# कांहीं मननीय व मनोरंजक चरित्रें

****

**डॉ. भाऊ दाजी लाड.** लेखक श्री. ना. कर्नाटकी. धंदा डॉक्टरीचा खरा, पण विद्वत्ता चौफेर धावणारी, सबंध आयुष्यभर, वैद्यकीचा व्यवसाय करीत असतां, संकृत ग्रंथांचें, जुन्या शिलालेखांचें, ताम्रपटांचें संशोधन चालूच होतें. अव्वल इंग्रजींतील अनेक सामाजिक चळवळींचें नेतृत्व यांजकडे होतें.

पृष्ठें १३०. किंमत ०–१२–० आणे

***

**चक्रवर्ति नेपोलियन.** आपल्या पराक्रमांनीं व दराऱ्यानें एक वेळ साऱ्या युरोपखंडाला हालविणाऱ्या या वीरपुरुषाचें हें चरित्र प्रसिद्ध इतिहासकार वि. ल. भावे यांनीं सर्व उपलब्ध चरित्रांचा उपयोग करून लिहिलें आहे. पृष्ठें सुमारें ६००. किंमत रु. ३–१२–०.

***

**प्रिन्स बिस्मार्क.** गेल्या महायुद्धांत आपल्या रणकौशल्यानें सगळ्या जगाला कौतुक करावयाला लावणाऱ्या व आजहि बलिष्ठ असणाऱ्या संघटित जर्मनीच्या मूळ जनकाचें हें चरित्र आकर्षक, तितकेंच बोधप्रद आहे. पृष्ठें सुमारें ६००. किंमत रु. ३–१२–०.

***

**कौंट टॉलस्टॉय.** महात्मा गांधींना सत्याग्रहाच्या तत्त्वज्ञानाची ज्याचेकडून पहिली संथा मिळाली तीच ही रशियन विभूति होय. लक्षाधीश असूनहि गरिबांच्या सेवेसाठीं अमीरीचा त्याग करून यानें फकीरी स्वीकारली. उत्कृष्ट कादंबरीकार म्हणून तर याचा लौकिक त्रिखंड आहे. किंमत ५ रुपये

भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प १०० वें.

# आजकालचा महाराष्ट्र

## वैचारिक प्रगति



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।

—भगवान् श्रीकृष्ण.

— लेखक —

प्रभाकर पाध्ये, बी. ए.

श्री. रा. टिकेकर

# अनुक्रमणिका

# आश्रयदात्यांशीं दोन शब्द

आज 'माले'च्या आश्रयदात्यांच्या हातीं, 'माले'चें बराच काळपर्यंत द्याव-याचें राहिलेलें हें शंभरावें पुस्तक देतांना आम्हांला आनंद होत आहे. 'माले'च्या नेहमींच्या पुस्तकांहून याची घडण वेगळी आहे. अशा तऱ्हेचीं पुस्तकें इंग्रजी भाषेंत कितीतरी लिहिलीं जातात. एकहि आठवडा असा सुना जात नाहीं, कीं ज्यांत चालू घडीला जगांत चाललेल्या नानाविध घडमोडींवर लिहिलेलीं सर्वसामान्य लोकांना समजतील व रुचतील अशीं चर्चात्मक, टीकात्मक किंवा समालोचनात्मक पुस्तकें निघालीं नाहींत. ज्यावेळेला ज्या व्यक्तीकडे, ज्या राष्ट्राकडे, ज्या चळवळीकडे व ज्या घडामोडीकडे जगाचें लक्ष्य वेधलेलें असेल, ज्याबद्दलची माहिती करून घेण्याविषयीं जग अत्यंत उत्सुक झालेलें दिसून येत असेल, त्यावेळेला त्या त्या विषयांवर पुस्तकें लिहून घेऊन तीं प्रसिद्ध करण्याची तत्परता युरोप–अमेरिकेंतील प्रकाशक नेहमींच दाखवितांना दिसतात. आपल्याकडे ही तत्परता फारशी दिसत नाहीं. आणि त्याला कारणेंहि आहेत. तिकडील लोकांप्रमाणें भोंवतालच्या जगांत काय चाललें आहे, हें समजून घेण्याची उत्सुकता आमच्यांत नाहीं हें एक, आणि ज्या थोड्या फार लोकांत ती असेल अशांचें समाधान होईल असें लेखन करणारे व्यासंगी व अद्यावत् अभ्यासू लेखक नाहींत, हें दुसरें. अशा स्थितींत, प्रस्तुत पुस्तका-सारखें पुस्तक प्रसिद्ध करणें हें एक धाडसच ठरेल. 'मागणी तसा माल' हें व्यावहारिक तत्त्व एका बाजूस ठेवून, 'आधीं माल मग मागणी' हें तत्त्व डोळ्यांपुढें वागविल्यास केव्हां केव्हां अनपेक्षित यश मिळतेंहि.

सर्वसामान्य समाज हा वैचित्र्यप्रिय आहे. नेहमींहून कांहीं तरी वेगळें त्याला लागत असतें. त्याचा फायदा घेऊन जर कांहीं प्रयत्न केला तर सहसा तो निष्फळ होणार नाहीं अशी आमची समजूत आहे. आणि या समजुतीनेंच 'आजकालचा महाराष्ट्र' यासारखें पुस्तक आम्हीं प्रसिद्ध करीत आहों.

व्यक्तीच्या आयुष्यांत काय किंवा राष्ट्राच्या आयुष्यांत काय असा एक काळ येतो, कीं ज्यावेळेस त्याला, आपण आजवर केलें काय, करीत आहोंत काय, आणि पुढें करणार काय याचा विचार करावासा वाटतो; आणि त्याचें आत्मनिरीक्षण सुरू होतें. महाराष्ट्राच्या आयुष्यांतहि आज

दोन शब्द

हाच काळ आला आहे. गेलीं चौदा--पंधरा वर्षें आपण पहात आहोंत, कीं महाराष्ट्र दिवसेंदिवस पिछाडीला अधिकाधिक रेंटला जात आहे. आणि तें पाहून आपल्याला खेदहि होतो. पण असें कां होत आहे याची चिकित्सा फारशी होत नाहीं. 'एकेकव्याचा सद्दीचा काल असतो; एकवेळ तो आपला होता, आतां दुसऱ्यांचा आला,' असें म्हणून आपण आपलें कसेंतरी समाधान करून घेतों, आणि स्वस्थ बसतों. पण, जीवंत राहूं इच्छिणाऱ्या राष्ट्राला हें शोभत नाहीं. शरीर थकूं लागलें किंवा त्याला व्याधी उत्पन्न झाली, कीं आपण त्याची लगेच वैद्यकीय चिकित्सा करून औषधयोजना करतों. तसेंच राष्ट्रपुरुषाचें शरीर थकूं लागलेलें दिसतांच, इतर राष्ट्रांच्या शर्यतींत मागें मागें पडूं लागलेलें दिसतांच, त्याच्या कारणाची चिकित्सा होऊन लगेच उपाययोजना झाली पाहिजे. ही चिकित्सा व योजना ज्यांचे हातून होणार नाहीं, त्यांचें तें राष्ट्र, पूर्वी कितीहि महान् असलें, कितीहि वैभवशाली असलें व कितीहि बलिष्ट व कर्तबगार असलें तरी, फार दिवस टिकाव धरूं शकणार नाहीं. आणि हें लक्ष्यांत घेऊनच या पुस्तकाची रचना झाली आहे.

या पुस्तकाचे दोघेहि लेखक तरुण आहेत, पण एकाचा चौरस व्यासंग व दुसऱ्याचें डोळस पर्यटन, यामुळें अशा तऱ्हेचें पुस्तक लिहावयास जी एक विशिष्ट दृष्टि व मनाची घडण लागते ती दोघांतहि आहे, याचें प्रत्यंतर पुस्तक वाचीत असतां येईलच. असो.

'माले'च्या आश्रयदात्यांस हा आमचा नवा प्रकार आवडून तशातऱ्हेचे नवीन नवीन प्रकार सुरू करण्यास आम्हांला ते सक्रिय प्रोत्साहन देतील अशी आशा आहे.

प्रकाशक

---

# वक्तव्य

महाराष्ट्रांत बुद्धीशिवाय दुसरें कांहींच पिकत नाहीं असें म्हणतात. अर्थात् महाराष्ट्राचा इतिहास म्हणजे प्राधान्येंकरून त्याच्या बुद्धीच्या उत्कर्षापकर्षाचा इतिहास म्हणावयाचा. सद्यःस्थितीचा विचार केला तर असें दिसून येईल कीं महाराष्ट्रीयांचें आजचें आद्यकर्तव्य जर कोणतें असेल तर तें आत्मनिरीक्षण. आणि तें करतांना महाराष्ट्राची बुद्धि खरी केव्हां चमकली व तिच्या अपकर्षाच्या वेळीं त्याला कोणती परिस्थिति कारण झाली याचाच विचार करावा लागेल. बुद्धिप्रधान महाराष्ट्राचा परप्रांतीयांवर कठोर टीका करण्याविषयीं फार जुना लौकिक अगर दुर्लौकिक आहे. महाराष्ट्रांत केवळ टीकाकारच जन्मास येतात असें म्हणण्याची पद्धत यामुळेंच पडली असावी. परंतु खरा टीकाकार हा इतरांचें परीक्षण करतांना जितका कठोर बनतो, तितकाच न्यायनिष्ठुर तो आत्मनिरीक्षण करण्यांतही असतो, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. प्रस्तुत पुस्तक हें या आत्मनिरीक्षणाचेंच फळ आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. न्यायनिष्ठुर आत्मनिरीक्षणाचें फळ हें केव्हांही कडूच असणार. तेव्हां सदरहू पुस्तक आमच्या वाचकांस कडवट वाटल्यास तो त्या पुस्तकाचा एक स्वभावधर्मच आहे असें त्यावर उत्तर देतां येईल. परंतु आत्मनिरीक्षणाचें कार्य सोपें नाहीं; मनुष्यप्राण्याला आत्मनिरीक्षण हें स्वभावतःच अप्रिय असतें; आणि या पुस्तकाचे लेखक या नियमाला अपवाद ठरण्याइतके अतिमानुषही नाहींत.

वस्तुतः आत्मनिरीक्षणात्मक पुस्तक लिहिणें फार मोठें जबाबदारीचें व जोखमीचें काम आहे. आणि अशा प्रकारचें पुस्तक लिहून काढण्याची ज्यांची खरी योग्यता आहे अशा ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध विद्वानांवर तें लिहून काढण्याची एक सामाजिक जबाबदारीच असते. परंतु वडील माणसांनीं जी कामगिरी आपल्या शिरावर घ्यावयाची टाळली ती यथाशक्ति पार पाडण्यास तरुणांनीं पुढें येऊं नये असें थोडेंच आहे? शिवाय, 'क्रियावान् एव पण्डितः' हें तर सुभाषितच गणलें जातें. तेव्हां स्वतःची थोडीबहुत अपात्रता ध्यानांत धरूनही आम्हीं ही जबाबदारी स्वीकारली. अर्थात् ती

कितपत पार पडली आहे हें पाहाण्याचें काम विद्वान् टीकाकार करतीलच. त्यांचा अभिप्राय कसाही पडला तरी प्रस्तुत पुस्तकाचे लेखकांना एक समाधान सदैव राहील. महाराष्ट्राच्या वैचारिक चक्रव्यूहाचा भेद करण्यांत आम्हांस यशापयश कितीही आलें असलें तरी प्रयत्न केल्याचें समाधान आम्हीं मानावें कीं नाहीं ?

भारत-गौरव-ग्रंथमालेच्या इतर पुष्पांपेक्षां शंभरावें पुष्प अधिक वैशिष्ट्यनिदर्शक असावें व त्याकरितां महाराष्ट्राच्या बौद्धिक करामतीचें मोजमाप निर्हेतुकपणें व निस्पृहपणें करणारा ग्रंथ कोणातरी अधिकारी व्यक्तीकडून लिहवून घ्यावा असा श्री. मंगेशराव यांचा हेतु होता. पण सर्वच हेतू सर्वच वेळां सिद्धीस जातात असें नाहीं. अनेक अडचणींमुळें तें काम दिरंगाईवर पडलें व त्यामुळें १०० वें पुष्प तसेंच राखून पुढचीं पुष्पें प्रसिद्ध करावीं लागलीं. शेवटीं हें काम अधिक काल लांबविणें योग्य नाहीं याची तीव्र जाणीव झाल्यामुळें श्री. मंगेशरावांनीं ती कामगिरी त्या वेळीं कर्नाटक प्रेसमध्यें नुकतेच नोकरीला लागलेले श्री. टिकेकर यांना सांगितली. परंतु पुस्तकाचें एकंदर स्वरूप टिकेकरांना समजावून दिल्यानंतर, प्रभाकर पाध्ये यांचें सहकारित्व आपणास मिळालें तर ही कामगिरी पार पाडण्यास सुलभ जाईल असें श्री. टिकेकर यांनीं सांगितलें; व श्री. कुळकर्णी यांनीं कार्याचें महत्त्व जाणून टिकेकरांच्या मागणीला तत्काळ मान्यता दिली. अशा प्रकारें अगदीं अनपेक्षित रीतीनें माझी योजना टिकेकरांचा सहकारी म्हणून त्या कार्यावर झाली. या घटनेमुळेंच सदरहू पुस्तकाचे बाबतींत आमचीं दोघांचीं नांवें एकत्र येण्याचा योग जुळून आला. एकादें कार्य एका ऐवजीं दोघांनीं करावयाचें ठरविल्यास श्रमांची विभागणी होऊन कार्य अधिक सुलभ होतें, हें तत्त्व जरी प्रायः खरें असलें तरी केव्हां केव्हां सहकाऱ्यापासूनच त्रास होऊं लागल्यास मूळ कार्य अधिकच बिकट होऊन बसतें यांत संशय नाहीं. प्रस्तुत पुस्तक मला एकट्यालाच लिहावें लागलें असतें तर जितका मनस्ताप झाला असता त्यापेक्षां अधिक मनस्ताप मला हें पुस्तक लिहितांना व मागाहून सुधारतांना झाला असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं. कारण, पुस्तकाला सुरवात केल्यापासून अल्पावधींतच आमच्या विचारसरणींत महत्त्वाचे मतभेद दृग्गोचर होणार असें वाटूं लागलें. अशा स्थितींत मला काम सुरू ठेवणें कठिण होतें.

परंतु श्री. मंगेशराव व श्री. टिकेकर यांना दिलेलें वचन पूर्ण करण्याकरितां मी काम सुरू ठेविलें व माझ्या मूलभूत विचारसरणीस बाध न येईल अशा बेतानें मजकूर पुरवीत राहिलों. पुस्तक साधारण पुरें झाल्यावर मी सेवानिवृत्त झालों व पुस्तकांत आणखी कांहीं भाग घालून टिकेकरांनीं तें छापण्यासही दिलें. परंतु १९३४ च्या अखेरीस श्री. टिकेकर कर्नाटक छापखान्यांतून सेवानिवृत्त झाले. त्या वेळीं पुस्तकाचीं सुमारें दीडशें पृष्ठें म्हणजे चिपळूणकरां-वरील प्रकरण जमेस धरून पुस्तकाचा पहिला सुमारें निम्मा भाग टिकेकरांच्या देखरेखीखालीं कंपोज होऊन पडला होता. बाकीचा भाग तसाच राहिला. तें काम हातीं घेण्याबद्दल मंगेशरावांनीं मला सांगितलें व एकंदर पुस्तकांत मला आवश्यक वाटत असलेले सर्व फेरबदल करण्यास परवानगीही दिली. अशा प्रकारें सदरहू पुस्तक सुधारून छापून काढण्याची अत्यंत महत्त्वाची व जोखमीची जबाबदारी मजवर पडल्यामुळें माझें काम किती अवघड झालें असलें पाहिजे याची कल्पनाच केलेली बरी. पुस्तकाचीं दीडशें पृष्ठें कंपोज होऊन पडलीं होतीं. कंपोज झालेल्या मजकुरांत दुरुस्त्या, सुधारणा व गाळागाळ करणें याला कांहीं मर्यादा असते. आणि त्या मर्यादेच्या कक्षेंत ‘ मुद्राराक्षसाची ’ रागीट नजर मजसमोर सदोदित असतां तो भाग मला सुधारावा लागला. बरें, उरलेला भाग सर्वस्वीं पुनर्लिखित करण्याइतका अवधिही नव्हता. तितका अवधि असता तर ‘ टिळक ’ व गोखले ’ हीं प्रकरणें अधिक व्यवस्थित व व्यापक स्वरूपांत वाचकांना सादर करणें शक्य झालें असतें. तरीही कांहीं मजकूर [ उदाहरणार्थ, युद्धोत्तर महाराष्ट्र, समालोचन हीं प्रकरणें ] आमूलाग्र पुनः लिहावा लागला; व त्यामुळेंच प्रस्तुत पुस्तक बाहेर पडण्यास विलंब लागत आहे.

इतकें सर्व करूनही या पुस्तकांत कांहीं थोडासा गंगाजम्नी प्रकार झालाच आहे. दोघांनीं मिळून लिहिलेल्या पुस्तकांत अमुक एक भाग सर्वस्वीं एकट्याचा असें म्हणतां येत नाहीं. तरीपण माझ्या विचारसरणीची जबाबदारी मी माझ्या एकट्याच्या शिरावर घ्यावयास तयार असल्यामुळें एक गोष्ट स्पष्टपणें येथें सांगितलेली बरी. ती हीच कीं, हें पुस्तक मी विशिष्ट दृष्टीनें सुधारलें व लिहिलें असून ती दृष्टि ‘ समालोचन ’ या प्रकरणांत एकत्र साकल्यानें पाहावयास मिळेल.

इतकेंच नव्हे, तर पुस्तकांतील दोघांनीं लिहिलेला भाग कोणता व प्राधान्येंकरून एकेकट्यानें लिहिलेला कोणता हें कळणें वाचकांच्या व लेखकांच्याही दृष्टीनें इष्ट असल्यामुळें, महाराष्ट्र, शिवशाही, पेशवाई, टिळक व गोखले हीं प्रकरणें टिकेकरांनीं; (वासुदेव बळवंतावरील मजकूर सोडून) अव्वल इंग्रजी, जांभेकर, फुले, रानडे, भांडारकर, चिपळूणकर, आगरकर, युद्धोत्तर महाराष्ट्र, समालोचन, व (चारपांच प्रकरणें सोडून) परिशिष्ट नं. १, हीं मी; व बाकीचीं आम्हीं दोघांनीं लिहिलीं असल्याचा खुलासा करून ठेवतों.

या पुस्तकाचें मुद्रण चालू असतांच श्री. टिकेकर यांची निर्भीड, महाराष्ट्र-शारदा, प्रवासी इत्यादि नियतकालिकांतून लोकहितवादी, चिपळूणकर, जांभेकर, विष्णुबुवा ब्रह्मचारी वगैरे व्यक्तींवर जी लेखमाला सुरू झाली आहे तिचा संबंध वाचकांनीं या पुस्तकाशीं जोडल्यास नवल नाहीं. प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशनानें त्या लेखमालेंत खंड पडेल असें नव्हे. रामनाम जितकें अधिक वेळां घ्यावें तितकें त्याचें पुण्य अधिक असें भाविक लोक समजतात. महाराष्ट्रांतील थोर व्यक्तींचीं चरित्रें व विचार यांचीही अशा रीतीनें पुन्हा उजळणी झाल्यास महाराष्ट्राच्या वाङ्मयास तरी तें भूषणावहच आहे.

वस्तुतः हें पुस्तक श्री. टिकेकर यांनीं एकट्यांनींच अथपासून इतिपर्यंत लिहिलें असतें (दुर्दैवानें त्यांनीं ती जबाबदारी स्वीकारली नाहीं) तर तें आज वाचकांच्या हातीं पडत आहे त्याहून अगदीं वेगळ्या स्वरूपाचें पडलें असतें. हरप्रयत्नानें बातम्या व मतें गोळा करणें, त्यांबद्दल निरनिराळ्या व्यक्तींना गांठून त्यांच्याशीं चर्चा करणें व त्यांच्या अनुरोधानें लेखन सजविणें यांत श्री. टिकेकर यांचा (ते प्रवासी बातमीदार व कसलेले वृत्तपंडित असल्यामुळें) हातखंडा आहे. कोणापासून केव्हां व कशी माहिती मिळवावी ही कला श्री. टिकेकर यांना चांगलीच अवगत असल्यामुळें त्यांनीं श्री. न. र. फाटक व रियासतकार सरदेसाई वगैरे विद्वानांचा या पुस्तकासाठीं उपयोग करून घेतला असल्याचें मला माहीत आहे. श्री. टिकेकरांची कला मजपाशीं नसल्यानें आणि प्रयत्नसाध्य असली तरी तितका अवधि शिल्लक नसल्यामुळें मला सारी भिस्त स्वतःच्या अल्पस्वल्प विवेचक बुद्धीवरच ठेवावी लागली. मात्र पुस्तकाचें

एकंदर स्वरूप प्रायः विवेचक पद्धतीचें असल्यामुळें एवढें भांडवल पुरेल असें वाटतें.

आतां एक गोड कार्य पार पाडून ही लांबलेली प्रस्तावना आटोपती घेतों. श्री. न. र. फाटक व रा. सा. सरदेसाई (रियासतकार) यांचा उल्लेख वर आलाच आहे. विशेषतः श्री. फाटक यांची या पुस्तकाला बरीच मदत झाली. "कालगणना" या परिशिष्टांत जर कांहीं निर्दोषत्व असेल तर तें बरेंचसें त्यांच्यामुळें आहे हें विसरून चालणार नाहीं. श्री. विठ्ठल हरि कुळकर्णी यांची मदत या पुस्तकाला कशी व किती प्रकारें झाली तें वर्णन करून सांगणें कठीण आहे. श्री. विठ्ठलराव यांनीं या पुस्तकाचे पायीं जो त्रास घेतला व जी यातायात सहन केली त्यांना मजवरील त्यांच्या अकृत्रिम प्रेमाखेरीज दुसरें कांहींही कारण नाहीं. त्यांचें उत्तेजन व मदत मला नसती तर हें पुस्तक आहे या स्वरूपांत बाहेर पडलेंच नसतें. श्री. दौंडकर यांच्या मदतीचें स्वरूपही पुष्कळसें तसेंच आहे. माझे दुसरे स्नेही 'नवाकाळ'चे श्री. ज. म. घाटे यांचाही उपयोग मला झाला. 'आर्यसमाज' हें प्रकरण 'राम' [लाला लजपतराय यांच्या आत्मचरित्राचे मराठी अनुवादक] यांचें आहे. मलपृष्ठावरील चित्र श्री. धोपेश्वरकर यांनीं काढलें असून त्याची मूळ कल्पना माझे पार्ल्याचे स्नेही श्री. रा. भि. जोशी यांची आहे.

श्री. मंगेशराव कुळकर्णी यांचा उल्लेख केल्याखेरीज या प्रस्तावनेला पूर्तता येऊं शकत नाहीं. श्री. कुळकर्णी यांचा उत्साह, त्यांचा प्रेमळपणा, त्यांचें सौजन्य इत्यादि गुणांचा निर्देश केल्याखेरीज माझ्यानें कसें राहावेल? या पुस्तकाचे पायीं त्यांनीं जे कष्ट सोसले, जो मनस्ताप सहन केला, व जी मनाची शांति दर्शविली त्या सर्वांची मला चांगलीच कल्पना आहे. लेखक व प्रकाशक यांमध्यें हल्लीं वर्गयुद्ध सुरू आहे कीं काय असा संशय अलीकडील कांहीं प्रकारांवरून येतो. अशा परिस्थितींत माझा श्री. मंगेशरावांसारख्या प्रकाशकांशीं संबंध यावा हें मी माझें भाग्य समजतों.

ता. २० एप्रिल १९३५.<br>
कर्नाटक हाऊस;<br>
गिरगांव—मुंबई २.

प्रभाकर पाध्ये.

# संदर्भ-ग्रंथ

चरित्रेंः—

वासुदेव बळवंत फडके यांचें चरित्र [ ले० रा. ग. बोरवणकर ]
बाळशास्त्री जांभेकर यांचें चरित्र [ ले० बा. ना. देव ]
कै० बाळशास्त्री जांभेकर [ ले० राजारामशास्त्री भागवत ]
लोकहितवादी यांचें चरित्र [ ले० कृ. ना. आठल्ये ]
लोकहितवादी [ ले० ग. ह. केळकर ]
महात्मा जोतिराव फुले [ ले० पं. सि. पाटील ]
विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचें चरित्र [ ले० रा. पां. आजरेकर ]
न्या० महादेव गोविंद रानडे यांचें चरित्र [ ले० न. र. फाटक ]
*Mahadeo Govind Ranade* ( By J. Kellock )
*Eminent Indians* ( Natesan & Co., Madras )
आत्मवृत्त [ ले० धों. के. कर्वे ]
रामकृष्ण गोपाळ भाण्डारकर [ ले० द्वा. गो. वैद्य ]
विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र [ ले० ल. कृ. चिपळूणकर ]
गोपाळ गणेश आगरकर ( चरित्रात्मक निबंध ) [ ले० मा. दा. आळतेकर ]
आगरकर-चरित्र [ ले० वि. स. खांडेकर ]
आगरकर [ ले० वि. ह. कुळकर्णी ( अर्वाचीन वाङ्मयसेवक-सं० गं. दे. खानोलकर ) ]
लो० टिळक यांचें चरित्र [ ले० न. चिं केळकर ]
*Lokamanya Tilak* ( By D. V. Athalye )
ना० गोखले यांचें चरित्र [ ले० पां. सा. साने ]
श्रीसमर्थ रामदास [ ले० वि. का. राजवाडे ]
प्रार्थनासमाजाचा इतिहास ( चरित्रलेख ) [ ले० द्वा. गो. वैद्य ]

## संदर्भ-ग्रंथ

### लेखसंग्रहः—

निबंधसंग्रह [ ले० लोकहितवादी ऊ० सरदार गोपाळराव हरि देशमुख ]
*Indian Social Reform* ( Ed. G. Y. Chintamani )
*Essays on Indian Economics* ( By M. G. Ranade )
*Miscellaneous Writings* ( By M. G. Ranade )
धर्मपर व्याख्यानें [ ले० महादेव गोविंद रानडे ]
धर्मपर लेख आणि व्याख्यानें [ ले० रा. गो. भाण्डारकर ]
धर्मपर व्याख्यानें [ ले० ना. ग. चन्दावरकर ]
निबंधसंग्रह भाग १-२-३ [ ले० गोपाळ गणेश आगरकर ]
निबंधमाला [ ले० विष्णुशास्त्री चिपळूणकर ]
केसरींतील निवडक निबंध भा० १
लो० टिळकांचे केसरींतील लेख भाग १ ते ४.
*Speeches* ( By. G. K. Gokhale )

### स्वतंत्र ग्रंथ—

शिवाजी आणि शिवकाल [ ले० यदुनाथ सरकार ]
आज्ञापत्र
मराठी रियासत [ ले० गो. स. सरदेसाई ]
ब्रिटिश रियासत ( पूर्वार्ध ) [ ले० गो. स. सरदेसाई ]
*History of Village Communities in Western India* [ By A. S. Altekar ]
ऐतिहासिक गोष्टी भा. १ [ ले० लोकहितवादी ]
शिरस्तेदार [ ले० वि. कों. ओक ]
*Economic Annals of Bengal* ( By J. C. Sinha.)
*Scientific Outlook* ( By Bertrand Russell )
गुजरात देशाचा इतिहास [ ले० लोकहितवादी ]
*The Sex Expression in Literature* ( By V. F. Calverton )
गुलामगिरी [ जोतीराव फुले ]
सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक [ ले० जोतीराव फुले ]
सुखदायक राज्यप्रकरणी निबंध [ ले० विष्णुबुवा ब्रह्मचारी ]

वेदोक्त धर्मप्रकाश [ ले० विष्णुबुवा ब्रह्मचारी ]
विधवाविवाह [ ले० वि. प. पंडित ]
प्रार्थनासमाजाचा इतिहास [ ले० द्वा. गो. वैद्य ]
*Ends and Aims of College Education* ( By R. G. Bhandarkar )
ब्राह्मणेतर वादाचें स्वरूप [ ले० वा. कृ. भावे ]
स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा [ ले० खरे व केळकर ]
मराठी गद्याचा इंग्रजी अवतार [ ले० द. वा. पोतदार ]
पिराजी पाटील [ ले० धनुर्धारी ]
विष्णु कृष्ण चिपळूणकर ( द्विविध दर्शन ) [ ले० ग. त्र्यं. माडखोलकर व श्री. बनहट्टी ]
*Political Thought in England* ( The Utilitarians ) [ By Davidson ]

## संकीर्ण

महाराष्ट्र ज्ञानकोश [ सं० डॉ० केतकर ]
महाराष्ट्र–सांवत्सरिक ( १९३३ व १९३४ ) [ सं० श्री. म. माटे ]
केसरी–प्रबोध
अर्वाचीन वाङ्मय सेवक [ गं. दे. खानोलकर ]
विविधज्ञानविस्तार ( १९३० )
भारत–इतिहास–संशोधक–मंडळ त्रैमासिक ( वर्ष ६ वें )
केसरी ( टिळक–अंक )
*A Report on the Territories of the Peshawa* [ Elphinstone ]
*Shivaji Souvenir*
*Peshva Daftar Selections*
*Bengal Gazetteers* ( Murshidabad )
*Bombay Gazetteers* (Poona, Satara, Ahmednagar, Nasik etc.)
*Deccan Riots Committee Report*

याशिवाय, भूषणकाव्य, दिल्लींतील मराठ्यांचें राजकारण, सत्यशोधक समाजाचा रिपोर्ट वगैरे.

# १ महाराष्ट्र

१ महाराष्ट्रदेश  २ मराठी राज्याचा विस्तार
३ मराठ्यांची राष्ट्रीय कामगिरी  ४ आधुनिक कर्तबगारी
५ समाजनिरीक्षण

१. तापी, सीना व वारणा ह्या तीन नद्यांनीं, 'महाराष्ट्र' अशी संज्ञा असलेल्या देशाच्या, अनुक्रमें उत्तर, पूर्व व दक्षिण हद्दी रक्षिल्या असून, पश्चिम बाजूस अरबी समुद्र आहे. पण 'महा'राष्ट्राची व्याप्ति एवढ्या आकुंचित मर्यादेंत फार काळ राहिली नाहीं. औरंगाबाद महाराष्ट्रांत समाविष्ट होतें. तेथून पूर्वेकडे महाराष्ट्र सरकत गेलें तें नागपूरपर्यंत. दक्षिणेस कावेरीपार तंजावरपर्यंत मराठ्यांचें राज्य पसरलें. उत्तरेस ग्वाल्हेर, इंदूर, हीं शहरेंसुद्धां मराठी टापूंत मोडूं लागलीं. गोमंतक महाराष्ट्रीय असल्यानें, ढोबळ मानानें नागपूर ते गोवें, गोवें तें बडोदें, व बडोदें ते नागपूर असा त्रिकोण महाराष्ट्राची सीमा दर्शविण्यास पुरेसा आहे. परंतु बृहन्महाराष्ट्रांत या बाहेरचे किती तरी विभाग येतील. इंदूर व ग्वाल्हेर हीं दोन संपन्न संस्थानें शुद्ध मराठी आहेत. तंजावर येथें तर खुद्द छत्रपतींचें राज्य होतें. शहाजी राजांनीं मिळविलेल्या

जहागिरीवर शिवाजी महाराजांचे सावत्र भाऊ आरूढ झालेले. शहाजीच्या वेळेपासून गेलेलीं मराठी घराणीं अद्याप तिकडे आढळतात. बंगलोरमध्येंही मराठमोळा आहे. मद्रास इलाख्यांतील महाराष्ट्रीय समाज हा एका दृष्टीनें शुद्ध स्वरूपांत राहिलेला म्हणून मानतां येतो. कारण ज्या देशांत त्यांनीं पराक्रम गाजविले, त्याच देशास स्वदेश मानून तेथें ते स्थाईक झाले. त्यामुळें आक्रमणाची भावना उत्तरपेशवाईंत मराठ्यांच्या आंगीं जशी बाणलेली दिसते, तशी मद्रासेकडील मराठ्यांत ती आढळत नाहीं. त्यांचा पुणें, सातारा येथील सत्ताधाऱ्यांशीं संबंध उरला नसल्यानें ते तिकडे स्वतंत्र राहिले. पण मराठेपणाच्या अभिमानाला आजमितीसही मात्र ते पारखे झाले नाहींत, हें स्वाभाविक होय. आपण बाहेरून येऊन येथील मुलुख जिंकला ही गोष्ट ते कशी विसरतील ?

यांच्या उलट उत्तराभिमुख झालेल्या मराठ्यांची वृत्ति आढळते. शिवपूर्व कालांतही कांहीं मराठे उत्तराभिमुख झाले व तिकडेच ते कायम राहूं लागले असें दिसतें. जहांगीरच्या रोजनिशींत कित्येक मराठे सरदार मोगलांस येऊन मिळाल्याचा उल्लेख आहे. शहाजहान युवराज असतां त्याच्या मदतीस दख्खनचे मराठे स. १६२३ मध्यें दिल्लीपर्यंत गेले होते. पण सध्यांच्या संयुक्त प्रान्तांत कांहीं मराठी घराणीं शिवपूर्वकालीं तिकडे स्थिरावलेलीं असून, आपलें पूर्ववृत्त अजीबात विसरलेलीं दिसतात. पानपतावर मराठ्यांचा अब्दालीशीं संग्राम झाला, त्यांत हे संयुक्तप्रांतीय मराठे गिलच्यांचे पक्षपाती बनून त्यांनीं स्वजनांचा घात केला, इतकें विवेकशून्य जिणें त्यांचें होतें! ही मंडळी उत्तरेकडे कधीं व कशी गेली याला निश्चित पुरावा कांहींच नाहीं. (कलकत्त्याच्या उपनगरांत तिकडे पिढ्यान् पिढ्यांचीं कायम झालेलीं कांहीं मराठे घराणीं आहेत म्हणतात. पण त्यांचाही इतिहास फारसा अवगत नाहीं.) दक्षिणेंत मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊन पैठणचें वर्चस्व कमी होतांच, तेथील कांहीं घराणीं उत्तराभिमुख झालीं असावीं. किंवा नंतरच्या दुर्गादेवीच्या दुष्काळांतही बऱ्याच जणांना देशत्याग करण्याची पाळी आली असावी. आणि म्हणून आक्रमणशील मराठ्यांचा अभिमानी बाणा त्यांच्या रक्तांत उतरला नसावा.

मराठशाहींत महाराष्ट्राबाहेर मराठ्यांच्या ‘छावण्या’ होत्या, त्या हळुहळू जहागिरी बनून, त्यांतील मंडळी तेथेंच स्थायिक झाली. बडोद्याचे गायकवाड, उज्जैन

ग्वाल्हेरचे शिंदे, महेश्वर इंदूरचे होळकर, नागपूरचे भोसले, यांचीं आजचीं मराठी राज्यें अशींच निर्माण झालीं आहेत; झांशीचे खेर, सागरचे बुंदेले,......हेही त्यापैकींच. पण ह्या मराठ्यांत आक्रमणवृत्ति होती. किंबहुना आक्रमणवृत्तीमुळेंच ते इतके दूरवर पांगले गेले. आणि त्या वृत्तीचा विसर पडल्यावर त्या मराठ्यांतला ‘राम’ नाहींसा झाला !

ह्या मराठ्यांचा उत्कर्ष इतक्या झपाट्यानें झाला, कीं प्रथम त्यांच्या पराक्रमावर कोणाचा विश्वासच बसेना; कारण मुसलमानांशीं उत्कृष्ट स्वामिभक्तीनें निगडित अशा मराठ्यांत अवघ्या ४०–५० वर्षांत ‘छत्रपति’ निर्माण व्हावा, त्या छत्रपतींच्या नुसत्या नामोच्चारानें आग्रा–दिल्लीकडे बादशहाच्या झनानखान्यांतील बिबीजान गर्भगळित व्हाव्या, “हे मराठे नव्हेत, हैवान आहेत,” असें मोगल सुभेदारांनीं कपाळाला हात लावून म्हणावें—त्याला चिरडण्यास टपलेल्या पातशाहांनीं सहाय्यासाठीं त्यांजकडे दीनवाणीनें याचना करावी......वगैरे गोष्टी अपूर्व आहेत. त्यांस जगाच्या इतिहासांत तोड नाहीं. त्यांची स्पष्ट कल्पना येण्यास मराठ्यांचा राज्यविस्तार कसकसा होत गेला हें पाहिलें पाहिजे.

भोसल्यांची वतनवाडी प्रथम देवगिरीजवळ होती. नंतर त्यांस पुणें–सुपें इकडे जहागिर मिळाली. ही जहागिर हेंच शिवाजीचें स्वराज्य होय. त्या स्वराज्याची साम्राज्यांत परिणति किती झपाट्यानें झाली ती पहा :—

२. शिवाजीच्या पूर्वजांचें वतन दौलताबादेजवळील दहा पांच गांवांत होतें. त्यांनीं कित्येक गांवच्या पाटिलक्याही मिळविल्या होत्या. भोंसल्यांच्या पाटिलकीचे गांव सांगतात ते :—हिंगणी, बिरडी, देऊळगांव, खानवट, जिंती, कळस, वावी, मुंगीपैठण, नानजव व बनसेंद्र.

इ. स. १६०५:—शहाजीचा बाप मालोजी यास निजामशाहीकडून पुणें, इंदापूर, सुपें या प्रांतांची जहागिरी मिळाली. हीच भोसल्यांची पिढीजाद जहागिरी. तिचा विस्तार सुमारें २३०० चौरस मैल होता. [ ज्ञा. को. (म.)८७–८ ]

इ. स. १६४८:—इ. स. १६४७–४८ च्या सहा महिन्यांत शिवाजीनें दक्षिणेकडील कांहीं प्रांत जोडून आपल्या जहागिरीला स्वराज्याचें स्वरूप दिलें. घोडनदीपर्यंत उत्तरेकडे व दक्षिणेकडे इंदापूर, बारामती, राजगड,

तोरणा व बहुशः कोंडाणा सुद्धां, इतकी स्वराज्याची मर्यादा होती. (शिवाजी व शिवकाल. पृ. ३९)

इ. स. १६५९: उत्तरेकडेस डोंगर ओलांडून हें स्वराज्य देशावर पोंचलें, आणि दक्षिणेस सातारा जिल्हा आणि कोंकणांत माहुलीपासून महाडपर्यंत असें शिवाजीचें स्वराज्य विस्तीर्ण दिसूं लागलें. ( कित्ता पृ. ३९ )

इ. स. १६७४:—बागलाण, जव्हार व रामनगर हे प्रांत शिवाजीनें स्वराज्यास जोडले. पन्हाळा, कोल्हापूर व फोंडा स्वराज्यांत सामील केल्यानें दक्षिणेस शिवाजीचा अंमल दृढमूल झाला. ( कित्ता. पृ. १५३ )

इ. स. १६७५:—हा राज्यविस्तार कोल्हापुरापलीकडे गेला असून वर-घाटीं कर्नाटकांत जाऊन पोंचला होता. याप्रमाणें राज्यारोहणसमयीं स्वराज्याची मर्यादा वाढलेली होती. ( कित्ता. पृ. १५३ )

इ. स. १६८०:—शिवाजीच्या मृत्युसमयीं मराठी साम्राज्यांत खालील प्रान्त अन्तर्गत होते. मावळ, वाई, सातारा, पन्हाळा, दक्षिण कोंकण, बागलाण, त्र्यंबक, धारवाड, बिदनूर, कोलार, श्रीरंगपट्टण, कर्नाटक, वेलोर, तंजावर, कोप्पळ आणि जिंजी. शिवाजीच्या ताब्यांत असलेल्या किल्ल्यांची संख्या ते वेळीं सुमारें ३०० होती. या वेळची मराठी साम्राज्याची चतुःसीमा ठोकळ मानानें पुढीलप्रमाणें होतीः—पूर्वेस भीमा, पश्चिमेस अरबीसमुद्र, उत्तरेस गोदावरी आणि दक्षिणेस कावेरी. सबंध राज्याचा विस्तार सुमारें १,२०,००० चौरस मैल होता. [ ज्ञानकोश (म) पृ.–८७–८ ]

इ. स. १७४०:—पहिल्या बाजीरावानें माळवा, गुजराथ बुंदेलखंड, वऱ्हाड हे प्रांत मराठ्यांच्या सत्तेखालीं आणले. ( कित्ता )

इ. स. १७६०:—नानासाहेबाचे कारकीर्दीत अंतर्वेदि, पंजाब, ओरिसा, संयुक्त प्रांत इत्यादि मुलुखांवर मराठ्यांचे हक्क सुरू झाले. स. १७५८ मध्यें राघोबानें मराठ्यांचा झेंडा अटकेपार नेला. स. १७६० सालीं उदगीरच्या लढाईंत खानदेश, नगर, विजापूर इत्यादि ६२॥ लक्षांचा मुलुख मराठ्यांनीं मिळविला. ( कित्ता )

इ. स. १७७१:—माधवरावाचे कारकीर्दीत मराठी साम्राज्याचा विस्तार प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें हिंदुस्थानचे सुमारें $\frac{3}{4}$ भागावर होता. ( कित्ता )

# मराठ्यांची असामान्य मर्दुमकी

इ. स. १८०३:—मराठी साम्राज्याचा विस्तार शिवाजीच्या जहागिरीचे २३९ पट असून साम्राज्याचें उत्पन्न ५४ हजार पटींनीं होतें. (किंत्ता)

३. हिंदुस्थानांतल्या कोणत्याही लोकांस पूर्वी कधींही न साधलेला पराक्रम मराठ्यांनीं गाजविला. त्यांनीं नुसतें हिंदुस्थान पादाक्रान्त केलें असें नाहीं, तर दिल्लीच्या बादशहाला तर्जनीच्या तालावर, बाहुलें खेळवितात त्याप्रमाणें, नाचविलें. रजपुतांची शौर्याबद्दल शेकडों वर्षांची ख्याति आहे. त्यांच्या लढवय्येपणाचीं किती तरी वर्णनें आजसुद्धां ऐकूं येतात. त्यांच्या बायकादेखील रणधीर म्हणतात. त्यांनीं मोगल बादशाहीशीं टकरा कांहीं कमी दिल्या नाहींत. त्यांच्याशीं पिढ्यान् पिढ्या त्यांचा झगडा चालू असे. पण शेवटीं काय? तर आपल्या बहिणी–मुलींना बादशहाच्या झनानखान्यांत पाठविण्यास ते तयार झाले! केवळ आत्मरक्षणार्थ त्यांनीं हा मार्ग पत्करला. मोगलांची नुसती नोकरी स्वीकारून रजपूत राहिले नाहींत किंवा मलकाना जमातीनें सांघिकरीत्या धर्मांतर केलें एवढ्यावर त्यांचा अधःपात थांबला नाहीं. तर अकबराच्या मोहक भुलथापांना बळी पडून किंवा त्याच्या आक्रमणास भिऊन, रजपूत स्त्रियांना मोगलांच्या झनानखान्यांत पाठविण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला. त्यांच्या वंशपरंपरा चालत आलेल्या पराक्रमास हें कमीपणा आणणारें होतें. त्यांना एक जुटीनें राहून मोगल साम्राज्याचा पाया खिळखिळा करतां आला नाहीं; उलट तें साम्राज्य अधिक मजबूत करण्यांतच त्यांची मेहनत खर्च झाली......व्यापक दृष्टीनें या सर्व घटनांचा विचार केला तर मराठ्यांची मर्दुमकी असामान्य वाटत नाहीं काय?

पूर्वीचा इतिहास त्यांना विशेष स्फूर्तिदायक होता असें नाहीं. मन मानेल त्या शाहीची नोकरी करावी व आपला फायदा करून घ्यावा एवढी त्यांच्या पूर्वजांची विचारशक्ति होती. त्यांनीं मोंगलांशीं व दख्खनमधील इतर चार पांच पातशाह्यांशीं पुष्कळ स्वामिनिष्ठा दाखविली. असल्या मानसिक अवनतीची कमाल मर्यादा शहाजीचे काळीं पोंचली असावी असा तर्क होतो. तेव्हांचें वर्णन रामदासांनीं असें केलें आहेः—

**ब्राह्मण बुद्धीपासून चळले। आचारापासून भ्रष्टले।**
**गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्याचे॥ १॥**

**कित्येक दावलमलकास जाती । कित्येक पिरास भजती ।**
**कित्येक तुरुक होती । आपुले इच्छेनें ॥ २ ॥**
**राज्य नेलें म्लेंच्छ क्षेत्रीं । गुरुत्व गेलें कुपात्रीं ।**
**आपण अत्री ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥ ३ ॥**

ही सर्वसाधारण स्थिति असली तरी राजे शहाजी भोसले यांचें उदाहरण त्या मनोवृत्तीचें यथार्थ निदर्शक मानतां येतें. अंगीं शहामत व हातीं करामत असतांही त्यांना सेवावृत्तीच्या कक्षेंतून बाहेर पडण्याचें धारिष्ट नव्हतें. दरबारीं बाचाबाची झाली म्हणून हे छत्रपतींचे पितृराज दक्षिणेकडे गेले व स्वतः हिंदू असूनही तिकडील हिंदूराजांना जिंकून त्यांनीं आदिलशाहीची भर केली! माणसाळलेल्या हत्तीनें वन्यगजांना आणून खड्डयांत पाडावें तशांतलाच हा प्रकार झाला! आणि शहाजीसारखा शूर, कर्तबगार, धाडसी व पराक्रमी 'राजा' छत्रपति न होतां मांडलिकच राहिला. ही मांडलिकी झुगारून देतांना शिवाजीला किती बिकट परिस्थितींतून जावें लागलें याची कल्पना येण्यास त्याचा वतनावर कटाक्ष कां होता तें पहावें, म्हणजे त्या वेळीं फंदफितुरी किती माजत असे तें समजेल. 'आज्ञापत्रां'तील खालील एक दोन उताऱ्यांवरून त्याची बरीचशी कल्पना येईल. वतनदारांविषयीं त्यांत असें म्हटलें आहेः

"...सर्व देशाचा स्वामी म्हणजे राजा, त्यांशीं निष्ठेनें वर्तावें, कोणाचा अन्याय न करावा, ही यांची बुद्धीच नाहीं....बळकट व्हावें, दुसऱ्याचें घ्यावें, दावे दरवडे करावे हा यांचा सहज हव्यास. राज्यशासन येईल हें जाणोन अगोदरच दुसऱ्याचा आश्रय करतात. स्थळें बांधतात. त्या बळें वाटा पाडितात; देश मारितात; समयीं जिवाचीही तमा धरीत नाहींत. परचक्र आलें म्हणजे वतनाच्या आशेनें अगोदर सलूख करतात....स्वतः भेटतात. तिकडील भेद इकडे व इकडील भेद तिकडे करून राज्यांत शत्रूचा प्रवेश करितात...."†

असे वतनदार योग्य प्रकारें काबूंत ठेवले तर उपयोग. नाहीं तर त्यांच्या पासून उपद्रव अधिक व्हावयाचा. म्हणून " वतनदारांत उद्धत व उच्छृंखळ असा कोणी असला तर त्यास नांवाजून जें कठिण कार्य असेल तशा कार्यावर

† आज्ञापत्र पृ० ३०.

पाठवावें,"† असा उपदेश करणें भागच पडलें. त्यांची महति अशा प्रकारें वर्णिली आहेः—

"आधीं वतनदार ह्या एक विश्वास. ततोपि प्रामाणिक म्हणजे सोनें आणि सुगंध. या करितां अशांचा अत्यादरें संग्रह करावा."† फंद फितुरीचा प्रघात सर्रास रूढ झालेला असल्यानें त्याबद्दल कडक शिक्षा फर्मावली ती:—

"कदाचित् कोणी मामलेदार स्थळास संकट आलें म्हणून स्थळ गनिमास देऊन आपला जीव वाचवून गनिमाकडे गेला तरी तो यत्नेंकरून हस्तगत होई ते गोष्ट करावी. कदाचित् हातास न लागे तो उपायें करून मारवावा. उपाय करून गनिमाकडे गेला तो न ये असें झालें तरी त्याचे लेक गुलाम करावे, बायका बटकी कराव्या – त्यासही विष मारेकरी आदिकरून हरप्रयत्नें तेथील तेथें मारवावा." †

अशी कडक शिस्त राखण्याची जरुरी परिस्थितीमुळें पडली असली पाहिजे. आणि अशा प्रतिकूल वातावरणांतून झगडत जाऊन उत्कृष्ट व नमुनेदार कर्तबगारांची पिढी शिवाजीनें तयार केली यांत त्याचें श्रेष्ठत्व व विभूतिमत्त्व आहे. संभाजीचे वेळीं मराठ्यांनीं दर्शविलेली स्वामिभक्ति, राजनिष्ठा, व स्वदेशप्रेम, केलेला स्वार्थत्याग व बजावलेली कामगिरी खरोखरी अपूर्व आहे. पेशव्यांचे अमदानींत सुद्धां तमाम हिंदुस्थानभर त्यांचे वकील राहूं लागले, त्यांचा दबदबा जिकडे तिकडे पसरला, त्यांच्या विविध प्रकारच्या कार्यास माणसें मिळत गेलीं... हा सर्व प्रताप कमी प्रतीचा नव्हे.

कोंकणांतले भट अद्वितीय लढवय्ये व मुत्सद्दी झाले. भिक्षुकी करणारी मंडळी राजदरबारीं वकील म्हणून राहूं लागली, शेतावर राबणारे नांगरे किंवा मेंढ्या पाळणारे मेंढपाळ सेनानी बनून चारी दिशास त्यांची 'डर' बसूं लागली; इतकेंच नव्हे तर दीडशें वर्षांच्या अवधींत अखिल भारतीय राजकारणाची चर्चा पुण्यांत होऊं लागली. मराठ्यांसंबंधींचा विचार प्रत्येक प्रांतांतील अधिकाऱ्यां-पुढें उभा राहूं लागला. हिंदुस्थानाबाहेरच्या मुसलमानांची स्वारी दिल्लीवर होऊं लागली कीं मराठ्यांना दिल्लीपतींच्या सहाय्यास धांवावें लागे; आणि कर्मधर्मसंयोग

---

† आज्ञापत्र.

म्हणा किंवा अफगाणांची रग मराठ्यांनीं जिरविली म्हणून म्हणा, अब्दालीशीं मराठ्यांनीं पानपतीं सामना दिल्यानंतर पुनः म्हणून अफगाणांनीं दिल्लीवर स्वारी करण्याचा प्रयत्न केला नाहीं. त्यांना मराठ्यांनीं कायमची दहशत बसविली. म्हणूनच मराठ्यांचें व मराठी छत्रपतींचें कौतुक उत्तर हिंदुस्थानांत विशेष होतें. हिंदुस्थानांतील सर्व जाती व सर्व लोक मुसलमानांपुढें नरम आले असले, तरी मराठे मुळींच नरमले नाहींत. उलट त्यांनींच दक्षिणेंतील मुसलमानी पातशाह्यांना व खुद्द दिल्लीच्या बादशहालाही नरम केलें. अशा पराक्रमामुळें मराठ्यांचें नांव जिकडे तिकडे दुमदुमून राहिलें.

> " काशी हू की कला जाती मथुरा मसीद होती
> जब शिवाजी न होत तब सुन्नत होत सब की।"†

हे उद्गार एका हिंदुस्थानी कवीचेच आहेत.

शिस्तीच्या जोरावर किंवा धर्माच्या वेडांत पराक्रम गाजविणाऱ्यांचीं नांवें इतिहासांत आढळतात. पण मराठ्यांत पुढें पुढें शिस्त फारशी राहिली नाहीं. तरीही त्यांचें आक्रमण सारखें वाढत होतें; त्यांची भीति सर्वांना वाटत होती, याचें कारण मराठ्यांचें शौर्य हें असावें. स्वाभिमानाच्या वाऱ्यानेंच शौर्याचा निखारा फुलतो. मराठ्यांचा स्वाभिमान जागृत झाल्यावर त्यांच्या शौर्यामुळें त्यांचीं आक्रमणें अमर्याद झालीं. आणि बेडरपणें ते हिंदुस्थानभर वावरूं लागले. प्रत्येक अधिकारी व राज्यकर्ता मराठ्यांकडे हिंदुस्थानांतील प्रबल सत्ताधारी म्हणून पाहूं लागला. हिंदुस्थानांतील कोणत्याही लोकांनीं मराठ्यांप्रमाणें हिंदुस्थानभर सत्ता गाजविली नव्हती. मुसलमानांच्या आक्रमणास पायबंद हिंदुस्थानांतील कुठल्याच जमातीनें घातला नव्हता, तो मराठ्यांनीं घातला; व त्यांची सबंध कर्तबगार पिढी पानपतावर कापली गेल्यानंतरही त्यांनीं दिल्लीश्वरास – मोगल बादशहास – आपल्या इच्छेनुरूप वाटेल तसें खेळविलें. आणि म्हणूनच मराठ्यांची मर्दुमकी सर्वश्रेष्ठ ठरली. मराठ्यांची राष्ट्रीय कामगिरी उच्च प्रकारची गणली जाते तीही याच कारणानें.

---

† " काशीची कळा उतरली असती आणि मथुरेंत मशिदी झाल्या असत्या. शिवाजी झाला नसता तर सर्व हिंदूंची सुन्ता झाली असती."—**भूषण काव्य, १९–२०**

# मराठ्यांची चालू काळांतील कर्तबगारी

४. मराठशाहींतील ऐतिहासिक कर्तबगारीमुळें मराठ्यांकडे हिंदुस्थानांतील इतर प्रांतियांचें व राज्यकर्त्यांचें लक्ष वेधलें असें नव्हे. इंग्रजी अमदानींत, बदललेल्या परिस्थितींतसुद्धां, मराठ्यांनीं आपलें पाणी जगाच्या निदर्शनास आणून दिलें. आणि म्हणूनच त्यांचेकडे एक प्रकारच्या उच्च आकांक्षेनें पहाण्याची रीत पडून गेलेली दिसते. युद्धप्रसंगीं मराठ्यांचें शौर्य, नेट व वीरवृत्ति सर्वत्र कसाला लागून '५२ कशी' ठरली असल्यानें इतर क्षेत्रांत त्यांचेकडून कांहीं म्हणण्यासारखी कामगिरी होईल, अशी कुणी अपेक्षा केली नाहीं. परंतु इंग्रजी भाषेवर प्रभुत्व संपादण्यांत; शास्त्रीय संशोधन करण्यांत; संस्कृत अध्ययनांत; वैद्यकी, वकिली... अशा धंद्यांत; गणितासारख्या किचकट विषयांत;...फार काय, केवळ विलायतकरांचाच मक्ता अशा ठरलेल्या बहुतेक सर्व शाखांत मराठ्यांनीं पाश्चात्य पंडितांकडून प्रशंसा मिळविण्याइतकी कामगिरी बजावली. मग त्यांचेकडे विद्वानांचें लक्ष कां जाऊं नये? बाळशास्त्री जांभेकरांनीं अल्पवयांत 'प्रोफेसरी'चें काम केलें. या जागेवर नेमलेले हेच पहिले हिंदी गृहस्थ. आणि त्यांनीं काम चोख बजावल्यामुळें त्यांचें कौतुक झालें. डॉ. भाऊ दाजी लाड यांचे वैद्यकीय, शास्त्रीय व सांस्कृतिक शोध यांमुळें महाराष्ट्रीय पांडित्यसुद्धां उपेक्षणीय नाहीं असें इंग्रजांस वाटूं लागलें. आणि पुढें भांडारकर, तेलंग, टिळक यांच्या संशोधनानें तर मराठ्यांचें बुद्धिसामर्थ्य प्रस्थापितच झालें. लोकहितवादी, विष्णुबुवा ब्रह्मचारी, सार्वजनिक काका, जोतिबा फुले अशांसारखे समाजसेवक लपून रहाणें शक्य नव्हतें. सार्वजनिक काकांची कामगिरी तर विविध प्रकारची होती. वृत्तपत्रकारांची कलकत्त्यास भरविलेली सभा, सार्वजनिक सभेची स्थापना...वगैरे जनहिताच्या चळवळींमुळें मराठ्यांच्या उदार वृत्तीची व देशप्रीतीची ओळख राज्यकर्त्यांस पटूं लागली. रानडे, तेलंग, चंदावरकर यांस हायकोर्टाचे न्यायाधीश निवडून सरकारनें त्यांच्या विद्वत्तेचें व न्यायीवृत्तीचें कौतुक केलें. रानड्यांची सार्वजनिक चळवळ तर डोळ्यांत भरण्यासारखी होती. चिपळूणकर, टिळक, आगरकर यांची शैक्षणिक कामगिरी इंग्रजी अधिकाऱ्यांना नमुनेदार वाटली. चिपळूणकर, टिळक, 'काळ'कर्ते परांजपे....यांच्या लेखणींत जलाल जहर भरलें असल्याची, व त्यांच्या ओजस्वी वाणीची बहुजनमनावर विलक्षण पकड असल्याची, जाणीव सरकारला पावलोपावलीं होई. एवढ्या मोठ्या सत्तेवर यांच्या लेखणीच्या फटकाऱ्यानें आघात

होतो, त्या आघाताचा तिला बंदोबस्त करावासा वाटतो, हीच मुळीं एक प्रकारें त्या लेखकांच्या कर्तबगारीची कबुली होय. नोकरशाही व राणीसरकार असा भेद स्पष्टपणें लोकांपुढें मांडल्यामुळें आणि विशेषतः अधिकाऱ्यांच्या सत्तेलाही नियंत्रण असून प्रजेला तसें नियंत्रण मागण्याचा हक्क आहे, हें मत प्रस्थापित केल्याबद्दल टिळकांवर हिंदुस्थानांतील सर्व अधिकारी खवळले.

इ. स. १८६८ पासून परीक्षेसाठीं महाराष्ट्रीय विद्यार्थी विलायतेस जाऊं लागले. अशा विद्यार्थ्यांपैकीं सिव्हिल सर्व्हिसमधील ठाकूर हे पहिले विद्यार्थी होत. डॉ. परांजप्यांसारख्यांनीं केंब्रिज विश्वविद्यालयांतील गणिताची उच्च पदवी प्राप्त करून हिंदी बुद्धिमत्तेची साक्ष इंग्लंडमध्यें पटवून दिली. आणि अशा सर्व बाजूंनीं मराठी लोकांत कांहीं तरी विशेष पाणी आहे ही गोष्ट सरकारच्या व हिंदवासीयांच्याही नजरेंत अधिकाधिक भरूं लागली.

परंतु सरकारी नजरेंत महाराष्ट्रीय खुपूं लागले असेंच म्हणणें अधिक सयुक्तिक. वर लिहिलेल्या कारणांखेरीज राजकीय हेतूंनीं प्रेरित होऊन केलेल्या सशस्त्र कृत्यांचा निर्देश आतां केला पाहिजे. ब्रिटिश राजसत्तेला संघटित विरोध करण्याचा पहिला प्रयत्न हिंदुस्थानांत झाला, त्यांत नानासाहेब पेशवा, तात्या टोपी व झांशीकर राणी लक्ष्मीबाई, ह्या तीन व्यक्ती बऱ्याच प्रमुख होत्या. त्यानंतर पुण्याचे आजूबाजूस वासुदेव बळवंताचें 'बंड' उद्भवलें. पुढें पुणें प्रकरणांत चाफेकर बंधू यांनीं क्रांतिकारक कृत्यें केलीं......या सर्व कृत्यांत **मराठे** दिसत असल्यानें एक प्रकारच्या संशयी वृत्तीनें सरकार, व इतर लोक मात्र विशिष्ट नजरेनें व कुतूहलानें मराठ्यांकडे पाहूं लागले. मराठ्यांचा इतिहास ताजा आहे–त्यांच्या आकांक्षा फार उच्च होत्या; त्यांनीं कर्तबगारीही तशीच गाजविली ...ह्या कारणासाठीं सरकार शंकित होई; तर लोकांना वाटे, शिवाजी, बाजीराव, नाना फडणीस, अशांसारखे पराक्रमी व चतुर मुत्सद्दी पुनः मराठ्यांत निपजणार नाहींत कशावरून ?

महाराष्ट्रांत अप्रकट अशी प्रचंड शक्ति आहे. तिचा उपयोग, त्यांना, हिंदुस्थानला, किंबहुना अलम दुनियेला व्हावा, म्हणून प्रयत्न झाला पाहिजे. मराठ्यांच्या वास्तविक गुणांची पारख विख्यात वंग इतिहासकार सर यदुनाथ सरकार यांनीं केली आहे. ते म्हणतात,

"...मराठ्यांना हिंदुस्थानामध्यें आज अद्वितीय ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालेलें आहे. त्यांच्या अगदीं अलीकडच्या पूर्वजांनी सुद्धां शेकडों लढाया मारून धारा-तीर्थी आपले देह ठेविले आहेत, व्यवस्थित रीतीनें मोठमोठ्या फौजांच्या हाल-चाली केल्या आहेत, विलक्षण राजकारणें लढविलीं आहेत...साम्राज्यांतील महत्त्वाचे राजकीय प्रश्न उलगडून दाखविले आहेत. सारांश, त्यांनीं आपल्या कृतीनें हिंदुस्थानचा अगदीं अलीकडील इतिहास बनविला आहे....बुद्धीची तीक्ष्णता, दीर्घोद्योग, साधी रहाणी, उच्च विचारसरणी, कोणताही सुविचार आचरणांत आणण्याची धमक, चारित्र्य,...इत्यादि सर्व सद्गुणांचा सन्निपात मराठ्यांच्या ठिकाणीं झालेला असल्यामुळें आज तरी हिंदुस्थानांत त्यांच्यापेक्षां वरचढ कोणी असेल अशी कल्पनासुद्धां करण्याचें कारण नाहीं. वरील सद्गुण-समुच्चयांत जर मराठ्यांमध्यें संघटनाचातुर्य, सहकारिता, आधुनिक यांत्रिक कलेचें ज्ञान आणि आहे त्याहून अधिक दूरदृष्टि इतक्या सद्गुणांची भर पडेल तर पृथ्वीच्या पाठीवर त्यांची बरोबरी कोणीहि करूं शकणार नाहीं."†

सर यदुनाथ सरकार यांस मराठ्यांच्या गुणांकडे निर्मळ दृष्टीनें पहाण्याची संवय नाहीं, हा प्रवाद लक्षांत घेतला तर वरील विधानास विशेष महत्त्व येत नाहीं काय ?

५. मराठ्यांची अशी कर्तबगारी असतां किंवा त्यांच्या आंगीं सुप्त असे गुण बरेच असतां, त्यांचा उपयोग कां झाला नाहीं हा प्रश्न पडतो. परंतु कित्येकांना प्रथमतः मराठ्यांत सध्यां कांहीं दुर्गुण दिसत नाहींत, त्यांची सर्वथा प्रगति होत असल्याचें त्यांना वाटतें. हें निश्चितपणें ठरवितां येणें शक्य आहे त्यासाठीं कांहीं आडाखे साधारण मानानें ठरविल्यास गैर नव्हे. कुठल्याही समाजांतील स्वावलंबन, संपन्नता, विद्याप्रसार, विचारी पुरुष, घटकांचें सहकार्य, व्यापक वृत्ति—एवढ्या बाबींवरून त्या समाजाची प्रगति होत आहे का अधोगति हें सांगतां येतें. म्हणजे समाज ज्या मानानें स्वावलंबी असेल, संपन्न असेल, त्यांत विद्याप्रसार झाला असेल, त्यांत विचारी पुरुष असतील, निरनिराळ्या घटकांत सलोखा असेल, त्यांत व्यापक दृष्टि असेल, त्या

† शिवाजी व शिवकाल पृ. ८–९.

मानानें तो समाज प्रगतीच्या मार्गावर आहे असें म्हणावयास प्रत्यवाय नसावा. स्वावलंबी याचा अर्थ असा कीं, समाजोपयोगी अशीं उच्च नीच दर्जाचीं सर्व कामें स्वतंत्रपणें करणें. त्याचें समाजचक्र चालविण्यास अन्य प्रेरकांची किंवा प्रेरणेची जरुरी नसते. आणि समाजांत ऐतखाऊंचा भरणा नाहीं. काम करतां येणारी सर्व मंडळी निदान पोटापुरतें मिळवीत आहेत. असा समाज स्वावलंबी म्हणतां येतो. मारवाडी लोकांचें उदाहरण स्वावलंबी म्हणून देतां येईल. संपन्न समाजाचा अर्थ तर स्पष्ट आहे. समाजांतील होत-करूना कार्यमग्न ठेवण्यास, किंबहुना त्यांना शिक्षण देण्यासही, संपत्तीची आवश्यकता आहे. म्हणून धनोत्पादक धंदे, व्यापार, अशांत समाज जितका अधिक गुंतून राहील तितकें उत्तम. कारण समाजाच्या संपन्नतेवरच त्याचे इतर सर्व गुण अवलंबून रहातील. गुजराथी किंवा पारशी समाजाचें उदाहरण संपन्न म्हणून देतां येईल.

समाजाच्या सर्व घटकांत विद्याप्रसार सारखा व्हावयास हवा. एका वर्गांत शिक्ष-णाचें अजीर्ण व बाकीच्या विभागांना कडकडीत उपवास असें असणें केव्हांही इष्ट नव्हे. पारशी किंवा ख्रिस्ती समाजांत विद्येचा प्रसार अधिक झालेला आढळतो. जरा दूरचें उदाहरण घ्यावयाचें तर ब्रह्मी समाजांत साक्षरता सार्वत्रिक आहे असें म्हणतां येतें. अर्थात् नुसत्या साक्षरतेवरच समाजाच्या सांस्कृतिक तयारीचें मान ठरवितां येणार नाहीं. पण विद्याप्रसाराचें तें एक किमान लक्षण आहे एवढें खरें.

समाजांतील विचारी पुरुषांवर तर नियंत्रणाचें काम पडत असल्यानें त्यांची किंवा त्यांनीं घालून दिलेल्या शिस्तीची महति अधिक. महाराष्ट्रांत रानडे, टिळक...गोखले...अशीं विचारी माणसें आधुनिक कालांत झालीं म्हणून महाराष्ट्राकडे परप्रांताचें किंबहुना परदेशांचेंही लक्ष वेधलें.

समाजांतील निरनिराळ्या घटकांत पूर्ण सहकार्य पाहिजे. एवढेंच नव्हे तर, सर्व घटकांच्या कर्तबगारीसही भरपूर वाव मिळाला पाहिजे. नाहीं तर, 'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः' यांना दडपून ठेवलें असल्यास त्या समाजाची कार्यक्षमता कमी राहील. त्यांत स्वावलंबन येणार नाहीं.

सध्यांच्या चढाओढीच्या दिवसांत आणि व्यापारी युगांत चढाऊ वृत्ति

नसेल तर जगणें अशक्य होऊन बसलें आहे. म्हणून नुसतें आपल्यापुरतें पाहून भागणार नाहीं. किंबहुना इतरत्र सर्वत्र चालू असलेला लुटालुटीचा धंदा ( अर्थात लुटीचा प्रकार सध्यां अगदीं निराळा आहे ) पहातां, कुठल्याही एका समाजानें त्यापासून अलिप्त रहाणें म्हणजे 'आपुल्या मरणाचा सुखसोहळा पहाण्यासारखें' होय. युरोपियन राष्ट्रांचें जीवनच मुळीं लढाऊ वृत्ती-वर – त्यांच्या आक्रमणावर – अवलंबून आहे. पण त्यांचें उदाहरण घेण्यापेक्षां हिंदुस्थानांतील मारवाडी, शीख, पठाण,...वगैरे कितीतरी समाजांचें देतां येईल. फार कशाला, मराठ्यांचा इतिहास त्यांच्या लढाऊ वृत्तीमुळेंच राज बनला काय, हा प्रश्न विचारून पहावा म्हणजे काय तें समजेल. अस्तु.

आतां ह्या सर्व कसोट्या मराठी समाजास लावून पाहूं. पहिली बाब स्वाव-लंबनाची. महाराष्ट्रांत परप्रांतीयांनीं येऊन निरनिराळे नित्योपयोगी व्यवसाय आरंभिले, व म्हणून मराठे बेकार राहूं लागले ही तक्रार गेल्या दहा पंधरा वर्षांत पुष्कळ ठिकाणीं आली आहे. त्याचीं उदाहरणेंही अनेकांनीं अनेक दिलीं आहेत. महाराष्ट्रांत शेतकऱ्यांचा सावकार, दुकानदार, अडत्या, व्यापारी...... हे सर्व महाराष्ट्रीयेतर आहेत. इतकेंच काय, पण महाराष्ट्रांतील स्वयंपाक तेलंगी ब्राह्मणांकडे, रखवालीचें काम गुरखे किंवा पुरभय्ये यांजकडे. अशा लहान-सहान बाबींतसुद्धां परकीयांनीं आक्रमण केलेलें आहे, म्हणून ओरड करावी लागते. पेशवाईपासून चालत आलेली पिढीजात कारकुनीसुद्धां मद्रदेशवासी हिरावून नेत आहेत. या सर्वांचा अर्थ एक – महाराष्ट्रीय समाज स्वावलंबी नाहीं. कित्येक क्षुल्लक गोष्टींत सुद्धां त्यास अन्य समाजाकडे पहाण्याची पाळी येते.

महाराष्ट्रांतील प्रमुख जिल्ह्यांत मुंबई इलाख्याबाहेरून आलेल्यांचें स्थानिक लोकसंख्येशीं प्रमाण असें पडतें:—

| | | | |
|---|---|---|---|
| पुणें | १२·७%* | पूर्व खानदेश | ५·२% |
| नाशिक | ७·३% | पश्चिम खानदेश | ७·८% |
| सोलापूर | १३·६% | ठाणें | ८·३% |
| अहमदनगर | ७·७% | | |

* Census Reports, Bombay Presidency (1931)

म्हणजे जिल्ह्यांतील दर शंभर माणसांमागें इतके लोक परप्रांतीय आहेत! पुणें, सोलापूर, ठाणें, नगर, प. खानदेश येथील प्रमाण विचारणीय वाटतें. इतकी महाराष्ट्रीय मंडळी तरी मुंबई इलाख्याबाहेर गेली आहेत काय याचा अंदाज मनाशीं बांधावा.

महाराष्ट्रांत बेकारी फार माजली असल्यानें व हा प्रदेशही दुष्काळी असल्यानें एका मिळवत्या हातावर अवलंबून असणारीं खाणारीं तोंडेंही पुष्कळ आहेत. त्या दृष्टीनें आमचा समाज स्वावलंबी नाहीं असें दिसतें. देशावर दर हजारीं ६३२ लोक ऐदी–म्हणजे बसून खाणारे, परावलंबी–आहेत. गुजराथेंत अशा लोकांचें प्रमाण ५६७ आहे. गुजराथेंतील श्रीमंती व तेथील बायकांची घरीं रहाण्याची संवय लक्षांत घेतली, तरीही ऐतखाऊ त्यांच्या समाजांत फार नाहींत हें उघड होतें.

संपन्नतेच्या दृष्टीनें मराठी समाजावर निसर्गाचीच मुळीं अवकृपा. ती भरून काढण्यासाठीं मराठशाहींत आक्रमणवृत्ति वाढून महाराष्ट्रांत कांहीं काल संपत्ति पुष्कळ खेळली. पण ती टिकवून ठेवण्याचें कसब मराठ्यांना नसल्यानें मराठे पुनः कोरडे ते कोरडेच राहिले. आज किती तरी समाज संपन्न होत आहेत. पण महाराष्ट्राची त्या मार्गानें प्रगति अगदीं मंदगतीनें होत आहे. धनोत्पादक धंद्यांत महाराष्ट्रीय मंडळी फारशी पडत नाहींत. धनोत्पादक उद्योग याचा अर्थ लोकांची उत्पादनशक्ति वाढविणारे धंदे असा केला पाहिजे. या दृष्टीनें थोडेंसें निरीक्षण केलें तर महाराष्ट्रांत धनोत्पादक धंदे फार थोडे आहेत असें दृष्टोत्पत्तीस येईल.

धंदा–मग तो कुठलाही असो–नेकीनें, व्यवस्थेनें व धोरणानें केला कीं संपत्ति मिळालीच पाहिजे, हा सर्वसाधारण नियम समजावा. खाद्यपेयांचे धंदे महाराष्ट्रांत पुष्कळ असले तरी परप्रांतांत जाऊन ते चालविण्यांत अधिक मातब्बरी आहे. नाहीं तर आपल्या घरीं व्यापार करण्यासारखा तो पोरखेळ होईल. धनोत्पादक धंदे महाराष्ट्रांत फारसे नाहींत; पण चैनीच्या व तूर्त तरी अनवश्यक अशा धंद्यांकडे बरेच लोक ओढले गेल्याचें स्पष्ट दिसतें.

"...सांपत्तिक दृष्ट्या महाराष्ट्र गरीब असला तरी रसिक व गुणग्राहक आहे. तो एक वेळ खाण्यापिण्यांत काटकसर करील, पण नाटक–सिनेमासारख्या

करमणुकीच्या साधनांना इतकून आश्रय देईल ! याचें प्रत्यंतर महाराष्ट्रांतील ६० सिनेमागृहें आणि २५-३० नाटक कंपन्या देतील. शिवाय तमाशांची संख्या निराळी आहेच.......एकूण सिनेमा, नाटकें आणि तमाशे यांची संख्या जेवढी महाराष्ट्रांत आहे, तेवढी हिंदुस्थानांतल्या कोठल्याही सधन व सुधारलेल्या भागांतही नाहीं. ''*

ही बढाई खरी आहे. पण वास्तविक बढाई मारण्यासारखें यांत कांहीं नसून उलट विचार करण्यासारखी स्थिति ह्या विधानांत स्पष्टपणें दृग्गोचर होते. रसिकता किंवा गुण-ग्राहकता यांना संस्कृतींत महत्त्व नाहीं असें नाहीं. परंतु इतर अवयव पुष्ट न करतां एकाची वाढ होऊं देणें जसें अनिष्ट, तद्वत् धनोत्पादक धंद्यांची तरतूद न करतां समाजाला रसिक व गुण-ग्राहक होऊं देणें अनिष्ट होय. इतर प्रांतांत नाहींत इतक्या नाटकमंडळ्या, महाराष्ट्र गरीब असूनही महाराष्ट्रांत आहेत, ही आमच्यांत ललितकलेची वाढ दर्शविणारी प्रौढीची बाब आहे खरी, पण भौतिक शास्त्रें, उद्योगधंदे, व्यापार, शिक्षण... इत्यादि शाखा, कीं ज्यावर समाजाची खरीखुरी समृद्धता व संपन्नता अवलंबून असते, त्याकडे लक्ष न देतां, सिनेमा नाटकें पाहवीत बसणें हें अनाठायीं मेहनत खर्च करण्यासारखें होय. हा विचार समाजांतील मार्गदर्शकांस सुचला किंवा नाहीं तें समजत नाहीं. पण अधिकारवाणीनें कोणी याबद्दल भयसूचक इशारा दिल्याचें आढळत नाहीं. नाटक कंपन्या ह्या खऱ्या व्यापक अर्थानें धनोत्पादक होऊं शकतात. पण सध्यांतरी त्या पैसे खेळविणाऱ्या मंडळ्या आहेत. स्वदेशी सिनेमांना बाहेरच्या प्रांतांतून महाराष्ट्रांत पैसा आणण्यास वाव बोलपटामुळें पूर्वीपेक्षा कमी झाला असला, तरी नाटक मंडळ्यांपेक्षां त्यांना धनोत्पादक – बाहेरचा पैसा आणतां येतो म्हणून – म्हणतां येतें. शिवाय नाटकें काय किंवा सिनेमा काय, दोन्हीही करमणुकीचीं साधनें अत्यल्प शहरवासीयांपुरतींच आहेत; शेतकरी वगैरे खऱ्या बहुजनसमाजाचा त्यांच्याशीं फारसा संबंध येत नाहीं, हीही एक बाब लक्षांत ठेवली पाहिजे. शिक्षणप्रसारास सिनेमाची मदत पुष्कळ होण्यासारखी आहे. परंतु प्रस्तुतचें त्याचें स्वरूप शुद्ध करमणुकीचें आहे व ती करमणूकही अल्पसंख्याक अशा शहर-

* केसरी, टिळक-अंक पृ. ५५

वासीयांची होय. ह्या गोष्टींचा विचार केल्यावर सिनेमा-नाटकांबद्दल महत्त्व विशेषसें वाटत नाहीं.

ही संपन्नता महाराष्ट्रास नसल्याकारणानें महाराष्ट्रीय समाज स्वावलंबी नाहीं. विद्येचा प्रसार पाहिला तर समाधानास थोडी जागा आहे खरी, पण त्यामुळें विषमता अधिक वाढत आहे. शिक्षण मिळतें त्यांस १०–१२ वर्षें मिळतें व तें एकाच लहानशा विवक्षित वर्गास लाभतें. आणि बाकीचे निरक्षर रहातात इतकेंच नव्हे, तर शिक्षितांत व त्यांत दुर्लंघ्य अशी दरी उत्पन्न होते. कित्येक वेळीं तर गरीबांना लुबाडण्याकडे त्या शिक्षणाचा उपयोग होऊन समाजांत हे घटक परस्परपोषक न बनतां शोषक होतात.

विचारी पुरुषांबद्दल अधिक काय लिहावें ! विचारकर्त्यांच्या विचारांची विस्तृत छाननी ह्या पुस्तकांत झाली आहे. त्यावरून महाराष्ट्रीय समाजांत अव्वल दर्जाचे कांहीं विचारी पुढारी होऊन गेले हें दिसतें खरें;–पण सध्यां त्यांच्या तोडीस येणारा कुणी आहे काय, असा मनाशींच प्रश्न केल्यास उत्तर देतांना मोठी पंचाईत पडते.

नंतरची कसोटी सहकार्याची. समाजांतील भिन्न घटकांत सहकार्य आहे असें मराठी समाजापुरतें तरी म्हणतां येत नाहीं. ब्राह्मण–अब्राह्मण किंवा स्पृश्यास्पृश्य हे विरोध त्यांत आहेत म्हणूनच सहकार्य नाहीं असें नव्हे, तर इतरही पुष्कळ भेद–तट–त्यांत पडले असून त्यांच्यांतील स्पर्धेस अनिष्ट व अहितकर वळण प्राप्त झालें आहे. इंग्लंडमधील राजकीय पक्षोपपक्षांतही चुरस असते; स्पर्धा रंगते, वाद माजतात; पण ती स्थिति महाराष्ट्रीय समाजाची नाहीं हें स्पष्ट दिसतें. पक्षाभिमानाचें रूपान्तर वैरांत होतें असा इथला प्रकार आहे. सार्वजनिक संस्थांच्या इतिहासांतही सहकार्याचें प्रत्यंतर विशेषसें सांपडत नाहीं.

शिवाय शिक्षित वर्गाला बहुजनसमाजाची काडीइतकीही काळजी नसल्याचें प्रत्यंतर चळवळींत, वादविवादांत आणि वाङ्मयांत आढळतें. त्यामुळें शिक्षितांचें जग निराळें व अशिक्षितांचें निराळें, अशी परिस्थिति निर्माण झाली आहे. शहरांत रहाणारे व खेड्यापाड्यांत वस्ती करणारे असेही पाहिजे तर हे दोन प्रकार मानावे. त्यामुळें समाजांतील घटकांत सहकार्य होणें मुष्कील झालें आहे. महिलांच्या 'जगा'कडे लक्ष देणें ही एक अलीकडे फॅशन ठरली

असल्यानें तो घटक अलिप्त नाहीं हें खरें; पण केवळ शहरवासी शिक्षितां-पुरती ही दृष्टि झाली. खेडेगांवांत राहणाऱ्या बहुजनसमाजांतील स्त्रिया बहिष्कृतच आहेत.

राहातां राहिला प्रश्न व्यापक वृत्तीचा. एके काळीं मराठ्यांच्या ह्याच गुणाची भीति अखिल हिंदुस्थानभर वाटत असे. तो गुण सध्यां आम्हांस अगदीं सोडून गेलेला दिसतो. इतर प्रत्येक प्रांतांतील मंडळी अन्य प्रांतांत जाऊन वसाहत केल्याप्रमाणें स्थायिक होतात; व्यापारउदीम, नोकरीधंदा करतात. पण आमच्या महाराष्ट्राला मात्र असल्या व्यापकवृत्तीचें वावडें दिसतें. "सध्यांची आर्थिक परिस्थिति लक्षांत घेतल्यास महाराष्ट्राची लोकसंख्या, आहे तीसुद्धां, जास्तच आहे" * अशी आंकड्यानिशीं कबुली 'केसरी'नें दिली आहे; तरीही बाहेर वसाहतीसाठीं जाण्याचा किंवा दृष्टि व्यापक करण्याचा विचार त्यांच्या कक्षेंत आला नाहीं, हें आश्चर्य.

समाज़स्थितीची व्यापक दृष्टीनें पहाणी करून विशिष्ट योजनेनुसार पुनर्घटना करण्याचें काम कोणी करीत नाहीं. कांहीं विशिष्ट क्षेत्रांतच आजीव कार्यरत रहाणारी मंडळी महाराष्ट्रांत आहे. तेवढ्यानें समाजांतील एका अंगाचा प्रश्न सुटण्यास मदत होते. पण नव्या पिढीच्या आंगीं कोणते गुण आहेत, कोणत्या गुणांची वाढ तेथें व्हावयास पाहिजे, ती कशी करावी...इत्यादि महत्त्वाच्या प्रश्नांकडे मराठी समाजाचें लक्ष दिसत नाहीं. उलट नव्या व जुन्या पिढींतील तेढ वाढत आहे, दोहोंमध्यें असणारी दरी विस्तारत आहे, असें दिसतें. त्यामुळें एकंदर समाजाची प्रगति न होतां हानि होत रहाते, त्याची वाट काय ? आमच्या समाजाचीं स्थित्यंतरें कोणत्या विचारानुसार घडत आलीं, त्यांत विचाराला कितपत महत्त्व होतें, आज महाराष्ट्रीय समाज कोणत्या दिशेनें चालला आहे... इत्यादि गोष्टी अभ्यासणें मनोरंजक आणि उपयुक्त ठरेल. म्हणून मराठशाहीं-तल्या मुख्य मुख्य घडामोडींचा विचार करून नंतर गेल्या शंभर वर्षांतील प्रमुख विचारवन्तांच्या कामगिरीचें निरीक्षण केलें आहे.

---

* केसरी टिळक अंक पृ० १३.

# २ शिवशाही



१. महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापना केली ती शिवछत्रपतींनीं, असें आपण जेव्हां मोठ्या अभिमानानें म्हणतों किंवा हिंदुपदपातशाहीचा पायाही त्यांनींच घातला असें सांगतों, तेव्हां श्रीशिवाजी महाराजांच्या कामगिरीचें वर्णन अगदीं थोडक्यांत होतें. परंतु त्या कर्तबगारीचें वास्तविक स्वरूप फारच थोड्यांना ठाऊक असेल. कारण शिवपूर्वकालीन समाजस्थिति कशी होती, ती बदलणें कसें कठीण होतें आणि शिवाजी महाराजांनीं दीर्घ प्रयत्नानें ती शेवटीं किती यशस्वी तऱ्हेनें बदलली,—नुसती बदलली इतकेंच नव्हे तर त्या ठिकाणीं नवी परंपरा स्थापिली—हा सर्व इतिहास पाहिल्याशिवाय स्वराज्यसंस्थापकाच्या कार्याचें महत्त्व कळून येणार नाहीं.

# सेवाधर्माच्या शिवपूर्व कल्पना

स्वराज्य, स्वातंत्र्य, देशभक्ति, समाजसेवा, सार्वजनिक कार्य इत्यादि शब्द आजमितीस शाळेंतील विद्यार्थीसुद्धां सढळतेनें वापरतात. पण शिवपूर्वकालांत ते शब्द विशेष रूढ नव्हते; आणि असले तरी त्यांचा अर्थ वेगळा होता. कारण देशप्रीतीच्या, राष्ट्रसेवेच्या किंवा समाजहिताच्या कल्पना सुशिक्षित व सुसंस्कृत समाजांतील घटकांनाच आकलितां येतात. व्यक्तिनिष्ठ गुण किंवा कल्पना अडाणी जनतेस लवकर पटतात. तत्कालीन समाजाची आकांक्षा राज्यासनावर असलेल्या 'विष्णूच्या अंशा'शीं राजनिष्ठ रहावें, त्याची सेवा—चाकरी इमानें इतबारें करावी, या पलीकडे गेली नव्हती. शिवाय बरींच शतकें दिल्लीच्या तख्तावर आणि दख्खनमधील गोवळकोंडा, बेदर, विजापूर, नगर इत्यादि ठिकाणींही मुसलमानच 'पातशहा' असल्यानें राजपद हें आपणासाठीं नाहीं, अशी वेडेपणाची समजूत त्या काळीं पसरलेली दिसते. हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें क्षत्रिय तेवढेच खरे राजे होऊं शकतात, आणि कलियुगांत क्षत्रिय उरले नाहींत असा दुराग्रह लोकांच्या मनीं बिंबलेला असे. तो इतका कीं, पुढें शिवछत्रपतींना राज्याभिषेक होण्यापूर्वीं आपण क्षत्रियकुलोत्पन्न आहोंत, अशी तत्कालीन समाजाची पक्की खात्री पटविण्यासाठीं उदेपूरहून आपली वंशावळ तयार करवून आणावी लागली !

२. पण शिवपूर्वकालीं मराठ्यांचा पराक्रम सुप्तावस्थेंत होता किंवा मुसलमानी अंमलासुळें त्यांना मर्दुमकी गाजविण्यास संधि मिळत नसे असें मुळींच नव्हे. उलट निजामशाही, कुत्बशाही, आदिलशाही वगैरे शाह्यांत मराठे सरदारांचाच भरणा अधिक होता आणि त्या त्या दरबारांतलीं महत्त्वाचीं व जबाबदारीचीं कामें मुसलमान पातशहा मराठे सरदारांवर मोठ्या विश्वासानें टाकीत—पातशहांबद्दल इतकी स्वामिनिष्ठा खुद्द मुसलमानांनींही दर्शविली नव्हती. मराठ्यांच्या ह्या स्वामिनिष्ठेचें स्वरूप परमेश्वरी भक्तिमार्गाच्या धर्तीवर गेलेलें दिसतें. बादशहाचा उपमर्द तर त्यांना ऐकवत नसेच; पण बादशाहींतला कोणीही नोकर येवो, तो बादशहा इतकाच पूज्य व आदरणीय वाटे. आणि बादशहाकडून आलेला लखोटासुद्धां प्रथम नम्रतापूर्वक ललाटीं लावून, नंतर त्यांतील मजकूर पहावयाचा, ही रीत सर्रास रूढ झाली होती. तख्तनशीन कोण आहे, दरबारीं बलाबल कितपत दिसतें, सत्ता कुणाच्या हातीं आहे वगैरे बाबी तत्कालीन

मराठा मंडळीस उपेक्षणीय वाटत. पातशहा बालबच्चा असो, व्यसनांध असो किंवा नाममात्रें करून राहिलेला असो, ह्यांच्या राजभक्तींत तिळमात्र उणें पडावयाचें नाहीं. किंवा आतां आपण थोडी तरी हुकमत हातीं घ्यावी, अशी इच्छा त्यांस व्हावयाची नाहीं. आपण हिंदु आहोंत, मुसलमान हे आपल्या देशांत बोलून चालून परके, त्यांचा व आपला धर्म एक नव्हे, त्यांनीं हिंदुधर्मियांवर अनन्वित जुलूम केले, हें सर्व ठाऊक असूनही मुसलमानांची नोकरी संभाळून हिंदु मराठे शांततेचे पुतळे राहिले. त्यांना एक वेळही चेव आलेला दिसत नाहीं; किंवा त्यांच्या स्वामिनिष्ठेंत किंवा सेवाचाकरींत रतिमात्र उणेपण आलें नाहीं.

३. लुटालूट, मारहाण, जाळपोळ अशी त्यावेळीं वारंवार होई. परकीय सत्ताधीश कोठें रहातो, त्याची शक्ति किती, तो आपला अधिकार कसा चालवितो, तो आपणांवर हुकमत कां व कशी सांगतो, इत्यादि प्रश्न त्यावेळीं कुणालाच सुचले नाहींत. म्हणून अधिकाऱ्यांना, असल्या मेषपात्र बनलेल्या प्रजाजनांवर वाटेल तसा जुलूम करण्यांत कांहींच क्षिति वाटली नाहीं. जुलुमाचा प्रतिकार होणार नाहीं ही खात्री आणि मुसलमानी धर्मांचे कडवे, क्रूर व अविचारी अधिकारी, असा संबंध जमून आल्यावर प्रजेचे काय हाल झाले असतील याची कल्पना करतां येते. परंतु अशा हालांतून सुटण्यासाठीं प्रतिकाराची भावना पीडितांच्या मनांत न उद्भवतां गांजणारांची अनन्य भक्तीनें नोकरी करण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत प्रादर्भूत झालेली आढळते. ‘मनसबदारी’ किंवा ‘शिलेदारी’ स्वीकारून आपापल्या वतनवाडींत ‘स्वतंत्र’ रहावें, आपल्या वाडीपलीकडील जगाची (तें असल्यासच!) फिकीर करूं नये, हाच त्या वेळच्या जनतेचा बाणा असावा असें वाटतें. आपली शेतीवाडी बचावून वर राजमान्यता मिळविण्याचा राजमार्ग म्हणजे पातशाहींत नोकरी करण्याचा. मग नोकरी विधर्मी लोकांची असली, तरीही त्याबद्दल दिक्कत बाळगण्याचें कारण नाहीं, अशीच वृत्ति सर्वत्र फैलावलेली दिसते. ‘सेवा माहात्म्य’ नांवाची ते वेळीं लिहिलेली पण व्यासप्रणीत अशी एकादी स्वतंत्र पोथी उपलब्ध आहे कीं नाहीं तें समजण्यास मार्ग नसला, तरी एका श्लोकांत तो आशय भरलेला दिसतो.

“ मुनयोपि न गच्छंति यां गतीं योगिनाऽपि च
स्वामिकार्यगतप्राणास्तां गतीं यान्ति सेवकाः ”*

—आज्ञापत्र

ही सेवावृत्ति केवळ पाइकांच्याच आंगीं मुरली होती असें नव्हे, तर थेट ‘ राजा ’ पर्यंत सर्वांना नोकरीचा ध्यास लागलेला दिसतो. पण स्वामिनिष्ठा कोठपर्यंत पाळावी आणि स्वाभिमानास कोठून प्रारंभ करावा, याचा निर्णय मात्र त्यांना लावतां आलेला दिसत नाहीं. शिवपूर्वकालांतील समाजाचें प्रातिनिधिक म्हणून शहाजी ‘ राजे ’ भोसले यांचें उदाहरण घेतां येईल. दख्खनमधीलच सर्व पातशाह्या त्यांची बहाद्दरी ओळखीत असें नव्हे, तर जगदीश्वर मानलेला दिल्लीश्वर-सुद्धां शहाजीची कर्तबगारी पुरेपूर जाणून होता. निजामशाही टिकविण्यांत शहाजीनें किती पराकाष्ठेची मेहनत केली हें विस्तारानें सांगण्याची आवश्यकताच नाहीं. बालबादशहास स्वतःचे मांडीवर निजवून त्याचे नांवानें पेमगिरीस शहाजीनें निजामशाहीची पुनः स्थापना केली, व आजूबाजूच्या सत्ताधाऱ्यांचें वैर संपादलें. पण स्वतः तख्तनशीन व्हावें असें त्यास वाटलें नाहीं. कर्नाटकांतील व मद्रासेकडील निरनिराळे सुभे त्यानें स्वतःच्या करामतीवर मोठ्या हिंमतीनें जिंकले खरे, पण ते आदिलशाहीची धन करण्याकरितां. छोटेसेंच कां होईना, पण आपलें स्वतंत्र असें राज्य असावें, यवनांपुढें सलामासाठीं किंवा कुर्निसातासाठीं कंबर लवविणें आतां पुरे झालें, अशी इच्छा कांहीं शेवटपर्यंत त्याला झालेली दिसत नाहीं. दरबारच्या कारस्थानास कंटाळून ‘ सेवानिवृत्त ’ होऊन क्षेत्रीं वास करण्याची इच्छा प्रकट करतांना देखील, ‘ पातशहांस दुवा देण्याची ’ हौस आहेच ! ‘ आमच्या भाईबंदांनाही नोकरींत घेण्याची विनंति ’ त्याबरोबर व्यक्त झालेली दिसते. शहाजीचें एक पत्र उपलब्ध असून त्यांत या नोकरीनिष्ठेचें खरें स्वरूप उघड होतें. विजापूरच्या पातशहास शहाजी राजे लिहितात :—

“ ...... आम्ही रजपूत लोक आहों; **आज पावेतो चार पातशाहींत नोकरी केली.** परंतु गैरहिसाबी, भलतेंच नुकसान सोसून बेअब्रूनें व

* “ **सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः** ” हें भर्तृहरीचें वचन वरील श्लोकाशीं ताडून पहाण्यासारखें आहे.

गैरमेहेरबानगीनें पूर्वीं नोकरी केली नाहीं व पुढेंही करणार नाहीं. ...... पूर्वीं थोरले हजरतसाहेबांचे मेहरबानगीस आम्ही पात्र झालों व आप हजरतसाहेबही आज पावेतो मेहेरबानगीच राखीत आले ...... इत उत्तर आम्हांस जास्त पराक्रमाचे मामले संपादण्याची हौस बिलकुल राहिली नाहीं. ... **एखाद्या हिंदूच्या तीर्थांत राहून परमेश्वराची सेवा करून हजरत साहेबांस दुवा देत राहूं. आमचे भाईबंद आहेत त्यांजपासून आपण सेवा घेतली पाहिजे. ......"***

मग सर्वसामान्य जनता नोकरीच्या ध्यासांतच मग्न राहिल्यास नवल नव्हे. साधन व संधि यांचें आनुकुल्य असतांही शहाजी राजे यांना स्वतंत्र राज्य स्थापावें असें वाटलें नाहीं; व शहाजीच्या कर्नाटकांतील मोहिमा चालू असतां पुण्याकडे त्यांच्या मुलानें स्वराज्य स्थापिलें, हा केवळ वैयक्तिक कर्तृत्वाचा फरक होय. शिवाजीनें केलें तें शहाजीस अशक्य होतें असें नव्हे किंवा शिवकालीं समाजाची स्थिति होती ती शहाजीचे वेळीं नव्हती असेंही नव्हे. म्हणून शहाजीला प्राप्त परिस्थितीचा यथार्थ उपयोग करून घेतां आला नाहीं असें म्हणतां येतें.

४. परंतु, अशी विरोधशून्य, प्रतिकाररहित, भ्याड व औदासिन्यपूर्ण वृत्ति तत्कालीन समाजाची कां बनली? फार छळ झाला तर गाईसारखीं गरीब जनावरेंसुद्धां वाघावर प्राणांतिक हल्ला करण्यास प्रवृत्त होतात. मग वीर वृत्तीच्या मराठ्यांना तें कां शक्य झालें नाहीं हा प्रश्न साहाजिकच उद्भवतो. पराक्रम गाजविण्याची मराठ्यांची नैसर्गिक आकांक्षा मुळींच अतृप्त राहिली नव्हती. त्यांच्या अंगांतील धैर्यशौर्यादि गुणांना पुष्कळ वाव वारंवार मिळत असे. कारण ह्या नाहीं त्या पातशाहींत हिंमतबहाद्दरी गाजविण्याचे प्रसंग मराठ्यांना येत आणि मराठेही ती जबाबदारी कौतुकास्पद रीतीनें पार पाडीत असत. शहाजहानला वश झालेल्या मराठी सरदारांचें किंवा विजापूर व अहमदनगर ह्या दख्खनमधील पातशाहींतील मराठी सरदारांचीं उदाहरणें वरील विधानास पुष्टि देतील. असें असूनसुद्धां मराठ्यांनीं शिवपूर्वकालांत मुसलमानी सत्तेला प्रतिरोध कां केला नाहीं, ह्या प्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं थोडासा इतिहास पाहिला पाहिजे.

* 'Shivaji Souvenir,' ( मराठी विभाग ) पृ. ११६

# सन्तांची कामगिरी

महाराष्ट्रभर मुसलमानी अमलाची पकड बसूं लागली तेव्हांपासून किंबहुना थोड्या पूर्वीपासूनही महाराष्ट्रांत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि प्रमुख सन्तांचा संचार झाला. त्यांनीं परधर्मांचें होणारें आक्रमण थोपवून धरलें व तत्कालीन समाजाला अधिक धर्मरत केलें. इतकेंच नव्हे, तर पढिक ब्राह्मणांची मिरास अशी भगवद्गीता त्यांनीं मराठींतून सर्वसामान्य जनास उपलब्ध करून दिली; तिचा संदेश खेडोपाडीं – घरोघर – पसरविला; बहुजन-समाजाला सहज साधेल असा वारकरी पंथ वाढवून सर्वांना ईश्वरपूजेचा हक्क मिळवून दिला; जातीजातींतील बंधनें नाहींशीं करण्याचा प्रयत्न केला आणि जगांतील अनेक दुःखांनीं गांजलेल्या समाजाचें लक्ष धर्माकडे गुंतविलें ... ही सन्तांची कामगिरी अत्यंत श्रेष्ठ दर्जाची ठरते. परंतु त्यांची शिकवण आचरणांत उतरवितांना समाजानें तिचा विपर्यास केला असें दिसतें. रामदासांशिवाय बहुतेक सर्व सन्तांनीं केवळ पारमार्थिक सुखाकडे लक्ष पुरविलें. इहलोकांतील परिस्थितीकडे लक्ष देण्याची कल्पनासुद्धां त्यांना आली नसावी असा तर्क, त्यांची शिकवण पाहून करतां येतो. लोकांचें मन धर्मरत रहावें म्हणून प्रयत्न करणाऱ्या पुण्यपुरुषांनीं अधर्माचें मूळ कारण नाहींसें करण्याचे प्रयत्न केले नाहींत. ईशचिंतनांत ते इतके मग्न झालेले असत कीं ऐहिक बाबींची त्यांना दादही नसे. साधुपुरुषांविषयींचा हा अनुभव आजमितीसही खरा ठरतो. पारमार्थिक सुखाचा मोह असा विचित्र असतो कीं त्यामुळें ऐहिक बाबींकडे पहाण्याचें भानच रहात नाहीं. बाबू अरविंद घोषांची गोष्ट पहा. हिंदी राजकारणांत अग्रेसर म्हणून वावरण्याची त्यांची योग्यता ओळखून लोक त्यांना मोठ्या खुषीनें तें स्थान देतील. परंतु त्यांना अलीकडे या व्यवहाराच्या गोष्टींत 'राम' वाटत नाहीं. हिंदुस्थानची परिस्थिति त्यांना कळत नाहीं असें नव्हे. परंतु ब्रह्मानंदीं टाळी लागलेल्यांना देहाचीसुद्धां शुद्ध रहात नाहीं. मग तत्कालीन समाजाच्या असहाय्य स्थितीकडे सन्तांनीं पाहिलें नाहीं किंवा ती सुधारण्याचा प्रयत्न केला नाहीं, यांत आश्चर्य कसलें ?

सन्तांच्या शिकवणीचा विपर्यास कसा झाला याचीं एक दोन कारणें पहा. नवविधा भक्तीचा उपदेश व परमेश्वराच्या भक्तप्रियतेचें वर्णन त्या महात्म्यांनीं

अत्यंत परिणामकारी प्रकारानें केलें. तें इतकें कीं, आजमितीसही त्याचा पगडा महाराष्ट्रांत सर्वत्र आढळतो. पण ही शिकवण मिळाली तेव्हां समाजाची मनःस्थिति फार बिकट होती. यादवांचें राज्य यवनाक्रान्त झालें; दक्षिणेंत इस्लामी पातशाह्या स्थापल्या; दुर्गादेवीचा प्रखर दुष्काळ पडला; तालिकोटच्या लढाईंत विजयनगरचें समृद्ध हिंदुराज्य धुळीस मिळालें; मुसलमानांचे हिंदु-समाजावर हल्ले होऊं लागले आणि कुठल्या ना कुठल्या तरी निमित्तानें सत्ताधारी पातशाह्यांचा जुलूम जाणवूं लागला — अशा स्थितींत 'परमेश्वरी अवतारा'वर विसंबून रहाणें ही बाब बहुजनसमाजाला आशादायक वाटली. दशावतारी कथांचे भरीस सन्तांना प्रत्यक्ष साक्षात्कार झाल्याच्या व त्यांच्या क्षुल्लक घरगुती अडीअडचणींस देव धावून आल्याच्या किती तरी गोष्टी तेव्हां पसरलेल्या होत्या. गीतेंतील

**यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

आणि

**परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।**
**धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥**

अशा आश्वासनांचा आधार स्वतः निष्क्रिय राहून आत्मोद्धाराची सर्व जबाबदारी परमेश्वरावर घालण्यासाठीं तत्कालीन समाजानें घेतला ! घरगुती संकटाचे वेळीं धावून येणारा 'विठ्ठल' राष्ट्रीय आपत्तीचे वेळींही आपल्या साहाय्यार्थ येईल, असा विश्वास असल्यानें तेव्हांचा समाज अधिक परावलंबी व कर्तृत्वहीन बनला.

भक्तिमार्गाची शिकवण आचरण्यास सोपी म्हणून तिचा उपयोग सार्वजनिक रीत्या होऊं लागला. पण तिचें रूपही थोडेंसें विपरीत झालें. तें असें. लोकांची भक्ति 'निर्गुण निराकार' अशा परमेश्वराच्या किंवा 'कर कटेवरी उभा विटेवरी' अशा विठ्ठलाचे ठायीं न रमतां, ती अधिकारी, पातशहा व इतर सत्ताधारी अशांवर केंद्रित होऊं लागली; त्यांची भक्तिभावानें पूजा होऊं लागली. कारण स्वर्गीय देवदेवतांपेक्षां हे मर्त्यरूपधारी 'देव' नवविधा भक्तीला लवकर पावतात असा त्यांना आत्मानुभव होता. म्हणून त्यावेळीं स्वामिनिष्ठेला भाव चढला; स्वाभिमानाची आठवण फारशी कुणाला झाली

नाहीं आणि ह्या कारणास्तव सत्ताधीशांना प्रतिकार असा बहुशः कुणी केला नाहीं.. एकंदरींत सन्तांच्या उपदेशाचा उपयोग ऐहिक गांजणूक विसरविण्यासाठीं दिलेल्या 'अफूच्या गोळी'* प्रमाणें झालेला दिसतो. आपणांस होणाऱ्या त्रासाचें मूळ जनतेनें शोधून काढलें नाहीं; मग त्याचें निराकरण करणें तर दूरच! आपल्या कर्माची जबाबदारी अविचारीपणें अदृश्य शक्तीवर टाकणें, अंगीं सोशिक वृत्ति आणणें, नैराश्यपणें जगणें, इतकेंच नव्हे तर पातशाहाच्या चरणीं लीन रहाणें, असे परिणाम त्या संतशिकवणुकीचा विपर्यास झाल्यामुळें झाले!

५. तुकाराम व रामदास, शिवपूर्वकालांत म्हणजे अनुक्रमें इ. स. १६०७ व १६०८ मध्यें जन्मले असले, तरी दोघांच्या विचारसरणींत कैलास–कन्याकुमारी इतकें अंतर होतें. तुकाराममहाराजांचें ऐहिक व्यवहाराकडे फारसें लक्ष नव्हतें; पण रामदासस्वामींचें याच्या अगदीं उलट होतें. तत्कालीन परिस्थितीची त्यांना पूर्ण जाणीव होती. मुसलमानांचें आक्रमण, हिंदूंची दुर्बल वृत्ति, त्यांच्यांतील प्रतिकारशून्यता, वगैरे सर्व अवगुणांचें नीट निरीक्षण करून त्या देशकाल–स्थितीस अनुरूप असा धर्मोपदेश त्यांनीं केला. 'धर्म' रक्षणासाठीं जुन्यापुराण्या ग्रंथांचा तर्जुमा करण्याचा विवेकशून्य प्रयत्न त्यांचे हातून झाला नाहीं. कारण रामदासकालीं समाजाला जडलेला रोग भगवद्गीतेंत असणें शक्यच नव्हतें. भगवद्गीतेंत समाजसंघटनेचा उपदेश नसून "नीति व भक्ति यांची प्राप्ति व्यक्तिमात्रानें कशी करावी" ह्याचें तींत विस्तृत विवेचन आहे. "परंतु समुदाय करून समाजाला नीति व धर्म यांकडे कसें न्यावें ह्याचें दहा पांच उल्लेखांपलीकडे गीतेंत विवेचन नाहीं. हें विवेचन तर दासबोधाचा मुख्य प्राण होय. ... तसेंच गीतेंत राज्यस्थापनेसंबंधीं उल्लेख नाहीं. दासबोधांत राज्यसंस्था म्हणजे ईश्वराचें शरीर आहे वगैरे प्रतिपादन स्पष्ट केलें आहे. ......"† रामदासस्वामींनीं शिवाजीचे कार्यास कितपत सहाय्य केलें अथवा शिवाजीला त्यांचेपासून स्फूर्ति मिळाली काय, या वादग्रस्त प्रश्नांत न शिरतां फक्त विचारसरणी पुढें मांडण्यांत त्यांनीं दूरदृष्टि व व्यावहारिक ज्ञान यांचा उपयोग कितपत केला हें पाहूनच त्यांची योग्यता ठरविली आहे.

* "Religion is an opiate to the people"—Karl Marx.

† राजवाडेकृत **श्रीसमर्थरामदास** पृ. १५ ते २९.

रामदास व तुकाराम हे दोघे जवळजवळ समवयी असतां त्यांच्या विचारसरणींत इतका फरक पडतो याचें कारण उघड आहे. 'उदंड देशाटन करावें' हा स्वानुभवानंतरच रामदासांनीं उपदेश केला आणि त्या देशाटनाचा फायदा घेण्याइतकी व्यवहारी विवेचक बुद्धि रामदासांची होती. तें कांहींही असलें तरी, सन्तांपैकीं एकटे रामदासस्वामीच तत्कालीन समाजस्थिति अचुकपणें जाणत होते व बाकीचे ऐहिक परिस्थितीविषयीं बेफिकिर राहिलेले दिसतात.

ऐहिक बाबींविषयीं औदासिन्य व पारलौकिकाची तळमळ असल्या उपदेशालाही थोडीशी किंमत आहे. नाहीं असें नाहीं. पण ती वेगळ्या काळीं. मराठ्यांची मुलुखगिरी हिंदुस्थानांत चोहोंकडे चालू झाल्यानंतर साम्राज्य-संवर्धनाची तयारी होत असतां जित प्रजाजनांसाठीं म्हणून हा उपदेश खास उपयोगी पडला असता. हेतु हा कीं, त्या जित जनतेंत प्रतिकाराची भावना उद्भवूं नये, सोशिकपणा त्यांचे अंगीं बाणावा, 'स्वर्गींचें साम्राज्य' मिळविण्याकडेच त्यांनीं लक्ष द्यावें...साम्राज्य वाढविणारीं ख्रिस्तानुयायी राष्ट्रें दास्यांत रहाणाऱ्या दुबळ्या लोकांत ख्रिस्ती धर्म–प्रसाराला मनापासून साहाय्य करतात. याच कारणासाठीं नीत्शेनें ख्रिस्ती धर्माला 'जेत्यांनीं जितांत पसरविण्याचा धर्म' असें म्हटलें आहे.

६. पणइतकें असूनही पारतंत्र्यांतल्या त्या असहाय्य लोकांनीं विरोध केला, इतकेंच नव्हे, तर स्वतंत्र राज्य स्थापून सर्व हिंदुस्थानभर दरारा बसविला. ही एवढी कर्तबगारी गाजविण्यास तत्कालीन समाजांत आणखीही कांहीं नवविचार प्रसृत करावे लागले.

त्या वेळच्या लोकांची अवतारावर किती अढळ श्रद्धा होती हें सांगण्याचें कारण नाहीं. समाजहित, देशकार्य किंवा राष्ट्रसेवा अशा कांहीं चिजा आहेत अथवा नाहींत याची ज्या लोकांस जाणीव नव्हती; राज्यासनारूढास प्रतिकार करतां येईल अशी कल्पनाही ज्या लोकांना शक्य कोटींतली वाटली नाहीं; आपणच आपल्या श्रमांनीं आपल्या समाजावर नवीं नवीं बंधनें लादीत आहोंत ह्याची दखल ज्यांना नव्हती; धर्मपालनाच्या समजुतीनें स्वधर्म व स्वजन भ्रष्टविणारांस जीवेंभावें मदत करण्यांत ज्यांना दिक्कत वाटली नाहीं; आपणांपैकीं कोणी सरदार पातशाही जिंकूं शकेल अशी कल्पनाही ज्यांना नव्हती;

सत्ताधाऱ्यांच्या बलाबलाचा, त्यांच्या हक्काचा, अन्यायी वर्तनाचा विचारसुद्धां ज्यांच्या मनाला शिवला नाहीं......अशा लोकांना शिवाजीनें ‘ बंडखोरी ’ आरंभिली असें वाटलें तर नवल नव्हे. आणि ती बंडखोरी यशस्वी करून स्वतः पातशहाच्या तोडीचे आहोंत हें सिद्ध करणें म्हणजे मानवी आवाक्या-बाहेरचें कार्य होय, असें मानून लोकांनीं शिवाजीस ‘ शंकरावतार ’ ठरविलें हेंच रास्त. परकियांचा प्रतिकार करतांना शिवाजीमहाराजांस स्वकियांशीं झुंझावें लागलें याचें कारण वेगळें सांगण्याची गरज नाहीं. कारण राज्यपदाधिष्ठित मुसलमान पातशहांना हिंदू यशस्वी विरोध करूं शकतात हा ‘ शोध ’ शिवाजीनेंच लावला. आत्मविश्वास ज्याच्यांतून नष्ट झाला आहे अशा समाजाला, पराभववृत्तीचा पूर्ण पगडा बसलेल्या लोकांना, हा एक वस्तुपाठाचा धडाच शिवाजीनें शिकविल्या-प्रमाणें झालें. शिवाजीमहाराज दैवी पुरुष आहेत हें ज्याला त्याला वाटूं लागलें.

७. अनुयायी मिळविण्यासाठीं शिवाजीमहाराजांनीं कोणती विचारसरणी प्रसृत केली हें आतां पाहिलें पाहिजे. फ्रेंच राज्यक्रांतीचे वेळीं ‘ स्वातंत्र्य, समता व बंधुत्व ’ ह्या त्रयीवर भर होता. मराठ्यांचें स्वराज्य स्थापन झालें तेव्हां तो ‘ गोब्राह्मणप्रतिपाल व धर्मरक्षण ’ या ध्येयावर होता. त्या काळच्या समाजाची मनोभूमिका एकदां लक्षांत घेतल्यानंतर ‘ स्वातंत्र्य ’ ‘ स्वराज्य-स्थापना ’ ‘ हिंदुपदपातशाही ’ वगैरे कल्पनांचें आकलन कुणास झालें नसतें हें उघड दिसतें. धर्माचा अर्थ कांहींही असो किंवा त्याचें स्वरूप कसेंही असो, त्या शब्दांत जनसमूहाला प्राणत्यागही करावयास उद्युक्त करण्याची जादू आहे खरी. परवांपरवांपर्यंतचीं युद्धें, मुत्सद्यांचा वा व्यापाऱ्यांचा अंतस्थ कावा निराळा असला, तरी धर्माच्या नांवाखालींच लढविलीं गेलीं आहेत; बहुजन-समाजाचा पाठिंबा मिळविण्यासाठीं धर्माचा किती उपयोग होतो त्याचें वर्णन नेपोलिअननें स्पष्ट शब्दांत केलें आहे. नेपोलिअन आणि शिवाजी यांमध्यें फरक आहे. शिवाजीची धर्मनिष्ठा जितकी उज्ज्वल तितकीच प्रामाणिक होती. अशा धर्मराजाच्या नेतृत्वाखालीं असलेल्या मराठी समाजाला

**धर्मासाठीं मरावें – मरोनि अवघ्यांसि मारावें –**
**मरतां मरतां घ्यावें – राज्य आपुलें ॥**

हा समर्थोपदेश उच्च कोटींतला वाटला यांत नवल कोणतें ?

# आजकालचा महाराष्ट्र

'गोब्राह्मणप्रतिपाल' अथवा स्वधर्मरक्षण या ध्येयासाठीं गोळा झालेल्या मराठमोळ्याकडून स्वराज्य मिळविल्यावर शिवाजीनें गांवोगांव 'गोवर्धनसंस्था' काढल्या नाहींत, किंवा ब्राह्मणांना पोसण्यासाठीं ठिकठिकाणीं अन्नसत्रेंही उघडलीं नाहींत. बहुजनसमाजाला समजेल व त्यांचा पाठिंबा मिळेल अशी ती योजना आहे. तिचा उपयोग किती झाला हें आपणांस इतिहासावरून कळतें. पण तेंच ध्येय सदासर्वदा लोकांपुढें ठेवावें असें म्हणतां येत नाहीं. देश–काल–स्थिति ओळखून रुचेल व पचेल तेंच ध्येय स्वीकारावें लागतें; आणि तसेंच ध्येय शिवाजीनें स्वीकारलें.

प्रतिरोधाचा शोध व परिस्थित्यनुरूप ध्येयनिश्चिती एवढ्यानेंच शिवाजी महाराजांची कर्तबगारी संपते असें नाहीं. त्यांनीं आणखीही पुष्कळ विधायक कामगिरी केली आहे. ती पहाण्यापूर्वीं ध्येयासंबंधींचा थोडा खुलासा केला पाहिजे. शिवाजीमहाराजांचे मनांत बालपणापासूनच स्वराज्यस्थापनेचे किंवा हिंदुपदपातशाहीचे विचार घोळत होते ही कल्पना यद्यपि अवतारकल्पनेशीं सुसंगत असली, तथापि आजकालच्या चिकित्सक कालांत ती टिकणार नाहीं. आणि तेवढ्यानें म्हणजे बालपणींच स्वराज्यस्थापनेचे विचार त्यांचे मनांत नव्हते असें म्हटल्यानें, त्यांचा थोरपणा रतिमात्र कमी होत नाहीं. 'बंडखोरी'ची वृत्ति हीन, दीन व मेषपात्र बनलेल्या समाजांत पसरवून, त्यांत वीरश्री खेळवून, त्यांना शिस्तींत गोवून, त्यांच्या करवीं असंभाव्य वाटणारे पराक्रम गाजविणें ही कामगिरी शिवाजीमहाराजांचें नांव अजरामर राखण्यास किंवा हिंदु पुरुषश्रेष्ठ म्हणून त्यांना सदैव लेखण्यास पुरेशी आहे. 'बंडखोरी' यशस्वी होत गेली तसतसा शिवाजीचा आत्मविश्वास दुणावला, नवीन पण व्यापक आकांक्षा त्याचे मनांत उद्भवल्या, हा विचारांतील विकासच तर्ककोटींतला वाटतो.

शिवाजीमहाराजांनीं अष्टप्रधानव्यवस्था केली; गड, कोट, दुर्ग, आरमार, सैन्य वगैरेसंबंधीं शिस्तीचे धारे बांधून दिले; राज्यव्यवहाराचे नियम केले;...... वगैरे किती तरी महत्त्वाची कामगिरी त्यांची आहे. पण शिवाजीमहाराजांनीं स्वतंत्रतेची विचारसरणी पसरविली, आपल्याला लागणाऱ्या सर्व प्रकारचीं माणसें तयार केलीं आणि विविध कार्यालयांची शिस्त लावून दिली, हेंच कार्य विशेष श्रेष्ठ दर्जाचें झालें. कारण प्रत्येक थोर पुरुष आपणांस पाहिजे तशी कार्यकर्ती

मंडळी तयार करीत असतो आणि ती परंपरा पुढें चालविणें आवश्यक बनतें. शिवाजीमहाराजांच्या तालमींत तयार झालेल्या पिढीच्या कसोटीची वेळ शिवोत्तर कालांत लगेच आली. खुद्द शिवाजीचे कालीं आलीं नाहींत इतकीं संकटें मराठी राज्यावर शिवाजीचे पश्चात् आलीं. मराठ्यांचा मोड करण्यासाठीं औरंगजेबानें हिंदुस्थानांतील सर्व सरंजाम एकत्र केला व लक्षावधि लोकांची अगडबंब सेना घेऊन तो जातीनें दख्खन काबीज करण्यासाठीं आला. तरीही मराठे सेनानींनीं त्याला खडे चारले. सत्तावीस वर्षें स्वतः खटपट करूनही औरंगजेबासारख्या मोगल बादशहाला मराठ्यांचा तेजोभंगही करतां आला नाहीं. ' पहाडी चुव्या ' नें घालून दिलेल्या शिस्तींत तयार झालेलीं माणसें मोगल फौजेला पुरून उरलीं. एकटा शिवाजी पुरवला, पण त्याच्या पश्चात् फुटलेलें हें ' सैतानांचें पेंव ' नको, असें औरंगजेबाला होऊन गेलें. शिवशाहीबद्दल प्रत्येकाला आदर व भक्ति वाटत असे आणि थोरल्या महाराजांनीं आरंभिलेलें कार्य पुढें चालविण्याची जबाबदारी आपणांवर आहे असें सर्वांना वाटे. त्यामुळें वैयक्तिक मतभेद दूर राहिले; स्वार्थी आकांक्षांचा विसर पडला; आणि म्हणून मराठेशाहींतील अत्यंत अभिमानास्पद अशी कामगिरी त्यांचे हातून पार पडली.

परंतु तीच त्या नंतरच्या काळांतली स्थिति पहा. राजारामाचे कारकीर्दींत मराठ्यांत ढिलाई माजण्यास प्रारंभ झाला. वतनांवर शिवछत्रपतींचा भयंकर कटाक्ष; त्याच्या उलट, राजारामाचे अमदानींत वतनाच्या सनदा किती तरी दिल्या गेल्या. इतकेंच काय, पण स्तुतिस्तोत्रें गाण्याची मराठ्यांतील प्रथा राजारामाचे कारकीर्दींतच वाढलेली दिसते. छत्रपति सहा सात वर्षें एके ठिकाणीं कोंडून पडले; त्यांच्या परिवारांत हरिदास-पुराणिकांचा भरणा झाला व त्यांनीं आपला पगडा त्यांवर बसविला. शिवाजीचें आख्यान वर्णन करणारें एक खास 'शिवभारत' लिहिण्याचा प्रयत्न याच काळांतला दिसतो. स्वतःस कांहीं कर्तवगारी गाजवितां येत नाहीं, तर निदान वडिलांची कीर्ति गात बसावें, असा विचार त्यांचा झाला असावा.

पुढें औरंगजेबाच्या पश्चात् शाहू दक्षिणेंत परत आला तेव्हांही दुफळ्या माजल्या. राजारामाचे वेळेपासून चालत आलेली यादवी शाहूच्या काळीं वाढलेली

दिसते. सरदारांच्या फिरलेल्या पगड्या, रंगलेलीं भांडणें, हीं सर्व पाहिलीं म्हणजे अत्यंत विषाद वाटतो. आपसांत झुंजणाऱ्या कार्यकर्त्यांना एकत्रित करणारी जबरदस्त शक्ति किंवा त्या शक्तीची स्मृति समाजांत तितकीशी राहिली नव्हती. व्यक्तिनिष्ठ समाजांत नुसत्या विचारांचा जप उपयोगी पडत नाहीं. तर त्याच्या जोडीस आचरणाची 'संथा' देणारा शास्ताही हजर असावा लागतो. पण शिवोत्तर कालांत शास्त्यांचाच अभाव झाला. म्हणून मराठशाहींत तंटे-बखेडे, फंद-फितुरी, लांच-लुचपत हे प्रकार अतिशय पिकले व कित्येक मराठे सरदार मोगलांना जाऊन मिळाले ! राजारामाचे वेळींच संताजी व धनाजी यांची आपसांत यादवी माजली. पण शाहूचे वेळीं त्या पुढली पायरी त्यांनीं गाठली. "... राव मशारनिल्हे (धनाजी जाधव) नीं स्वामीचे चरणीं चित्तालय करून, औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां, आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें, शत्रूचा हिसाब न धरितां, राज्याचे संरक्षणार्थ असाधारण कसाला केला. स्वामींस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण होते असे नाहीं," असें ज्या धनाजीचें वर्णन ताराबाईनें केलें, व ज्याच्या पुत्रास शाहूनें सेनापतिपद दिलें, त्या धनाजीचा आवडता मुलगा, छत्रपतींचा सेनापति, चंद्रसेन हा मोगलास मिळून अखेरपावेतों शाहूचे विरुद्ध वागला. निजाम-बाजीरावाच्या पहिल्या रंगांत तर चंद्रसेन जाधव निजामाचे बाजूनें पेशव्याशीं लढल्याचा उल्लेख आहे !. उदात्त विचारसरणी घसरणीस कशी लागली होती त्याचें हें उदाहरण मानतां येतें. 'दौलतीचे खांब' मानलेले सरदार सुद्धां अशा प्रकारें सरशी दिसेल त्या पक्षाकडे झुकून आपली पोळी पिकवून घेत. ही असली अंतस्थ यादवी एकाद्या विचारवंताला सहज थांबवितां आली असती.

---

# ३ पेशवाई

| | |
|---|---|
| १ ध्येयाचा विसर | २ दुय्यम पदाची तळमळ |
| ३ जहागिरीची चटक | ४ आचार्यमठांची लूट |
| ५ स्वजनांवरील अविश्वास | ६ व्यापकदृष्टीचा अभाव |
| ७ धार्मिक शिकवणुकीचा दुरुपयोग | ८ दैववाद कीं पुरुषवाद ? |

१. इतउत्तर पेशवाई अंमलास प्रारंभ झाला असें म्हणण्यास हरकत नाहीं. शिवशाहींतली ध्येयनिष्ठा पेशवाईंत राहिली किंवा नाहीं ह्या प्रश्नाचीं दोन्ही पक्षीं उत्तरें मिळतील. पण एवढें मात्र खरें कीं, मराठ्यांच्या मर्दुमकी पेशवाईंतच अधिक गाजल्या; व स्वराज्याचा विस्तार साम्राज्यांत झाला. मराठ्यांची लढाऊ वृत्ति; त्यांचें अटकेपार आक्रमण; बंगाल, कर्नाटक, माळवा, गुजराथ, दिल्ली इकडे त्यांची मुलुखगिरी; दिल्लीश्वराचा मराठ्यांनीं केलेला सांभाळ......इत्यादि अनेक अभिमानास्पद पराक्रम मराठ्यांनीं पेशवाईंतच गाजविले असल्यानें व शिवाय मराठशाहीचा अस्तही पेशवाईंतच झाला म्हणून, ह्या कालखंडास विशेष महत्त्व येतें. मराठ्यांचे विविध गुणदोष या काळांत अधिक स्पष्टपणें उठून दिसतात, तसे इतर कालांत दिसत नाहींत. विचारांची वाढ पहाण्यास हा काल उपयुक्त ठरतो तो याच कारणानें.

# आजकालचा महाराष्ट्र

मराठ्यांचा उत्कर्ष इतक्या झपाट्यानें कां झाला किंवा इतर प्रांतियांना साधलें नाहीं तें कार्य त्यांनाच का साधलें याची थोडी मीमांसा केली पाहिजे. स्वभावतःच बाणलेली मराठ्यांची स्वाभिमानी वृत्ति, त्यांच्या मनावर असलेला धार्मिक कल्पनांचा पगडा, काटकपणा, साधी रहाणी, शौर्य, वगैरे गुणांमुळें मराठ्यांच्या मर्दुमकी शक्य झाल्या. नंतर त्यांना आमिष लागलें तें समृद्धीचें, दरबारी वैभवाचें व शाही विलासांचें. सत्तेची हांव परमेश्वराला सुद्धां असते म्हणतात. तशी ती मराठ्यांनाही वाटली. शिवछत्रपतीनें केलेल्या कीर्तिमय कमाईंत प्रतापी वीर भर टाकीत होते, त्यामुळें मराठ्यांचा दबदबा सर्वत्र बसूं लागला; आणि ह्या प्रकारें एकदां यशस्वी म्हणून नाणावलेल्या लोकांची सारखी चलती होत गेली. तेव्हां मराठ्यांना यश मिळालें तें फुकाफुकी नसून त्यांचे आंगीं कांहीं थोडे गुण होते म्हणून. फक्त मिळविलेलें वैभव टिकविण्यासाठीं लागणारें कौशल्य त्यांना नसल्यानें त्यांचें साम्राज्य अल्पकालांत नष्ट झालें असावें. आतां तो इतिहास थोड्या विस्तारानें पाहूं.

शिवछत्रपतींच्या कल्पनेचें व्यापक स्वरूप हिंदुपदपातशाही हें होय आणि पेशव्यांनीं तें साध्य करण्याची कसून खटपट केली हें खरें. पण त्या ध्येयाची उभारणी व त्या कल्पनांचा विकास अगदींच वेगळ्या प्रकारें झाला.

२. शाहू महाराजांचे कारकिर्दींत मराठे दिल्लीस गेले. आपसांत कलह माजविणाऱ्या सरदार-जहागिरदारांना कांहीं तरी नवें कार्यक्षेत्र पाहिजे होतें म्हणून पहिल्या पेशव्यानें त्यांना उत्तराभिमुख केलें असें म्हणतात. मराठ्यांना दिल्लीस जावें लागलें तें दिल्लीवर हल्ला करण्यासाठीं किंवा तेथें मराठी सत्ता प्रस्थापित करण्यासाठीं, असें नव्हे; तर दिल्लीश्वराच्या ( अनधिकृत ? ) हस्तकाशीं तह केला, त्याच्या भरपाईसाठीं ! शाहू छत्रपतींची भावना शिव छत्रपतींच्या भावनेहून अगदींच वेगळी होती. मुसलमानांचें राज्य घेऊन तेथें आपण राज्य स्थापावें ह्या इच्छेहून शाहू महाराजांची इच्छा निराळी होती. "बेगमेनीं संगोपन करून ... मातृपक्षीय करून त्याचे हातून आम्हांस ठिकाणीं बसविलें, तेव्हां मातृस्थानीं विरोध करणें कामाचें नाहीं" ही तर शाहू छत्रपतींची दृढ भावना. शिवाय त्यांना दिल्लींत कैदेंत असलेली आपली मातुःश्री व इतर मंडळी यांची सुटका करावयाची ओढ साहजिक लागलेली. तेव्हां हिंदुपदपातशाहीची स्थापना

किंवा तत्सदृश अन्य व्यापक हेतु छत्रपति, पेशवे किंवा इतर सरदार यांचा नसावा असें वाटतें.

सय्यद बंधूंशीं छत्रपतींचा तह झाला त्यांत मराठ्यांनीं आपली १५,००० सेना बादशहाजवळ ठेवण्याचें व दरसाल १० लक्ष रुपये खंडणी देण्याचें अशीं दोन कलमें आहेत, ही गोष्ट विसरतां यावयाची नाहीं. ह्या सय्यदांस बादशहाच्या वतीनें तह करण्याचा अधिकार नव्हता, असें दिसतें. कारण त्या बंधूं-पैकीं हुसेन अली सय्यद याचा पाडाव करण्याविषयीं बादशहा दिल्लीहून मराठ्यांस गुप्तपणें सुचवीत होता. तरीही त्याच्याशीं छत्रपतींनीं, तो बादशहाचा प्रतिनिधि म्हणून तह केला. कांहीं तरी निमित्त साधून मातुःश्रींच्या सुटकेसाठीं आपलीं माणसें दिल्लीस पाठवावीं एवढाच हेतु कदाचित् छत्रपतींच्या नजरेपुढें असावा.

परंतु पूर्वींच्या ध्येयाचा विसर तत्कालीन समाजाला किती झपाट्यानें पडला याचें प्रत्यंतर वरील तहांतच आढळतें. मराठ्यांच्या स्वराज्याची व दख्खन-मधील मोगली सुभ्याच्या चौथ–सरदेशमुखीची सनद बादशहाकडून छत्रपतींनीं मागितली; पहिल्या पेशव्यांनीं ती दिल्लीहून आणली, यांत कुणालाच कांहीं गैर वाटलें नाहीं. ज्या दिल्लीश्वराशीं शिवछत्रपतींनीं आजीव झगडा केला, गुहेंत जाऊन सिंहाची आयाळ उपटावी त्याप्रमाणें पराक्रम गाजविला, मराठ्यांचें राज्य बुडवावें म्हणून ज्या बादशहानें दख्खनमध्यें जातीनें भटकून धडपड केली, व शेवटीं मोठ्या निराशेनें मृत्यूला कवटाळलें—त्याच दिल्लीश्वराच्या दुर्बळ वंशजाकडून आपल्या स्वराज्याची सनद मागण्याचा आग्रह छत्रपतींनीं धरावा, व इतरांना त्यांत कांहींच वाटूं नये, हें केवढें आश्चर्य! नाममात्रें करून तख्तनशीन झालेल्या परभृत बादशहास खंडणी द्यावयाची, त्याचेकडून आपल्या दुय्यमपदाचा चर्मपट मागावयाचा, पन्नास पाऊणशें वर्षें भोगलेल्या 'स्वतंत्र' स्वराज्याची सांगता 'बादशाही' शिक्कामोर्तबाशिवाय होत नाहीं असें वाटावयाचें, ही वृत्ति तत्कालिनांची दिसते! मराठ्यांनीं तरी निदान मोंगल बादशाहीची कदर बाळगावयास नको होती. जहांगिरापासून मराठ्यांचा दिल्लीश्वराशीं चालत आलेला झगडा व त्याचें वेळोवेळीं बनलेलें तीव्र स्वरूप लक्षांत घेतल्यास, बाहुलें म्हणून बसलेल्या बादशहाचा सार्वभौमत्वाचा मान छत्रपतींनीं व इतर मराठ्यांनींही कां मानावा, हा प्रश्न पडतो. बादशाहीबद्दलचा आदर

शिवपूर्वकालांत वसत होता तसा तो पुनः उसळी मारून या वेळीं मराठ्यांचे मनांत बळावला कीं काय ?

बादशाहीबद्दलची मराठ्यांना वाटत असलेली पराकाष्ठेची पूज्यबुद्धि व आदर हीं आणखीही एक दोन वेळां व्यक्त झालीं आहेत. पानपतचा संग्राम होण्यापूर्वीं सदाशिवराव भाऊंनीं दिल्लीच्या बादशाही दिवाणखान्यांतील चांदीचें छत फोडलें, तेव्हां कित्येक मराठ्यांचीं मनें दुखविलीं गेलीं. त्याचें कारण काय वेगळें होतें ? तसेंच महादजी शिंदे यांनीं वकील–इ–मुतालिकीची सनद बादशहाकडून मिळविली, ते वेळीं माजलेला वाद तर याहून क्षुद्र वृत्तीचा निदर्शक ठरतो. पेशव्यांनीं दिल्लीश्वराचे 'सर्वाधिकारी कारभारी' व्हावें हा त्या वेळीं सर्व राजकारणी मुत्सद्द्यांस व इतरेजनांसही मोठा सन्मान वाटला. त्या दुय्यमपदाच्या सनदा मोठ्या समारंभानें व थाटानें मिरवीत आणण्यापर्यंत ते वेळच्या पुढाऱ्यांची मजल गेली होती. एक वेळ पेशव्यांचा सेनापति किंवा सुभेदार अशा थोर पदाची आकांक्षा धरता तर तें कांहीं तरी क्षम्य ठरलें असतें. पण त्या वेळीं महादजी शिंदे व नाना फडणीस यांमध्यें उद्भवलेल्या बाचाबाचीवरून वेगळाच सूर निघतो. पाटिलबावांनीं मुखत्यारपत्र पेशव्यांचे नांवें घेतलें व ते स्वतः पेशव्यांचे प्रतिनिधि म्हणून राहिले. अर्थात् दिल्ली-दरबारांत मानाचें आणि हुकमतीचें स्थान मिळालें तें महादजीला. आणि त्यांत वावगें असें कांहींच नव्हतें. पण तेवढ्यामुळेंच 'न भूतो न भविष्यति' असें जें अंतस्थ राजकारण पिकलें तें पाहिलें म्हणजे तत्कालीन पुढाऱ्यांची बुद्धि कशी फिरली होती याची पूर्ण कल्पना येते. मराठशाहीची उन्नति करण्याचा हेतु असा कोणाचा बहुधा नव्हताच. प्रत्येकाला आपली तुंबडी भरण्याचा किंवा सत्ता आपल्या हातीं ठेवण्याचा हव्यास लागलेला दिसतो. अशा मानसिक अव-स्थेंत साम्राज्य टिकविण्याचें काम कसें पार पडावें ? दिल्लीश्वर पराक्रमहीन, दुर्बल, परावलंबी व कुचकामी असला तरी त्याच्या सनदेला इतका मान, ज्या मराठ्यांवर त्या बादशाहाचा प्राण अवलंबून होता त्या मराठ्यांनीं द्यावा, त्याचे कारभारी होण्यांत त्यांनीं परमोच्च आनंद मानावा, आपल्या पराक्रमाची त्यांनीं हीच इतिश्री मानावी, हें सर्व खरोखर विचारशून्यतेचेंच लक्षण होय.

३. पण मराठ्यांत शिरलेली ही स्वार्थी वृत्ति आणखी पुष्कळ ठिकाणीं व्यक्त झाली आहे. जहागिरदार किंवा सरदारांचीच बाब घ्या. मराठशाहीच्या संस्था-

पकांनीं वतनावर कटाक्ष ठेवून कोणाही बहाद्दरास किंवा सरदारास जहागीर अशी दिली नाहीं. पण त्यानंतर लगेच काय झालें ? तर प्रत्येक कामाला, प्रत्येक मुलुखगिरीला जहागिरीचें आमिष लागूं लागलें. मराठे लढवय्ये वसुलीला जाण्या-पूर्वीच वसूल मिळवावयाच्या प्रांताच्या सनदा मागूं लागले आणि त्यांचे वरिष्ठही त्या सनदा बिनदिक्कत देऊं लागले. खुद्द पेशव्यांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनींही खासगीकडे जहागिरी मिळविल्या आणि आपली वेगळी गंगाजळी वाढविली; म्हणजे सर्वांनीं मिळून एका मराठशाहीची भर करावयाची तें बाजूस राहून जो तो स्वतःसाठीं सवता सुभा स्थापूं लागला. शिवकालीं धर्मासाठीं किंवा मराठ-शाहीसाठीं लढवय्ये लढत किंवा मर्दुमक्या गाजवीत. पेशव्यांनींही कांहीं दिवस ती परंपरा राखली. पण लगेच पुढें तो नूर साफ पालटून केवळ पैशासाठीं सर्व मोहिमा होऊं लागल्या, असें दिसतें. ही ध्येयच्युति एकदम डोळ्यांत भरते.

मराठ्यांना द्रव्याचा जो इतका जबरदस्त मोह पडला, त्याचीं थोडीं कारणें देतां येतील. मराठे प्रथम दिल्लीहून परत आले ( स. १७१९ ) तेव्हां त्यांनीं अगणित संपत्ति बरोबर आणली. सर्व खर्च भागवून " ऐंशी लक्ष वराई व तीस लक्ष रुपये जामदारखान्यांत भरले "* ही गोष्ट मराठी स्वभावानुसार लक्षांत घ्यावयास पाहिजे. म्हणजे सुवर्णलोभाचा पगडा छोट्यामोठ्या मराठे सरदारां-वर कां बसला तें समजेल. महाराष्ट्रांतील कणखर राकट जमिनींत पीक बेताबाताचें असल्यानें तेथील समृद्धि इतर प्रांतियांचे मानानें ' भिकार ' म्हणतां येते. अशा महाराष्ट्रीयांचे दृष्टीस उत्तर हिंदुस्थानचें वैभव पडलें, तें आपल्या दबदब्यानें आपणांस मिळतें असा अनुभव आला आणि म्हणून अल्पावधींत मराठ्यांना संपत्तीचा हव्यास लागून मदही चढला. सत्ता व संपत्ति यांचा दुहेरी मोह मराठ्यांना पडल्यानें त्यांच्या ठिकाणीं शिवशाहींतील तर राहोच पण पुढें पुढें अव्वल पेशवाईतील ध्येयनिष्ठा व सदाचरण आढळेनासें झालें. ज्या ठिकाणीं राजकार-णाचा खल किंवा हिंदुस्थानच्या उलाढाली चालावयाच्या त्या ठिकाणीं नाच, तमाशे, गाणें-बजावणें, यांच्या मैफली झडूं लागल्या. प्रत्येकाला खासगी मिळकत वाढते

* मराठी रियासत, मध्य०१-पृ. ९२.

कशी, स्वतःची चैन अव्याहतपणें चालते कशी, हाच ध्यास लागलेला दिसतो. त्यामुळें मुलुखगिरीच्या नांवाखालीं आपण स्वतःची, स्वतःच्या राज्याची व स्वतःच्या राष्ट्राची किती हानि करीत आहोंत याची नुसती जाणीवही कुणाला राहिलेली दिसत नाहीं. असल्या राष्ट्रहितविघातक, स्वच्छंदी व स्वार्थी वागणुकीचीं उदाहरणें पेशवाईच्या इतिहासांत पुष्कळच आढळतात.

उत्तर हिंदुस्थानाच्या कारभारांतील मराठ्यांचें वर्तन पहा. प्रथम प्रथम हिंदुधर्माचे उद्धारक, त्राते, अशा अभिमानी दृष्टीनेंच रजपूत व इतर राजे मराठ्यांकडे पहात होते. पहिले बाजीराव पेशवे यांस छत्रसालानें पाचारण केलें तो प्रसंग किंवा उदेपूरच्या राण्याकडून बाजीरावास पत्रें आलीं तीं विचारांत घेतल्यास मराठ्यांचें वास्तविक बल तेव्हां इतरांच्या दृष्टीनें काय होतें तें कळून येईल. पण असें असूनही उत्तर पेशवाईंत काय झालें ? मराठे सरदार माळवा, बुंदेलखंड, रजपुताना पादाक्रांत करीत खरे, पण कोणत्या रीतीनें ? मराठ्यांचें उत्तरेकडील आक्रमण मुसलमानी सत्तेविरुद्ध असल्यानें त्यांना शीख, रजपूत, वगैरेंचें सहाय्य भरपूर मिळालें असतें. पण अशीं माणसें जोडण्याचा प्रयत्न झाल्याचें दिसत नाहीं. उलट वरील सर्व प्रसंग त्यांना तोडण्यासाठींच घडलेले आढळतात.

तेथील सर्व राणे व राजे मराठ्यांचा तिरस्कार करूं लागले. जयपूरच्या राण्याचीच हकीकत पहा. त्यानें स्वतः तर विषाचा पेला घेतलाच, पण आपल्या तीनही राण्यांस तो प्रयोग करण्यास त्यानें भाग पाडलें. एवढ्यावरच ही अनर्थ-परंपरा थांबली नाहीं. त्यांच्या वीस दासींनीं सर्पदंश पत्करून जीव सोडले ! * आणि हें सर्व कशासाठीं म्हणाल, तर शिंदे-होळकरांची 'चढाई' असह्य झाली म्हणून ! जातीच्या लढवय्यांना असा कमालीचा वैताग येण्यासारखी आगळीक मराठे सरदारांकडून वारंवार होत गेलेली दिसते. या प्रसंगांनंतर चार वर्षांनींच जयाप्पा शिंदे यास रजपुतांनीं मारेकरी घालून ठार केलें ( सन १७५५ ). महादजी शिंद्यांच्या कारभाराविरुद्ध किती तरी कागाळ्या पुणें दरबारीं रजपूत वकील करीत असत. मराठी फौज निघून गेल्यानंतर तेथील मुलुख किती

* Peshva Daftar Selections—No. 2, 31, ( of 21—2—1751 )

ओसाड व उजाड होई यांचीं वर्णनें तत्कालीन कागदपत्रांत भरपूर सांपडतात. त्या सर्वांवरून मराठशाहीची ध्येयच्युति किती झपाट्यानें होत होती हें स्पष्ट दिसतें.

४. मराठ्यांची ध्येयनिष्ठा कशी लोपत चालली याचें ढळढळीत उदाहरण आचार्यमठांची लूट मराठ्यांनीं केली तींत आढळतें. ब्राह्मणी राज्यांत, हिंदु-धर्मोद्धारार्थ अवतरलेल्या कारभाऱ्यांच्या असदानींत, आचार्यांचे मठ, एकदां नव्हे, दोनदां नव्हे तर चार वेळ मराठ्यांनींच लुटावे, ह्या प्रकारांची उपपत्ति नीटशी लागत नाहीं. त्रिंबकराव मामा पेठे यांनीं सन १७७०-७१ मध्यें मेलकोटा येथील रामानुजाचार्यांचा; सन १७७५ मध्यें हरिपंत फडके यांच्या फौजेनें द्वारकापीठाच्या शंकराचार्यांचा; त्याचे पुढचे सालीं पटवर्धनांनीं करवीर संकेश्वरचा; व सन १७९१ मध्यें पुनः पटवर्धनांनींच शृंगेरी शंकराचार्यांचा—असे चारदां आचार्यमठ लुटल्याचा उल्लेख इतिहासांत आढळतो.* मराठ्यांचे कांहीं शत्रू मठांचा आश्रय घेऊन बसले असल्यानें कदाचित् मराठे सरदारांना ह्या आत्यंतिक उपायाचा अवलंब करावा लागला असेल, हें समर्थन लंगडें पडतें. शत्रूला वठणीवर आणण्यासाठीं धर्मगुरूंना असें दुखविणें—किंवा त्यांच्या मठांची लूट करणें केव्हांही रास्त ठरणार नाहीं. अशानें झालेली प्रतिक्रिया विशेष महत्त्वाची असते. शृंगेरी मठाचार्यांची टिपूनें राखलेली बरदास्त ऐतिहासिक कागदपत्रांत लिहिलेली आढळते. हिंदु-राज्यांतील जुलमास कंटाळून हे आचार्य मुसलमानी राज्यांत गेले व तेथें टिपूनें त्यांस नुसता आश्रय दिला इतकेंच नव्हे, तर मूर्तिपूजाविरोधक असूनही सुवर्णमूर्ति ओतवून दिल्या, निश्चितपणें राहण्याचा आग्रह केला, सर्व व्यवस्था लावून देण्याचें काम पत्करलें, असे उल्लेख आहेत. तेव्हां मराठ्यांच्या लुटीचें खूळ कोणत्या मर्यादेपर्यंत जाऊन पोहोंचलें होतें त्याची कल्पना येण्यास एवढे प्रसंग पुरेसे आहेत. शिवकालीन गोब्राह्मणप्रतिपाल गेला, पेशव्यांची हिंदुपदपात-शाहीची किंवा हिंदवी स्वराज्याची कल्पना मावळली आणि आतां "**धनान्य-र्जयध्वं धनान्यर्जयध्वम्**" हाच उपदेश शब्दशः आचरणांत येऊं लागला.

५. पेशवाईंत प्रामुख्यानें नजरेंत भरणारा एक दुर्गुण सर्वत्र दिसतो; तो

---

* मराठी रियासत उ. वि. १-पृ० ४९४–५.

म्हणजे स्वजनावरील अविश्वास. सरदार-जहागिरदार यांचीं आपसांत भांडणें नेहमींच चालत; त्यामुळें परकियांची पोळी पिके इकडे त्यांचें लक्षच नसे. पेशव्यांच्या कार्यक्रमांत 'जहागिरदारांचा बंदोबस्त' हें एक कलम हमेशाचेंच येऊन बसलें व त्यांची बरीचशी शक्ति ह्या बंदोबस्तासाठीं खर्च होऊं लागली. मराठी फौजेंत परप्रांतीयांचाच काय, पण परधर्मीयांचाही भरणा वाढूं लागला, हें स्वकीयांवरील अविश्वासाचें उदाहरण नव्हे तर कशाचें? तोफखान्यावरील प्रमुख कोणीही असला तरी तेथें प्रत्यक्ष काम करणारे प्रथमपासून मुसलमान किंवा फिरंगीच असत, आणि असें महत्त्वाचें साधन त्यांच्या हातीं राही. कवायती पलटणें तर सर्वस्वी फिरंग्यांच्या ताब्यांत असत. ह्या बाबतींत आपलें कांहीं चुकतें, किंवा आपणांस अशा परकीयांपासून दगाफटका होईल ही शंका देखील तत्कालीन कार्यकर्त्यांना आली नाहीं. परकियांच्या ओंजळीनें पाणी पिण्यांत या पुढाऱ्यांना, कसलीच हानि वाटली नाहीं. यावरून सर्वसाधारण मनोवृत्ति कशी झपाट्यानें बदलली हें दिसतें.

पण याहीपेक्षां महत्त्वाची गोष्ट म्हणजे पेशव्यांच्या कारभाऱ्यांनीं ठेवलेलें शरीरसंरक्षकाचें दळ ही होय. खुद्द पेशव्यांना कधींही शरीरसंरक्षक लागले नाहींत. पेशव्यांच्या अव्वल अमदानींतही धामधुमी चालत. शत्रूही सर्वत्र फैलावलेले असत. तरीही त्यांना भासली नाहीं ती गरज पेशवाईच्या अस्तापूर्वी नाना फडणिसांस आवश्यक वाटली. आणि मौज ही कीं त्या शरीरसंरक्षक पलटणांत अरबांचाच भरणा होता! स्वजनांवरील अविश्वासाची ही कमाल मर्यादा म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. ह्याच अरबांनीं शेवटीं आपला पगार चुकविल्याविना नानाचें शवही हालूं दिलें नाहीं, हा प्रकार इतिहास-वाचकांस विदित आहेच.

नाना फडणिसांनीं तत्कालीन परिस्थितीवर केलेलें हें भाष्यच म्हटलें पाहिजे. नुसत्या नानांच्या दृष्टीचा हा दोष मानतां येणार नाहीं. त्या वेळीं लोकांच्या मनोवृत्ती इतक्या साशंक व संशयी बनल्या होत्या, कीं कुणीही कुणावर विश्वास ठेवण्यास धजत नसे. नानांचें प्रचंड हेरखातें हें त्याचें प्रत्यंतर होय. आपण घालून दिलेली व वाढविलेली ही प्रथा आपल्या वाइटावर असलेल्या इतर कारस्थानी मंडळीस अधिक उपयोगी पडेल, हा विचार नानांना—त्या बुद्धीच्या सागराला—सुचला नाहीं असें म्हणावें लागतें. पण तो प्रकार वस्तुतः

तसा झाला खरा. नानांच्याच समयीं खुद्द पुण्यांत राहून भेद करणारे घरभेदे पुष्कळ होते.

आपपरभावाचा विसरही या प्रकारांतला होय. खुद्द पेशवे यांनीं आपल्या हाताखालच्या सरदारांचा बंदोबस्त करतांनासुद्धां हा तारतम्यभाव दाखविला नाहीं. नानासाहेब पेशव्यानें केलेला आंग्र्यांचा मोड किंवा भोसल्यावर मराठा पलटणी चालून गेल्यावेळचा प्रसंग काय दर्शवितो ? आणि इंग्रजांचें सामर्थ्य बळावून टिपूचा पाडाव करण्यासाठीं मराठ्यांनीं टोपीकरांशीं केलेलें संगनमत काय किंमतीचें ठरवावें ? वास्तविक आंग्रे म्हणजे जातिवंत दर्यावर्दी; पोर्तुगिजांचीसुद्धां डाळ त्यानें शिजूं दिली नाहीं. त्याचा नायनाट करावा असें पेशव्यांना वाटलें हेंच मुळीं वाईट आणि त्यासाठीं त्यांनीं 'परकीयांचें' सहाय्य घेतलें हें अविकच निंद्य.

मध्यवर्ति सत्ता जेव्हां अधिक बलशाली असावयास हवी होती तेव्हांच ती बलहीन झाली आणि त्यांत भर पडली ती कोणी कोणाला न मानण्याच्या वृत्तीची. कुणाचीच सत्ता न मानतां मन मानेल तसें मोकाट वागण्याची संवय मराठी सरदारांना लागली. वैयक्तिक कमाईला अधिक महत्त्व आलें. त्यामुळेंच हे सर्व दुष्परिणाम ओढवलेले दिसतात. मराठे सरदारांची आपसांतील यादवी किती तीव्र होती, किंवा खुद्द पेशव्यांच्या नगरीबद्दल त्यांना काय वाटत होतें हें पलायनपटु रावबाजींच्या कारकीर्दींत पुणें शहरावर हल्ला झाला तेव्हां स्पष्ट झालें आहे. अशा प्रकारें शास्ते व शासित या दोन्ही घटकांत कसलाच धरबंध उरला नसल्यानें सहकार्य होण्याऐवजीं दोघांचीही मेहनत बऱ्याच प्रसंगीं परस्परविरोधी ठरली व त्यामुळें दोघांचाही नाश होऊन फायदा मात्र तिसऱ्याचा झाला.

पेशवाईंत परोत्कर्षाबद्दल असहिष्णुता विशेष वाढली. शिंदे–होळकर यांची तेढ, सातारकर–कोल्हापूकर यांची स्पर्धा, नाना–महादजीमधील चुरस,...... इत्यादि किती तरी द्वंद्वें त्या वेळचीं म्हणून दाखवितां येतील आणि तीं सर्व असहिष्णु स्वभावाचींच द्योतक ठरतात. सर्वांनीं मिळून एका समाजाची किंवा राष्ट्राची कमाई वाढविण्याऐवजीं प्रत्येक जण आपली तुंबडी भरूं लागला म्हणजे असें व्हावयाचेंच.

६. व्यापक दृष्टीचा अभाव हेंही आणखी एक वैशिष्टय त्या वेळच्या समाजांत दिसतें. शिवाजी महाराजांची दूरदृष्टि किंवा व्यापक दृष्टिकोन नंतरच्या राजकारणांत फारसा आढळत नाहीं. राघो भरारीनें अटकेपार झेंडे मिरवून पेशावर काबीज केल्यावर त्याला "काबूल–कंधाहार हे अटकेपारचे सुभे हिंदुस्थानांतच म्हणजे पर्यायानें आपल्या हुकमतीखालीं" ठेवण्याची महत्त्वाकांक्षा साहजिकच झाली. पण त्यास तसें उत्तराभिमुख राहूं न देतां पेशव्यानें लगेच दक्षिणेकडे बोलावून घेतलें. कारण त्या मोहिमेचें वास्तविक महत्त्व पुण्यास बसून कार-स्थानें लढविणाऱ्या पटाईत मंडळीसही कळलें नसावें.

दुसराही एक प्रसंग तसाच आहे. पेशव्यांचा वकील, हिंगणे, दिल्लीहून लिहितो, "......हिंदुस्थान निवारसी झालें आहे. ......ही पातशहात आपले हातीं लागली आहे. ...त्यास पन्नास हजार स्वार लाहोरास राहतील तर अटक-काश्मीरपावेतों दाब बसून पैक्यासही कमी पडणार नाहीं. इंग्रज रिकामा जाल्यावर तो अथवा शीख अथवा विलायतेचा ( अफगाण मुलखांतील ) कोणी सरदार, पूर्वीच्या अब्दालीचा मुलगा तैमूरशहा वगैरे दिल्लींत येऊन बसल्यास मग भारी पडेल. त्यास जो बंदोबस्त करणें तो सत्वर व बळकट करावा."* पण या लिखाणाचें महत्त्व कुणाला कळलेलें दिसत नाहीं. पाटिलबावा कर्जांत बुडलेले. 'पेस्तर तेस्तर सालचें' उत्पन्न आधींच गहाण पडलेलें; अशा स्थितींतही 'इतका पैसा होतो काय' म्हणून पुणें दरबारची टेहळणी दिल्लींत शिंद्यावर होती ! सर्व पेशवे नेहमीं कर्जबाजारी असत व इतर सरदार मात्र संपत्तींत डुंबत रहात, ह्या गोष्टीवरूनही हेंच सिद्ध होतें कीं, खासगी मालकीचें महत्त्व त्यांना अधिक वाटलें; समाजहिताकडे त्यांचें लक्ष नव्हतें.–कदाचित् तितकी व्यापक दृष्टीही त्यांना नसावी.

म्हणूनच बादशाहीचा कारभार हांकणाऱ्या पाटिलबावांस पुणें दरबारचीं आर्जवें वारंवार करावीं लागलीं. बादशहाला खेळवणारा कर्तबगार लढवय्या सालोसाल कर्जांत बुडत चालला आणि पेशवाईचा कारभार करणाऱ्या फडणिसांची खासगी मात्र फुगत चालली ! नर्मदातीरीं ब्राह्मण-भोजनें घालण्यांत व

---

* मराठी रियासत उ. वि. २–९५

काशी, प्रयाग वगैरे तीर्थक्षेत्रीं अन्नछत्रें चालविण्यांत होळकरांचा पैका उडत होता. दिल्लीच्या राजकारणाचें महत्त्व बाईला कळलें नसल्यास नसो, पण ‘ मनसुब्याची तलवार ’ अशा फडणीस नानांस तें उमगूं नये हें विचित्र! आणि मग त्यांतील खरें महत्त्व इतरेजनांच्या लक्षांत आलें नाहीं यांत आश्चर्य कसलें?

७. शिवपूर्वकालीं धार्मिक उपदेशाचा दुरुपयोग झाला किंवा लोकांनीं तो केला तसा पेशवाईंतही झालेला दिसून येतो. लिंगार्चनें, ब्राह्मण-भोजनें, दानधर्म, दक्षिणा, यांत पैसा व्यर्थ जाऊं लागला हें अरिष्ट तर खरेंच, पण त्यामुळें समाजांत आईतखाऊ, आळशी व परजीवोपजीवि अशांचा एक वर्ग बनत चालला आणि बहुजनसमाजाला झुलवून त्याच्यावर आपली हुकमत कायम रहावी अशा प्रकारचें आचरण त्याचे हातून साहजिकच होऊं लागलें. उत्तर पेशवाईंत त्या ऐदी वर्गानें आपलें समाजांतील उच्च स्थान कायम टिकविण्यासाठीं अनेक हिकमती योजून ज्योतिष, मुहूर्त, शुभाशुभ, शकुनापशकून, व्रतें, वैकल्यें, नेम, दानधर्म......इत्यादिकांचें वंड फार माजविलें. वाड्यांत प्रवेश करण्यास मुहूर्त; गडावरून खालीं येण्यास शुभ वेळा; साधीं बोलणीं करण्यास शकून; देवाचा कौल;.......असले प्रकार या अवधींत मनस्वी वाढलेले दिसतात.

धर्माच्याच पगड्यामुळें मल्हारराव होळकरांस मराठशाहीचें हित साधतां आलें नाहीं. उलट ‘ अस्तनींतच अग्न ’ असावा अशी त्यांची अवस्था झाली. नजीबखानाचें पारिपत्य कसेंही करून प्रथम करा, हा रघुनाथरावाचा हुकूम मान्य करणें जनकोजी शिंद्यास शक्य नव्हतें. कारण, नजिबखानच काय पण “ माधवसिंग जयनगरकर, बिजेसिंग मारवाडी वगैरे बहुत धर्मपुत्र मल्हाररावास होते व या धर्मपुत्रांचा फलादेशही ते भोगीत आले. ” धर्माचा अर्थ भलता होऊन धर्माला नसतें महत्त्व उत्तर पेशवाईंत मिळालें. मराठ्यांचा शेजारचा शत्रु निजाम शरण आला एवढ्या बाबीवरच त्याची गय होई. पण नजीबखान, निजाम ह्या दोघांना कचाटींतून सोडल्यामुळें — धर्माच्या ‘उच्च’ भावनेनें प्रेरित होऊन सोडल्यामुळें — मराठशाहीवर किती अनर्थपरंपरा ओढवली हें लोक-विश्रुत आहे.

धार्मिक वर्चस्व तसें म्हटलें तर शिवशाहींतही होतें. पण त्याचा विपर्यास पेशवाईंतच होऊं लागला. मात्र त्या धर्मगुरूंच्या भक्तीचें रूपांतर बुवाबाजींत झालेलें आढळतें तें धावडशीकर ब्रम्हेंद्रस्वामीपासून. पेशवे वगैरेंना, फार काय छत्रपतींनासुद्धां, स्वतःच्या कच्छपीं लावण्यांत हे महाराज कुशल होते. पेशवे–छत्रपती यांच्या अंतःपुरांतसुद्धां महाराजांचा प्रभाव दांडगा असे. पण साधुगिरीवर ह्या योगी महाराजांनीं सावकारी फुगविली असल्यामुळें कदाचित् कर्जबाजारी पेशवे त्यांना गुरुस्थानीं मानीत असावे. शिवाय शाहूच्या दरबारीं बाजीरावाबद्दल कलुषित मत पसरविण्याचा प्रयत्न बहुत होई, त्यावर तोडगा म्हणूनही पहिले बाजीराव ब्रम्हेंद्रस्वामीस गुरुमाऊली म्हणत असावे.

पानपतच्या संग्रामामुळें मराठी जीवनांत क्रांतिकारक फरक पडला असला पाहिजे. तत्संबंधीं फारशी माहिती उपलब्ध नाहीं. पण ठाऊक असलेल्या इतिहासावरून, महत्त्वाच्या वाटल्या त्या बाबी घेऊन विचाराची पहाणी करण्याचा हा प्रयत्न आहे. पेशवाईचे नुसते गोडवे गाणें किंवा त्या राजवटीस शिव्यांची लाखोली वहाणें यापैकीं कोणताच हेतु अभिप्रेत नाहीं. तेव्हां पेशवाईच्या अखेरीस कोणती परिस्थिति होती, तत्कालीन समाजाची मनोवृत्ति कशा प्रकारची असावी हें अजमावण्यास वरील निरीक्षण पुरे होईल. आणि मग रावबाजीच्या अमदानींत मराठशाहीचा नाश कां झाला तें कळेल.

रावबाजी अधिकारावर आले तेव्हां समाज ध्येयशून्य, संशयी व कर्तृत्वाचा विसर पडलेला असा होता. नानांची पुण्याई ओसरत चालली, तसतशी त्यांची दूरदृष्टि व राष्ट्रहितबुद्धीही त्यांना सोडून गेल्यासारखी दिसते. नानांच्या अखेरच्या वर्तनानें आधींच अस्वस्थ असलेल्या समाजांत विशेष अस्थिरता उत्पन्न झाली व त्यांत रावबाजींच्या चाळ्यांनीं अधिक भर घातली. मग स्वारीनें राज्यच उडविलें, पणाला लावलें–ही कांहीं विशेष बाब नाहीं. रावबाजीच्या लहरी व भित्र्या स्वभावामुळें छत्रपति व छत्रपतींचे सरदारसुद्धां, इंग्रजांचे अंकित बनले. एका तहानें मराठशाही इंग्रजांची झाली! आणि इतक्या वर्षांची कमाई पार धुऊन गेली! बाजीराव व रावबाजी या दोन पुरुषांच्या कारकीर्दींत सारी मराठशाही वाढली व संपली देखील!!

# अवघा शंभर वर्षांचा कारभार !

दिल्ली व एकंदर उत्तर हिंदुस्थान इकडील राजकारण मराठ्यांना अवघीं शंभर वर्षेंसुद्धां पुरलें नाहीं. अटकेवर भगवा झेंडा मिरविणारांना शनवार वाड्यावर इंग्रजी निशाण फडफडत असल्याचें दिसलें ! !

मराठी इतिहासाचें हें धांवतें परीक्षण संपलें. देवांची भक्ति करण्यांतच जीवितसर्वस्व मानून ऐहिक कर्तव्याचा विसर पडलेला मराठी समाज हळु हळू दरबारी देवांस -- मुसलमानी पातशाहा व त्याचे मानकरी यांस -- भजूं लागला हें आपण पाहिलें. त्या वेळची असहाय्य अवस्था घालविण्यास शिवाजी महाराज पुढें आले. त्यांनीं धर्माचा अर्थ नीट लावून धर्माखातर स्वराज्यस्थापना केली व मराठ्यांच्या कामगिरीला नवें वळण लावलें. मुसलमानांनीं भूषिलेल्या तख्ताचा 'उपमर्द' करण्याचा अधिकार वंशपरंपरा त्याच तख्ताशीं राजनिष्ठ रहाणारांनाही आहे, हा शोध लावून तो यशस्वी करून दाखविल्याबद्दल शिवाजी महाराज शंकराचे अवतार ठरले ! धर्माच्या कल्पनेंत मराठ्यांनीं विकास केला. पूर्वीं पातशहांची सेवा करणें हा धर्म होता, तर नंतर पातशहाशीं झुंजून स्वराज्य स्थापणें हा धर्म झाला. पुढें पेशवाईंत उत्तरेकडे जाण्याच्या प्रसंगामुळें मराठ्यांची दृष्टि व्यापक झाली आणि तिकडे मुलुख-गिरीस प्रारंभ झाला. पण सरंजामी वाढली; ध्येयाचा, धर्मतत्त्वाचा विसर पडला आणि मग अधःपात जवळ आला. साहजिकच पुनः धर्म मदतीस येऊन मराठे निष्क्रिय राहिले. धार्मिक मदानें त्यांचें गतवैभव त्यांना आठवेना, तत्कालीन दैन्यावस्था कळून येईना किंवा पेशवाई गिळंकृत करण्यास टपलेला डोळ्यांपुढें असूनहि दिसेना ! अशी परिस्थिति कां आली किंवा मराठ्यांना ध्येयाचा विसर पडून त्यांची कर्तबगारी इतक्या अल्पकालांत कां आटली याचें विवेचनकेलें पाहिजे. तसेंच, मराठी राज्यकर्त्यांकडून कांहीं भरीव कामगिरी कां झाली नाहीं, याचींही कारणें सांगतां आल्यास पाहूं.

मराठ्यांचा स्वराज्य-संस्थापनेचा प्रयत्न सुरू झाला तो मुसलमानी हल्ल्यांच्या व जुलमी अंमलाचा प्रतिकार म्हणून. तेव्हां आपलें साम्राज्य कसें असावें किंवा त्याची रूपरेषा आधीं आंखणें अवश्य आहे वगैरे विचार प्रतिरोधकांचे मनांत आले नाहींत. शिवाय आज आपणांस अनेक साम्राज्यांचे इतिहास, त्यांच्या

उत्कर्षापकर्षाचीं कारणें दर्शविणारे टीकात्मक प्रबंध, प्रत्येक राजवटीची गुण-दोषचर्चा करणारे व अधिकारी लेखणींतून उतरलेले ग्रंथ उपलब्ध आहेत. तशी मार्गदर्शक व विचारांना चालना देणारी सामग्री तेव्हां कुठें होती? आज आहे तसा उज्ज्वल इतिहास तत्कालीन मराठ्यांच्या मागें नव्हता. तेव्हां त्या वेळच्या मराठ्यांच्या अडचणी नीट लक्षांत घेतल्या पाहिजेत. अनेकांच्या उदाहरणानें व इतिहासवाचनानें आज आमची दृष्टि जितकी व्यापक झाली आहे तितकी तेव्हां झालेली कशी असेल? म्हणून मराठ्यांच्या त्या परि-स्थितीचें परीक्षण करतांना हा विचार चित्तांत अवश्य वागविला पाहिजे. मुसल-मानांचा हल्ला होऊं द्यावयाचा नाहीं – त्यांच्या कचाट्यांतून देवळें, गाई-बैल, ब्राह्मण,* वांचविणें एवढेंच प्राथमिक ध्येय मराठ्यांच्या (धार्मिक) स्वराज्यांत वसणारें होतें. गो-ब्राह्मणप्रतिपाल करण्यासाठीं मुसलमानांना थोपवून धरलें म्हणजे काम भागतें अशी त्यांची भावना झाली. आणि शिवशाहींत संपादिलेल्या यशानंतर काय करावयाचें ही पंचाईत लढाऊ सरदारांना पडली. कारण मुसलमानांचा बंदोबस्त होऊन गो-ब्राह्मणप्रतिपाल यथास्थित होत होता. कोणाचें विघ्न त्यांत येत नव्हतें. त्यांनीं देवालयें बांधलीं, जीर्णोद्धार केला, मशिदींनाही उत्पन्न नेमून दिलें...यापेक्षां आणखी काय करावयाचें होतें? दळणवळणाचीं साधनें नाहींत म्हणून ज्यांना परकीय हल्ल्यांचा विशेष त्रास झाला नाहीं, ते लोक सडका बांधण्यास केव्हांही नाखूष असणारच! शिवाय व्यापाराचें वावडें मराठ्यांस पूर्वींपासूनचें असल्यानें त्यांना रस्त्यांचें महत्त्व कसें कळणार? परराज्यांत जाऊन आपलें वर्चस्व स्थापणारांस मात्र सडकांचें महत्त्व ताबडतोब कळतें. आणि म्हणूनच मोगलांनीं मोठमोठ्या सडका बांधल्या – इंग्रजांनीं रेल्वे व रस्ते केले.

व्यापार किंवा उद्योगधंदे यांची वाढ मराठी अमदानींत झाली नाहीं त्याचीं कारणें अशीं: एक तर महाराष्ट्रांत व्यापारोपयोगी जिन्नस फारसे नाहींत. मोठ्या जिकीरीनें मराठा शेतकरी आपलें पोट भरण्याइतकी पैदास

* ब्राह्मणांची संभावना गाईबरोबर व्हावी व त्यांना गाईप्रमाणेंच इतरांकडून संरक्षणाची अपेक्षा असावी ही वस्तुस्थिति कशाचें द्योतक आहे?

जमिनींतून करतो. स्वराज्य झाल्यानंतरही 'कारखान्यां'चीं कामें दरबारकडून सुरू झालीं नाहींत. मराठशाहींतही अठरा कारखाने असत; पण त्यांचें स्वरूप वेगळें होतें. मोगल लष्कराचा जामानिमा पुरविणारे कारखाने असत; तशांची मराठ्यांना आवश्यकता नव्हती. अशा प्रकारें मराठ्यांचें व्यापार-उदिमाकडे दुर्लक्ष झालें. मात्र पेशव्यांनीं सावकारांशीं व्याहीपणा जोडण्यांत जी दूरदृष्टि दाखविली तीच त्यांची उन्नति करण्याकडे खर्चली नाहीं. आपणांस कर्ज सुलभतेनें मिळावें याच दूरदर्शी हेतूंनीं त्यांनीं सावकार घराण्यांशीं शरीरसंबंध जुळवून आणले असावे.

८. परंतु या सर्व कारणांपेक्षां मराठ्यांचा आत्मविश्वास खच्ची झाला हें कारणच महत्त्वाचें मानलें पाहिजे. धार्मिक विचारसरणीचा पगडा लोकांवर मनस्वी असून त्याचा परिणाम विपरीत झालेला दिसतो. अवतार-कल्पना किंवा भक्तिमार्गी उपदेश ह्यांचा दाब मराठी मनावर विशेष असल्यानें ते कर्तृत्वशून्य बनून, प्रतिकाराची प्रवृत्ति त्यांच्यांतून नष्ट झाली. स्वराज्यस्थापनेचें कार्य 'धर्म' म्हणूनच त्यांनीं स्वीकारल्यानें आणि 'धर्म' या शब्दाचा अर्थ फार व्यापक आणि संदिग्ध आहे म्हणून, सर्वांचें ध्येयैक्य साधलें नाहीं. उलट, धर्माचा अर्थ भलताच होऊन नैराश्याचा पगडा जनमनावर अधिक बसला. अवतारकल्पनाच पहा. अवतार एकदां समाप्त झाल्यावर मग त्या अवतारी पुरुषाचें अनुकरण करण्याकडे प्रवृत्ति न होतां, पुनः अधोगतीला जाण्याची तयारी होऊं लागते. आणि 'असें हें होणारच,' 'अधर्म मातलाच पाहिजे,' 'मग पुनः दुसरा अवतार येईल,' अशा आशयाचे आशापूर्ण (?) उद्गार जिकडे तिकडे ऐकूं येतात. 'हें कलियुग आहे, असें चालावयाचेंच' या बोलांत प्रकट होणारी असहाय विचारपद्धति वास्तविक 'धर्म्य' नव्हे ! पण ती तशी वेळोवेळीं समाजांत बळावून समाजांतील कर्तृत्व नष्ट झालें हें अगदीं खरें. "**ठेविले स्थितीं देवानें तींतच सुख मान रे**" असला नेभळट उपदेश महाराष्ट्र–जनतेच्या रोमरोमीं भिनला आणि महत्त्वाकांक्षेची वृत्ति अजीबात लोपून गेली. जिकडे तिकडे अल्पसंतोषाचेंच साम्राज्य दिसलें. कारण कितीही जुलूम झाला, कितीही हाल सोसावे लागले तरी 'समाधान'

मानून रहाणें हेंच खरें सौख्य, असा उपदेश बाळपणापासून कानांवर पडलेला. अफूच्या गोळीनें आलेल्या शान्त झोंपेहून हें समाधान निराळें कसें? मूळ हिंदु अवतारकल्पनेचा किंवा धर्मातील इतर शिकवणींचा हेतु कितीही उच्च व स्तुत्य असला, तरी प्रत्यक्ष परिणामावरून मत ठरविणें झाल्यास त्या शिकवणीनें आमची हानि केली असेंच म्हणणें भाग पडेल. आपलीं ध्येयें पक्कीं करतांना त्यांना धर्माच्या निकषापेक्षां बुद्धीचाच निकष लाविला पाहिजे, हें तर ह्या विवेचनावरून कळतेंच; प्रण 'धर्मा'ला कितपत मानावें व व्यवहारांत त्याचा मान किती राखावा हेंही लक्षांत येतें.

शिवाय धर्माचा उपयोग, उपयोग म्हणण्यापेक्षां दुरुपयोग, इतर लोक कसा करून घेतात हेंही ध्यानांत घ्यावयास हवें. शिवपूर्वकालची हलाखीची अवस्था सांगितली, तेव्हां ऐहिक जाचांकडे प्रजेचें लक्ष लागूं नये, त्यांनीं क्रियाशून्य राहून सोशिक बनावें, अशा प्रकारची 'अफूची गोळी' समाजाला मिळाली म्हणून म्हटलें. तशीच अवस्था पेशवाई अखेरीस अव्वल इंग्रजींतही झाली. आपल्या गतवैभवाची उत्तेजक स्मृति कुणास होईना, कोणांत वीरःश्रीचें वारें चढेना किंवा पूर्वींची आठवण होऊन तत्कालीन दैन्याबद्दल दुःख होईना. सगळेच लोक 'मादक' धर्माच्या गुंगीखालीं असल्यानें वास्तविक दुःखाची व असहाय्यतेची खरी कल्पना त्यांना येईना. 'भविष्य पुराणां'त लिहिल्याप्रमाणें सर्व घडून येतें एवढ्यावर त्यांच्या विचारशून्यतेची मजल थांबली नाहीं, तर पुराणांत 'होणार' म्हणून वर्णिलें आहे तसें आपण आचरण केलें नाहीं, तर पुराणें असत्य ठरतील, ह्या फाजील दुरभिमानाला पेटून तत्कालीन पुढाऱ्यांत कमालीचें शैथिल्य व निष्क्रियता माजली, व धर्माचा अर्थ विपरीत झाल्यानें समाजांत ती पसरली. '**नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण**' ही परंपरा समाजांत ऐतिहासिक दाखल्यानें पटते. परंतु उन्नति करून घ्यावी अशी नुसती इच्छा असली तरी आशेला पुष्कळच अवसर असतो. पण, 'ही अशी अवनति होणारच,' 'नशिबीं असलेलें टळत नाहीं,' 'स्वस्थ रहावें, जें जें होतें तें तें पहावें,' असली दुबळी व पौरुषत्वाचा अभाव दाखविणारी भावना समाजांत रूढ झाली, तर मात्र समाधानाला मुळींच जागा नसते! नीच स्थितींतून उच्च स्थितीकडे जाण्याची इच्छा असली तरी भागतें; मात्र

# डुबळा दैववाद !

प्राप्त स्थिति ' दैववादा ' मुळें आली असें मानण्याची मनोवृत्ति नसावी. पण मराठे दैववादी राहिले; प्रयत्नवाद त्यांना फारसा पटला नाहीं; विचारप्राधान्य त्यांच्या आचारांत विशेषसें दिसलें नाहीं, आणि म्हणूनच, त्यांनीं उभारलेला वैभवाचा मनोरा इतक्या जलदीनें गडगडला, ते उच्च स्थान गांठतात न गांठतात तोंच अधःपाताला जोरानें सुरवात झाली.

---

# ४ मराठेशाहीची अखेर



१. महाराष्ट्रांतील विचारांची वाढ कसकशी होत गेली हें पहातांना शिवपूर्वकालांतून मराठशाहीच्या अखेरपर्यंत निरीक्षण केलें. इतउत्तर इंग्रजी अंमलास प्रारंभ झाला. इंग्रजांबद्दल वेगवेगळ्या लोकांचीं जरी वेगवेगळीं मतें असलीं, तरी त्यांच्याशीं घडून आलेल्या संबंधामुळें महाराष्ट्राच्याच काय, पण अखिल हिंदुस्थानच्या विचारांत झपाट्यानें वाढ झाली याबद्दल दुमत होणार नाहीं. इंग्रजी ग्रंथांचें वाचन वाढूं लागलें, इंग्रजांच्या राजकीय कल्पनांशीं ओळख अधिकाधिक होऊं लागली, सामाजिक चळवळींशीं परिचय होत गेला, तसतशी आमच्या कल्पनांत व विचारांतही साहजिकच भर पडत चालली. कित्येक प्रसंगीं तर असेंही आढळतें कीं अगदीं तिकडील विचार आमच्या पेहरावांत मिरविण्याचा प्रयत्न बऱ्याच जणांनीं करून पाहिला. त्या दृष्टीनें विचारसरणीची प्रगति लक्ष देऊन पाहिल्यास तींत

इतरत्र आढळणारे नव्याजुन्यांचे झगडे व प्रत्येक पक्षाचे स्वमतसमर्थनार्थ योजिलेले युक्तिवाद अभ्यासूंना उपयुक्त व उद्‌बोधक वाटतील.

केवळ व्यापारासाठीं दूर देशाहून येथें आलेले इंग्रज अखिल हिंदुस्थानचे सत्ताधीश बनले हेंच मुळीं आश्चर्य ! त्यांत घरच्या भेद्यांनीं परकियांना मदत केली व त्यांचें बूड येथें स्थिर केलें हें विशेष आश्चर्य ! मग हिंदी लोकांच्या मदतीनें आम्ही हिंदुस्थान मिळविलें असें इंग्रजांनीं म्हटल्यास काय वावगें ? तें कांहींही असो, हिंदी व्यापाऱ्यांनीं व हिंदी सैन्यानें इंग्रजांना येथें स्थायिक होण्यास मनोभावें मदत केली हें खरें. कदाचित् आपण काय करीत आहोंत व याचे परिणाम काय होणार हें अजमाविण्याची दूरदृष्टि त्यांना नसावी. हिंदी राजेरजवाड्यांच्या आपसांतील दुहीनें देखील इंग्रज बळावले. तत्कालीन राजकारणांत सावकारांचें महत्त्व विशेष असल्यानें त्यांना मोठमोठ्या राजकीय उलाढालीसुद्धां करतां येत. इंग्रजांचे पाय प्रथम स्थिरावले ते बंगालमध्यें; आणि त्या प्रांतांतील इंग्रजांचा सुरवातीचा इतिहास पाहिल्यास आपणांस असें आढळतें कीं, तत्कालीन ' शेठ ' मंडळींनीं म्हणजे तेथील सावकारांनीं इंग्रजांचा हात तेथें अंतस्थ कारभारांत अधिकाधिक शिरूं देण्यास मदत केली. इंग्रजांना अवघ्या पांच वर्षांत बंगाल मिळाला याचें प्रमुख कारण ' शेठ ' मंडळी त्यांना वश होती हेंच होय.*

इंग्रजांच्या सहाय्यास शेठ मंडळी कां आली ? आणखी इतर कोणाची मदत ह्या विलायती व्यापाऱ्यांस झाली ? वगैरे प्रश्नांची मीमांसा करण्यासाठीं थोडासा पूर्वेतिहास पाहिला पाहिजे. मोगल साम्राज्याच्या पडत्या काळांत ठिकठिकाणचे प्रान्ताधिकारी शिरजोर होऊन त्यांनीं सवतासुभा स्थापला. म्हणजे नुसते अधिकारी होते ते आतां राजे बनले. दिल्लीची सत्ता त्यांनीं झुगारून दिली. अशामुळें सर्व देशभर अंदाधुंदी माजली, लुटालुटीस ऊत आला, व रयत पिळून निघाली. अशा वातावरणांत व्यापारधंदे नीट चालूं शकत नाहींत. त्यामुळें कारागिरांना व व्यापाऱ्यांना बसून रहावें लागलें. जमीनदारांच्या गांजणुकीमुळें शेतकरी नाडला जाऊन शेतीवाडी ओस पडली. पण उत्पन्न कमी झालें ही बाब सत्ताधारी जमीनदार व सरदार यांच्या लक्षांत मुळींच

* W. W. Hunter: *A Note on the History of the Sheths.* [ *Bengal Gazetteers : Murshidabad.* ]

आली नाहीं. त्यांची चैन पूर्ववत् चालू राहिली. तिला पैसा पुरेसा मिळेना म्हणून त्यांनीं आपल्या हाताखालील रयतेला जुलुमाच्या जांत्याखालीं अधिकाधिक भरडून काढण्यास सुरवात केली. सावकारांना धाकदपटशा किंवा वेळप्रसंगीं मारहाण करूनही कर्ज उकळण्याची बुद्धि सरदार–जमीनदारांना होऊं लागली. मुर्शिदाबादचे ‘ शेठ ’ आणि सिराजुद्दौला यांच्या परस्परसंबंधाचा इतिहास पाहिला कीं या विधानाचें प्रत्यंतर येईल.

जवळ जवळ अशीच परिस्थिति फ्रेन्च राज्यक्रान्तीपूर्वीं फ्रान्समध्यें होती. पण तिकडील सावकार व व्यापारी मंडळींनीं अनुकूल परिस्थितीचा पूर्ण फायदा घेऊन राज्यक्रान्ति ‘ घडवून ’ आणली. तशी बंगाली शेठसावकारांना घडवून आणणें शक्य झालें नाहीं. कारण फ्रान्समधील व्यापारी समृद्ध व संघटित होते, तसे बंगालमधील नव्हते. म्हणून अंतस्थ जुलमी कारभाराला कंटाळलेल्या बंगाली व्यापाऱ्यांना याचा प्रतिकार करतां आला नाहीं. उलट, परकियांकडून अशा जुलमी सरदार–जमीनदारांचा परस्पर बींमोड करण्याची खटपट त्यांनीं आरंभिली. कांहीं झालें तरी इंग्रज भिन्नधर्मी, भिन्नदेशी, भिन्नभाषी व भिन्न-वर्णी. तेव्हां त्यांना स्वबांधवांविरुद्ध मदत करण्यांत बंगाली व्यापाऱ्यांनीं स्वजन-द्रोह केला ही गोष्ट खरी. पण देशप्रेम किंवा बंधुभाव असल्या नात्यापेक्षां समव्यवसायामुळें होणारी गट्टी अधिक प्रभावी ठरली. कारण इंग्रजांचा व बंगाली व्यापाऱ्यांचा पेशा एक पडला.

समाजांतील वरचे म्हणून समजलेले वर्ग अशा प्रकारें इंग्रजानुकूल होते. तेव्हां बहुजनसमाज तरी काय करणार ? शेतकरी, कारागीर, उदमी आणि मजूर यांची स्थिति शोचनीय झाली होती. सत्ताधीशांचे चढते हल्ले, जमीन-दारांचा वाढता जुलूम, चोराचिलटांचा मनस्वी उपद्रव इत्यादि आपत्तींनीं पीडलेली प्रजा प्रतिकारशून्य बनली. कांहींही होवो, पण आहे ही स्थिति बदलावी अशी वैतागाची मनोवृत्ति तिच्यांत बोकाळली. स्वतः हातपाय हालवून जुलमी अंमलाचा बंदोबस्त करण्याची धमक रयतेंत नव्हती. अशा नैराश्यपूर्ण परिस्थितींत बंगाल असतां इंग्रजांसारख्या हुषार व्यापाऱ्यांनीं ह्या सुसंधीचा यथायोग्य उपयोग करून घेतला. बंगाल त्यांच्या हातीं अल्पायासें गेला. आणि मग बंगालच्या जोरावर मद्रास, म्हैसूर वगैरे प्रान्त त्यांना जिंकतां आले व मराठ्यांच्या स्वातंत्र्यावर घाला घालण्यास फावलें.

३. बंगाल अमलाखालीं आणण्यास इंग्रजांना फक्त पांचच वर्षें लागलीं; पण महाराष्ट्र आहारीं पाडण्यास मात्र चाळीस पन्नास वर्षें मराठी सत्तेशीं त्यांना झुंझावें लागलें. याचें कारण काय असावें ? मराठी मुलखावर ताबा मिळविण्यापूर्वी इंग्रजांची सत्ता इतरत्र प्रबल झाली असतांही मराठी राज्य सहजासहजीं कावूंत आलें नाहीं, याला सांस्कृतिक व इतर पुष्कळ कारणें आहेत. त्यांपैकीं शेलकींच येथें विचारांत घेतलीं आहेत. बंगालचे मानानें महाराष्ट्र अधिक डोंगराळ व खडकाळ. शिवाय इंग्रजांना बंगालची माहिती होती तशी महाराष्ट्राची नव्हती. पण मुख्य कारण हें कीं, मराठ्यांचें कांहीं झालें तरी स्वराज्य होतें. त्याच्या उलट बंगालमधील राज्यकर्ते पडले उपरे, परकी व परधर्मी. परकीय व परधर्मीय अंमलाखालीं बंगाली खितपत होते तसे मराठे मुळींच नव्हते. मराठे सरदार यद्यपि आपसांत धुसफुसत, त्यांच्यांत कोणी कोणाचें वरें चाहीत नसे, तथापि परकीय लोकांविरुद्ध झगडण्याची इच्छा कमी अधिक प्रमाणांत बहुतेक सरदारांना शेवटपर्यंत होती. महाराष्ट्रीय जनतेला बाजीरावी कारकीर्दींचा कंटाळा आला होता तरी, बंगाली जनतेइतके इंग्रजी अमदानीला ते खास हपापलेले नव्हते. कारण दोन्ही प्रान्तांतील जमीनमहसुलाची पद्धत निरनिराळी असल्यानें रयतेची मनस्थिति भिन्न होती. बंगाली जमीनदारीचें सरंजामी स्वरूप रयतेला विशेष तीव्र भासत होतें. महाराष्ट्रांतही सरंजामी होती. वतनें व सरंजाम हे सरदारांना मिळत. परंतु जमीन शेतकऱ्यांची राहून, बंगालप्रमाणें सरदारांना तिजवर मालकी कधींच सांगतां आली नाहीं. महसूल वसूल करून त्याचा एक ठराविक हिस्सा स्वतःसाठीं घेण्यापलीकडे मराठी सरंजामी हक्काची मर्यादा गेली नव्हती.* त्यामुळें बंगाली शेतकऱ्यांची झाली तेवढी पिळणूक व हलाखी जहागिरदारांना मराठी शेतकऱ्यांची करतां आली नाहीं.

४. बंगाल आणि महाराष्ट्र यांमधील सामाजिक घटकांचे आपसांतील संबंध अशा प्रकारें थोडेसे भिन्न असले तरी ऐतिहासिक दृष्ट्या दोन्हींकडे परिणाम जवळ जवळ एकाच प्रकारचे झाले, असें म्हणतां येतें. कारण, बंगालमधील रयत तेथील अधिकाराला व जमीनदारांच्या जाचणुकीला कंटाळली, वैतागली

* A. S. Altekar: *History of Village Communities in Western India. pp. 84–5.*

तशीच मराठी प्रजाही इकडील व्यवस्थेस कंटाळली, वैतागली. त्यावेळीं इकडे राज्यकर्त्यांत बेशिस्त व कर्तव्यच्युति, सरदार मंडळींत आळस व घरभेदी-पणा, सावकारांत असंतोष व अस्थिरता, व्यापाऱ्यांत कुचंबणा, सर्वसाधारण जनतेंत संपूर्ण नैराश्य, हींच बोकाळलीं होतीं. मात्र एवढी गोष्ट खरी कीं बंगाल-मध्यें ( किंवा इतर प्रांतांतही ) होतें त्या मानानें मराठ्यांचें लक्ष व्यापारउदिमा-कडे कमी होतें. तरीही मराठी मुलखांत गुजर व जैन व्यापाऱ्यांचें प्राबल्य होतें असें दिसतें. बंगाल्यांतील उमीचंद व जगत्शेठ यांच्या 'गुप्त' नातेवाइकांकडे मराठी मुलखांतला पुष्कळसा व्यापार असे. त्या वेळीं व्यापारी एके ठिकाणीं न रहातां प्रांतो-प्रांतीं पेढ्या स्थापून रहात. तसें केल्याशिवाय भागत नसे. म्हणून ह्या गुप्तांच्या पेढ्या तमाम हिंदुस्थानभर व अफगाणिस्तान, मध्य आशिया येथपर्यंतही पसरल्या असल्यास नवल नाहीं. एवढें मात्र खरें कीं, सत्ताधिशांच्या आश्रयास राहून आपला व्यापार पुढें ढकलावयाचा असा व्यापारी कावा शेठ मंडळींचा; तर धनिकांच्या जोरावर आपली सत्ता वाढवावयाची हा डाव इंग्रजांचा—असा परस्परसंबंध जमून आल्यानें उमीचंद, जगत्शेठ व त्यांची संबंधी गुप्त मंडळी, या सर्वांनीं आपल्या हातानें इंग्रजी राज्य हिंदुस्थानांत स्थिरावण्यास मदत केली आहे. व्यापाऱ्यांस खबरा आणवाव्या लागतात तशा ही शेठ मंडळी आणवीत. पण त्यांचा फायदा स्वकियांना न होतां परकियांना झाला. स्वकियांच्या मानेवर पारतंत्र्याचें जूं आपण कायमचें ठेवीत आहों याची जाणीवच त्यांना नव्हती. इंग्रजांना खबरा देणें, सरदार वगैरे वजनदार मंडळींना पदरमोड करून इंग्रजांकडे फितविणें, वेळप्रसंगीं सैन्यभरती करून देणें इत्यादि कामें, हीं शेठ मंडळी 'कर्तव्य-बुद्धीनें' इंग्रजांसाठीं करीत आली आहे असें त्यांना वेळोवेळीं इंग्रज अधिकाऱ्यांकडून मिळालेल्या प्रशस्तिपत्रकांवरून दिसतें. "आपले पूर्वज ब्रिटिश सरकारचे मोठे मित्र.... पुण्यांत झालेल्या युद्धांत आपण इंग्रजांस सहाय्य केलेंत ... एक अत्यंत महत्त्वाची बातमी इतक्या वेळेवर दिलीत कीं, ती न मिळती तर आम्हांस जय मिळण्यास एरवीं फार वेळ लागता व सायास पडते, " * अशी सनद या शेठमंडळीस जेंकिन्सच्या सहीनें दिलेली २७-११-१८१७ तारखेची उपलब्ध आहे. अशा

* भा. इ. मं. त्रैमासिक – वर्ष ६ वें. त्र्यं. शं. शेजवलकर—**ब्रिटिशांचे एतद्देशीय सहाय्यक.**

किती तरी सनदा याच पेढीवाल्यांस मिळाल्या असून इंग्रजांनीं हिंदुस्थानांत केलेल्या बहुतेक लढायांत अशीच कांहीं तरी महत्त्वाची कामगिरी केल्यानें हें घराणें पुढें आलें आहे. तेव्हां स्वजनद्रोह करण्याचा गुण या घराण्यांत पिढीजाद उतरला असें अनुमान काढणेंच अधिक रास्त ठरेल. मराठ्यांचें व्यापाराकडे व सावकारांकडेही असावयास पाहिजे तितकें लक्ष नव्हतें, हें खरें, पण समजा, त्यांनीं अधिक लक्ष दिलें असतें, तर इतरत्र इंग्रजांना सर्वस्वी अनुकूल असलेली ही पेढी मराठ्यांशींच राजनिष्ठ कशी राहिली असती हा प्रश्नच आहे! असो, मुख्य मुद्दा एवढा कीं, पैसा पिकविणारांचा पेशा एक ठरून आमच्या देशांतील व्यापारी स्वजनद्रोह व स्वधर्मद्रोह करण्यास केवळ पैशाच्या लालचीनें तयार झाले. पैशापेक्षां दुसरें दैवत त्यांना ठाऊक नव्हतें हाच त्याचा अर्थ!

५. शिवशाहींत आढळणारी ध्येयनिष्ठा आणि कर्तव्यबुद्धि ही तदुत्तर काळांत कमी कमी होत जाऊन पेशवाईच्या अखेरीस तिचा पूर्ण लोप झालेला आपण पाहिला. समाजाची ही अवनति तर खरीच, पण तिच्या भरीस दुसऱ्या बाजीरावासारखे नालायक पुरुष मराठेशाहीचे प्रमुख झाले. "सेनासाहेब सुभा (नागपूरकर भोसला) यांचें लक्ष स्वधर्मसंरक्षणाकडे पूर्ण आहे. प्रसंग पाहून जलचरांशीं तूर्त समेट घातला, परंतु त्याजवर कायम नाहींत.... कटक बंगाल्याकडे फौजा पाठविण्याची तयारी आहे .... ही गोष्ट फार चांगली. असे चहूंकडून पायबंद असल्यावर जलचर कोठपावेतो पुरे पडतील? याजकरतां फौज सत्वर बिदा करावी'* अशी धर्मरक्षणाची हाकाटी करून यशवंतराव होळकर इंग्रजांना पायबंद घालण्यासाठीं प्रयत्नाची पराकाष्ठा करीत होते. अशा वेळीं अटकेपार झेंडा गाजविणाऱ्या राघो भरारीचा बेटा – मराठेशाहींतील मुख्य सत्ताधीश – काय करीत असावा? "वाड्यांत दोनतीनशें बायका नित्य न्हावयास येत असत. त्यांनीं सकाळीं न्हावयाचा समारंभ करावा, तो प्रहर दिवसापर्यंत चाले! नंतर जेवावयाची तयारी झाल्यावर इच्छेस येईल त्या वाड्यांत बाजीरावाची स्वारी जात असे. पंक्ति-भोजनाचे समयीं सर्व काळ बायका जवळ बसलेल्या असावयाच्या. आश्रित लोकांनीं चार चार पांच पांच लग्नें करून घरीं एक बायको ठेवावी, आणि

* **मराठी रियासत** उ. वि. ३ – ३०६.

सरकारवाड्यांत बाकीच्या बायका पाठवाव्या! आणि याजकरितां अन्याबा राहातेकर यांनीं जास्ती लग्नें केलीं होतीं. जो गृहस्थ वाड्यांत बायको पाठविणार नाहीं त्याजवर श्रीमंतांची इतराजी व्हावयाची. यामुळें अब्रुदार गृहस्थांनीं वाड्यांत जाण्याचें सोडिलें, इतकेंच नाहीं तर पुणें देखील सोडिलें. सर्व अब्रुदार तितके या कृत्यास नाराजी होते; आणि गैरअब्रुदार तितके या कृत्यांत सामील होते. बायकांनीं सर्व कारभार करावा; व उलटा नवऱ्यांवरच त्यांचा हुकुम असे! त्यांनीं आपल्या नवऱ्यांकरितां श्रीमंतांस सांगून त्यांस मामलती, कमाविशी वगैरे द्याव्या! त्यांजवर नवऱ्यांचा हुकुम इतकाच कीं वाड्यांत रहा आणि सरकारची मर्जी खूष करा! बयाबाई दातारीण, शिता शेंडी, काशी दिक्षितीण, उमा फडकीण, ताई पेठीण या प्रकारच्या सुमारें दोनचारशें उनाड बायकांचा थवा नेहमीं वाड्यांत भरलेला असे. तितक्यांचे शृंगार, दागिने आणि सोंगट्या वगैरे गोंधळ चालून श्रीमंतांनीं काळ काढावा! शिष्ये, पाणक्ये वगैरेंशीं व्यभिचाराची त्यांस सदर परवानगी असे! त्यांत किती एक स्त्रिया बहुत देखण्या, रूपवान, ज्वान, थट्टेखोर व बोलक्या असत. त्याप्रमाणें रावबाजीच्या कारकीर्दीत बहुत गृहस्थांचीं घरें खराब झालीं!...जेवून उठले म्हणजे पर्वतीस वगैरे दर्शनास आल्यावर शास्त्री, पंडित व भट यांची कचेरी होत असे. त्यांपैकीं कोणीं म्हणावें, 'बाजी हा कृष्ण अवतार आहे!' कोणीं म्हणावें, 'शिवाचा अवतार प्रगटला आहे!' वर्षांतून सहा महिने याखालीं जावयाचे."*

६. पेशव्यांच्या दरबारीं भटभिक्षुकांचें प्रस्थ रावबाजीच्या कारकिर्दीतच विशेष कां माजलें याचें कारण वरील उताऱ्यांत सापडतें. स्वेच्छाचार वाढला व साधे नीतिनिर्बंध व शिष्टाचारही धुडकावण्याची चटक लागली म्हणजे अशा उच्छृंखल आचरणाबद्दल मन खाऊं लागतें आणि मग मनःशान्तीसाठीं प्रायश्चित्तें, ब्राम्हणांचे आशीर्वाद, देवदेवतार्चन, जपजाप्य, अनुष्ठान वगैरेंच्या नादीं दुराचरणी माणसें सहज लागतात. कारण केलेल्या कसल्याही पापाचें क्षालन झाल्याची व परलोकीं उत्तम गति मिळवून देण्याची हमी देव-दरबारचे दलाल घेतात. हातांत अधिकार असला म्हणजे असल्या दिखाऊ, धार्मिक कृत्यांना उत्तेजन देणें परवडतें. ब्राम्हणांचीही त्यामुळें पोळी पिकते, व नीतिभ्रष्ट, व्यसनी पण सत्ताधारी

* लोकहितवादीकृत **ऐतिहासिक गोष्टी**, भाग १

मनुष्याचा धर्मनिष्ठ म्हणून 'उदो उदो' परजीवोपजीवी भटभिक्षुक बिनदिक्कतपणें करतात. हाच प्रकार रावबाजींचा झाला.

"सरकारांत कोटिहोमास प्रारंभ केला होता....मोठें अनुष्ठान. श्रीमंत पुण्यवान. ब्राम्हणांस दक्षणा भोजनादिक साहित्य धर्मराजगृहींसारखें. भोजन समयीं अत्यादर विनंति करावी असे नियम....ब्राम्हणांचें आतिथ्य होतें तें पत्रीं काय लिहावें! रांगोळ्या, पांचसात भाज्या, नित्य एक मिष्टान्न, दही, कोशिंबिरी, आतिथ्य उट्या गंधांच्या. केळीचीं पानें."* ब्राम्हणांना बाजीरावाचे कारकिर्दींत खूष रहाण्यास पंचाईत कसली? श्रावणमासच्या दक्षणेचा प्रकार पहा:—

"प्रथम दिवशीं तीस हजार ब्राम्हण आले. दुसरे दिवशीं छत्तीस हजार शिधा पावले. यंदा साठ हजार पर्यंत ब्राम्हण येईल अशी बोलवा आहे....गांवांतून रस्त्यांत ब्राम्हणच ब्राम्हण दिसतात. गेल्या वर्षी दीड लक्ष दक्षणा होती, ती यंदा दुप्पट झाली. श्रीमंतांनीं आपल्या हातें दोनशें, चारशें, बाराशें, चवदाशें दोन हजारपर्यंत दक्षणा दिली. आजपर्यंत चार दरवाजे चालू होते. पांचवा... चिणला होता, तो यंदा चालू केला. त्याच दरवाजावर श्रीमंतांनीं बसून मोहरा, होन, पुतळ्या, रुपये, मोतीं वगैरे मिळून खिचडी करून वाटली." मराठ्यांनीं मुलुखगिरीवर मिळविलेल्या सुवर्णगंगेची अशी विल्हेवाट लागलेली पाहून फक्त ब्राम्हणांनाच सौख्यानंद झाला असेल. पण एवढ्यावरच रावबाजीचें औदार्य थांबलें नाहीं.

"श्रीमंतांनीं विजयादशमीस नवीन पालख्या वगैरे बक्षिसें दिलीं. सासरे धोंडभट भागवत यांचे घरीं रात्रौ फराळास गेले. सासूस लुगडें आठशें रुपयांचें व त्यांचे सुनेस सहाशें रुपयांचें भरजरी दोन्ही दिलीं. शिवाय सहा हजार रुपयांचा कंठा सुनेस दिला. धोंडभटाचे मुलास कर्नाळा किल्ल्याची मामलत दिली. वरकड जवळच्या मंडळीस झाडून पोषाख सोनेरी बुट्टीचे दिले. हजार आठशेंखालीं पोषाख कोणास नाहीं. रामचंद्र गोसावी गाणार चांगले त्यांस हत्ती दिला...सुप्रसिद्ध गाणारी व्यंकट नरसी इचा नाच व रामचंद्र गोसावी यांचें गाणें तीन रात्र सतत केलें. श्रीमन्तांनीं प्रसन्न होऊन अनुक्रमें २६ हजार व १० हजार रुपये बक्षिस दिले.†" एवंगुणविशिष्ट अशा

---

* **मराठी रियासत** उ. वि. ३-५४९

† **कित्ता** उ. वि. ३ - ६४८

दुसऱ्या बाजीरावाच्या दरबारांत राजकारण तें कसलें चालणार? "फार तर काय? पण दौतलेखणीही वाड्यांत मिळावयाची नाहीं...सदाशिव माणकेश्वर व चिंतो वामन देशमुख यांचे घरीं जाऊन मत्त्यानें मामलती वगैरे घ्याव्या. त्यांत सरकारास पैसा मात्र पुष्कळ भरावा लागे. सर्व खर्चांत जेवणाचा खर्च मात्र काय तो मोठा....फौजफाटा, पागा, हुजुरात, सरदार, मुत्सद्दी वगैरे यांस पैसा मिळावयाचा नाहीं."*

७. खुद्द पेशव्यांचीच ही कथा. मग ज्यांना त्यांचें अंशतः अथवा संपूर्ण-तया अनुकरण करतां येत होतें त्यांनीं तें केलें यांत आश्चर्य नाहीं. विषय-लोलुपता, व्यभिचार, व्यसनांधता, लांचलुचपत यांचे धडे खुद्द पेशव्यांच्या वाड्यांतून मिळूं लागले. मग राजधानींत व इतरत्र तसल्या प्रकारांचें स्वरूप किती विकृत असेल? या अवस्थेचा परिणाम व्हायचा तोच झाला. कर्जासाठीं सावकारांना तगादा होऊं लागला; पण तें फेडण्याची मात्र मुळींच तजवीज नव्हती. व्यापारधंद्याला तर ओहोटीच लागली होती. मुलुखगिरीला आळा बसल्यानें पुण्याच्या रोखानें वहाणारा सुवर्णगंगेचा प्रवाह बंद झाला. ज्यांच्या वडिलांनीं भीमथडीच्या तट्टांना उत्तर हिंदुस्थानच्या सर्व नद्यांचें पाणी पाजलें; ज्यांच्या वडिलांनीं उत्तरेस अटक पेशावर ते दक्षिणेस श्रीरंगपट्टणपर्यंत मराठ्यांचा जरीपटका वैभवानें मिरविला, ज्यांच्या वडिलांना दिल्लीश्वर बादशहा संरक्षणार्थ शरण आला आणि "सल्तनतीचा बंदोबस्त करावा"† अशी नम्रभावें विनंति करूं लागला; ज्यांच्या वडिलांनीं यमुनातीरीं दिल्लींत बसून मोगल पातशाहीचीं सूत्रें हालविलीं व तमाम हिंदुस्थानचें राजकारण खेळविलें – त्या मराठे शिलेदारांना व बारगिरांना ठाण्यावर डांबल्याप्रमाणें घरीं रहावें लागलें; वाटमारी करण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली; भांडणांत काळ कंठण्याची संवय त्यांना जडली व तमाशाचे फड उभारून लावण्यांच्या मजलशींत नामर्दाईनें कालक्षेप करण्याचा वखत आला.

---

* लोकहितवादीकृत **ऐतिहासिक गोष्टी** भाग १

† दि. म. रा. १—१०६ **मराठी रियासत** उ. वि. २ पृ. ८२

# ५ अव्वल इंग्रजी



१. मराठी साम्राज्याची ही अवस्था असतां शनवारवाड्यावर इंग्रजांचें युनियन जॅक लावण्यास सरदार नातू पुढें आले यांत आश्चर्य नाहीं. पण छत्रपतींच्या स्वराज्यांत टोपीकरांचें राज्य सुरू झाल्यानें चंगळ बंद पडलेल्या ब्राह्मणांखेरीज व मूठभर अंकित सरदारांखेरीज कोणाला विशेष वाईट वाटलें होतें असें दिसत नाहीं. मात्र या असंतुष्ट ब्राह्मणांनीं वैतागून कांहीं प्रतिकार अथवा निदान साधा विरोध तरी केला असावा असें वाटल्यास तें चुकीचें होय. कारण प्रतिकार किंवा विरोध करण्याची ताकदच त्यांच्यांत नव्हती. इतके ते निःसत्त्व व निर्बल बनले होते. एकंदर समाजांत अग्रेसर राहून बऱ्यावाईट परिस्थितींतून

जनतेला सुरक्षितपणें निभावून नेण्याचें काम परंपरेनेंच ज्यांच्यावर आलें ते हे दशग्रंथी पढिक, 'वर्णानां गुरुः' असे ब्राह्मण या वेळीं काय करूं लागले ? तर दुराचरणी यजमानांची मनसोक्त स्तुति, इतर जातींची नालस्ती आणि सर्व प्रकारचा मिथ्याचार ! स्नानसंध्या, सोंवळेंओंवळें, ब्राह्मणभोजन हाच त्यांचा धर्म; अर्थाशिवाय मंत्रपठण हीच त्यांची विद्या, व संस्कृत भाषेखेरीज इतर भाषा 'नर्कांचें साधन' आहेत असें मानणें हेंच यांचें ज्ञान ! या विवेचनांत अतिशयोक्तीचा भाग आहे असें समजण्याचें कारण नाहीं. तत्कालीन परिस्थितीचें हें शब्दचित्रच पहाः—"पूर्वींपासून ब्राह्मणांची समजूत अशी पडली आहे, कीं आम्हीं पृथ्वीवर देव आहोंत व देवही आमचे हातीं आहेत व आमचे आशीर्वादानें व शापानें पाहिजे तसें होईल. पृथ्वीवर आमच्या इतके शहाणे लोक कोणीच नाहींत व आमच्या देशाशिवाय पृथ्वीवर कांहीं देश नाहींत. इंग्रज लोक हे समुद्रांतील बेटांतील माकडांसारखीं मनुष्यें इकडे आलीं आहेत." $ इतकेंही नव्हे; तर अव्वल इंग्रजींत त्यांच्या अवनतीचें हें मोजमाप पहा. पुणें येथें "आम्हांस पक्केपणीं समजलें आहे कीं, शास्त्री, पंडित व गृहस्थ मिळून पांचशें असामी दारू पिणारे आहेत."* "भटांत व अतिशूद्रांत मला इतकेंच अंतर दिसतें कीं एक बोलका राघू व एक न बोलता राघू."× समाजाची दिशाभूल ब्राह्मण कशी करीत असत त्याचें वर्णन लोकहितवादींनीं असें केलें आहेः—"ब्राह्मण म्हणतात कीं द्रव्य खर्च केल्यास सर्व दोष दूर करून देऊं...तेली असला म्हणजे त्याला सांगतात, तूं आपल्या घाण्याची पूजा केलीस म्हणजे तेल फार निघेल. असें म्हणून याजपासून ४ रुपये काढतात. कुंभारास म्हणतात आंव्याची पूजा करावी म्हणजे विटा चांगल्या निघतात. आणि शेतकरी कुणब्यास म्हणतात कीं तुझ्या दाण्याची रास करून तिची पूजा करावी, म्हणजे तुला बरकत येईल." †

२. प्रतिष्ठित ब्राह्मणसमाज अशा अवस्थेंत होता. तेव्हां तिकडून प्रतिरोध तो कसला होणार ? सरदार, जहागिरदार वगैरे मानकरी यांना पेशव्यांच्या संगतींत

$ लोकहितवादी. **शतपत्रें**. पत्र नं. ५

* लोकहितवादी. **किता** पत्र नं. ७६

× लोकहितवादी. **किता** पत्र नं. ७१

† लोकहितवादी. **किता** पत्र नं. ७२

राहून व्यसनांची चटक लागली; व तेही समाजांतील आपल्या प्राप्त जबाबदारीस सर्वस्वीं नालायक ठरले. राज्यांतरानें आपला फायदा झाला असें त्यांना प्रथम वाटलें आणि म्हणूनच "अलपिष्टन साहेबांस जें मानपत्र राजे वगैरेनीं दिलें त्यांत स्पष्ट लिहिलें आहे, कीं तुम्हीं राज्य घेतलें हें बरें जाहलें."× इंग्रजांच्या न्यायी वर्तनाबद्दल त्यांना पहिल्यापहिल्यानें फार आदर वाटला. पण त्या न्यायी कारभाराचा इंग्रजांनीं अवलंब केल्यामुळेंच अगदीं कायदेशीर रीत्या त्यांचीं उत्पन्नें जप्त होऊं लागलीं, तेव्हां जागचे जागेवर चरफडत बसण्याखेरीज त्यांना दुसरा उपाय सुचेना; स्वहक्कांसाठीं इंग्रजांशीं भांडण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. "इतके सरदार आहेत. यांपैकीं एक जणास आणून पाहिलें कीं हा गृहस्थ कोणत्या उपयोगी पडेल ? तर मला वाटतें कीं या पृथ्वी-वर कोणतेंही काम त्याचे लायक सांपडावयाचें नाहीं. कारण कीं, पंचवीस वर्षां-पासून त्याचे वृद्धापकाळास आरंभ होतो....कितिएकांस चाळीसावे वर्षीं धराव-यास दुसरे लोक लागतात. स्वतां लिहिणें पुसणें तर कोणासही येत नाहीं. सर्वांस वकील व कारभारी पाहिजेत. जांस वकील कारभारी नाहींत त्यांनीं दरबारांत जाण्याचे दिवशीं एकादा मजूरदार करून तरी बरोबर नेला पाहिजे. यज-मानास बोलावयाचें माहीत नाहीं...कारकुनांनीं पिसें लावून, कावळा करितात तसा करून, एजंटास भेटवावा. हे अमके म्हणून सांगावें. परंतु खासे पाहिले म्हणजे नंदी किंवा शुद्ध नर्मदेंतले बाण....घरांत व्यवस्था पाहिली म्हणजे दरबारापेक्षां अधीक. पण वाण्याची उचापत आणि सराफाचें कर्ज ! त्यास व्याज शेंकडा २५ रुपये....याप्रमाणें कामगार व कारकून हे लोक सरदारांस बुडवितात... त्यांस उजडल्यामावळल्याची खबर नाहीं व योग्यता कांहीं नाहीं. व्यापाराच्या कामांत उपयोग नाहीं, विद्वान नाहींत. चाकरी करण्यास बळकट नाहींत. सरासरी जिवंत मात्र असतात...त्यांचें जिणें फार वाईट आणि लज्जेचें आहे."† तेव्हां अशी मंडळी समाजाला वळण तें कसलें लावणार ? उलट स्वतःच्या असहायतेमुळें ब्राह्मणांच्या कच्छपीं लागून, देवधर्म करून, तीच इतिकर्तव्यता

---

× लोकहितवादी. **शतपत्रें.** पत्र नं. ४६

† लोकहितवादी. **शतपत्रें.** पत्र नं. ४९

मानण्यांत त्यांचा काळ जात असे. निर्बल मनुष्यानें परमेश्वरावर हवाला ठेवावा अशी शिकवण ब्राह्मणांनीं दिली, तें त्यांना साजेसेंच झालें; पण ह्या विचारहीनांनीं तिजवर विश्वास ठेवला व तदनुसार आचरण केलें, ह्याचेंच दुःखमय आश्चर्य, त्या सरदारांचा पूर्वेतिहास पाहून वाटतें.

३. पेशवाईच्या अस्ताबरोबर लक्ष्मीही पुण्यास विन्मुख झाली. सावकारांचे वसूल बुडाले; पेढ्यांचीं दिवाळीं वाजलीं; आणि सावकार मंडळींजवळ कागदी खतांचीं भेंडोळीं मात्र राहिलीं. समाजांतील सावकार, सरदार व पुढारी गणलेले ब्राह्मण यांची स्थिति, अव्वल इंग्रजींत, वर वर्णिल्याप्रमाणें दुर्बलतेची होती. बहुजनसमाजाला हाताशीं धरून, सर्वांच्या असंतुष्टतेचा फायदा घेऊन, ऐक्य वडविण्याचें धोरण कोणांतच राहिलें नाहीं. प्रत्येक घटक आपल्याच जागीं कण्हत, कुंथत प्राप्त परिस्थितीस दोष देत होता. कारण बहुजनसमाजाची तरी स्थिति म्हणण्यासारखी चांगली कोठें होती? पेशवाईनंतर नवीन हुकमत आली. नव्या राजवटीचे कडक नियम मराठेशाहींत रुळलेल्या अडाणी शेतकऱ्यांना प्रथम प्रथम तापदायकच वाटले. शिपाईबाणा बंद पडल्यानें घोड्यावर बसणारे राऊत नांगरटीकडे आले. उद्योगधंदे व इतर कलाकौशल्याचीं कामें एकदम बसल्यासारखींच झालीं. सावकारांचीं वाजलेलीं दिवाळीं व बदललेल्या आवडी-निवडी यांमुळें देशी कारागिरांचें गिऱ्हाईक तुटलें. एतद्देशीय हुन्नरी लोकांचा धंदा बसण्याचें याहीपेक्षां बलवत्तर कारण म्हणजे कंपनी सरकारची स्वदेश-हिततत्पर दृष्टि. ही दृष्टि कवि भर्तृहरीनें वर्णिल्याप्रमाणें स्वहित साधण्याची होती. इंग्लंडमधील व्यापाऱ्यांचें हितरक्षण करणें हा तर कंपनी सरकारचा बाणा! मग एतद्देशीय कारागिरांना ते कसे उत्तेजन देतील? अर्थात् कंपनीसरकारच्या केवळ स्वार्थी धोरणामुळेंच हिंदुस्थानचा व्यापारधंदा बुडाला असें म्हणणें चुकीचें ठरेल. अठराव्या शतकाचे अखेरीस इंग्लंडमध्यें यांत्रिक युग सुरू झालें. यंत्राच्या झपाटेदार सफाईपुढें कूर्मगतीनें चालणारी हस्तकारागिरी काय टिकाव धरणार?

एकंदरींत काय? उठला सुटला बेकार झालेला इसम उदरंभरणार्थ काळीकडे धांव घेऊं लागला. पण महाराष्ट्रांतील जमिनीचा निकसपणा लक्षांत घेतां

अशा एकाएकीं वाढलेल्या कृषिकर्मावलंबी लोकांना पुरेसें खावयास मिळणें शक्यच नव्हतें.

तमाम हिंदुस्थानभर पन्नास वर्षांपूर्वींच ज्या मराठ्यांचा दरारा होता, त्यांची अशी हलाखीची अवस्था या अल्पकाळांत झाली. हिंदुपदपातशाहीचें किंवा साधें स्वराज्याचें ध्येय त्यांना कितपत साध्य झालें, हा प्रश्न बाजूस ठेवला तरी मिळविलेला मुलूख, संपादिलेली सत्ता, आणि केलेली कमाई मराठ्यांना अल्पकाळसुद्धां टिकवितां आली नाहीं, ही गोष्ट अगदीं खरी. याची कारणमीमांसा याच पुस्तकांत योग्य ठिकाणीं झालेलीच आहे. आतां अवनतीच्या खोल दरींतून महाराष्ट्रीय समाज पुन्हां चढत्या प्रवासास कसा आरंभ करतो व त्यांत नवनवे मार्गदर्शक निर्माण होऊन त्यास कसकसें वळण लावतात हें पहावयाचें आहे. इंग्रजी राज्यानंतर मराठ्यांच्याच काय किंबहुना अखिल हिंदी जनतेच्या विचारांत फरक पडला आहे. आणि सनातन्यांच्या दृष्टीनें आमची सांस्कृतिक पिछेहाट होत असली, तरी विचारवंतांना एकंदरींत प्रगतीच होत असल्याचें आढळून येईल. जुनें तेंच सोनें म्हणून त्यास चिकटून बसणाऱ्यांना कसलाही फरक झाला तरी तो पिछेहाटीचा वाटणार. तेव्हां तत्संबंधीं निरर्थक वाद न माजवतां आमच्यांत इंग्रजी अंमलापासून नव्या कल्पना कोणत्या आल्या, नवे विचार आम्हांस कसे व किती सुचले व त्यांचा विकास कसा झाला हें आतां पाहूं.

४. महाराष्ट्रीय समाजाचें त्यावेळचें एक असें वैशिष्ट्य सांगतां येईल, कीं त्याच्यांत जिज्ञासुवृत्ति कशी ती नव्हतीच. मराठ्यांनीं कांहीं वर्षें कां होईना, पण दिल्लीचाही कारभार पाहिला होता. म्हणून त्यांची गति राजकीय बाबतींत अधिक असावयास पाहिजे अशी अटकळ बांधणें साहजिक. पण तें चूक ठरेल. राजकीय प्रश्नांसंबंधीं जागरूकता आणि चौकसबुद्धि लहानशा राज्याच्या मुख्याला सुद्धां असावी लागते. मग मराठ्यांसारख्या हिंदुस्थानच्या चारी टोंकांना भगवा झेंडा फडकवत ठेवणाऱ्यांना तर अधिक प्रमाणांत हे गुण हवेत. परंतु वस्तुस्थिति मात्र भिन्न होती. साधी इंग्रजांचीच गोष्ट घ्या. ते कोण, कुठले, किती, त्यांच्या चालीरीती काय, त्यांचा राजा कोण, त्यांचें शौर्य कसें, वगैरे साधे 'चौकशीचे' प्रश्न त्यांना सुचलेले दिसत नाहीं. परकियांचा बंदोबस्त ह्या माहितीच्या अभावींच होऊं शकला नाहीं. देशांतील प्रबल सत्ताधारी आपणांविषयीं

किती हास्यास्पद बेफिकिरी दाखवितात, हें पाहून तत्कालीन इंग्रज मूर्ख मराठ्यांना खास हंसले असतील. राजा म्हणजे अमर्याद सत्ताधीश, त्याचा अधिकार अविचारणीय, अशीच भावना पूर्वीपासून ह्या देशांत चालत आली असल्यानें युरोपमध्यें राजा व प्रजा यांमध्यें राजकीय हक्कासाठीं झगडे झाले, तसे आमचेकडे झाले नाहींत. शिवाजीनें अष्टप्रधानपद्धति उपयोजून राज्यकारभाराला व्यवस्थित स्वरूप देण्याचा प्रयत्न केला, तरी राजाची सत्ता अमर्यादच राहिली. आणि शिवाजीनें स्वतः राजपद स्वभुजबलावर मिळवून कोणालाही राजा होतां येतें हें स्वोदाहरणानें सिद्ध केलें होतें, तरी त्याला अवतारी पुरुष मानून, राजा हा दैवी पुरुष, तो विष्णूचा अंश, त्याची हुकमत सर्व दूर, अशा वेडगळ व अज्ञानजन्य विचारसरणींत आमचा समाज इंग्रजी अंमलानंतरही कांहीं काळ होता. तेव्हां त्यास राजकीय हक्कांसाठीं इंग्रज सरकारशीं बोलणें करावें, फार काय राज्यकारभारांत आपला हात असावा, इतकी सुद्धां इच्छा झाली नाहीं यांत आश्चर्य नाहीं. सरकारी नोकरीकरितां मात्र एतद्देशीय मंडळीची फार धडपड असे आणि नोकरी केली म्हणजे आपण शासनसंस्थेंतील एक महत्त्वाचे घटक होऊं अशी त्या वेळच्या लोकांची समजूत होती. सरकारी कचेरींत बसून कागदी घोडे नाचविणें आणि राजकीय हक्क मिळविणें यांत बहुत फरक आहे, हें त्यांस कळत नसे. तत्कालीन समाजाची ही भोळी समजूत इंग्रज अधिकाऱ्यांच्या चांगलीच उपयोगीं पडली. त्यांनीं 'नेटिव्ह' अंमलदारांचा एक वेगळा वर्ग बनविला; आणि त्यांचे करवीं ह्या अफाट देशांत व्यवस्थित असें शासनयंत्र चालू केलें. ह्या अंमलदारांची विचारसरणी पेशवाईतील अंमलदारांच्यापेक्षां थोडीशी निराळी होती. उत्तरपेशवाईच्या बेबंदशाहींत अधिकाऱ्यांवर, इंग्रजींत होता तसा, दाब नव्हता. साहेबाचें नुसतें नांव, शेतांतील बुजगावण्याप्रमाणें, नव्या अमदानींत उपयोगीं पडे. याच्या उलट 'गांवठी' साहेबांना म्हणजे एतद्देशीय वरिष्ठांना हाताखालील नोकर इतके भीत नसत. इंग्रजी साहेबांच्या हाताखालीं काम करण्यांत देशी अंमलदारांना एक प्रकारची हौस वाटे. साहेबांच्या इकडील परिस्थितीविषयींच्या अज्ञानाचा फायदा घेऊन हे लोक आपली हुकमत बेधडक चालवीत आणि प्रजेवर वाटेल तसा जुलूम करीत. राज्यकारभार चालविण्याचे नियम कलमवार ठरविलेले असूनही एतद्देशीय अंमलदार त्यांना बाजूस

गुंडाळून ठेवून मनसोक्त अधिकार गाजवीत. असें असूनही स्वहक्कांसाठीं आणि न्याय्य कारभारासाठीं कोणी मागणी केली नाहीं. याचें कारण एकच; आणि तें म्हणजे प्रजेचें स्वहक्कांविषयींचें अज्ञान.

५. सहा हजार मैलांवरून येऊन एवढ्या अफाट देशाचा राज्यकारभार चालविण्यासाठीं लागणारीं सर्वच माणसें बोटींतून इकडे आणणें इंग्रजांना शक्य नव्हतें. आणि शक्य असतें तरी भिन्न भाषा व भिन्न रीतरिवाज यांमुळें तें अव्यवहार्य ठरलें असतें. म्हणून गोऱ्यांच्या हाताखालीं कामें करण्यास लागणारे कारकून तयार करण्यासाठीं सरकारला 'कारखाने' उघडावे लागले. यांनाच शिक्षणसंस्था * असें म्हणत. सरकारी नोकरीस लायक अशी मंडळी त्यांत भरपूर तयार झाली. अशा शाळांतून शिक्षण विशिष्ट हेतूनेंच देत असत. हिंदुस्थानांतलें तेवढें सगळें वाईट. चांगलें जितकें आहे तें इंग्लंडमध्यें, कंपनी (राणी) सरकारच्या राज्यांत, व ख्रिस्ती धर्मांत—अशी शिकवण सारखी मिळूं लागली. त्या वेळचे सगळेच ग्रंथ बहुधा पाश्चात्यांनीं लिहिलेले. मराठ्यांचा इतिहास, हिंदूंचीं धार्मिक पुस्तकें, फार काय मराठी भाषेचा कोश व संस्कृत भाषेचें व्याकरण हीं सुद्धां पाश्चात्य पंडितांनीं लिहिलेलीं असल्यानें विपर्यासाचा व अज्ञानाचा भाग त्यांत बराच होता. विशेषतः मराठ्यांचा इतिहास इतका उज्ज्वल असतां, त्यापासून मराठ्यांनाच काय पण अखिल हिंदुमात्रास स्फूर्ति मिळण्याचा संभव असतां, विकृत स्वरूपांत रचलेला इतिहास सर्वत्र रूढ झाला. आणखीही एका कारणामुळें जेथें तेथें इंग्रजांचें तट्टू पुढें पुढें दामटण्याचा प्रयत्न झाला. शिक्षणाचें काम प्रारंभीं बऱ्याच मिशनरी संस्थांकडे होतें. तेव्हां विद्यादानाबरोबर आर्य-धर्मनिंदा व ख्रिस्तमहति यांचे पाठ विद्यार्थ्यांस मिळूं लागले. मिशनऱ्यांची चिकाटी, व विशेषतः आत्मीय भावनेनें इतरांवर छाप पाडण्याची पद्धति, यांमुळें त्यांच्या भुलावणीस बरींच 'मेंढरें' भुललीं.

हिंदुस्थानांत आपलें आसन स्थिर करण्यासाठीं राज्यकारभाराचीं खातीं सुरळीतपणें चालावयास पाहिजेत, म्हणून परदेशस्थ राज्यकर्त्यांनीं शाळा कॉलेजें स्थापन करण्यास सुरवात केली वगैरे वृत्तान्त वर दिलाच आहे. त्यांतच

* बॉबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी (सरकारी). स्थापना १८२२.

मिशनऱ्यांच्या उद्योगाची भर पडली. परकी लोकांत ख्रिस्तधर्माचा प्रसार करण्यासाठीं त्यांना अगोदर दोन अक्षरें शिकविलीं पाहिजेत, असा पोक्त विचार करून त्यांनीं ठिकठिकाणीं शाळा काढल्या, * छापखाने उभारले आणि पुस्तकें छापावयास सुरवात केली. इतकेंच नव्हे, तर सरकारनें शिक्षणसंस्था स्वतःच्या हातांत ठेवूं नये अशीही मागणी त्यांनीं केली.× सरकारनें शिक्षणखात्यांतून आपला हात काढून घेतला असता तर तें आयतेंच त्यांच्या हातांत पडलें असतें, अशी योग्य समजूत या मागणीच्या मुळाशीं होती. इंग्रजी शिक्षणानें आवडीनिवडी बदलल्या, सुशिक्षित समाजांत पाश्चात्य चालीरीती शिरल्या आणि पाश्चात्य मालाची मागणी वाढूं लागली. पाश्चात्य शिक्षणानें परकियांना असा द्रव्यलाभ तर झालाच, पण त्याचबरोबर आमच्या सुशिक्षित वर्गांत थोडीबहुत जागृतिही होऊं लागली. अजूनपर्यंत लिहिणें वाचणें हा पांढरपेशांचाच अधिकार होता. नवीन राजवटींत ही मिरास चालू रहाणें शक्य नव्हतें. नवीन युगांत मनुष्यमात्र तेवढा विद्येस पात्र ठरला. शूद्रातिशूद्रांसाठींच नव्हे तर मुलीं-† साठींही शाळा निघूं लागल्या. 'ब्राम्हणवर्गाच्या जातिविशिष्ट मुखांत वावरणाऱ्या प्राचीन षट्शास्त्रादि कर्णगोचर विद्येऐवजीं लिहिण्यावाचण्याचें संसारोपयोगी दृष्टिगोचर ज्ञान'÷ प्रत्येकास मिळण्याची सोय झाल्यामुळें जुन्या रूढ समजुती बदलूं लागल्या. इतकेंच नव्हे तर दरेक बाबतींत इंग्रजी समाजाशीं आपल्या समाजाची तुलना होऊं लागल्यामुळें आपल्या चालीरीतींतील दोष चट्कन् नजरेंत भरूं लागले.

६. लोकांत होत असलेल्या विचारक्रांतींत महत्त्वाची भर पडण्यास आणखी एक कारण झालें. आणि तें म्हणजे वाहतुकीच्या आधुनिक साधनांचा

---

* १८२७ पर्यंत (मिशनरी) शाळांची संख्या ८० वर येऊन मुलांची संख्या ३००० च्या घरांत गेली व लोकांकडून जास्त शाळांसाठीं तगादा सुरू झाल्याची माहिती आढळते. मुलांबरोबर मुलीदेखील शिकूं लागल्या व त्यांची संख्या १८२७ सालीं ३०० होती. (न० र० फाटकः **विविधज्ञानविस्तार**, एप्रिल १९३०)

× केळकर : **टिळकचरित्र** भा. १ पृ० ६०

† मुलींची पहिली शाळा (मुंबई) १८४५

÷ न. र. फाटकः **रानडे चरित्र**. पृ. ९२

प्रसार. एवढ्या अफाट देशावर एकछत्री राज्य करणें ही साधी बाब नसल्यानें सर्व देशभर शांतता व व्यवस्था राखण्यासाठीं लष्कराची जलद नेआण व्हावयास पाहिजे. म्हणून सरकारनें रेल्वे * बांधण्यास व नवीन नवीन सडका तयार करण्यास प्रारंभ केला. रेल्वे करण्यांत सरकारचे आणखीही कांहीं हेतू होते.

इंग्रज बोलूनचालून व्यापारी. त्यांच्या राज्यांत त्यांचा व्यापार वाढला नाहीं तर त्या राज्याचा उपयोग काय? बंदरोबंदरीं इंग्लंडचा माल येऊन पडला तर तो देशांत पसरविण्यास रेल्वेशिवाय (सडकाही त्यांतच) दुसरा उत्तम मार्ग नव्हता. शिवाय हिंदुस्थानांतून नफा, बक्षीस, तैनात, खैरात... अशा अनेक रीतीनें गेलेली अब्जोगणति संपत्ति × इंग्लंडमध्यें बिनव्याजीं पडली होती. तिचा विनियोग करून व्याजाचें पीक काढण्यासाठीं रेल्वे बांधाव्या असेंही इंग्रज मुत्सद्द्यांनीं ठरविलें. डलहौसीनें कंपनी सरकारास रेल्वेसंबंधीं लिहिलेल्या खलित्यांत उपरोक्त हेतूंचा स्पष्ट उल्लेख आहे. रेल्वे काढण्याचा मूळ हेतु कांहींही असो. पण त्यामुळें हिंदुस्थानचें स्वरूप मात्र पार बदललें. हा वेळ पावेतों हिंदुस्थानांत सर्वत्र विखुरलेल्या वेगवेगळ्या खेड्यांचा परस्परांशीं फारसा संबंधही येत नसे. फार काय, कांहीं नवल वार्ता नसली तर एकाची खबर दुसऱ्यास कळतच नसे. आगगाड्यांच्या युगास प्रारंभ होतांच हा नूर एकदम पालटला. दूरदूरचीं शहरें या दळणवळणाच्या नव्या साधनांनीं नजिक आल्याप्रमाणें झालीं. आणि लोकांची आकुंचित दृष्टि व्यापक होऊन त्यांना आपल्या गांवाबाहेर, जिल्ह्याबाहेर, प्रान्ताबाहेर पहावेंसें वाटूं लागलें. निरनिराळ्या प्रान्तांतील एकधर्मीय पण भिन्न आचारविचारांचीं माणसें रेल्वेमुळें एकत्र येऊं लागलीं; आणि पूर्वींइतकी रूढींना चिकटून रहाण्याची लोकांची प्रवृत्ति साहजिकच ढिली पडत चालली. पोष्ट व तारखात्यांची योजना याच वेळीं झाल्यानें व्यापारास अधिक मदत झाली

---

* हिंदुस्थानांतील पहिली आगगाडी (मुंबई ते ठाणें) सुरू १८५३

× या निर्यातीची कल्पना येण्याकरितां कांहीं आंकडे देणें बरें. एकट्या बंगाल प्रान्तांतून १७५७-१७८० च्या मुदतींत ३८४००००० पौंड किंमतीची संपत्ति इंग्लंडला रवाना झाली. (J. C. Sinha: *Economic Annals of Bangal, P. 52*) ते वेळची स्वस्ताई लक्षांत आणली म्हणजे या निर्यातीचें स्वरूप अधिकच भेसूर वाटतें.

हें उघड होय. परंतु निरनिराळ्या ठिकाणच्या लोकांचीं मनें एकत्र आणून त्यांच्या हितानहिताचे धागे एकमेकांत गुंतवून एकात्मतेची भावना त्यांच्यांत उत्पन्न करण्यास व त्यांचें हिताहित एकत्र निगडण्यास त्यांचा उपयोग कांहीं थोडथोडका झाला नाहीं.

७. काशी रामेश्वर किंवा पंढरी त्र्यंबकेश्वर हीं धार्मिक यात्रेचीं ठिकाणें प्रत्येकाच्या आटोक्यांत इंग्रजांनीं आणून दिलीं, म्हणूनच त्यांना धन्यवाद मिळाले असें नव्हे. 'चाक्या म्हसोबा' हा एक नवीन देव आपणाला उपलब्ध झाला म्हणून खुशालणारे म्हसोबा जसे कित्येक होते त्याप्रमाणें या सुधारणांचा चांगुलपणा पहाणारे विचारवंतही होते. इंग्रजांचा श्रेष्ठपणा सुशिक्षितांना आपोआपच कळून आला. त्यांनीं सतीची चाल बंद केली,× ठगांचा बंदोबस्त केला,* गुलामगिरीचें उच्चाटन केलें.† हीं कृत्यें करण्यास त्यांना कोणी आग्रह केला नव्हता. त्यांना राजा राममोहन राय यांनीं पाठिंबा दिला ही गोष्ट खरी. पण मूळ कल्पना इंग्रजांचीच, हें विसरून चालणार नाहीं. इंग्लंडमध्यें रानटी लोकांचा अंमल होता, जागतिक संस्कृतीचा प्रवेश तेथें झाला नव्हता, इंग्रज रानांवनांतून विवस्त्र स्थितींत हिंडत होते तेव्हां हिंदुस्थानांत व आजुबाजूचे प्रदेशांत अशोकाचें एकछत्री साम्राज्य असून हिंदी संस्कृतीचा परमोच्च उत्कर्ष झाला होता. आणि प्रस्तुत कालीं तेच इंग्रज हिंदुस्थानांत येऊन हिंदी जनतेस माणुसकीचे धडे कायद्याच्या सहाय्यानें देत होते. सती गेल्यास किंवा नरमेध केल्यास कायद्यानें शिक्षा होऊं लागली. या वेळीं हिंदुस्थान सरंजामशाहीच्या अव्यवस्थित कारभारांतून कसाबसा बाहेर पडत होता. या संक्रमणाला मदत करणारे इंग्रज मानवी उत्क्रान्तीच्या एका वरच्या पायरीवर होते, हें यावरून सिद्ध होतें.

व्यापारासाठीं इकडे आलेले इंग्रज हळुहळू येथील राज्यकर्ते झाले, आणि त्यांनीं इकडील समाजास वळण लावण्याचा प्रयत्न कायद्याच्या सहाय्यानें केला. इंग्रज व हिंदुस्थानचे रहिवाशी ह्या भिन्न संस्कृतीच्या लोकांची गांठ अशा

---

× सतीची चाल बंद १८२९

* ठगांचा बंदोबस्त १८३६

† गुलामगिरी बंदीचा कायदा १८४१

रीतीनें पडली असतां, इंग्रज सामाजिक उत्क्रांतीच्या वरच्या पायरीवर होते असें म्हटलें. ती वरची पायरी कोणती, तिचें सांस्कृतिक स्वरूप काय, तिच्या आघातानें या देशांतील विचारआचारांना कसकसें वळण लागलें, हें आतां पहावयाचें आहे.

इंग्रज येथें स्थिरावूं लागले तेव्हां हिंदी समाज अगदीं विस्कळित झाला होता. निरनिराळे सरदार व त्यांच्या वतनवाड्या यांमुळें समाजाचे असंख्य विभाग पडले होते. त्यांच्या आपापसांतील भांडणांमुळें सबंध समाज हादरून निघाला होता. आपल्याच बडेजावांत गुंग झालेल्या या वर्गाला स्वतःच्या जबाबदारीचें पूर्णपणें विस्मरण पडलें होतें. आपल्या ताब्यांतील कुळांवर मन मानेल तशी सत्ता चालवून, त्यांना सुचेल त्या मार्गानें पिळून काढून, स्वतःचे चोंचले चालू ठेवणें एवढाच या सरदारांचा उद्योग असे. अशा स्थितींत त्यांच्या अंगचें कर्तृत्व नष्ट झालें तर नवल कोणतें ? इंग्रज दाराशीं येऊन ठाकला, त्यानें ठाण्यामागून ठाणें हस्तगत करण्यास सुरवात केली, तरी हे सावध झाले नाहींत कीं त्यांनीं आपल्या विलासी रहाणींत कमतरता पडूं दिली नाहीं. समाजांतील उच्च वर्गाचे हे ढंग चालू असतां खालचा गरीब आणि नाडलेला वर्ग काय करणार ? स्वकियांच्या जुलुमाखालीं भरडलेल्या या जनतेला प्रतिकारबुद्धि कोठून सुचणार ? स्वतःची दैना तिला दिसत नव्हती असें नव्हे. परंतु हताश होऊन प्राप्त स्थितींतच रखडत पडण्यापलीकडे ती कांहींही करूं शकत नव्हती. तिला हातीं धरून प्रतिकाराच्या मार्गानें स्वातंत्र्याच्या शिखरावर नेणारा मध्यम वैश्यवर्ग ते वेळीं विस्कळीत, असहाय, असंतुष्ट आणि परसत्तानुयायी होता हें आपण वर पाहिलेंच. शिवाय वैतागलेल्या मनःस्थितीस ताळ्यावर आणण्यास धर्माची मादक गोळी तयार होतीच. अशा परिस्थितींत समाजाची प्रगति होणार कशी ? सत्ताधाऱ्यांचा मनस्वी बडेजाव, धर्मांचें व धर्माधिकाऱ्यांचें अवास्तव खूळ, विद्येचा अभाव, बहुजनसमाजाची असहाय्यता, त्याची हालअपेष्टा व जाच सोसण्याची कमालीची सोशिक वृत्ति...हे इंग्रजपूर्व समाजाचे विशेष म्हणून प्रस्तुतच्या निरीक्षणांत नजरेस पडतात.

याच्या उलट इंग्रज येथें आले त्यांची समाजस्थिति पहा. युरोपांत इतर कुठल्याही देशांत न आढळणारी राजकीय प्रगति इंग्रजांना सांस्कृतिक विकासानें लाभली

होती. धर्माचें वर्चस्व, राजाची अनियंत्रित सत्ता, अमीर–उमरावांचें प्राबल्य, ह्या सर्वांचा अस्त त्यांचे देशांत झाला होता. प्रजेचे हक्क म्हणून कांहीं असतात हें तेथील लोकांस कळलें होतें, इतकेंच नव्हे, तर ते हक्क कसे मिळवावे याचें सुद्धां प्रत्यक्ष ज्ञान त्यांना मिळालें होतें. त्यांनीं राजाचेच काय पण धर्माध्यक्षांचेही अधिकार मर्यादित केले होते. अशा इंग्रजांच्या मानानें पेशवाई अखेरीचा इकडील समाज मागासलेला ठरल्यास नवल नाहीं. मतस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, आचारस्वातंत्र्य या कल्पनाच मुळीं इकडील समाजांत नव्हत्या. त्या तर इंग्रजांत बऱ्याच फैलावलेल्या.

एवंगुणविशिष्ट भिन्न संस्कृतीचे लोक एकत्र आले, तेव्हां इंग्रजांचें अनुकरण इकडील समाजांत विशेष झालें. याचें पहिलें कारण, ते बोलून चालून राज्यकर्ते, दूर देशाहून आलेले, हिंदुस्थानांतील कोणत्याही देशाधिपतीपेक्षां वरचढ ठरलेले. आणि दुसरें, म्हणजे त्यांचे आचारविचार प्रगतिपर असून एतद्देशियांच्या आचारविचारांहून अधिक मोहक होते. इंग्रजांनीं आपण होऊन आचार, विचार व उच्चार यासंबंधींच्या स्वातंत्र्याच्या स्वतःच्या कल्पना जितराष्ट्रांत पसरविल्या नाहींत. कारण इकडे येण्यांत त्यांचा मुख्य हेतु तो नसून द्रव्यसंपादनाचा होता, तो तसें करून फार वेळपर्यंत चालला नसता. राज्यकर्त्यांबद्दल वाटणारा आदर, जुन्या चालीरितींना कवटाळण्याची आवड, देवावर व दैवावर भिस्त टाकून स्वस्थ बसण्याची दुबेल वृत्ति, क्रियाशून्यतेची वाढ, विचारांचा पूर्ण अभाव, धर्माचें विलक्षण वेड....इत्यादि एतद्देशियांच्या 'गुणावगुणां'वरच परकीयांचें बूड स्थिर राहणार. मग इंग्रजांसारख्या परकीयांनीं तरी ही सुधारणा येथें कां पसरवावी? इंग्रजांनीं आपण होऊन आपली संस्कृति हिंदी जनतेंत पसरविण्याचा प्रयत्न केला नाहीं. तरी पण तसें होणें अपरिहार्य होतें. अवलोकन, अनुकरण, विचार हीं साधनें इकडील लोकांजवळ होतीच. त्यायोगें व विशेषतः वाघिणीचें दूध प्याल्यानें—इंग्रजी शिक्षणानें—इकडील मंडळींत नवमतप्रसार होऊं लागला. राज्यकर्त्यांच्या व्यापारी धोरणानेंसुद्धां नवीन विचारांना चालना मिळाली. इंग्लंडमधून येणारा माल इकडील हस्तकारागिरीनें तयार होणाऱ्या जिनसांपेक्षां साहजिकच स्वस्त पडे. अर्थात् इंग्लंडांत तयार झालेला माल हिंदुस्थानांत बोकाळला. यामुळें हिंदुस्थानचे उद्योगधंदे बसूं लागले. त्यांतच इंग्रजांच्या स्वहिततत्पर धोरणाची भर

पडली. स्थल–काल वगैरे कांहीं न पहातां–कदाचित् तसें करणें इंग्लंडच्या फायद्याचें होतें म्हणून–खुल्या व्यापाराचें ( Free Trade ) तत्त्व सरास अमलांत आलें; आणि इंग्लंडच्या व्यापारी माऱ्यापुढें हिंदी उद्योगधंदे कोलमोडूं लागले. हें नवशिक्षित विद्वानांचे ध्यानांत येऊन त्यांनीं सरकारी धोरणावर कसून टीका करण्यास सुरवात केली. साहजिकच हिंदुस्थानच्या आर्थिक हलाखीचें खापर राज्यकर्त्यांच्या धोरणावर फुटलें. इंग्रजी शिक्षणानें येणारी व्यापक दृष्टि व स्वतःच्या दुःस्थितीचें झालेलें सत्यतर ज्ञान वगैरे गोष्टींमुळें लोकांत जागृति होऊं लागली.

८. त्या जागृतीचा इतिहास आतां आपणास पहावयाचा आहे. इंग्रजी राज्यपद्धति, इंग्रजी शिक्षण, इंग्रजी जीवन, तसेंच नवीन राजकीय व आर्थिक सुधारणा वगैरे गोष्टींमुळें जो नवमतप्रसार झाला त्यानें प्रेरित होऊन महाराष्ट्रीय समाजांत सुधारणा झाली पाहिजे असें म्हणणारी मंडळी पुढें आली. त्यांना विरोध करणारे अर्थातच होते. मनुष्यप्राणी स्वभावतःच रूढीप्रिय आहे. परंपरेच्या आधारावरच तो बहुतांशानें जगतो. केवळ आपलें म्हणूनच तो जुन्याला कवटाळीत असतो. असा परंपराभिमानी वर्ग तेव्हां होता व अजूनही आहे. पण महाराष्ट्रांत सुधारणेची प्रगति निर्विवाद होणें शक्यच नव्हतें. इंग्रजी शिक्षण देण्यांत राज्यकर्त्यांची बुद्धि स्वहिताची होती, प्रजाजनांना सुधारण्याची नव्हती हें वर पाहिलेंच. शिवाय महाराष्ट्रांत होत असलेलें स्थित्यंतर अंतःप्रेरित व सर्वंगामी नव्हतें. समाजाची सर्वांगीण सुधारणा करणें परकीयांच्या हिताचें नसतें. सुधारलेला समाज परस्थांचें हित साधूं देत नसतो. आणि म्हणूनच राज्यकर्त्यांना आवश्यक तेवढ्या सुधारणा हिंदुस्थानांत होत. राजकीय व आर्थिक–सर्वच सुधारणा, ते वेळीं, इंग्लंडच्या हिताकडे नजर ठेऊन होत असत. कोणत्याही समाजाची सांस्कृतिक उन्नति त्याच्या आर्थिक व राजकीय सुधारणांवर बहुतांशानें अवलंबून असते. त्या दोन महत्त्वाच्या सुधारणांचीं सूत्रें जेथें परकीय राज्यकर्त्यांच्या हातांत तेथें त्या समाजाची सुधारणा अंतःप्रेरित व सर्वगामी कशी असणार ? अशा परिस्थितींत जुन्या पद्धतींतील कित्येक घटक व त्याबरोबर त्यांनीं अनेक खुळें जीव धरून राहिलीं. हे लोक नवविचारांचे विरोधक बनले.

# आजकालचा महाराष्ट्र

या सुधारक-विरोधक ( यांना दुर्धारक म्हणावयास हरकत नाहीं ) मंडळींचे निरनिराळे प्रकार कल्पितां येतील. अव्वल इंग्रजींत ( म्हणजे सुमारें १८५० पर्यंत ) परकीय अमलानें दिपून जाऊन इंग्रजांचें अंधानुकरण करण्याची प्रवृत्ति बरीच बोकाळली. नेटिव्ह अंमलदारांचा एक मोठा वर्ग इंग्रजी चालीरीतींचें नुसतें अनुकरण करण्यांतच धन्य मानी. अर्थात् हें विचाराभावाचें लक्षण होतें. पण ते वेळचे विचारी आणि लोकहिताची तळमळ लागलेले समाजभक्तही प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें अनुकरण करतांनाच आढळतात. हें अंधानुकरण नसलें तरी तें पूर्णपणें डोळसही नव्हे. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धांत मात्र ही स्थिति बदललेली दिसते. १८५० नंतर सुधारणांचा प्रभातकाल सुरू झाला, असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. आणि या सुधारणांत अनुकरणापेक्षां विचाराचाच भाग अधिक होता. उच्च शिक्षणानें विचारक्षम बनलेली पिढी सुधारणांचा विचार अधिक खोलपणानें करूं लागली. अर्थात् या सुशिक्षितांत बुद्धिप्रामाण्यवादी अगदीं थोडे होते. बुद्धि हा मनुष्यप्राण्याचा विशेष गणला जातो. पण बुद्धि असणें आणि केवळ तिच्या अनुरोधानें आचरण करणें यांत अंतर आहे. एका इंग्रजी ग्रंथकारानें × म्हटल्याप्रमाणें मानवी आयुष्य हा एक भावनांचा खवळलेला समुद्र असून बुद्धीचें तारू त्यावर कसेंबसें हेलावत असतें. महाराष्ट्रांत आगरकरांसारखे बुद्धिप्रामाण्यवादी थोडे असले, तरी नवीन शिक्षणाचा उपयोग करून व त्यायोगें स्वतःच्या बुद्धीची व्यापकता व हृदयाची उदारता वाढवून ( म्हणजेच न्याय, दया वगैरेंनीं प्रेरित होऊन ) सुधारणांची तरफदारी करणारे सुधारक पुष्कळ होते. अर्थात् यांच्यावरही परंपरेचा पगडा होताच. पण त्यांची सुधारणाबुद्धि अधिक प्रभावी ठरली. आणि म्हणूनच शास्त्रवचनांचा अर्थ नीट समजावून घेऊन ( प्रसंगीं शास्त्रांतून नवीन, सुधारणांना पोषक असा, अर्थ काढून ) सुधारणा आर्यसंस्कृतीला व हिंदूंच्या परंपरेला विघातक नाहींत, त्यांनाही शास्त्राधार आहे, असें प्रतिपादन करणारे सुधारक जन्माला आले. अशा सुधारकांचा वर्ग महाराष्ट्रांत बराच मोठा होता. मात्र या वर्गाला बुद्धीचें प्रामाण्य मानणाऱ्या सुधारकांइतकें महत्त्व नाहीं. बुद्धिप्रामाण्यवादी सुधारक केव्हांही पूर्णांशानें सुधारक होय. अर्थात् बुद्धि हें अंतिम प्रमाण नव्हे. परंतु खवळलेल्या

× बरट्रँड रसेल: *Scientific Outlook*. p. 16.

समुद्रांत बुद्धीचें एकुलतें एक जहाजच आशेचा आधार वाटावा यांत आश्चर्य कसलें ?

सुधारणांना विरोध करणारांतही तसेच वर्ग आढळतात. केवळ नवें म्हणून बुजणारे लोक विचारशून्य तर आहेतच, पण थोडेसे पिसाळलेलेही दिसतात. नव्या राजवटींत आपली चंदी संपली म्हणून पिसाळलेले पेशवाईंतील शिरासदार कांहीं थोडे नव्हते. परंपरेचा अभिमान बाळगणारे विरोधक याहून थोडेसे निराळे भासतात. अशिक्षितांना परंपरेचें वेड हें असतेंच, आणि तसें तें अव्वल इंग्रजींत कित्येकांना होतें. परंतु पुढें शिक्षणप्रसार झाला; सुशिक्षितांची पिढी समाजांत मानाचें स्थान मिळवून बसली. तरीही त्यांत सुधारणांना नाकें मुरडणारे परंपराभिमानी होते. परंपराभिमानी लोकांत सुधारक आणि दुर्धारक असे दोन तट पडले. आणि ते तसे पडूं शकले हेंच ते शुद्ध बुद्धिवादी नव्हते किंवा त्यांना आपल्या परंपरेची नीटशी ( शास्त्रीय ) कल्पना नव्हती, याचें प्रमाण होय. हे सुशिक्षित पुराणमतवादी सांस्कृतिक प्रगतीच्या दृष्टीनें अर्थातच अधिक ओंगळ ठरले. परंतु त्यांपैकीं कित्येकांच्या परंपराभिमानाचें —स्वसंस्कृत्यभिमानानें— रूपांतर राष्ट्रभक्तींत झालें; आणि एका अर्थानें ते समाजाचे मोठे हितकर्ते ठरले.

वरील परिमाणानुसार आतां पहाणी करावयाची आहे. विचारांची प्रगति पहातांना आधीं ‘ अविचारी ’ लोकांच्या कृत्यांची नोंद करावयास पाहिजे. ती येथें केली आहे.

९. हिंदुस्थानवर सत्ता गाजविणारे इंग्रज जागतिक सुधारणेच्या वरच्या पायरीवर होते असें वर म्हटलें खरें; पण तें विधान विवक्षित मर्यादेपुरतेंच होतें. त्याची अतिव्याप्ति करून चाललें नसतें. परंतु अव्वल इंग्रजींत बहुजन-समाजानें तशी अतिव्याप्ति केली हें खोटें नाहीं. पेशवाई अखेरच्या अमलापेक्षां अव्वल इंग्रजी शतपट सुखदायक झाली, अशीच तेव्हां बहुतेकांची ने मळीं समजूत होती. हा भ्रमनिरास करणारी कांहीं मंडळी तेव्हां निघाली, हें विचारांच्या परिणतीचें द्योतक होय. मात्र स्वदेशहिताची तळमळ लागले-ल्यांना ही परिणति अत्यंत सूक्ष्म गतीनें होत होती असें साहजिकच वाटेल. शिवपूर्वकालांत महाराष्ट्रीय समाज तत्कालीन राज्यकर्त्यांच्या सेवेंत गर्क झाला

होता–तशीच अवस्था अव्वल इंग्रजींतही झाली. फरक इतकाच, कीं पूर्वी सन्त-वाङ्मयामुळें ऐहिक घडामोडींविषयींचें वैराग्य लोकांच्या मनांत बाणलें होतें, तर इंग्रजी राजवटींत मिशनऱ्यांच्या व इंग्रजांच्या पद्धतशीर प्रतिपादनी शिकवणुकीमुळें समाजाला सारासार विचार सुचला नाहीं, स्वाभिमान आठवला नाहीं किंवा परकियांचें धोरण आकलतां आलें नाहीं. पण इंग्रजी संस्कृतीच्या झगझगीत प्रकाशामुळें महाराष्ट्रियांचे दिपलेले डोळे कायमचे अंध झाले नाहींत. कांहीं काळानंतर डोळे दीपविणाऱ्या 'सूर्या'वरील डाग त्यांना दिसूं लागले, इतकेंच नव्हे तर कित्येकांनीं त्या प्रभावी सूर्यावर थुंकण्याचे स्वशक्त्यनुसार प्रयत्नही केले. मात्र ते यशस्वी झाले नाहींत एवढ्यावरूनच त्यांचा निर्देश टाळणें योग्य नव्हे. महाराष्ट्राच्या वैचारिक प्रगतींतील पायऱ्या या दृष्टीनें त्यांना महत्त्व आहे.

पुणें जिल्ह्यांतील रामोशांनीं १८२६ मध्यें बंड आरंभिलें. त्यांच्या त्या बंडांत लुटालुटीचा व मारहाणीचा प्रकार विशेष होता. पण निरनिराळ्या टोळ्या करून ते पांगलेले असल्यानें त्यांचा बंदोबस्त करणें इंग्रज सरकारला साधलें नाहीं. त्या वेळची राजकीय परिस्थिति वेगळी होती कीं प्रजेशीं वागण्याचें धोरण निराळें होतें, हें निश्चितपणें सांगतां येत नाहीं. कारण ह्या बंडखोर रामोशांशीं इंग्रज प्रभूंनीं सलोखा केला. इतकेंच नव्हे, तर त्यांचे गुन्हे माफ करून त्यांना नोकरी देऊन व कित्येकांना जमिनी इनाम देऊन समजावण्याचा सरकारनें प्रयत्न केला. त्याच सुमारास नाशिकचा राघू भांग्या व नगरचा रामजी यांचा विरोध सुरू झाला. रामजीचा साथीदार, रतनगडचा किल्लेदार, गोविंदराव खारी म्हणून होता, त्यानें पेशवाईंतील अनुभवाच्या व हुकमतीच्या जोरावर या विरोधास उत्तेजन दिलें. पुण्यांतील रामोशांच्या यशस्वी बंडाची हकीगत इतरत्र पसरण्यास विलंब लागला नाहीं. पुणें व नगर जिल्ह्यांतील कोळी नवीनच स्थापन झालेल्या इंग्रजी सत्तेस प्रतिकार करण्यासाठीं एकत्रित झाले व पुणें, ठाणें आणि नगर ह्या जिल्ह्यांत त्यांनीं आपलें अस्तित्व पटवून दिलें. हाही प्रकार अल्पकालांतच म्हणजे १८३० मध्यें थांबला. डोंगरांत रहाणाऱ्या अक्षरशत्रू प्रजेनें नवीन आलेल्या राजसत्तेस यथाशक्ति विरोध करून आपलें स्वातंत्र्य परत मिळविण्याचा प्रयत्न केला, तिनें प्रतिपक्षाच्या बलाची

व सामर्थ्याची कल्पनाही केली नाहीं. स्वतःच्या मर्यादित शक्तीमुळें उत्पन्न होणारी पराभव-भीतिही त्यांच्या मनावर पगडा चालवूं शकली नाहीं. ह्या गोष्टी ऐतिहासिक घडामोडी पहात असतां लक्षांत घ्यावयास पाहिजेत.

मध्यंतरींचा सुमारें दहाबारा वर्षांचा काल प्रतिकाराचा विचार प्रगट झाल्या-शिवाय गेला खरा. पण १८४४ मध्यें नाशिक-नगर भागांत रामोशी पुनः आपलें स्वातंत्र्य कायम टिकविण्यासाठीं धडपडूं लागले. राघू भांग्र्यानें २० सप्टेंबर १८४४ रोजीं एक ऑफिसर व सात पोलीस यांस ठार केलें. राघूचा भाऊ, बापू हा सरका-रच्या तावडींत सांपडला, तरी सरकारला होत असलेला विरोध मुळींच कमी झाला नाहीं. इतकेंच नव्हे, तर सरकारपक्षपाती पाटलांचीं नाकें कापण्याचा उपक्रम राघूनें आरंभिला. उमाजी नाईकाचे पुत्र १८४६ मध्यें सरकारच्या हातीं लागले तरी उमाजी मिळाला नाहीं व दरोड्यांचें काम तसेंच चालू राहिलें. राघूचें नांव सर्वतोमुखीं होऊन त्याच्या पराक्रमाविषयीं सर्वत्र बोलबाला होऊं लागला. त्याला पकडण्यास सरकारनें पांच हजार रुपयांचें बक्षीस लावलें. सरकारला जेरीस आणण्याचे ह्या डोंगरी लोकांचे प्रयत्न फार दिवस चालले नाहींत. राघू १८४८ मध्यें व उमाजी १८५० मध्यें सरकारचे हातीं लागले व हाही प्रयत्न संपला.

कोळ्यांचा आणखीही एक उठाव १८३९ ते ४६ च्या सुमारास झाला. यांत भाऊ खेर, चिमणाजी जाधव व नाना दरबारे या तिघांनीं पुढाकार घेतला असून पेशव्यांचे अधिकारी म्हणून ते काम करीत. यावरून ह्यास शुद्ध राजकीय स्वरूप प्राप्त होतें. इतर प्रयत्नांप्रमाणेंच ह्याचाही शेवट झाला. पण त्यापायीं एकंदर चौपन इसमांवर खटला भरून, रामचंद्र गोरे व एक कोळी फांसावर लटकले; अठ्ठाविसांना कमीजास्त अशा शिक्षा मिळाल्या व चौविस जण गुन्हा माफ म्हणून सुटले.

उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र १८५७ हें साल फार धामधुमीचें गेलें असलें, तरी महाराष्ट्रांत मात्र त्या मानानें कांहींच घडलें नाहीं असें म्हणतां येतें. नुरलहुदा नांवाचा वहाबी पंथीय पुढारी राजद्रोहात्मक पत्रव्यवहार करीत असे या आरोपावरून पुणें येथें पकडला होता. त्यानें बेळगांव व कोल्हापूर येथील मुसलमानांशीं कांहीं संशयास्पद कारस्थानें चालविलीं होतीं. त्याच सालीं राज-

द्रोही असें एक पत्रक पुना कॉलेज लायब्ररीजवळ लावलेलें आढळलें. ह्या दोन प्रकारांखेरीज १८५७ सालची दुसरी कसलीही आठवण पुण्याशीं–पेशव्यांच्या राजधानीशीं–संलग्न नाहीं. मात्र पुढें दोन वर्षांनीं नाना–साहेबांच्या वतीनें एक जाहीरनामा काढल्याबद्दल एका इसमास फांशीची शिक्षा झाली होती.

या नंतरचा कांहीं काल इंग्रजी राज्याशीं तन्मय होण्यांत गेलेला दिसतो. तिकडे लक्ष पोंचविण्यापूर्वीं हे प्रतिकाराचे प्रयत्न कोळी, रामोशी वगैरे डोंगरी लोकांतच कां झाले, हें पहावयास हवें. मराठी राज्य गेलें व इंग्रजी राज्य आलें या फरकानें शहरवासी शिक्षित पांढरपेशांना आपलें भाग्य उदयास आलें असें वाटलें. इंग्रजी अमलानें शहरवासी लोक दिपले; त्यांना इंग्रजी सत्ता अमर्याद वाटली, हें तर खरेंच. पण चार पुस्तकें शिकलीं कीं सरकारी नोकरींत वर्णी लागून या अमर्याद सत्तेचें भागीदार होण्याचें भाग्य लाधतें असें त्यांस वाटे. शिवाय त्यावेळच्या नेटिव्ह अमलदारांचें महत्त्व कांहीं विशेष असे. अर्थात् या नवशिक्षितांना प्रतिकाराची नुसती कल्पनाही शिवणें शक्य नव्हतें. जुन्या ब्राह्मण–सरदार वगैरे वर्गांची काय परिस्थिति होती तें आपण पाहिलेंच. शिवाय यांना आंजारून–गोंजारून आपलेसे करण्याचे प्रयत्न एलफिन्स्टनसाहेबासारखे हुशार अधिकारी करीत होते. पण हें धोरण सर्वत्रच कसें आंखणार? जेथें जित आणि जेते यांचे हितसंबंधच पूर्णपणें वेगवेगळे तेथें समाजांतील सर्वच घटकांना अंकित कसें करणार? शेतकरी वगैरे मागासलेल्या वर्गांची, राजवटींतील फरकामुळें, मोठीच हानि झाली. त्यांतून एकोणीसाव्या शतकाच्या पूर्वार्धांतील आर्थिक मंदीमुळें शेतकरीवर्ग अधिकच हवालदील झाला. परंतु या स्थित्यंतराचें खरें स्वरूप त्या अडाणी जनतेस कसें समजणार? शिवाय प्रतिकाराची धमक त्यांच्यांत उरलीच नव्हती. पण कोळी, रामोशी वगैरे डोंगरी लोकांची स्थिति निराळी होती. स्वातंत्र्याची मातब्बरी वन्यजातींनाच अधिक वाटते. इंग्रजी राजवटीचा कडक शिस्तबाज अमल खेडोपाडीं पोंचला असल्यामुळें त्याचा प्रतिकार म्हणून या लोकांनीं उठाव केला असावा. जन्मोजन्मीं स्वैरपणें वागण्यास मिळालेल्या या डोंगरी लोकांना 'कायदा आणि सुव्यवस्था' राखण्यासाठीं आंखलेली शिस्त नुसती बेशिस्त वाटावी यांत नवल कोणतें? शिवाय वतनजप्तीच्या सत्रांत कित्येक रामोशांचीं वतनें जप्त झाल्यामुळें त्यांना हा स्वातंत्र्य–

नाश अधिकच जाणवला असावा. तें कसेंही असलें तरी नव्या राजवटीशीं एकरूप होण्यास शहरवासी पुढारलेली पांढरपेशी मंडळी जितकी तयार होती, तितकी खेडवळ, अडाणी, व रानटी प्रजा नव्हती हें खरें.

१०. उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र गाजलेल्या मोठ्या उठावाचा पूर्वध्वनि म्हणून महाराष्ट्रांतील तत्कालीन छोट्या प्रयत्नांची एक वेळ उपेक्षा करतां येईल. तशी वासुदेव बळवंत फडके यांच्या 'दरवड्यां'ची करतां यावयाची नाहीं. कारण फडके यांनीं रामोशांना जमवून, 'दरवडे' घातले ही गोष्ट खरी असली तरी, त्यांच्या प्रयत्नांचें खरें स्वरूप अगदीं भिन्न होतें.

> "...चार चार माणसें महिना महिना पूर्वी पाठवून...देशांत लहान बंडें करीन. एवढें केलें तरी इंग्रजांचे मनांत मोठी भीति उत्पन्न झाल्याशिवाय राहणार नाहीं.....अशीं बंडें केलीं तर डाका बंद होतील, आगगाडी बंद होईल, तारा बंद पाडतां येतील,...म्हणजे तुरुंग मोकळे करण्यास हरकत नाहीं....अशीं लहान लहान बंडें झालीं तर...सर्वच चमत्कार व्हावा त्याप्रमाणें होऊन जाईल; व इंग्रजांना हाकून लावून प्रजासत्ताक राज्य स्थापना करण्याचा जो आपला हेतु तो तडीस जाईल." *

पण अशा हेतूनें प्रेरित झालेल्या फडक्यांनीं सरकारी संस्थांवर अथवा अधिकाऱ्यांवर कोठेंच हल्ला केला असल्याचें त्यांच्या चरित्रांत नमूद नाहीं. वासुदेव बळवंताला विष्णुशास्त्री चिपळूणकरांसारख्या अव्वल दर्जाच्या देशभक्तानें 'यःकश्चित् दरवडेखोर'× म्हटलें. (फडक्यांच्या 'प्रजासत्ताक हेतू'कडे चिपळूणकरांचें दुर्लक्ष झालें हेंच खरें.) पण न्या० मू. गो. रानडे यांच्यासारख्या समतोल बुद्धीच्या सरकारी अधिकाऱ्यास 'फडक्यांनीं स्वीकारलेला मार्ग संमत नसला, किंबहुना तिरस्करणीय वाटत असला, तरी त्यांची देशभक्ति (माधवरावांस) सर्वस्वीं मान्य होती.'† यावरून फडके स्वदेशप्रेमामुळेंच ह्या बंडखोरीच्या मार्गाला लागले हें खरें दिसतें. पण त्यांची स्वदेशभक्ति व्यक्त होण्यास योग्य स्थलावकाश लाभला

---

* रा. ग. बोरवणकर—"**वासुदेव बळवंत फडके**" चरित्र पृ. २९

× **निबंधमाला.** (आर्यभूषण प्रत) पृ० १२२९

† न. र. फाटक. **न्या. रानडे चरित्र** पृ. ३२१

नाहीं, हेंही तितकेंच खरें. परिस्थितीचें ज्ञान, ध्येयनिश्चिती, मार्गाची रूपरेषा, रामोशांनासुद्धां हातीं धरण्याची तयारी, इत्यादि बाबींमुळें फडक्यांचें सर्वसंग्राहकत्व सिद्ध होतें. स्वतः ब्राम्हण असूनही त्यांनीं असल्या विश्वासाच्या कामांत रामोशांना सहकारी केलें—ही बाब तत्कालीं प्रसृत असलेल्या ब्राह्मणी मोठेपणाच्या कल्पनांमुळें विशेष महत्त्वाची वाटते. सरकारी नोकरींत असल्यापासून इंग्रज प्रभूंच्याविरुद्ध सशस्त्र बंड करण्याची तयारी फडके करीत होते, यावरून त्यांच्या अलौकिक धाडसाची कल्पना येते.

---

# ६ बाळशास्त्री जांभेकर

१ बहुभाषी जांभेकर २ तीन चळवळींचे जनक

१. इंग्रजी अमदानींत नव्या नवलाईच्या किती तरी गोष्टी इकडील समाजांत आल्या व प्रत्येकाबरोबर नवमताची लहान मोठी लाटही आली. किंबहुना त्या लाटेवर आरूढ होऊन नवलाई इकडे आली, असें म्हणतां येईल. इंग्रजी शिक्षण, रेल्वे, पोस्ट, तारायंत्रें, वर्तमानपत्रें, छापील पुस्तकें,... इत्यादिकांनीं आणलेल्या लाटा अधिक मोठ्या होत्या. ह्या नव्या लाटांबरोबर वहावत जाऊन पुढें सरकणारी कांहीं मंडळी समाजांत होती, तसेच स्वतःच्याच ठिकाणीं राहून लाटांना परत फिरविण्याचा प्रयत्न करणारेही कित्येक वीर होते. अशा नवमतांचा प्रथम स्फोट महाराष्ट्रांत बाळशास्त्री जांभेकर (१८१० ते १८४६) व दादोबा पांडुरंग (१८१४ ते १८८२) यांनीं केला. दादोबांच्या कामगिरीचा निर्देश अन्यत्र होणार असल्यानें येथें जांभेकरांचाच विचार कर्तव्य आहे. पूर्वीच्या शिक्षणाच्या मानानें इंग्रजी अमदानींतलें शिक्षण पाहून त्यांना कूपांतून निघून सागरांत पडल्याप्रमाणें वाटल्यास नवल नाहीं. किती शिकूं ? असाच त्यांचेपुढें सारखा प्रश्न पडलेला दिसतो. त्यांनीं नऊ भाषांचा अभ्यास केला; नाना विषयांचा अभ्यास केला; व

त्यापैकीं बहुतेकांवर आपलें कलम चालविलें. इतिहास, गणित, मानसशास्त्र, व्याकरण, संशोधन, ... अशा निरनिराळ्या विषयांवर त्यांनीं स्वतः लेखन केलें; इतकेंच नव्हे, तर गंगाधरशास्त्री फडके यांजकडून विधवाविवाहावर अनुकूल असा एक ग्रंथही लिहविला. ( १८४० ? )

२. जांभेकरांची बुद्धि इंग्रजांचें अगाध ज्ञानभांडार पाहून स्तिमित झाली आणि तिनें ( ल्हावरेपणानें ) मिळेल तितकें ज्ञान संपादन केलें. वयाच्या अवघ्या पसतिसाव्या वर्षीं जांभेकर स्वर्गवासी झाले, ही गोष्ट लक्षांत घेऊन त्यांचा विद्याव्यासंग व ग्रंथसंपत्ति यांकडे पहावें. परंतु केवळ स्वतःपुरतेंच पाहून ते थांबले नाहींत. लोकांनींही ज्ञानसंपन्न व्हावें, ही त्यांची तळमळ पुष्कळ प्रसंगीं व्यक्त झालेली दिसते. वक्तृत्वोत्तेजक सभा व ग्रंथालय स्थापण्याचे त्यांचे प्रयत्न याच दिशेनें होते. महाराष्ट्रांत प्रथम साप्ताहिक काढलें तें बाळशास्त्री जांभेकरांनींच. 'दर्पण' साप्ताहिक व 'दिग्दर्शन'* मासिक अशीं दोन नियतकालिकें जांभेकर चालवीत असत. ज्ञानप्रसाराची त्यांची तळमळ यावरून व्यक्त होते. कारण त्यांनीं या साप्ताहिक—मासिकांचा उपयोग लोकांत ज्ञान वाढविण्याकडेच केला.

जनतेंत ज्ञानप्रसार झाला कीं लोक विचारशील बनतील व मग जुन्या चालीरितींस फांटा मिळेल अशा प्रकारची जांभेकरांची विचारसरणी दिसते. ते सुधारक—कर्ते सुधारक—होते. म्हणूनच श्रीपाद शेषाद्रि या ख्रिस्ताळलेल्या गृहस्थास त्यांनीं त्याच्या इच्छेनुसार पुनः हिंदू करून घेतलें. ते वेळीं त्यांस किती विरोध झाला असेल किंवा ग्रामण्याची धमकी त्यांना किती धर्माभिनिवेशानें मिळाली असेल, याची कल्पनाच केलेली बरी. या प्रकरणांत त्यांना सतत पांच वर्षें बहिष्काराचा त्रास सोसावा लागला. कारण अव्वल इंग्रजींतील रिकामटेकड्या भटभिक्षुकांस आपलें स्तोम माजविण्यास ही आयतीच संधि मिळाली. तसेंच एका व्याख्यानांत

* **दिग्दर्शन** इ. स. १८३७ मध्यें निघालें. पण, **दर्पण** कधीं सुरू झालें तें नक्की समजत नाहीं.

ग्रहणाविषयीं शास्त्रीय उपपत्ति त्यांनीं न डरतां सांगितली. आणि ती तशी सांगितल्याबद्दलही त्यांचेवर ग्रामण्यांची चळवळ झाली असें दिसतें. परंतु कसल्याही धमकीस न भितां स्वतःच्या बुद्धीस पटेल तें करण्यास त्यांनीं केव्हांही मागेंपुढें पाहिलें नाहीं, यांतच त्यांचा थोरपणा आहे. धार्मिक बाबतींत ते पुराणमतानुयायी वाटले तरी त्यांचा आचार प्रागतिकांप्रमाणें होता. सर्व धर्मांचीं मूलतत्त्वें एकच आहेत असें बाळशास्त्री मानीत. पण "**स्वधर्मे निधनं श्रेयः**" हेंच तत्त्व त्यांनीं शेवटपर्यंत सर्वश्रेष्ठ मानिलें. परमेश्वरासंबंधीं त्यांची आस्तिक्यबुद्धि असे; मात्र ब्राह्मणांचें अर्थाविणा मंत्रपठण त्यांना मुळींच आवडत नव्हतें. इतकेंच नव्हे, तर धार्मिक विधींची माहिती सर्वत्रांस व्हावी म्हणून सर्व विधींचें बालबोध ज्ञान करून देण्याचा प्रयत्न त्यांनीं केला. अल्पारंभ म्हणून संध्येचें मराठी भाषान्तर करण्यास त्यांनीं सुरवात केली होती... 'धर्ममार्तंड' अशा रावबाजीच्या कारकिर्दींत जन्मलेल्या शास्त्रीबुवांचे हे उदार विचार पाहिले किंवा त्यांचें 'मनःपूत' आचरण त्या वेळेस किती बंडखोरीचें वाटलें असेल याची कल्पना केली कीं मगच त्यांची खरी योग्यता समजून येते.

वयाच्या अवघ्या पसतिसाव्या वर्षीं हे बाळशास्त्री परलोकवासी झाले. परंतु इतक्या अल्पावधींत सरकारी नोकरी संभाळूनही त्यांनीं तीन महत्त्वाच्या चळवळींचीं बीजें महाराष्ट्रांत पेरलीं. नियतकालिकें, विधवाविवाह आणि पतितपरावर्तन या तीन शाखांत महाराष्ट्रानें आज जी प्रगति केली आहे तिचें श्रेय, आद्यप्रवर्तक म्हणून, जांभेकरांसच जातें. अर्थात् महाराष्ट्राला (हिंदुस्थानला) लागलेल्या रोगाचें खरें निदान जांभेकरांना झालें होतें, असें म्हणतां येत नाहीं. इंग्रज हिंदुस्थानांत आले ते व्यापाराच्या हेतूनें; हिंदुस्थानचें राज्य संपादिल्यामुळें सर्वांत अधिक फायदा कोणाचा झाला असेल तर तो इंग्रज व्यापारी आणि भांडवलवाले यांचा. हीच व्यापारी जळू हिंदुस्थानचें द्रव्य शोषण करीत होती. शरिरांत रक्ताला जें महत्व तें समाजांत संपत्तीला. सामाजिक अवनतीची मीमांसा करतांना समाजाच्या आर्थिक प्रश्नांकडे अगोदर लक्ष पुरविलें पाहिजे. तसें लक्ष जांभेकरांनीं पुरविलें होतें, असें वाटत नाहीं. आपल्या "दर्पण" साप्ताहिकांतून ते राजकीय व व्यापारी प्रश्नांचा उहापोह करीत असत. परंतु त्याचें स्वरूप बरेंच मासुली

होतें. इंग्रजांच्या व्यापारी धोरणाचें खरें स्वरूप—आपल्या विशिष्ट पद्धतीनेंच कां होईना पण व्यक्त करण्याचा मान लोकहितवादींनाच मिळतो.

असल्या वैयक्तिक प्रयत्नांची पराकाष्ठा अव्वल इंग्रजींत झाली. परंतु राष्ट्राला ते वेळीं जडलेल्या रोगावर असल्या एकाकी प्रयत्नांनीं कांहींच दृश्य परिणाम झाला नाहीं. मात्र विचारसरणीचें मूळ शोधीत असतां हे मागावे लक्षांत घेतलेच पाहिजेत.

---

# ७ लोकहितवादी



ोकरांनंतर लगोलग समाजसुधारणेचा उपदेश लोकहितवादींनीं ारांना आपलीं मतें लोकांपुढें मांडण्यासाठीं वर्तमानपत्रें काढावीं लोकहितवादींना तो लाभ आयताच मिळाला. ‘ प्रभाकर ’* ीं आपल्या ‘ शतपत्रांचे ’ द्वारें निद्रिस्त समाजास जागें करण्याचे केले. हे लोकहितवादी म्हणजे सरदार गोपाळ हरी देशमुख ८९२ ) होत. त्या वेळच्या समाजांतील शिक्षित मंडळींचे णून देशमुखांचें उदाहरण देतां येतें. इन्दुप्रकाश,† वृत्तवैभव

’ दैनिक, मुंबई, सुरू १८४०

श ’ दैनिक, मुंबई, सुरू १८६२

याही पत्रांतून त्यांनीं पुष्कळ लेख लिहिले असल्यानें त्यांच्या एकंदर प्रयत्नांची व मतांची चांगलीच कल्पना येते. त्यांचें सर्वच लिखाण अत्यंत कळकळीचें आहे. आंतड्यांना पीळ पडल्यामुळेंच ते 'कंठशोष' करीत आहेत, असें त्यांचें कोणतेंही लिखाण वाचून वाटतें. "अरे, अरे, काय हे दुष्ट चांडाळ ब्राम्हण आहेत! आणि कोण यांचे पुढारी पंडित शास्त्री आहेत! या जातीचे पुढारी दुसरे कोणी होतील तर बरें....गरीब, तरुण, दुर्भाग्य स्त्रिया यांचे हाल पाहून या चांडाळांस दया येत नाहीं. पुनर्विवाहाची गोष्ट कोणी बोलला तर त्यांस वाटतें कीं हा कोणी राक्षस धर्म बुडविणारा आहे."* आणखीही एके ठिकाणीं ते म्हणतातः—"मला तर असें वाटतें कीं स्त्रियांचें दुःख इतकें भारी आहे कीं त्यांची स्मृती झाली तर रोमांच उभे राहातात...हे ब्राम्हण लोक आपल्या मुली मारल्यापेक्षां अधिक दुःखांत ठेवितात...अद्यापि या सुधारणेविषयीं उलटे बोलणारे आहेत. परंतु जसा व्याघ्र रानांत माजला तर (त्यास) सर्व जण जाऊन मारतात. तसें या उलटें बोलणारांचा लोक धिक्कार कां करीत नाहींत? व याविषयीं एक मत कां होत नाहीं? बारा, पंधरा, वीस, तीस वर्षांच्या पोरींचे गळे कापतात हें पाहून अन्तःकरण खवळून न जावें काय?...तुम्हीच आपल्या मुलींचे खाटीक स्वस्थपणें होतां. तुमच्या सारिखें राष्ट्र आणि तुमच्यांतील विद्वानांसारखे विद्वान यांस तुळणा पृथ्वीवर कोठेंही मिळणार नाहीं. हेंच खरें...यांत नीति नाहीं, धर्म नाहीं, विचार नाहीं, सत्कर्म नाहीं व युक्ती नाहीं; मागें करीत आले व लिहून ठेवलें म्हणून पुढें करितात. परंतु त्याची कांहीं मर्यादा पाहा. लक्षावधी स्त्रिया उपाशी मरतात. घर नाहीं, दार नाहीं, वस्त्र नाहीं, अन्न नाहीं. आणि हे दुष्ट पंडित अशा प्रकरणांत दैत्यासारखे निष्ठुर होऊन बोलतात, त्यांस काय म्हणावें?"† केवढी ही कळकळ!

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. ९९. हीं पत्रें बाळ महाजन यांच्या 'प्रभाकर' पत्रांतून क्रमशः प्रसिद्ध होत असत. तीं १८४८ पासून सुरू होऊन १८५० सालपर्यंत प्रसिद्ध होत होतीं. शेवटच्या पंधरावीस पत्रांवर तारीख दिसत नाहीं.

† **कित्ता.** पत्र नं. १०४

२. आपल्या लोकांत दुराचार माजला; त्यांच्यांत कर्तृत्व असें कांहीं उरलें नाहीं, अज्ञान वाढलें...वगैरे अनवस्था प्रसंग ओढवला तो दूर करण्यासाठींच ईश्वरानें इंग्रजांची योजना केली असें लोकहितवादींना वाटत असे. "इंग्रज लोक यांनीं इकडे राज्य संपादन केलें त्याचें कारण काय, याचा विचार करतां असें दिसतें कीं हिंदू लोकांमध्यें मूर्खपणा वाढला. तो दूर होण्याकरितांच हे गुरू दूर देशांतून ईश्वरानें इकडे पाठविले आहेत. पहा, हिंदू लोकांस हा मोठा लाभ आहे कीं, इंग्रज लोकांचे राज्यामुळें हिंदू लोकांत जागृति झाली व पृथ्वीवर काय काय आहे तें कळूं लागलें...सती जाणें, जलसमाध घेणें, पोरें मारणें, जगन्नाथास रथ उरावर घेणें व हिमालयास स्वर्गांत जाणें इत्यादि अघोर आणि लज्जास्पद चालींमुळें ईश्वराचा क्षोभ अत्यंत झाला तेव्हां दुष्ट लोकांस ताळ्यावर आणण्यासाठीं ईश्वरानें इंग्रज सरकारची योजना केली"* साता समुद्रांपलीकडून इंग्रज येतात व पहातां पहातां हिंदुस्थानचें राज्य बळकावतात ही कांहीं साधी गोष्ट नव्हे असें लोकहितवादींना वाटलें. त्यांत त्यांना ईश्वरी हेतु दिसला. "अशा अघटित योजना ज्या होणें त्या माणसांच्या कृतीनें होत नाहींत. ईश्वरसत्तेनें होतात. जेव्हां हिंदू लोकांचा मूर्खपणा जाईल, तेव्हां ईश्वर इंग्रजांस ये देशांतून जाण्याची आज्ञा करील."†

अशा प्रकारचे विचार एका सुविद्य व सुशिक्षित गृहस्थानें काढल्या-बद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. एकोणिसाव्या शतकाचा पूर्वार्ध उलटण्यापूर्वींचे हे उद्गार आहेत. हिंदुस्थानची सर्वांगीण सुधारणा करणारे इंग्रज, म्हणूनच राज्यकर्त्यांकडे पाहाण्याची ते वेळची रीत होती. लोक-हितवादी म्हणतात, "हिंदुस्थानचें राज्य इंग्लिश लोक करितात हें हिंदु-स्थानच्या हिताकरितां किंवा इंग्लंड देशाचे हिताकरितां याचा विचार करून मोठाले सूज्ञ लोकांनीं असें ठरविलें आहे कीं विशेषें करून हिंदुस्थानचे हिताकरितां हे लोक झटत आहेत." लोकहितवादींचे मनांत ही भावना दृढ होती खरी, परंतु दक्षिणा व वतनें बुडालेल्या ब्राह्मण—सरदार मंडळीस

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. ४६

† **कित्ता.** पत्र नं. ८९

हें कसें पटावें ? तसेंच, जुन्या वेडपट समजुतींवर पोसलेल्या जनतेला इंग्रजी सुधारणेंत आपलें हित आहे, असें कसें वाटावें ? महाराष्ट्रीय समाज इंग्रजांना परकें लेखून त्यांच्यापासून दोन पावलें दूर रहाण्याचाच प्रयत्न करी; व त्यांच्या सुधारणेला नाकें मुरडी. लोकहितवादींना तें पहावलें नाहीं. लोकांना त्यांनीं उपदेश दिला, "लोकांनीं या दुर्बुद्धि सोडून देऊन सरकारला हरेक कामांत मदत करावी हें योग्य. म्हणजे सरकारास आनंद होतो व त्यांचे हातून सुधारणा पुरतेपणीं होते."

३. इंग्रज आपले गुरु आहेत. त्यांच्या पायाशीं बसून आपण शहाणपणाचे धडे घेतले पाहिजेत; म्हणजे आपली मध्यंतरीं नष्ट झालेली संस्कृति आपणांस पुनः मिळेल; आणि तशी ती मिळविण्या-साठींच परमेश्वरानें इंग्रजांची योजना केली आहे, असा लोकहितवादींच्या शिकवणीचा इत्यर्थ आहे. महाराष्ट्रीय भोळा भक्तिभाव व त्याचें स्वामिनिष्ठेंत झालेलें रूपान्तर ह्याविषयीं विवेचन मागें केलें. तसाच थोडासा प्रकार लोकहितवादींच्या बाबतींत झालेला दिसतो. ते सरकारी नोकर होते. त्यांचें शिक्षण परकियांनीं बनविलेल्या साधनांनीं झालें होतें. 'अल्फिष्टन' साहेबांचें 'वजन' त्यांचेवर बालपणापासून पडलेलें असल्यानें 'इंग्रज' हा शब्द उच्चारतांना त्यांचेपुढें आज आपणांस आढळणारी आढ्यतेखोर अधिकारी मंडळी मुळींच नव्हती. उलट इनाम कमिशनवर बरोबर काम करणारे थोर मनाचे गोरे अधिकारीच त्यांचे नजरेससोर होते. त्यामुळें इंग्रजांबद्दल देशमुखांचें मत चांगलें झालें. यामुळें इंग्रजांचा व हिंदी जनतेचा संबंध आला यांत त्यांना ईश्वरी योजना दिसली तर आश्चर्य नव्हे. परंतु पुढें न्या. रानडे यांजसारखा जागरूक व स्वतंत्र विचाराचा मुत्सद्दी याच धब्याची उजळणी करून 'डिव्हाइन डिस्पेन्सेशन'चें तत्वज्ञान मान्य करतो किंवा भारतसेवक समाजाच्या सदस्यांनीं मान्य करावयाच्या समजुतींत नामदार गोखल्यांसारखा बुद्धिवादी ( १९०५ सालीं ) ह्याच अर्थाचें कलम घालतो, तेव्हां मात्र अतिशय विस्मय वाटल्यावांचून रहात नाहीं. असो.

४. इंग्रजांबद्दल लोकहितवादींना पूज्यभाव वाटत होता तरी त्यांनीं सरकारवर टीका करण्यास ( स्वतः सरकारी नोकर असूनही ) कमी केलें नाहीं. मद्यपानाचें

व्यसन लोकांत फैलावून सरकारला उत्पन्न मिळतें त्यासंबंधीं त्यांनीं म्हटलें, “सरकार लोकांचे स्थितिकडे किमपी पहात नाहींत. द्रव्याची आशा धरून दुर्गुणावर उत्पन्न करतात आणि प्रसिद्धपणें दुर्गुण वाढूं देतात.”* पण त्याच्याही पुढें जाऊन त्यांनीं बजाविलें कीं, “सरकारची मातोश्री लोक आहेत. आज उत्पन्न होईल; पण उद्यां लोक दरिद्री झाले म्हणजे तेंही बसेल.”× सरकारलाच ‘मायबाप’ म्हणण्याचा प्रघात असतां जनतेला सरकारची मातुःश्री ठरवून करांचा बोजा न वाढविण्याबद्दल लोकहितवादींनीं सरकारला सूचना दिली. परंतु या बाबतींत त्यांचे परिपक्व विचार त्यांनीं ‘गुजरात देशाचा इतिहास’ लिहिला ( प्रकाशन स. १८९४ ) त्यांत आढळतात. ह्या पुस्तकाला परिशिष्टवजा ‘राज्यतुलना’ म्हणून एक पुस्ती जोडली आहे. इंग्रजी व देशी राज्यांतील गुणावगुणांची त्यांत मुद्देवार चर्चा असून एकंदर ३४ कलमांची तुलनात्मक यादी लोकहितवादींनीं तयार केलेली दिसते. इंग्रजींतील दोष त्यांनीं दाखविले ते असे:—

“कर, पट्टया, जकाती, दस्तुऱ्या वगैरे सरकारदेण्याचें बंड इंग्रजी अमलांत वाजवीपेक्षां फाजील सोसावें लागतें. व ह्यासंबंधानें रयतेला नाखूष ठेवणें हें इंग्रजी राज्याला मोठें दूषण आहे”$ एवढ्यावरच समाधान न पावतां देशी राज्यांतील “ह्या बाबतींतला गुण इंग्रज सरकारनें घेण्यासारखा आहे.”† असा शेरा त्यांनीं मारला आहे. पुनः दुसऱ्या ठिकाणीं लोकहितवादी म्हणतात... “विलक्षण पक्षपात, व आपपर दृष्टी इंग्रजी अमलांत अत्यंत दोषार्ह आहे.”= “इंग्रज सरकारच्या अनेक गुणांला मोठा कलंक” असें या दोषांचें वर्णन करून पुढील कलमांत लोकहितवादी लिहितात, “युरोपियन मनुष्यावर कसाहि अधमपणाचा, नीचतेचा व घोर अपराधाचा आरोप आला असला तरी तो त्यांतून

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. ७६

× **कित्ता**

$ लोकहितवादीकृत **गुजरात देशाचा इतिहास** पृ. ३७२

† **कित्ता** पृ. ३८४

= **कित्ता**

सुटावयाचाच; किंवा झाली तरी अल्प स्वल्प शिक्षा देऊन त्यास सोडून द्यावयाचें. असा मूर्तिमंत पक्षपात व भेदबुद्धि दिसते," असें स्पष्टपणें बजावून "ही कानाडोळा करण्याची गोष्ट नाहीं," असें त्यांनीं सांगितलें. लोकहितवादींचा शिरस्ता इंग्रजांना ईशप्रेषित गुरु मानण्याचा असला, तरी इतकी स्पष्टोक्ति त्यांचे ठायीं आहे व इंग्रजांचे दोषही ते निर्भीडपणें लोकांपुढें जाहीररीत्या मांडतात, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. इंग्रजांच्या पक्षपातावरील लोकहितवादींची टीका चिपळूणकरांच्या तशाच अर्थाच्या टीकेशीं* अतिशय जुळते; इतकेंच नव्हे, तर ती एका पिढीनें अगोदरची आहे, हें लक्षांत ठेविलें कीं तिचें महत्त्व सहज पटतें.

५. लोकहितवादींच्या वरील परस्परविरोधी विचारांवरून एक गोष्ट स्पष्ट होते. हिंदुलोकांत मूर्खपणा व दुराचार वाढला, तो दूर करण्यासाठीं ईश्वरानें इंग्रजांची योजना केली, असें जरी त्यांना वाटत होतें, तरी ती एक इष्टापत्ति आहे याच भावनेनें लोकहितवादी त्या घटनेकडे पहात होते. अर्थात् इंग्रज-प्रेमानें त्यांचे डोळे अंध झाले नाहींत. त्यांची नजर जितकी चौफेर तितकीच ती खोल व दूर होती. अर्थातच हिंदुस्थानची—महाराष्ट्राची—आर्थिक अन-वस्था, त्याचें राजकीय भवितव्य वगैरे प्रश्नांकडे त्यांचें लक्ष वेधलें.

स्वदेशाची हलाखी, तीवर उपाय, आपलें राजकीय ध्येय इत्यादि विषयांवरचे त्यांचे विचार खरोखरच महत्त्वाचे आणि क्रान्तिकारक वाटतात. न्या. रानडे व सार्वजनिक काका यांना स्वदेशी चळवळीचे प्रवर्तक असें मानण्याचा प्रघात असला तरी त्यांचेपूर्वीही एतत्संबंधीं विचार प्रगट झाले होते, ते पाहिले तर स्वदेशी व बहिष्कार या चळवळीचे जनक लोकहितवादीच होते, असें स्पष्ट दिसून येईल. "सांप्रत हिंदु लोक भिकारी होत चालले आहेत व त्यांस रोजगार धंदा मिळत नाहीं, याचें कारण मला असें दिसतें कीं या लोकांचा व्यापार अगदीं बुडाला; इंग्रज व दुसरे देशचे लोक शहाणे होऊन या लोकांस सर्व जिनसा पुरवितात. आणि हे मुकाट्यांनीं स्वस्ताईमुळें खरेदी करतात. यास्तव या **लोकांनीं एकत्र होऊन असा**

---

* निबंधमाला पृ० ५८९

**कट केला कीं आपले देशांत दुसरे मुलखाचा जिन्नस आला तरी घ्यावयाचा नाहीं. आपले देशांत पिकेल तेवढाच माल घ्यावा. आपले लोक कापडें जाडीं वाईट करतात. पण तींच नेसावीं. इकडे छत्र्या करितात त्याच घ्याव्या** म्हणजे या लोकांत व्यापार राहून इकडे सुख होईल...**कापूस विकणाऱ्यांनीं असा बेत करावा कीं इंग्रेजास इकडे तयार केलेलीं कापडें द्यावीं परंतु कापूस देऊं नये.** येणेंकरून हे लोक सुखी होतील. सांप्रत आपलेच लोक आपल्या लोकांस मारीत आहेत ... श्रीमंत लोक जां(ज्यां)जवळ लाखो रुपये आहेत. ते विलायती जिनसा घेतात. आणि पैसा उडवितात."* येवढ्यावर भागलें, असें नाहीं. आणखी पुढें पहा. " हेच रोजगार आपले लोकांनीं करावे. कोणते म्हणाल तर कांच, कापड, सुरी, कात्री, लाकडी सामान, घड्याळें, चाबूक, यंत्रें इत्यादि पुष्कळ इकडे इंग्रज खपवितात. हीं सर्व आपले लोकांनीं करावयास शिकावें. व येथें जो माल खपणार नाहीं तो दुसऱ्या देशास घेऊन जावा आणि तेथें विकावा. पुष्कळ देश आहेत या गोष्टीचा शोध करावा व **इंग्रजांचे देशाचें सामान बंद करावें किंबहुना आपलें सामान त्यांस द्यावें... विलायती कापड घेऊं नये. यास्तव आपल्यास जाडीं मोठीं कापडें नेसावयास लागलीं तरी काय चिंता आहे?** आपले देशाचें रक्षण करावें. असें झालें म्हणजे बहुत रोजगार राहतील.†

न्यायमूर्ति रानड्यांनीं स्वदेशी व्यापारावर व्याख्यान ( १८७२ मध्यें ) दिलें, त्यापूर्वी जवळजवळ दोन तपें वरील विचारसरणी लोकहितवादींनीं महाराष्ट्रापुढें ठेविली. लोकांना बाहेरच्या देशांशीं व्यापार वाढवून इंग्रजी मालावर बहिष्कार घालण्याचा उपदेश, गोपाळराव देशमुख स्वतः सरकारी नोकर होते तरी, त्यांनीं अगदीं उघडपणें केला. यांतच त्यांचा बेडरपणा व्यक्त होतो. रानडेच काय, पण गोखलेसुद्धां बहिष्काराची भाषा बोलण्यास तयार नसत, ही बाब जातां जातां लक्षांत ठेविली पाहिजे. लोकहितवादींना मिळालेल्या शिक्षणविषयक

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** पत्र नं. ५७

† **कित्ता** पत्र नं. ६०

सवलतींचा मर्यादितपणा लक्षांत घेतला किंवा इंग्रज प्रभूविषयींचे त्यांचे विचार पाहिले तर असल्या दूरदृष्टीच्या धाडशी शिकवणुकीबद्दल त्यांचें साभिमान कौतुक वाटतें.

६. हिंदुस्थानच्या राजकीय आकांक्षांबद्दल आपले विचार सांगतांनाही त्यांनीं अशीच दूरदृष्टि दर्शविली आहे. "सर्व गरिबांनीं व श्रीमंतांनीं एकत्र होऊन राणी-साहेबांस असा अर्ज करावा कीं हल्लीं राज्यपद्धति आहे तीपासून आमचा फायदा नाहीं व आमचे राज्यसंबंधीं हक्क चालत नाहींत व हिंदुलोक जसे तसेच इंग्रज लोक मनुष्यें आहेत. याज करितां इन्साफ बरोबर होण्याकरितां सर्व इंग्रज व नेटिव लोक याजमध्यें सांप्रत मोठा भेद आहे तो मोडून एकसारखें होण्याकरितां **हिंदुस्थानचे देशांत पार्लमेंट ठेवावें**...आणि तेथें दर एक शहरांतून व दर एक जिल्ह्यांतून दोन दोन असामी घेऊन त्या सर्वांस कौंसिलांत बसवावें. संपूर्ण लोकांनीं विचार करून दोन शहाणे मुखत्यार नेमावें... ( अशानें )... इंग्रज लोक इकडील लोकांस मूर्ख असें समजतात तें मत मोडेल आणि राज्याची उत्तम प्रकारची सुधारणा होईल. **एके राजाचे अमलांत सुख काय व लोकसत्तात्मक राज्यांत सुख काय हें सहज दृष्टोत्पत्तीस येईल**....राज्य करण्यास गरीब व मातबर; नीच जातीचे व उंच जातीचे लोक समान मानावे हें सर्वांस कळूं लागेल...जे फार विद्वान व चांगले चालीचे लोक आहेत तेच नेमिले पाहिजेत. मग त्यांची जात कोणतीही असो."*

लोकहितवादींची दृष्टि इ. स. १८४८–४९ मध्यें इतकी व्यापक होती. इंग्रज त्यांना ईशप्रेषित वाटले तरी 'इंग्रज व नेटिव' सारखेच आहेत, हें प्रस्थापित करण्याचा आग्रह ते धरतात, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. यांत त्यांचा स्वाभिमान तर व्यक्त होतोच; पण आपल्या देशबांधवांना कमीपणा दिलेला त्यांना पहावत नसून तो दूर व्हावा म्हणून त्यांना तळमळ लागली असल्याचेंही कळतें. शिवाय 'पार्लमेंट'चें ध्येय व निवडणुकीची कल्पना एतद्विषयक मतें त्यांनीं लोकांपुढें ठेविलीं असल्यानें त्यांच्या विचारांना विशेष महत्व येतें. निवडणुकीची पद्धत सांगतांना लोकहितवादींनीं ताजा–

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. २५

कलम वजा एक सूचना दिली आहे ती अशीः—“ ...ब्राह्मणांस गर्विष्ठपणा फार आहे. याजकरितां ती जात फार थोडी असावी. ”*

७. पार्लमेंट असण्याची इच्छा ही केवळ इंग्रजांचे अनुकरणामुळें उद्भवलेली असली तरी ती व्यक्त करण्यांत त्यांनीं बराच बेडरपणा दर्शविला आहे. न्यायमूर्ति रानड्यांनाही पार्लमेंट पाहिजे होतें. पण त्यांची एतद्विषयक कल्पना वरील ध्येयाशीं ताडून पहाण्यासारखी आहे. किंबहुना देशमुखांच्या बऱ्याच कल्पना रानड्यांच्या विचारांशीं तुलना करण्याजोग्या असून त्यांवरून महत्त्वाचीं अनुमानें निघतात. लोकहितवादींची दृष्टि भविष्यकालांत बरीच दूरवर पहात असे. त्यांचीं भावी सुखस्वप्नें पहा :—

” (हिंदुस्थानचे) लोक शहाणे झाले म्हणजे (इंग्रजांना) हळूच म्हणतील कीं तुमच्या देशांत पार्लमेंट आहे तसें द्या. ... आणि मग अर्थातच इंग्रज फक्त व्यापार मात्र करून राहतील. ... जा (ज्या) **काळीं इंग्रज गडबड करूं लागतील किंवा कांहीं नवीन कानू बसवावयाचा आग्रह करतील त्या काळीं अमेरिकेंत झालें तसें होऊन हे लोक आपल्यास स्वतंत्र करून घेतील आणि इंग्रजांस सांगतील कीं तुम्ही आपले देशीं जावें** ... यास दोनशें वर्षें तरी पाहिजेत. परंतु असें होईल यांत शंका नाहीं ” †

लोकसत्तात्मक राज्याची कल्पना, अमेरिकेचें उदाहरण, परकी राज्यकर्ते व एतद्देशीय प्रजा यांच्यांत भविष्यकालांत पडणारी फूट ... इत्यादि बाबींवरून लोकहितवादींचें आकलन कळून येतें. त्यांचे हे विचार निवळ सुखस्वप्नें म्हणून मानले तरी त्यांत उच्च ध्येय, चढता आशावाद, इतिहासाचें सम्यक् ज्ञान व बदलत्या काळाबरोबर प्रगति करण्याची मनाची तयारी हीं सर्व दिसतात. पण हीं नुसतीं सुखस्वप्नें नव्हतीं. त्यांच्यामागें असलेली तात्त्विक विचारसरणी त्यांना ज्ञात होती. त्यांच्या लोकसत्तात्मक राज्यासंबंधींच्या उद्गारांवरून हें स्पष्ट होतेंच.

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. २५

† **किता** नं. ५४

त्यांनीं पुढें, १८६५ मध्यें, "सरकारानें काय करावें ?" ह्या मथळ्याखालीं लेख लिहिला, त्यांत याच लोकसत्तावादी विचारसरणीचें विवेचन व तरफदारी आहे. "सरकार चालविण्यामध्यें मुख्य मर्म असें आहे कीं सरकार जितकें घटत जाईल तितकें बरें आहे, व लोकांची सत्ता जितकी वाढत जाईल तितकी चांगली आहे."* असें करणें सरकारचें कर्तव्य असल्याची जाणीवही त्यांनीं करून दिली व पुढें म्हटलें, "न्याय, मनसुबी, कायदे करणें व शहरें आणि गांव यांतील बंदोबस्त ठेवणें हें सर्व लोकांचे हातीं असावें हा उत्तम पक्ष आहे. त्यानें लोक स्वतंत्रता भोगण्यास योग्य होतील."* हें विवेचन करतांना त्यांनीं सरकार व रयत यांचें नातें कसें असावें हें सांगितलें आहे. ते म्हणतातः—"**केवळ अडाणी देशांत सरकार मायबाप असतें किंवा सरकार चोर असतें. मध्यम सुधारलेले देशांत सरकार मित्र असतें. व फार सुधारलेल्या देशांत सरकार चाकर आहे असें मानून सरकारशीं लोक वागतात.**"† लोकहितवादींच्या उदारमतवादाचा हा पुरावा नव्हे काय ? तसेंच, सरकार रयतेशीं कसें वागतें यावरून रयतेची स्थिति अजमविण्याची त्यांची कल्पना त्यांच्या बुद्धिवैभवाची साक्ष देत नाहीं काय ? खरोखर, इतका व्यापक विचार लोकहितवादींनीं ते वेळीं केलेला पाहून त्यांच्या बुद्धीची तारीफ करावीशी वाटते.

८. लोकहितवादींच्या लिखाणांत विविध विचार आढळतात. त्यांनीं आपणांत कोणते गुण नाहींत, दोष कोणते आहेत व इंग्रजांपासून आपणांस काय शिकावयाचें याची छाननी सूक्ष्म दृष्टीनें केली आहे. त्यांची दृष्टि अन्तर्मुख होती. आपल्या अधःपाताला कारण आपणच, असें ते स्पष्टपणें म्हणत. आपणांकडे विचारशक्तीचा, शास्त्रीय (विज्ञान) ज्ञानाचा व विद्यार्जनाचा किती अभाव आहे हें त्यांना तुलनात्मक निरीक्षणानें चांगलें कळलें होतें यांत शंका नाहीं. "जें जातें व्यासाचे वेळेस होतें तेंच आतां आहे.

---

* लोकहितवादीः **संकीर्ण निबंधसंग्रह** पृ. ७६०

† **कित्ता** पृ. ७६०–१

जो नांगर पांडवांचे राज्यांत होता तोच आतां आहे,"* ही गोष्ट लोकहितवादींना जाणवली. ब्राम्हणांचा काल आळशीपणांत जातो हें पाहून त्यांना उद्वेग वाटला. "भट लोक...यांचा कांहींच उपयोग नाहीं...भीक मागणें वेळ व्यर्थ घालविणें... परंतु ह्यांचा सन्मान ठेवणारे गृहस्थ आहेत. येणें करून द्रव्याचा व्यय होऊन विद्याशून्य लोकांचा प्रतिपाळ होतो आणि मूर्खपणा वाढतो."† यावर ते तोडगा काय सुचवितात पहाः—"या लोकांस कांहीं तरी काम शिकविलें तर बरें. ब्राम्हण लोक शिंपी वगैरे यांचा रोजगार करतील तर अब्रूनें पोट भरतील."†

आमचेकडील विद्वानांचें लक्ष वर्तमानपत्रांकडे वेधण्यासाठीं लोकहितवादींनीं मोठा समर्पक दृष्टान्त दिला. "आमचे मुखांतील ही लघु जिव्हा व आपलें (वर्तमान)पत्र ही बृहत्तर जिव्हा असें समजलें पाहिजे. कारण कीं त्याचे द्वारें दूरदेशीचें भाषण ऐकावयास येतें व प्रतिउत्तर देतां येतें. असें हें परस्परें मनांतील अन्वय कळविण्याचें साधन आहे."× लोकहितवादींची नजर चौफेर होती. त्यांनीं प्रत्येक विषयावर – तत्कालीं समाजापुढें असलेल्या प्रत्येक प्रश्नावर – आपलीं मतें देऊन यथामति उपाययोजनाही सुचविली आहे. बालविवाह, विधवाविवाह, जातिभेद, ब्राम्हणवर्चस्व, या बाबींचा वेगळा निर्देश करण्याची आवश्यकता नाहीं. पण 'एकत्र राहण्याची चाल,' 'संस्कृत विद्या' 'मद्यपान' 'वेळेचा व्यर्थ खर्च' 'स्वदेशी' अशा विविध विषयांवर त्यांनीं चर्चा केलेली आढळते.

त्या वेळच्या समाजांत वेडगळपणाच्या समजुती किती प्रबल होत्या हें लोकहितवादींनीं सांगितलें. ते म्हणतात, "कोणी म्हणतो पृथ्वी कमलपत्रासारखी आहे. कोणी म्हणतो यवन हे पूर्वीपासून आहेत. परंतु त्यांस कांहीं देश नाहीं; समुद्रांत कांहीं लहान जागा आहे तेथें त्यांचा वास आहे. पृथ्वीचा अंत हिमालयाजवळ आहे. व पृथ्वीभोंवतीं सात बेटें आहेत. समुद्र दह्याचे व दुधाचे आहेत." लोकहितवादींच्या वेळचे लोक असे होते. "वास्त-

---

* लोकहितवादीः शतपत्रें नं. १०१

† लोकहितवादीः "वेळेचा व्यर्थ खर्च"—प्रभाकर १२-११-१८४८

× लोकहितवादीः शतपत्रें नं. ७

ठीक राहिले तर राहिले जुने लोक आहेत ते मूढ बैल आहेत. त्यांस खाण्याचें व पिण्याचें मात्र ज्ञान आहे व ते जनावराप्रमाणें कर्मे करतात. परंतु माणसाप्रमाणें कांहीं करीत नाहींत. व त्यांस कांहीं ठाऊक नाहीं. ... इंग्रज कोठले हें कांहीं त्यांस ठाऊक नाहीं व इंग्रजांनीं आलीकडे ज्ञान किती वाढविलें आहे याची त्यांस खबर नाहीं. अजनम्यें इतक्यापर्यंत त्यांची समजूत आहे. आणखी कांहीं नाहीं.*" अशांना लोकहितवादी आतां सुखी होण्याचा मार्ग सांगतात :—" तेव्हां आपले लोकांस सुखी होण्याची युक्ति कोणती म्हणाल तर अशी आहे. या लोकांनीं विद्या व ज्ञान यांचें प्रामाण्य मानावें. व इंग्रजांप्रमाणें शहाणें व्हावें ... जेव्हां सर्व लोक पुढें सरावें अशी इच्छा करितील व रानटी-पणाच्या समजुती सोडून देतील तेव्हां अनुकूलता सहज होईल."† असा त्यांना ज्ञानार्जनाबद्दल आग्रह आहे. रानटीपणाच्या समजुतींवर तर त्यांना मोठा कटाक्ष दिसतो. समाजांतील स्त्रियांची असहायता, कित्येक जातींना जन्मामुळें प्राप्त झालेली अवनत स्थिति वगैरे गोष्टी त्यांना मुळींच आवडत नसत. स्त्रियांना पुरुषांसारखेच हक्क असावे, त्यांना शिक्षण मिळावें, आपलेपणीं लग्नें व्हावीं, विधवांना पुनर्विवाहाची मोकळीक असावी, इत्यादि मतें त्यांनीं निर्भीडपणें लोकांपुढें मांडलीं. एवढ्यावरच त्यांच्या विचारांची मजल थांबली नाहीं. ब्राह्मणांतीलच समाजदोष त्यांनीं विशेषेंकरून दाखविले, याचा अर्थ त्यांना व्यापक दृष्टि नव्हती असा नव्हे. स्वजातिहिताकडे त्यांचें लक्ष प्रथम गेलें असलें तरी ते तेथेंच अडकून राहिले नाहींत. जातिभेदाची अनिष्टता त्यांना कळून चुकली होती. पूर्वकालीं जातिभेद अथवा तत्सम समाजव्यवस्था कोणत्याहि हेतूनें केलेली (झालेली) असो, आतां तिची आवश्यकता उरली नाहीं; उलट, तिजमुळेंच पेशवाईचे अखेरीस वैमनस्य माजून एकंदर समाज विस्कळित झाला, असें लोकहितवादींचें म्हणणें होतें.‡

---

* लोकहितवादीः शतपत्रें नं. ३०

† किता नं. ४४

‡ किता नं. २३—चार वर्णांची सांप्रतची स्थिती.

## लोकहितवादीप्रणीत स्मृति

९. समाजांत रूढ असलेल्या रूढींना कितपत मानावें किंवा शास्त्राची कदर कोठपर्यंत बाळगावी, याबद्दल लोकहितवादींनीं बुद्धीवरच सर्व भिस्त ठेविली आहे. शास्त्र व रूढी यांचा झगडा पडला असतां किंवा रूढीलाच प्राधान्य द्यावें असा आग्रह झाला असतां '**बुद्धिरेव बलीयसी**' हाच त्यांचा उपदेश आहे. "शास्त्रास येकीकडे ठेवा, आपली बुध्धी चालवा. विचार करून पाहा,"* असें ते सांगतात. दुसरे एके ठिकाणीं त्यांनीं म्हटलें आहे कीं, "शास्त्र असो अथवा नसो. परंतु हित जाणून शास्त्र एकीकडे ठेऊन ही रूढी घालावी कितीएक रूढीनें शास्त्र रद्द होतें."† अशा प्रकारें बुद्धिवादी विचार लोकहितवादींनीं प्रगट केले असल्यानें ते विशेष महत्त्वाचे ठरतात.

१०. रूढी व धर्म यांचें अभंग साहचर्य जुळविल्यानें समाजांत एकसूत्रता राहिली नाहीं; किंबहुना एका जातीला दुसऱ्यास अवनतींत कायमचें डांबतां येऊं लागलें, ही परिस्थिति लोकहितवादींना स्पष्ट दिसली व ती नाहींशी करण्याची खटपट त्यांनीं आरंभिली. विशेष म्हणजे लोकांच्या धार्मिक भावनांत आमूलाग्र बदल घडवून आणावा अशा प्रकारचे क्रान्तिकारक विचार त्यांचे होते. कालस्थित्यनुसार शास्त्रवचनें बदलत आलीं आहेत आणि म्हणूनच सध्यांच्या बदललेल्या परिस्थितींत तीं बदललीं पाहिजेत, असें उघडपणें प्रतिपादण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. धर्मसुधारणेचीं म्हणून त्यांनीं कलमें सांगितलीं तीं अशीं:— 'प्रथम, सर्वांनीं ईश्वराचें भजन अन्तःकरणापासून करीत जावें. दुसरें, जसा आपला जीव तसा दुसऱ्याचा मानावा. तिसरें, मुंज, लग्न, प्रेतक्रिया हे तीन संस्कार ठेवून बाकीचे रद्द करावे. चवथें, जें कर्म करावयाचें, तें स्वभाषेंत अर्थ समजेल असें करावें. भजन पूजन संस्कार सर्व जांचे त्यांचे भाषेंत करावे...प्रत्येकास आपले विचाराप्रमाणें आचार करण्याची व बोलण्या लिहिण्याची मोकळीक असावी. त्यास प्रतिबंध असूं नये. पांचवें, स्त्रीपुरुषांचे अधिकार धर्मसंबंधीं कामांत व संसारांत एकसारखे असावे...सहावें, आचारापेक्षां नीति प्रमुख असावी. आचाराचें महत्त्व हल्लीं आहे तसें असूं नये...आठवें, मनुष्य-

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. ७०

† **कित्ता** नं. १०४

मात्रास तुच्छ मानूं नये. जाति अभिमान नसावा. सर्वांशीं सारखें दयापूर्वक वर्तावें. सर्वांचें कल्याण करावें. नववें, स्वदेशाची प्रीति, त्याचें कल्याण विशेषेंकरून मनांत वागवावें. दहावें, ज्यास जो पाहिजे तो त्यानें रोजगार करावा....बारावें, **सरकाराहून प्रजेचे अधिकार अधिक असावे म्हणजे जे जे... रयतेच्या हिताचे कायदे आहेत ते सरकाराशीं भांडून घेत जावें.** चवदावें, विद्यावृद्धीकरितां सर्वांनीं मेहनत करावी. दुःखिताला सुख, रोग्यास औषध, मूर्खास ज्ञान व दरिद्र्यास शक्त्यनुसार द्रव्य देण्यास अनमान करूं नये. पंधरावें, शेवटचें कलम असें आहे कीं,...विद्येमध्यें ज्या गोष्टी शक्य आहेत त्यांचा शोध करण्यास आळस करूं नये व सांपडतील त्या सर्व प्रसिद्ध कराव्या. विद्याज्ञान संपादन करण्यास सर्व सारखे अशी मोकळीक असावी. ”*

लोकहितवादीप्रणीत स्मृतींतील मानवी हक्कांची ही सनदच दिसते. तींत व्यावहारिकदृष्ट्या किती व्यापक व सुटसुटीत असा विश्वधर्म सांगितला आहे? एकेश्वरी मत, मूर्तिपूजेचा अभाव, प्रार्थनेचा सर्वांस अधिकार, देवाकडे जाण्यास मध्यस्त नको असल्याची ग्वाही, समता, स्वदेशप्रीतीची आवश्यकता... वगैरे सामाजिक बाबी लोकहितवादींच्या व्यापक विचारांची साक्ष देतातच; पण ‘ सरकारहून प्रजेचे अधिकार अधिक असावे ’ हा जन्मसिद्ध हक्क त्यांच्या राजकीय विचारांची कल्पना करून देण्यास पुरेसा आहे. विद्येंत शोध करण्याचा उपदेश व मिळविलेलें ज्ञान प्रसिद्ध करण्याचा आग्रह...ह्या एकूण एक गोष्टींत लोकहितवादींचा बुद्धिवादच अधिक दिसून येतो, व अशा प्रकारचा प्रयत्न त्यांनींच प्रथम केला म्हणून त्यांची योग्यता विशेष वाटते.

अस्पृश्यतेसंबंधीं म्हणजे अस्पृश्यतानिवारणाविषयींही त्यांचे विचार असेच प्रगतिपर आहेत. त्यांत सहानुभूतीचा ओलावा तर आहेच, पण शिवाय अस्पृश्यांवर होत असलेल्या अन्यायाची चीडही दिसते. “ ब्राह्मण महारांची निंदा करितात व त्यांस शिवत नाहींत व इंग्रजांजवळ प्रीतीनें बसतात हें पाहून मला आश्चर्य वाटतें. शास्त्राप्रमाणें पाहिले असतां महार जवळचे.”†

---

* लोकहितवादीः **शतपत्रें** नं. ६४

† **कित्ता**

अशाप्रकारचे विचार प्रकट करणारे लोकहितवादी विशेष लोकप्रिय कसे होतील ? अस्तु.

अनेकेश्वरपंथ त्यांना पसंत नसावा, एकेश्वरी पंथच त्यांना मनापासून आवडत असावा, असें म्हणतां येतें. कारण त्यांचा प्रार्थनासमाजाशीं थोडासा संबंध असून त्यांनीं पुढें आर्यसमाजी मतांचा स्वीकार केला. थिऑसफीच्या प्रमुख व्यवस्थापकाचें कामही त्यांकडे होते. " ईश्वराविषयीं ब्राम्हणांचें एक मत नाहीं. कोणी तीन ईश्वर म्हणतात,...कोणी वेदास ईश्वर म्हणतात;... पुराणें तर सर्वांस ईश्वर म्हणतात,...या प्रमाणें अनेक भेद आहेत. "* हे भेद त्यांना अर्थातच पसंत नाहींत. श्रीमद्दयानन्दसरस्वती यांचे ते चहाते असून, मुंबईच्या आर्यसमाजाचे ते ट्रस्टीही झाले होते. एकूण काय, प्रगतिपर अशा धर्मांचीही त्यांस मनापासून आवड होती.

११. लोकहितवादींच्या ह्या विचारांची तत्कालीन समाजानें उपेक्षा केली कीं काय हें सांगणें कठिण आहे. पण त्यांच्या लिखाणावर आक्षेप घेणारा " यथार्थवादी " ' ज्ञानप्रकाश ' मधून लोकहितवादींचें म्हणणें खोडून काढीत असे, यावरून त्यावेळीं हा चर्चेचा विषय होता असें मानतां येतें. मात्र पुढें विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं लोकहितवादींवर झोड उठविल्यामुळें त्यांचें नांव मागें पडलें असावें. चिपळूणकरांचा रोख पुष्कळदां व्यक्तीवर असल्यामुळें—निदान त्यांच्या लेखांतून तसा ध्वनि तत्कालीन समाजानें काढल्यामुळें—व विशेषतः कुचेष्टेनें प्रतिष्ठा वाढविण्याची रीत चिपळूणकरांनीं निबंधमालेंतून स्वीकारल्यानें, लोकहितवादींची अवहेलना करणें 'फॅशनेबल' ठरलें. आणि ' निबंधमालाकारवाक्य ' प्रमाण मानण्याचा प्रघात कांहीं वर्षें तरी रूढ झाला व लोकहितवादी एकदां मागें पडले ते कायमचेच. असो !

दुसऱ्याही एका कारणानें लोकहितवादींच्या विचारांची अवहेलना कां झाली असावी हें कळतें. समाजांतील अग्रगण्य अशा ब्राह्मणांवर त्यांनीं भरपूर टीका केली असल्यानें त्यांचेवर ब्राह्मणसमाजाचा रोष झाला असावा. तसेंच, अव्वल इंग्रजींत गोपाळराव देशमुखांचे वरील प्रकारचे विचार लोकांस आत्यंतिक वाटले.

---

* लोकहितवादीकृत **शतपत्रें** नं. ७२

आत्यंतिक विचारांचा नीटपणें विचार व्हावा कसा ? पण लोकांनीं त्या विचारांना किती महत्त्व दिलें यावर लोकहितवादींची थोरवी अवलंबून रहात नाहीं. त्यांची थोरवी अजमविण्यास त्यांच्या विचारांचें ऐतिहासिक महत्त्व जाणून घेतलें पाहिजे. लोकहितवादींचा निबंधसंग्रह किंवा त्यांचें इतर लिखाण याची छाननी केली तर त्यांत कांहीं ठराविक मतेंच पुनःपुन्हा मांडलेलीं आढळतील. सर्वजण एकाच ईश्वराचीं लेकरें आहेत; सर्वांना सारखें लेखावें—हें तत्त्व लोकहितवादींच्या शिकवणीचें सार म्हणून मांडतां येईल. स्त्रियांना पुरुषां-सारखे अधिकार असावे व त्यांना पुनर्विवाह, शिक्षण वगैरे बाबतींत स्वातंत्र्य मिळावें; जातीजातींतील विषमता नष्ट व्हावी व सर्व जातींना सारखें शिक्षण व सारखे अधिकार मिळावे; प्रजासत्ताक राज्यपद्धति अमलांत यावी व प्रजेचे हक्क सरकारच्या हक्कांहून अधिक असावे; धर्मप्रकरणीं बुद्धीला प्रामाण्य द्यावें व परिस्थित्यनुरूप शास्त्रें बदलावीं; एकेश्वरपंथ स्वीकारावा; आळशीपणा, अज्ञान व मूर्खपणा यांचा त्याग करून उद्योगप्रियता वाढवावी; शिक्षणप्रसार करावा; ऐदीपणा, चैन व परावलंबीपणा सोडावा; आर्थिक अनवस्थेंतून देशाची सुटका करण्यासाठीं स्वदेशी व बहिष्कार यांचा पुरस्कार करावा; यांत्रिक पद्धति स्वीकारून नवीन उत्पादन साधनांचा प्रसार करावा; एकत्र राहाण्याच्या पद्धतीचा त्याग करून विभक्त पद्धति स्वीकारावी; डामडौल टाकून साधेपणानें राहावें; प्रामाणिकपणा व सचोटी या गुणांचा संचय करावा आणि विशेषतः स्वदेशावर प्रेम करावें:—लोकहितवादींच्या मतांचा हा असा आराखडा बनतो. विविध स्वरूपाच्या या मतांतून एकच ओघ वहात असलेला मात्र स्पष्ट दिसेल. या ओघाचें स्वरूप आणि महत्त्व जाणण्यास दृष्टि थोडीशी व्यापक करून पाहिलें पाहिजे. पाश्चात्य देशांतील—विशेषतः इंग्लंड देशांतील—विचारप्रवाह व जीवनप्रवाह यांचा तुलनात्मक पद्धतीनें अभ्यास केला तर असें चटकन दिसून येईल कीं सरंजामशाही संपुष्टांत येऊन आधुनिक व्यापारी युगास प्रारंभ झाला, तेव्हांचा नवोदित व्यापारी व भांडवलवाला वर्ग जवळजवळ अशाच मतांचा पुरस्कार करीत असे; आणि हीं मतें एकाएकीं उजेडांत येऊन महत्त्वास चढण्यास कारणही तसेंच घडलें. या नवीन युगाची उभारणी स्पर्धेवर झाली. या स्पर्धेंत टिकून राहून पुढें यायला व्यक्तीच्या ठायीं उद्योगप्रियता, मित-

व्यय, साधेपणा आणि सचोटी इत्यादि गुण बाणणें आवश्यकच होतें. सरंजामशाहीच्या बजबजपुरींत या गुणांना विशेष महत्त्व असण्याचें कारण नव्हतें. पिढ्यान्‌पिढ्या कोठींत येऊन पडणाऱ्या खंडावर चैन करणाऱ्या सरदारांना या गुणांची गरज नव्हती. वेळ येईल तेव्हां लढाईवर जाऊन रणांगणावर पराक्रम गाजविण्याची तयारी असली म्हणजे झालें. पण नवोदित व्यापारीवर्गाला या गुणांची मातब्बरी विशेष वाटली. पाश्चात्य देशांतील प्युरिटन ( Puritan ) धर्मसंप्रदायाचीं मतें व वर्तणूक यांचा अभ्यास केल्यास, या म्हणण्याचा प्रत्यय येईल. १७ व्या शतकांतील व्यापारीवर्गाच्या आकांक्षा व दृष्टिकोन हा संप्रदाय व्यक्त करीत असे, असें ग्रीन आणि मेकॉले यांसारख्या जुनाट इतिहासकारांनींही कबूल केलें आहे.* ऐतिहासिक क्षितिजावर चमकूं लागणाऱ्या भांडवलवाल्या वर्गानें सरदारशाहीच्या चैनबाजीला व ऐदीपणाला मूठमाती दिली. पण या स्थित्यंतराचे परिणाम इतके साधे नव्हते. त्यामुळें लोकांचा आयुष्याकडे पाहाण्याचा एकंदर दृष्टिकोनच बदलला. सरंजामशाहींतील जात्यभिमान व वंशमाहात्म्य कमी होऊन व्यक्तिमाहात्म्य वाढलें. व्यक्तीला व्यक्ति या नात्यानें मानूं लागले. राजकारणांत लोकशाहीचा पुरस्कार होऊन राष्ट्राच्या राजकारणांत दरेक व्यक्तीला अधिकार असावा असें मत प्रस्थापित होऊं लागलें. धर्मप्रकरणीं धर्मगुरूंचें महत्त्व कमी होऊन प्रत्येक मनुष्यमात्रास प्रार्थनेचा अधिकार प्राप्त होऊं लागला. समाजाचे नीतिनियम अधिक कठोर होऊन कर्मठवृत्तीचा फैलाव झाला. इंग्रजांचे हे गुण लोकहितवादींनीं उचलले व आपलीं मतें त्यांच्या अनुरोधानें बनविलीं. स्वतःच्या दृष्टिकोनाला व्यक्तिवाद असें स्पष्ट नामाभिधान त्यांनीं दिलें नव्हतें, हें खरें, परंतु त्यांचीं सर्व मतें या वादाच्या चवकटींत बसतील.† सर्वजण ईश्वराचींच लेकरें आहेत; दरेक मनुष्यमात्राला सारखें

---

* "Puritanism was an influence which sought to idealise the (bourgeois) middle class conception of life"—Joseph Crouch. [ V. F. Calverton यांचें The Sex Expression in Literature या पुस्तकाचें २ रें प्रकरण पाहा. ]

† एकेश्वरी पंथाचा पुरस्कार व्यक्तिवादाच्या चवकटींत कसा काय बसतो, असा आक्षेप या विधानावर येणें संभवनीय आहे. पण तें सिद्ध करणें फारसें कठिण नाहीं.

वागवावें—हें त्यांच्या उपदेशाचें मुख्य सूत्र व्यक्तिवादाचें मूल तत्त्व म्हणून मानतां येणार नाहीं का ? त्यांच्या लहानथोर सर्वच विचारांवर व्यक्तिवादाची छाया पडली होती, हें एकादें उदाहरण सहज सिद्ध करील, लोकहितवादींना एकत्र राहाण्याची पद्धति बिलकूल पसंत नव्हती. विभक्त पद्धतीचा पुरस्कार त्यांनीं केला. ज्या मनुष्याचें व्यक्तित्व जागें झालें आहे, तो मनुष्य स्वतःच्या बऱ्यावाईट गुणांनींच जगाच्या बाजारांत वावरूं इच्छितो. आपल्या कुटुंबाच्या भल्याबुऱ्या परंपरेनें व जबाबदारीनें जखडून घ्यावयाची त्याची तयारी नसते. व्यक्तिवादी माणसाच्या याच आकांक्षा लोकहितवादींच्या विचारसरणीच्या मुळाशीं होत्या, असें म्हणावयास अडचण नाहीं. या व्यक्तिवादाचा स्पर्धाप्रिय व्यापाऱ्यांच्या दृष्टिकोनाशीं किती निकटचा संबंध आहे, तें लोकहितवादींनीं विभक्तपद्धतीची तरफदारी ज्याप्रकारें केली आहे, त्यावरून सहज दिसून येईल. स्वावलंबनावर त्यांनीं विशेष भर दिला. ते म्हणतात "उद्योगवृद्धि

---

मनुष्याच्या ईश्वरविषयक कल्पना इहलोकांतील ज्या समाजरचनेंत तो वावरतो त्या समाजरचनेवरूनच घेतलेल्या पुष्कळदां आढळतात. स्वर्गांतील देवदरबारचें उदाहरण हें विधान विशद करील. सरंजामशाहीच्या युगांत राजेरजवाड्यांचें व राजदरबारचें माहात्म्य विशेष असे. तत्कालीन ईश्वरविषयक कल्पनांवर या बाबीचा परिणाम झालेला स्पष्ट दिसतो. स्वर्गांतील इंद्राचा दरबार व त्याचें प्रधानमंडळ, या प्रकरणाचा उगम पृथ्वीवरील राजदरबारांतच असावा. अर्थात् ह्या अवनितलावरील दरबारांचें विसर्जन झाल्यानंतर स्वर्गांतील देवांच्या दरबारांनाही रजा मिळणें साहजिक ठरतें. आजच्या व्यक्तिवादी जगांत, स्वर्गांत प्रजासत्ताक राज्याची स्थापना होऊन, सर्व देवांना सारखें स्वातंत्र्य मिळणेंच अवश्य आहे. परंतु ही योजना देवाच्या दैवी सामर्थ्याशीं सुसंगत नाहीं. आजच्या स्पर्धायुगांत स्पर्धेच्या घोड्यावर स्वार होऊनच आयुष्याचा मार्ग कापणें हें मानवी प्राण्यांच्या बाबतींत यद्यपि सुसंगत असलें तथापि तें ईश्वराच्या सार्वभौमत्वाच्या आड येतें. अर्थात् सरंजामशाहींतील ईश्वरबाहुल्या-ऐवजीं आतां 'एकमेवाद्वितीयम्' अशा ईश्वराची योजना झाली. मात्र ही योजना या तर्कपद्धतींतील सर्व पदांचा पूर्ण विचार करून झाली, हें म्हणणें अर्थातच चूक आहे. समाजाच्या अनुद्बुद्ध मनाचेच खेळ आहेत हे. महाराष्ट्रांत यापुढें प्रार्थना-समाज, आर्यसमाज वगैरे एकेश्वरी पंथांचा जो प्रसार झाला तें ऐतिहासिकदृष्ट्या सुसंगत आहे—हें या विवेचनावरून ध्यानांत येईल.

होण्यास विभक्त राहाण्याची चाल चांगली."* उद्योगवृद्धि होण्यास व्यक्तिवादाचीच गरज होती; आणि विभक्त राहाणें हा केवळ त्याला धरून असलेला एक मार्ग. परंतु लोकहितवादींच्या व्यक्तिवादाचें स्वरूप स्पेन्सरच्या वादासारखें निष्ठुर मात्र कधींच झालें नाहीं. व्यक्तिवादामध्यें त्यांना डार्विनच्या 'जीवनकलहाचें' उदाहरण सांपडलें नाहीं. आणि म्हणूनच 'विभक्त असलें तरी बंधुकर्म सोडूं नये,' असा उपदेश त्यांनीं दिला. या व्यक्तिवादी दृष्टिकोनाचाच विकास महाराष्ट्रांत पुढें झाला. न्या० रानडे यांनींही विभक्त पद्धतीचाच पुरस्कार केला; त्यांनींही 'अविभक्त कुटुंबपद्धतीनें निरुद्योगीपणा व आळस वाढतो,'† असाच युक्तिवाद केला; आणि आपल्या नेहमींच्या पद्धतीनें स्वमतसमर्थनार्थ शास्त्राधार काढून दाखविला. परंतु या प्रश्नाचें बुद्धिप्रामाण्यवादी विवेचन पुढें आगरकरांनींच केलें.+ असो. लोकहितवादींच्या मतांचें हें तात्त्विक स्वरूप पाहिलें कीं, त्यांच्या मतांचें ऐतिहासिक महत्त्व प्रत्ययास येतें. इतकेंच नव्हे, तर त्यांच्या विचारांची तत्कालीन महाराष्ट्रानें अवहेलना कां केली तेंही कळतें. ज्या संस्कृतीमुळें पाश्चात्यांच्या अंगीं लोकहितवादींनीं पुरस्कृत केलेले गुण बाणले होते ती संस्कृति प्राप्त करून घेण्यास महाराष्ट्राला कांहीं दिवस वाट पाहाणें जरूर होतें. लोकहितवादींनीं ते गुण उचलले, हा त्यांच्या वैयक्तिक कर्तृत्वाचा भाग. ते वेळचा समाज त्यांची बरोबरी करण्यास असमर्थ होता. त्यांची अवहेलना करण्याचाच मार्ग त्यानें स्वीकारला.

---

* लोकहितवादी: **शतपत्रें** नं. ७

† न. र. फाटक: **रानडेचरित्र** पृ. ३७२

\+ **केसरींतील निवडक निबंध** भाग १ ला

# ८ जोतीबा फुले

| | |
|---|---|
| १ खरा समाजसेवक | २ ब्राम्हणांवरील हल्ल्याचें स्वरूप |
| ३ अभ्यासू वृत्तीचा अभाव | ४ दलित वर्गांची तरफदारी |
| ५ इंग्रज प्रभूंची प्रार्थना | ६ फुल्यांचें ऐतिहासिक महत्त्व |

१. लोकहितवादींचे वेळीं ब्राम्हण-विरोधी विचार समाजांत सर्वत्रच खोलवर पसरलेले दिसतात. कारण ब्राम्हणांवर संघटित हल्ला करण्यासाठीं ब्राम्हणेतरांचा संघ स्थापन करणारा सामाजिक कार्यकर्ता लोकहितवादींहून फक्त चार वर्षांनीं लहान होता. पेशव्यांचे वाड्यांत फुलें देण्याचें काम करणाऱ्या 'फुले' घराण्यांत जोतीबा १८२८ सालीं जन्मले. त्यांना अध्ययनासाठीं फार त्रास पडला व ब्राह्मणेतर म्हणूनच कांहीं ठिकाणीं त्यांचा उपमर्द देखील झाला. वयाचे सातवे वर्षीं ब्राह्मण कारकुनाच्या कारवाईमुळें त्यांचें शिक्षण बंद पडलें. पुढें मे. लिजिट साहेबांच्या प्रयत्नानें वयाच्या पंधरावे वर्षीं जोतीबा पुन्हा शाळेंत गेले. तेथें मनोभावें अभ्यास करून त्यांनीं विद्या प्राप्त करून घेतली. तरीही ब्राह्मणांकडून त्यांचा अपमान व्हायचें थांबलें नाहीं. एकदां एका ब्राह्मण-मित्राच्या विवाहप्रसंगीं नवरदेवाच्या स्वारींत सामील झाल्याबद्दल त्यांचा उपमर्द

झाला. ब्राह्मण श्रेष्ठ आहेत, या लोकींचे ते देव आहेत, असें समाधान करून घेणें त्यांना अर्थातच शक्य नव्हतें. प्रो० विल्सन, सर वुइल्यम जोन्स वगैरे मिशनरी विद्वानांनीं लिहिलेले हिंदुधर्माविषयींचे लेख वाचून ब्राह्मणांच्या श्रेष्ठत्वाची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न त्यांनीं केला, व त्यामुळें ब्राह्मणांबद्दल तिरस्कार उत्पन्न होऊन त्यांना हिंदुधर्माकडे ख्रिस्ती चष्म्यांतून पहाण्याची संवय जडली. पुढें मिशनऱ्यांशीं अधिक निकटचा संबंध आल्यामुळें त्यांस ख्रिस्ती-धर्माची व मिशनऱ्यांच्या स्वार्थत्यागाची आणि भूतदयेची बरीच कल्पना आली, आणि ते मिशनरीमंडळीचे चहाते बनले.

हिंदुसमाजांत उपेक्षा व उपमर्द होत असतां आपल्या कार्याबद्दल व मतांबद्दल सहानुभूति दाखविणाऱ्या मिशनऱ्यांबद्दल जोतीबांना आदर वाटला तर तो त्यांचा दोष कसा ? हिंदु समाजांतील अमानुष चालीरीतींचा त्यांना जो वीट आला तो मिशनरीसहवासामुळेंच. समाजसेवेचें ध्येयही त्यांना आकाशस्थ बापाच्या अनुयायांकडूनच मिळालें असावें. आपलें शिक्षण संपतांच त्यांनीं वयाच्या २१ वे वर्षीं ( १८४८ ) मुलींसाठीं पुण्यांत शाळा सुरू केली. अशा प्रकारची सुधारणा करतांना फुले यांस फार हाल सोसावे लागले. अध्यापिका म्हणून त्यांनीं आपल्या पत्नीची मदत या शाळेसाठीं घेतली. आणि **लोकांनीं जातां येतां खडे मारले तरी** त्या माउलीनें आपल्या कार्यांत खंड पडू दिला नाहीं. असल्या सुधारकी चाळ्यांबद्दल जोतीबांस घरास पारखें व्हावें लागलें. कारण वडिलांच्या दृष्टीला हे नवे चाळे खपेनात.

फुल्यांच्या कामगिरीचें चीज मिशनऱ्यांनीं व सरकारनें मात्र केलें. आणि १८५२ मध्यें सर आर्स्किन पेरी यांच्या प्रयत्नानें जोतीबांना एक शालजोडी व दोनशें रुपये बक्षिस मिळाले. अशा प्रकारें सरकारबद्दल त्यांचे मनांत चांगला ग्रह उत्पन्न झाला. फुल्यांनीं महारमांगांकरितां एक शाळा चालविली (१८५४); विधवांची असहाय स्थिति व त्यांचें नीरस जिणें लक्षांत घेऊन 'बालहत्या-प्रतिबंधक गृहा'सारखी घरगुती संस्था त्यांनीं काढली (१८६३); आपल्या घरांत गुप्तपणें प्रसूतीसाठीं येऊन मूल तेथेंच ठेवून जावें, अशी पतितांसाठीं सोय

त्यांनीं केली;* व विधवाविवाहाची तरफदारी करून पुण्यास शेणवी जातींतील पहिला पुनर्विवाह घडवून आणला (१८६४). या त्यांच्या कामगिरीवरून त्यांचें धैर्य तर दिसतेंच, पण समाजाच्या हितासाठीं झटण्याचा कष्टाळू स्वभाव व सहृदय अन्तःकरण यांचीही साक्ष पटते.

२. परंतु फुल्यांची कामगिरी एवढ्यावरच थांबली नाहीं. किंबहुना त्यांच्या आयुष्याचें मुख्य कार्य वेगळेंच होतें असें म्हणतां येतें. 'सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक' व 'गुलामगिरी' ह्या दोन पुस्तकांमध्यें त्यांच्या मुख्य कार्याचा समावेश झालेला दिसेल. ब्राम्हणांवर हल्ला हें त्या पुस्तकांचें व जोतीबा यांच्या कामगिरीचेंही थोडक्यांत पण यथार्थ वर्णन होईल. मात्र नुसता हल्ला करूनच ते थांबले नाहींत. तर त्या हल्ल्यास संघटित स्वरूप आणण्यासाठीं त्यांनीं 'सत्यशोधक समाज' स्थापन केला; व त्या समाजाचें कार्य सर्वांना समजावें म्हणून 'दीनबंधु' नामक वर्तमानपत्रही काढलें. ह्या त्यांच्या कार्याचें भावि स्वरूप पुढील इतिहासांत आपणांस दिसेलच. तूर्त त्यांचा मूल हेतु व प्राथमिक प्रयत्न एवढ्यांचेंच निरीक्षण करावें लागेल.

ब्राम्हणांवर लोकहितवादींनींही टीका केली. आणखीही कित्येक इतिहासाभ्यासूंनीं ब्राम्हणांचा दोषी स्वभाव स्पष्टपणें वर्णिला आहे. परंतु फुले यांच्या ब्राम्हणांवरील हल्ल्यांत वेगळाच प्रकार आढळतो. त्यांनीं वेदकालापासून हिंदुस्थानचा इतिहास साक्षात्कार झाल्याप्रमाणें नव्या सिद्धान्तानुसार बनविला. अर्थातच ह्या सिद्धान्तांना फुले यांच्या म्हणण्याखेरीज दुसरा फारसा आधार नाहीं. स्वतःचें डोकें चालवून (किंवा दुसऱ्या कोणा संशोधकाचे ग्रंथ वाचून ?) ब्राम्हणांच्या वर्चस्वाची त्यांनीं जी कुळकथा सांगितली आहे तीवर अंधभक्तांचाच फक्त विश्वास बसेल. ब्राह्मण धर्मगुरूंनीं स्वार्थी हेतूंनीं प्रेरित

* हें बालहत्याप्रतिबंधकगृह पाहून रा. ब. महादेव गोविंद रानडे व लालशंकर उमियाशंकर यांस त्याची आवश्यकता दिसून आली व त्यांनीं पंढरपूर येथील सुप्रसिद्ध 'अनाथ बालकाश्रम' सुरू केलें (१८७८). त्याच सुमारास लोकहितवादींनीं नाशिक मुक्कामीं तसेंच एक गृह काढण्याची योजना केली होती. त्यांनाही फुल्यांकडूनच प्रेरणा झाली असावी, असें मानण्यास प्रत्यवाय नाहीं.

होऊन आपलें वर्चस्व समाजांत केवळ धर्माज्ञा अथवा ईश्वराज्ञा म्हणून मिरविण्याचा प्रयत्न केला, हें जरी खरें दिसलें, तरी फुले यांच्या सिद्धान्तांना होकार देतांना विचारशक्ति गुंडाळून ठेवावी लागेल. ब्राम्हण आपलें श्रेष्ठत्व श्रुति-स्मृति-पुराणांच्या जोरावर प्रस्थापित करूं शकतात, ते ग्रंथच मूळांत असत्यवादी व लबाडीचे आहेत, असें दाखविण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. " भटांच्या मूळ ( इराणी ) पूर्वजांनीं ( मत्स्य, कच्छ, वराह वगैरे ब्राह्मण मंडळींनीं ) या देशांत मोठा बंडावा करून येथील आमच्या क्षेत्रवासी पूर्वजांस युद्धांत जिंकून त्यांस आपले दास केलें. व पुढें जसजशी संधी सांपडत गेली, तसतशी भटांनीं आपल्या सत्तेच्या मदानें अनेक तऱ्हतऱ्हेचे मतलबी ग्रंथ करून त्या सर्वांचा एक मजबुती कोट बांधून त्यामध्यें सर्व दासांस वंशपरंपरेनें अटकावून तेथें त्यांस नाना तऱ्हेच्या पीडा देऊन हा काळ पावेतों मोठ्या मौजा मारीत आहेत."*

३. ब्राम्हणांच्या कपटविद्येवर जोतीबांचा कटाक्ष फार दिसतो. पण त्यांत समाजांतील विकासाचा शास्त्रशुद्ध अभ्यास मात्र आढळत नाहीं. अभ्यासू वृत्ति ह्यांत दृष्टीस पडते अशांतलाही कांहीं प्रकार नाहीं. जुने ग्रंथ, ते ब्राह्मण-लिखित आहेत एवढ्याच समजुतीवर किंवा त्यांत ब्राम्हणांचा पक्षपात केला आहे म्हणूनच सर्वस्वीं त्याज्य, असा फुले यांच्या प्रतिपादनाचा रोख दिसतो. उदाहरणार्थ, " ब्राम्हण ग्रंथकारांनीं अनेक स्मृत्या, संहिता, शास्त्रें, पुराणें, वगैरे भारेचे भारे **नवीन ग्रंथ** बनवून त्या सर्वांत शूद्रांवर ब्राम्हण लोकांचें वर्चस्व स्थापून त्यांनीं आपल्या वडिलोपार्जित शिपाईगिरीच्या मार्गांत काठी ठोकून राहाणें हा मोठा धार्मिकपणा आहे असा डौल घातला. " आणि " हें सर्व ब्रह्मकपट पुढें कधीं शूद्रांच्या ध्यानांत येऊं नये याकरितां, अथवा त्या ग्रंथांत पाहिजे तसे फेरफार पुढें करितां यावेत म्हणून, शूद्र वगैरे पाताळीं घातलेल्या लोकांस मुळींच **कोणी ज्ञान देऊं नये** असे फारच मजबूत लेख मनुसंहिते-सारख्या अपवित्र ग्रंथांत करून ठेविले आहेत."†

---

* फुलेः **गुलामगिरी** ( अनावृत्तपत्र ) पृ० १७५

† **कित्ता** पृ. १२४—१२५

स्वतंत्र अभ्यासांतीं ब्राह्मण-वर्चस्वाची चिकित्सा जोतीबांनीं केली असती तर तिची महति खात्रीनें अधिक ठरली असती. अर्थात् जोतीबांचे वेळीं समाजशास्त्राचा अभ्यास किती बाल्यावस्थेंत होता, हिंदु संस्कृतीच्या ऐतिहासिक विकासाचें परिशीलन करणें तेव्हां किती कठीण होतें, हें लक्षांत घेतलें म्हणजे जोतीबांच्या तर्कदुष्टतेचा विषाद वाटेनासा होतो. इतकेंच नव्हे, तर आहे या परिस्थितींत चुकीच्या कल्पनावर कां होईना, पण दलित वर्गाचें गाऱ्हाणें वेशीवर टांगण्याचें महत्त्वाचें कार्य जोतीबांनीं स्वयंसेवक वृत्तीनें स्वीकारलें व एका मोठ्या पंथाची स्थापना केली यामुळें त्यांचें श्रेष्ठत्व सहज पटतें. मात्र दलित वर्गाच्या सामाजिक अवनतीची त्यांना चीड आली असली तरी त्याच्या राजकीय दारिद्र्याची उमज त्यांना पडलेली दिसत नाहीं. राजकीय दृष्ट्या त्यांचे विचार किती आकुंचित वातावरणांत वावरत असत याचें प्रत्यंतर खालील उताऱ्यांत स्पष्ट होईल.

"निर्माणकर्त्यानें इंग्लिश लोकांस...पंगु शूद्रादि अतिशूद्रांस धूर्त आर्य अशांच्या दास्यत्वापासून मुक्त करण्याकरितां या देशांत मुद्दाम पाठविलें आहे. त्यांपैकीं कांहीं सज्जन इंग्रज लोक त्यांच्या धर्मांतील एका सत्पुरुषाच्या शब्दोघावरून शूद्रादिअतिशूद्रांस आर्य भट्टांच्या कृत्रिम दास्यापासून मुक्त करण्याचे मनःपूर्वक सतत उद्योग करीत आहेत."*

५. स्वकीय ब्राह्मणांच्या वर्चस्वांतून निघून परकीय व परदेशस्थ इंग्रजांच्या दास्यांत आपण डांबले जात आहोंत याची शुद्ध जोतीबांस नसावी हें महदाश्चर्यच म्हटलें पाहिजे. इंग्रज हिंदुस्थानांत आले ही तत्कालीन बहुतेक विचारवन्तांना 'ईश्वरी योजना' वाटली, तरी आपण जित आहोंत व जेत्यांच्या पंखाखालून आज ना उद्यां केव्हां तरी आपणांस निघावयाचें आहे, अशी त्या सर्वांना जाणीव होती. परंतु फुल्यांना मात्र तसें वाटत नव्हतें. उलट इंग्रजांनीं हिंदुस्थानांतच-महाराष्ट्रांतच-कायम रहावें अशी मागणी जोतीबांनीं, गुडघे टेकून, इंग्रज प्रभूंकडे केली आहे. ते म्हणतात, "ज्या ज्या युरोपिअन कलेक्टरास महाराष्ट्र भाषा स्वच्छ बोलतां येत असेल, त्यास तहाहयात भर पेन्शनी देऊन

*फुलेः **सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक** (पृ. ३६)

येथेंच खेड्यापाड्यांतून अज्ञानी भेकड बाहुल्यासारख्या शूद्रांत मिसळून ते रहातील असें करावें. व त्यांजकडून भट, कुळकर्णी वगैरे कामगारांच्या कसबांवर चांगली नजर ठेवावी.''*

एवढ्यानेंच जोतीबांचें समाधान होत नाहीं. सरकारला 'शुद्धीवर' आणण्यासाठीं त्यांनीं खटपट केली आणि म्हटलें, "आतां तरी आमच्या सरकारनें शुद्धीवर येऊन प्रत्येक खेड्यास **निदान एक तरी इंग्लिश अथवा स्कॉच गृहस्थाच्या निर्वाहापुरतीं गतकुळी शेतें इनाम देऊन, त्यावर उपदेशकाचें काम सोंपवून** त्यांनीं त्या त्या गांवच्या सर्व कच्च्या हकीकतीविषयीं वर्षांतून निदान एक तरी रिपोर्ट सरकारास करीत जावा, असा कायदा करून बंदोबस्त करावा.''† म्हणजे संस्थापक जोतीबांना राजकीय धोरण अथवा पोंच यांची तोंडओळखही नव्हती, एवढेंच नव्हे तर त्यांना मिशनऱ्यांचा साधा उघड कावा देखील दिसत नव्हता. कदाचित् हिंदु ब्राम्हणांच्या कचाटींतून निघून ख्रिस्ती पाद्र्यांच्या वर्चस्वाखालीं नांदण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असावी! नाहीं तर खेडोपाडीं वतनदार ख्रिस्ती उपदेशक कायद्यानें कायम करण्याचा फुल्यांचा आग्रह कशासाठीं असावा? राजकीय विचारांचें वावडें आज समाजोपयोगी संस्थांना धोरण म्हणून कित्येक वेळां स्वीकारावें लागतें. तसा प्रकार अव्वल इंग्रजींत नसतांही 'सत्यशोधक समाज' स्थापन करण्याचा उद्देश सांगतांना, "या समाजांत राजकीय विषयावर बोलणें अजी वर्ज्य आहे" असा कडक निर्बंध फुले यांनीं कां घालावा तें समजत नाहीं. एक तर, त्यांना राजकारणाचें गम्य नसावें अथवा दुसरें म्हणजे कोणा तरी आंग्लहितैषी मिशनऱ्यानें समाजाच्या उद्देशांचा खर्डा जोतीबांसाठीं तयार केला असावा. परंतु राजकारण कळत नाहीं, असें म्हटल्यास त्या काळीं राजकीय विषयावर बोलणें वर्ज्य करण्याचें फर्मान काढण्यास तरी कसें सुचलें, हा प्रश्न उद्भवतोच; म्हणून दुसरा तर्क अधिक संभवनीय वाटतो. मात्र त्यामुळें कांहीं बिघडलें असें नव्हे. जोतीबांची कामगिरी त्यांना राजकीय पोंचपाच नसला तरी,

* फुलेः **गुलामगिरी** पृ. १५३

† **कित्ता** पृ. १३९—१४०

किंवा घरचें भांडण मिटविण्यासाठीं दूरदेशस्थ अशा तिसऱ्यांचें बूड स्थिरावण्यास त्यांनीं मदत करण्याची तयारी दर्शविली असली तरी, कमी दर्जाची ठरत नाहीं. तिचा रोख वेगळ्या व अनिष्ट भूमिकेवरून होता इतकेंच.

फुल्यांचें मुख्य कार्य म्हणजे ब्राह्मणाविरहित इतर सर्व समाजांत जागृति करून आपणांस गांजणाऱ्या उच्च ब्राह्मणवर्गाविरुद्ध संघटित प्रतिकार करण्याचें शिक्षण त्यांनीं अडाणी अशा बहुजनसमाजास दिलें. केवळ अडाणी व मागासलेले म्हणून ज्यांची उपेक्षा ब्राह्मण करीत, त्यांचाच कैवार जोतीबांनीं आपण होऊन घेतला. आज सर्वत्र जागृति झालेली असतां, सर्व समाज आपापल्यापरी संघटित झाले असतां, त्यांचा पुढाकार घेणें व एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या पंचविशींत ब्राह्मणांना विरोध करून, त्यांचा रोष पत्करून, दलित वर्गाला जवळ करणें किंवा त्याच्या हक्कांची तरफदारी करणें, यांत पुष्कळच अंतर आहे. म्हणून जोतीबांची योग्यता थोर ठरते. त्यांनीं सत्यसमाजाची स्थापना करून ब्राह्मणेतर चळवळीचा पाया महाराष्ट्रांत घातला. "ब्राह्मण, भट, जोशी, उपाध्ये इत्यादि लोकांच्या दास्यत्वापासून शूद्र लोकांस मुक्त करण्याकरतां व आपल्या मतलबी ग्रंथांच्या आधारें आज हजारों वर्षें ते शूद्र लोकांस नीच मानून गफलतीनें लुटीत आहेत, यास्तव सदुपदेश व विद्याद्वारें त्यांस त्यांचे वास्तविक अधिकार समजून देण्याकरितां म्हणजे धर्म व व्यवहारासंबंधीं ब्राह्मणांचे बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून त्यांस मुक्त करण्याकरितां कांहीं सूज्ञ शूद्र मंडळींनीं हा समाज ता. २४ माहे सप्टेंबर सन १८७३ इसवी रोजीं स्थापन केला."* या एका उताऱ्यांत जोतीबांच्या विचारांचें व कार्याचें सार सांपडतें.

जोतीबांच्या विविध गुणांचें व त्यांच्या कर्तबगारीचें स्वरूप पाहिल्यानंतर, आतां ती पार पाडतांना त्यांनीं दर्शविलेल्या वैशिष्ट्याचें वर्णन केलें पाहिजे. सर्व सुशिक्षित समाज विरुद्ध असतां एका नव्या उपक्रमास हात घालण्यास लागणारें धारिष्ट व तो उपक्रम यशस्वी करण्यासाठीं लागणारी चिकाटी तर जोतीबांचे अंगीं होतीच. पण स्वप्राणापेक्षां प्यार अशा धार्मिक कल्पनांचें उच्चाटन करण्यासाठीं आवश्यक असणारी स्पष्टोक्ति व बेडरपणा

---

* **सत्यशोधक समाजाचा रिपोर्ट**, १८७६ ( पहिलीं तीन वर्षें )

फुल्यांनीं वेळोवेळीं दर्शविला आहे. पण यांतही त्यांचा ब्रम्हद्वेष स्पष्ट दिसतो. "कारण आपणा सर्वांना महापवित्र निर्माणकर्ता आर्य ब्राह्मणांच्या कल्पित काळ्या कृष्णासारखा दुधादुधाच्या चोऱ्यामाऱ्या करून सोळा सहस्र एकशत अष्ट नारींसह गवळ्याच्या भळकेच्या गधिनरोवर लंपट होऊन त्यांच्या उशापायथ्याशीं लोळत पडणारा नव्हे." * हे विचार यद्यपि मिशनऱ्यांकडून उसनवार आणलेले भासत असले तरी ते उघडपणें बोलून दाखविण्यांत फुल्यांचा वेडरपणा व्यक्त होतो.

९. जोतीबांचे विचार समजावून घेतल्यानंतर त्यांचें ऐतिहासिक महत्त्व सांगितलें पाहिजे. लहानपणापासून ब्राह्मणांच्या हातून उपमर्द व गांजणूक झाल्यामुळें फुल्यांच्या ठिकाणीं ब्रह्मद्वेष निर्माण झाला. ब्राह्मणांच्या वर्चस्वाची उपपत्ति लावण्यासाठीं त्यांनीं मिशनऱ्यांनीं हिंदुधर्मावरील भाष्यें वाचलीं व अर्थातच ब्राह्मणांचें वर्चस्व ईशप्रणीत नाहीं, मनुष्यप्रणीतच आहे, अशी त्यांनीं खात्री झाली. पण एवढ्यावरच त्यांचें समाधान झालें नाहीं. ब्राह्मण लोक हे मूळचे या देशांतले नव्हतच; ते परकीय; त्यांनीं आमच्या एतद्देशीय पूर्वजांना जिंकून आपलें जुलमाचें व लबाडीचें राज्य निर्माण केलें, असा सिद्धान्त त्यांनीं बांधला. अर्थात् जातिद्वेषाला वर्णद्वेषाची जोड मिळाली. ब्राह्मण हे वेगळ्या जातीचे आहेत एवढेंच नव्हे तर निराळ्या वर्णा ( race ) चे व निराळ्या देशाचे आहेत, असें समजल्यावर ब्राह्मणेतरांचा ब्राह्मणांबद्दल वाटत असलेला तिरस्कार वृद्धिंगत होणार नाहीं का? ब्राह्मणांच्या वर्चस्वा-बद्दल दलित वर्गांच्या मनांत चीड उत्पन्न करणें हें जोतीबांचें ध्येयच होतें. अर्थात् त्यासाठीं देश–वर्ण–भेदाचा मुद्दा त्यांनीं प्रामुख्यानें पुढें मांडला तें साहजिकच झालें. परंतु अशा विदेशी व विवर्णी 'भटांच्या कायिक दास्या' पासून मुक्त केल्याबद्दल ज्या इंग्रजांचे फुले मनापासून उपकार मानतात व जे ( इंग्रज ) सदैव येथेंच राहावे अशी त्यांनीं जगन्नियंत्याला मनोभावें प्रार्थना केली ते इंग्रज तरी हिंदूंच्या जातीचे व देशाचे कोठें आहेत? स्वतःच्या

* **सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक** पृ. ३९. जोतीबांचे चरित्रकार श्री. पाटील 'म. फुल्यांचीं तत्त्वें हीं भगवान् श्रीकृष्णाचीं व म. बुद्धांचीं तत्त्वें आहेत,' असें म्हणतात (पृ. १७२), तें जोतीबांचे स्वर्गस्थ आत्म्यास कितपत पटत असेल तें असो!

तर्कपद्धतींतील ही चूक फुल्यांच्या ध्यानांत आली नाहीं; इतके ते ब्रह्मद्वेषानें अंध झाले होते.

असें असलें तरी जोतीबांच्या विचारांचें ऐतिहासिक महत्त्व मुळींच कमी होत नाहीं. लोकहितवादींनीं व्यक्तिवादाची विचारसरणी महाराष्ट्रापुढें मांडली, तशीच ती फुल्यांनीं थोड्याशा वेगळ्या पद्धतीनें मांडली. सर्वजण एकाच परमेश्वराचीं लेंकरें आहेत; मग एका जातींतील व्यक्ति दुसऱ्या जातींतील व्यक्तीपेक्षां श्रेष्ठ कां, असा सरळ सवाल जोतीबांनीं केला. असाच सवाल लोकहितवादींनीं केला होता. परंतु ब्राह्मणांचें वर्चस्व हाणून पाडून समतेचें साम्राज्य स्थापण्याचे जोतीबांचे मार्ग निराळे होते व त्यांतच त्यांच्या कार्याचें महत्त्व आहे. दलितवर्गाकरितां किंवा कोणत्याही एका विशिष्ट जनसमूहाकरितां स्वतंत्र चळवळ करण्याची कल्पना महाराष्ट्राला त्यांनींच प्रथम दिली. त्यांचा रोख ब्राह्मणांवर होता. अर्थात् सर्व ब्राह्मणेतरांस ते सारखे मानीत असत. त्यांची ही समताबुद्धि इतकी तीव्र होती कीं, स्वतः माळी कुळांत जन्माला येऊनही 'महार मांगाचे व आपले पूर्वज एकच,'* असें सांगण्यास त्यांना बिलकूल दिक्कत वाटली नाहीं. हिंदुस्थानच्या गरीब जनतेबद्दल त्यांना किती आस्था वाटे याविषयीं एक हकीकत आहे. ड्यूक ऑफ यॉर्कनें हिंदुस्थानला भेट दिली, त्यावेळीं पुणें येथें एक समारंभ झाला. जोतीबा त्या समारंभाला एक साधा पंचा व एक घोंगडी या वेषांत हजर राहिले, व हिंदुस्थानचा शेतकरी हा असा ( दरिद्री ) आहे, असें ड्यूक साहेबांस प्रतीकात्मक पद्धतीनें सांगितलें. दरिद्री नारायणाची अशी सेवा करणारा हा समाजसेवक १९ व्या शतकांत अवतीर्ण झालेला महात्मा गांधींचा पूर्वावतार नव्हे काय ?

यद्यपि फुले जातिद्वेषानें पेटले होते तरी त्यांची समाजसेवेची बुद्धि इतकी शुद्ध होती कीं, ती पार पाडतांना ते ब्राह्मण—ब्राह्मणेतर हा भेद सहज विसरत. त्यांनीं अतिशूद्रांकरितां वेगळी शाळा काढली होती तरी त्यांच्या मुलींच्या शाळेंत किंवा बालहत्याप्रतिबंधकगृहांत ब्राह्मणांस मज्जाव नव्हता. ज्या पुनर्विवाहाच्या प्रश्नांकरितां त्यांनीं इतकी झीज सोसली, तो प्रश्नही ब्राह्मणादि उच्च जातींचाच होता. असें असतां 'ब्राह्मणांना शिव्या देण्यापलीकडे फुल्यांस

* फुलेः **गुलामगिरी** पृ० ६९

दुसरें कांहीं सुचत नाहीं' अशी त्यांची हेटाळणी त्यांच्या वेळीं झाली न अजूनही कोठेंकोठें होत असते, तें कितपत योग्य आहे? बरें, वर्गभेदावर अधिष्ठित असलेली त्यांची चळवळ समाजाला हानिकारक आहे असा स्पष्ट निर्वाळा इतिहासानें अजून कोठें दिला आहे? फुल्यांच्या विचारसरणीला शास्त्रशुद्ध स्वरूप नव्हतें; ब्राह्मणांच्या वर्चस्वाचें खरें ऐतिहासिक स्वरूप त्यांना कळलेंच नाहीं; कपोलकल्पित सिद्धान्तांवर त्यांनीं आपल्या चळवळीचा पाया घातला, हें सर्व खरें असलें तरी त्यांनीं दिलेली विशिष्ट वर्गाकरितां स्वतंत्र चळवळीची कल्पना, ऐतिहासिकदृष्ट्या पाहतां, विशेष महत्त्वाची ठरत नाहीं का? दलित वर्गांच्या उन्नतीची त्यांना तळमळ लागली होती. परकियांच्या आक्रमणामुळें हा वर्ग अवनतीच्या खोल दरींत अधिकाधिक रुतत आहे हें त्यांच्या बुद्धीच्या कक्षेंत आलें नाहीं, म्हणून कांहीं त्यांच्या कार्याचें महत्त्व कमी होत नाहीं. फुल्यांचा अभ्यास करतांना चिपळूणकरांच्या कार्याचा विचार करणें उद्बोधक ठरेल. चिपळूणकरांना ब्राह्मणी संस्कृतीचा मनस्वी अभिमान. त्या संस्कृतीच्या होमकुंडांत देशांतील बहुजनसमाजाची राखरांगोळी होत आहे, हें त्यांना दिसत नव्हतें. पण स्वदेशाभिमानाची ध्वजा फडकावल्यामुळें त्यांच्या कार्याचें महत्त्व सिद्ध झालेंच कीं नाहीं? चिपळूण-करांची विचारसरणी तरी शास्त्रशुद्ध कुठें होती? तो काळ शास्त्रशुद्ध मीमांसक वृत्तींचा नव्हताच. चिपळूणकर आणि फुले दोघेही विचारवन्त स्वयंस्फूर्तीनें कार्यप्रवण झाले होते. फुल्यांचें दलितवर्गप्रेम आणि चिपळूणकरांचा स्वदेशा-भिमान अशा त्या वेळच्या अगदीं परस्परविरोधी प्रवृत्तींचा समन्वय करून मार्ग आंखला तरच आपल्याला गति आहे, हें स्पष्ट दिसत नाहीं काय? अर्थात् दलितवर्गांबद्दल फुल्यांना वाटत असलेल्या आस्थेचें आजचें स्वरूप अगदींच वेगळें ठरेल. जातिनिष्ठेचें संकुचित स्वरूप टाकून आर्थिक समतेवर अधिष्ठित अशा समाजसत्तावादाचें स्वरूपही तिला कदाचित प्राप्त होईल. चिपळूणकरांच्या स्वदेशाभिमानालाही अगदीं व्यापक स्वरूप येण्याचा संभव आहे. तें कांहींही झालें तरी या दोन पुढाऱ्यांचे विचार एकत्र येऊन त्यांचा समन्वय होऊं पहात आहे, हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. अर्थात हा इतिहासाचा प्रभाव आणि त्यांतच या दोन पुढाऱ्यांच्या कार्याचें महत्त्व सांठवलेलें आहे.

# १ विष्णुबुवा ब्रम्हचारी

१ बंडखोर आचार व विचार
२ कम्युनिस्ट मॅनिफेस्टोचा मराठी अवतार
३ मिशनऱ्यांशीं बिनतोड सामना
४ धार्मिक भावनांना धक्के

१. जोतीबा फुल्यांचे क्रान्तिकारक विचार व आचार पाहिल्यानंतर जातां-जातां एका ब्राह्मणाचे बरेच निराळे आणि अगदीं स्वतंत्र असे विचार पाहिले पाहिजेत. हा ब्राह्मण म्हणजे विष्णुबुवा ब्रम्हचारी होय. विचारप्रवर्तक अथवा पंथसंस्थापक म्हणून जरी महत्त्व नसलें, तरी तत्कालीन समाजांत बंडखोरीचे विचार उद्भवत हें दर्शविण्यास यांचें उदाहरण पुरे होईल. स्वेच्छेस येईल तसें वागण्याची व मनास वाटेल तसें बोलण्याची धमक बुवांचे अंगीं होती. एवढ्यावरून किंवा सर्व जातीच्या लोकांकडून मद्यमांस खेरीज अन्न ते घेत यावरून त्यांस सुधारक समजतां यावयाचें नाहीं. कारण विचारपूर्वक एकादी सुधारणा आपणास पटली व ती अमलांत आणण्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न केला तरच 'सुधारक'ही पदवी प्राप्त होते. विष्णुबुवा भुलेश्वरच्या बाजारांतील पुऱ्या, भाजी, भजी वगैरे पदार्थ टोपलींत भरून पायांत जोडा असूनसुद्धां भर रस्त्यांत लोकांशीं बोलत असतांना खात होते; खानू नांवाच्या एका मुसलमान नोकरासही,

काशीक्षेत्रीं वास करीत असतां, त्यांनीं आपल्या तैनातीस ठेविलें होतें, वगैरे तत्कालीन लोकांच्या दृष्टीनें धर्मबाह्य असणारीं कृत्यें ते बिनदिक्कतपणें करीत. किंवा आपण असें केलें म्हणून उघडपणें प्रौढी मिरवीत. पण यावरून त्यांस सुधारक कसें म्हणावें ? पुनर्विवाहाविषयीं बुवांचें मत अजमाविण्यासाठीं व जमल्यास पुनर्विवाहाचा पुरस्कार त्यांचेकडून करवावा म्हणून कांहीं पुनर्विवाहोत्तेजक मंडळी त्यांचेकडे गेली असतां त्यांनीं असे उद्गार काढले, "हल्लीं जसा सप्तपर्यंत विवाह आहे तो यथाशास्त्र नाहीं, रूढीस अनुसरून आहे...हल्लींच नवरे-बायकांत अनेक कारणांवरून किती वैमनस्य असतें तें प्रथम दूर करण्याचा आमचा विचार आहे. तेव्हां विधवाविवाहाची खटपट यापुढें काय ? अस्तु. चापून विधवाविवाह लावीत जा. जेवावयास येतील त्यांना वाढा. न येतील त्यांचें आर्जव करूं नका. मुकाट्यानें हें प्रकरण चालूं द्या, म्हणजे मजा येईल...तुम्हीं तुमचें काम करा, आम्हीं आमचें करतों."* सुधारकांचे हेतूंविषयीं बुवांना कितपत आत्मीयता होती, किंवा त्यांच्या कार्याचें त्यांना कितपत महत्त्व वाटे याची या उताऱ्यावरून चांगलीच कल्पना येते. सुधारकांच्या कार्याविषयीं ते अधिक गांभिर्यानें विचार करण्यास तयार असते तर ही 'मजा' पाहाण्याची भाषा कां आली असती ? सुधारकांचे उद्योगांत त्यांना विशेष 'राम' दिसत नसावा, हेंच खरें. हिंदुसमाजाच्या प्रकृतीवर सुधारकांनीं योजिलेल्या अनुपानांहून अधिक कडक अनुपानें योजण्याचा त्यांचा विचार दिसतो.

२. पण समाजसुधारकांपैकीं म्हणून विष्णुबुवांना महत्त्व नसलें, तरी केवळ कौतुकास्पद असे विचार त्यांनीं लोकांपुढें ठेवले असल्यामुळें त्यांना वगळतां येत नाहीं. बुवांना लोकहितवादींचे समकालीन म्हणतां येईल (१८२५–७१). पण त्यांचें शिक्षण मात्र बेताचेंच होतें. जुन्या पद्धतीनें संस्कृत पठणही त्यांचें विशेष झालें नव्हतें. 'साक्षात्कार झाल्यामुळें' त्यांनीं फारसें संस्कृत कळत नसतांही वेदांचें अध्ययन केलें व वेदप्रणीत असा धर्म आचरण्याचा आग्रह धरला. 'सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध' लिहून, त्याच्या इंग्रजी भाषान्तराच्या

* आजरेकरकृत विष्णुबुवा ब्रह्मचारी यांचें चरित्र.

छापील प्रती इंग्लंडमधील राणीकडे, पार्लमेंटाकडे व जबाबदार अधिकाऱ्यांकडे विष्णुबुवांनीं पाठविल्या; एवढेंच नव्हे तर चीन, अमेरिका व इतर राष्ट्रांतील प्रमुख पुढाऱ्यांकडेही त्यांनीं त्या निबंधाच्या प्रती धाडल्या. असें करण्यांत त्यांचा कांहीं विशेष हेतु होता कीं कसें तें निश्चित कळत नाहीं. पण त्यांचा प्रयत्न दांडगा व पद्धतशीर, याबद्दल शंका रहात नाहीं. त्या निबंधाचा इत्यर्थ मोठा मनोरंजक व विचारोत्पादक आहे. विष्णुबुवांचें म्हणणें असें:— "सर्व प्रजेकडून सर्व जमिनीची लागवड करवावी, ती अशी कीं ज्या ठिकाणीं जी वनस्पति चांगली पिकेल त्या ठिकाणीं तिची लागवड करावी...आणि अनेक प्रकारचीं फळें, कंद, भाज्या, अन्न, ( वगैरे )...उत्पन्न करून गांवोगांव कोठारें भरून ठेवावीं. व त्यांतून सर्व गांवकऱ्यांनीं पोटास लागेल तितकें अन्न न्यावें, व जनावरास चारा न्यावा. या प्रमाणें सीतकाळ, उष्णकाळ व पर्जन्यकाळ या बाराहि महिन्यांत एकसारखें सर्व जमिनींतून उत्पन्न करावें आणि **तें सर्वांचें उत्पन्न एकंच व एकाचेच ताब्यांत राहून त्यांतून खावयास विपुल न्यावें** व राजानें लोंकरीचे, तागाचे, रेशमाचे व कापसाचे याप्रमाणें अनेक तऱ्हेचे कपडे तयार करावे आणि गांवोगांव खजिन्यांत ठेवावे. त्यांतून **ज्याला जो कपडा पाहिजे तो त्यानें न्यावा.** व सोन्यारुप्याचे, मोतीं, हिरे यांनीं जडलेले अलंकार तयार करून गांवोगांव ठेवावे व ते सर्व स्त्रिया पुरुषांनीं वापरावे आणि मोडले म्हणजे पुनः राज्याच्या खजिन्यांत टाकावे आणि नवे घेऊन जावे. तशींच, शस्त्रें, यंत्रें, तयार करून गांवोगांव ठेवावीं व सर्व प्रकारचे खेळ गांवोगांव ठेवावे. व **आगगाड्या व तारायंत्रें गांवोगांव असावीं.** व सर्व प्रकारच्या कारखानदारांनीं व शेतकऱ्यांनीं व राजानें **एक सारखें अहिंसक खाणें खावें** व तें **सर्वांनीं एका कोठारांतून नेऊन खावें.** व **सर्वांचीं लग्नें करण्याच्या खात्याच्या मार्फतीनें राजानें करावीं. व आवड नसली तर पुनः ज्याला जी स्त्री नको त्याला दुसरी करून द्यावी व तिला दुसरा पति करून द्यावा, म्हणजे स्वयंवर असावें** व सर्वांची पांच वर्षांचीं पोरें झालीं म्हणजे मुलगे व मुली राजाच्या ताब्यांत द्यावे. नंतर त्याणें त्यांना सर्व विद्या शिकवून ज्याला ज्या कामांत

जास्ती उद्योग करण्याची संवय असेल त्याला त्या कामाकडे लावून द्यावा व स्त्रियापुरुष वृद्ध झालीं म्हणजे त्यांच्याकडून कामधंदा न करवितां त्यांनीं स्वस्थ बसून खावें व त्या त्या खात्याचे 'पार्लमेंट' सभेचे सभासद असावे आणि जगत् भासणाराचे उपकार आठवीत बसावें. ''*

From each according to his capacity and to each according to his needs या साम्यवाद्यांच्या आद्यतत्वाचें प्रतिबिंब ब्रम्हचाऱ्यांच्या वरील विचारांत आढळतें. मालकी हक्काला मूठमाती देऊन नैतिक भावनांनाही गचांडी मारणारें हें ' सुखदायक राज्य प्रकरण ' तत्कालीन समाजाला अभिनव वाटलें, तरी तत्संबंधीं कांहीं विचार करावा अशी कोणाचीच वृत्ति नव्हती. विष्णुबुवा समाजशास्त्रज्ञ किंवा इतिहासज्ञ नव्हते, इतिहासाचें वारंवार पारायण करून त्यांनीं हें 'प्रकरण' खास काढलें नव्हतें. तरी त्यांची ही जुनी विचारसरणी एकदोन ठिकाणीं थोडा ' फेर ' केल्यास आधुनिक कम्युनिस्टांच्या आदर्श समाजाचा पाया बनूं शकेल. पण हें साम्य आलें कसें हा महत्त्वाचा प्रश्न असून त्याला कांहीं समाधानकारक उत्तर सांपडत नाहीं. कारखानदारीचा, भांडवलशाहीचा किंवा तिसरा कसला तरी जाच, कीं ज्यायोगें विष्णुबुवांस असले अभिनव विचार सुचावे, त्यांना झालेला दिसत नाहीं. वेदांतूनच आपणांस ही सर्व माहिती मिळाली, असें भासविण्याचा त्यांचा प्रयत्न दिसतो.

**३.** तें कांहींही असो, बुवांनीं असे जोरदार व क्रांतिकारक विचार समाजापुढें मांडले खरे. पण एवढ्यानें त्यांचें जीवितकार्य संपलें नाहीं. महाराष्ट्रांत माजलेल्या एका विशिष्ट मतप्रसाराची वाढ ब्रह्मचारीबुवांनीं जशी पाहिजे तशी खुंटविली. मिशनऱ्यांनीं हिंदुधर्मनालस्तीचे अड्डे ठिकठिकाणीं उघडले होते. तेथेंच ख्रिस्तमहति गाण्याचा प्रघात असून येशूच्या कळपांत 'मेंढरें' ओढण्याचें काम सुरू होई. अशा मिशनऱ्यांना विरोध करणाऱ्या मंडळींत विष्णुबुवा हे एक होते. वादविवादांत किंवा ख्रिस्ती धर्मांतील दोषस्थळें दाखविण्यांत बुवा मोठे वस्ताद होते. मिशनऱ्यांना ' चूप ' करण्यांत त्यांनीं आपली बुद्धिमत्ता व हजरजबाबीपणा हीं खर्च केलीं. त्यांचे हे दोन गुण

* " सुखदायक राज्यप्रकरणीं निबंध "

असल्या उपयोगासाठीं आधिक्यानें चमकत. कोणीकडून तरी ख्रिस्ती धर्मांतील वैगुण्यें दाखवून हिंदु धर्मावर टीका करणाराचीं तोंडें बंद पाडावयाचीं असा ब्रह्मचाऱ्यांचा कटाक्ष असे. मिशनऱ्यांशीं वाद करतां यावा म्हणून म्हणे त्यांनीं धर्माचा अभ्यास केला. त्यामुळें त्यांना कळलें कीं 'हल्लीं' धर्म म्हणतात तो वैदिकधर्माहून भिन्न आहे. तेव्हां प्रचलित धर्माचरणाचा त्याग करणें क्रमप्राप्तच झालें. आणि तसा त्यांनीं तो केलाही. म्हणूनच कदाचित् विष्णुबुवांचें 'मनःपूत धर्माचरण' तत्कालीन समाजाला विक्षिप्त वाटलें असावें. त्यांचें आचरण कशाप्रकारचें होतें याची कल्पना वर दिलीच आहे. प्रचलित नीति-निर्बंध अधार्मिक असून खरें नैतिक आचरण वैदिक नियमानुसार ठरविलें पाहिजे असा विष्णुबुवांचा आग्रह दिसतो. त्यांनीं म्हटलें, "प्रथम हिंदुस्थानांत सर्व धंद्यांचीं खातीं होतीं. व प्रत्येक धंद्याच्या खात्यांतील सात आठ वर्षांच्या वयाच्या मुली व मुलगे राजा घेऊन जाई आणि मुलींना अनेक धंदे शिकविण्याच्या खात्यांत पाठवी, आणि मुलगेही अनेक धंदे शिकवण्याच्या खात्यांत पाठवी; आणि ते मुलगे व त्या मुली वयांत येत तसतसें त्यांस जें जें काम शिकविलें असेल त्या त्या कामाला परस्पर मदत होण्यासारख्या बेतानें राजा त्यांचीं लग्नें करण्याच्या खात्याकडून लग्नें करवून त्यांना जें काम येतें त्या कामाच्या खात्याच्या सेक्रेटरीकडे त्यांना पाठवी. नंतर तो सेक्रेटरी त्यांची राहण्याची व्यवस्था करी. असा बहुतकाळ लोटल्यानंतर पुढें राजे दुर्बुद्धि झाले; यामुळें लोक आपलीं मुलें राजाच्या स्वाधीन न करतां आपणास येते तीच विद्या आपल्या मुलांस शिकवूं लागले. पुढें मुलें मोठीं झाल्यावर बापाचाच धंदा करूं लागलीं...याप्रमाणें झाल्यामुळें खातीं होतीं तितक्या जाती झाल्या. पुढें तोच जात्यभिमान दृढ झाला, आणि पूर्वस्थिती विसरले. नंतर राजे लुटारू होऊन प्रजेस पीडा करूं लागले...पुढें प्रजाही लुटारू झाली म्हणून मनु या नांवाचा राजा झाला, त्याने कायदे केले. अशा या बिघडलेल्या नीतींतील ज्या अनेक प्रकारच्या राजनीति त्याच भूगोलावरील अनेक प्रकारच्या राजनीति आहेत."*

* विष्णुबुवांचें हें वर्णन कुठल्या राजवटींतलें असावें तें समजत नाहीं. कदाचित् त्यांच्या साक्षात्काराचाच हा एक भाग असावा. जोतीराव फुले यांनीं हिंदुस्थानचा

४. विष्णुबुवांचें हें निरूपण पाहिलें म्हणजे थोडें हंसू आल्यावांचून राहात नाहीं. वेदांत सर्व कांहीं आधुनिक शोध आहेत असें प्रतिपादणारा आर्यसमाजी पंथ बुवांनंतर उदयास आला. वैदिक म्हणून एक आदर्श धर्म त्यांनीं वेदांतून प्रथमच काढून “ वेदोक्त धर्मप्रकाश ” या नांवाचा एक जाडा ग्रंथ लिहिला. त्यांत वेदोक्त म्हणून वर्णिलेला लोकाचार पाहिल्यास ब्रम्हचाऱ्यांचें वेदाध्ययन यथातथाच झालेलें दिसतें. समाजाच्या उत्क्रान्तींतील विविध अवस्थांचें अभ्यासू दृष्टीनें निरीक्षण बुवांनीं केलेलें नसावें. कारण त्यांच्याकाळीं अभ्यासाची ही दृष्टि फारशी नव्हतीच. ते समाजशास्त्रज्ञ नव्हते, इतिहासाभ्यासी नव्हते...कांहीं नव्हते. तरीही त्यांनीं ‘ वेदोक्त धर्मप्रकाश ’ इतक्या तपशीलवार लिहिलेला पाहून कौतुक वाटतें. पण त्यांच्या ‘सुखदायक राज्यप्रकरणीं’ च्या कल्पना कल्पनेनेंच स्फुरल्या असाव्या. मग विक्षिप्त बुवानें सांगितलेल्या अशा ‘विक्षिप्त’ विचारांची उपेक्षा झाली यांत काय चुकलें ? त्यावेळीं ( जेव्हां मालकी हक्कांबद्दल संशयही उत्पन्न झाला नव्हता, समाजाच्या आर्थिक रचनेबद्दल लोक उदास होते, व्यापारधंदा, या अर्थानें तरी, निर्वंधपणें चालू होता, धार्मिक बाबींत स्वातंत्र्य होतें तेव्हां ) असे मालकी हक्कांना धुडकावणारे किंवा धार्मिक भावना दुखविणारे विचार समाजांतील अग्रगण्यानें जरी पुढें मांडले असते तरी कोणीच तिकडे लक्ष दिलें नसतें. मग विष्णुबुवांसारख्या विक्षिप्तानें ते मांडल्यावर त्यांचीं आणखी संभावना ती कसली व्हावयाची ?

राजनीतीसंबंधानें विष्णुबुवांनीं विस्तृत विवेचन केलें असून वेदोक्त* धर्माचें व्यापक स्वरूपही वर्णिलें आहे. त्या एकंदर लिखाणांत कित्येक विचार तर अत्यंत प्रगतिपर असून त्यांच्या दूरदृष्टीची उत्तम साक्ष देतात. त्यांत ‘ विनाकारण गोंगाट ’ करण्यापासून ‘ एक राजा मेला किंवा वृद्ध वगैरे कारणानें ठरावाप्रमाणें वेतन घेऊन बसला ’ तर काय करावें येथपर्यंत

इतिहास कसा वाचला तें आपण पाहिलेंच. तोच इतिहास वाचण्याचा हा दुसरा प्रकार.

* **वेदोक्त धर्मप्रकाश :** पृ. ४३६ ते ४५०.

अनेक बाबींचा विचार केला आहे. “विवाहाचे नियम कालपरत्वें चालवावे, कीं, जेणें करून मनुष्याचें प्राणरक्षण व्हावें, आणि सुखही बुडूं नये, व धर्मही बुडूं नये,” “माहार दरवाज्याबाहेर आणि ब्राह्मण आंत असा पक्षपात करूं नये,” राज्यांत, “लेखनवाचन ज्ञान नाहीं असें तर कोणीच नसावें,” “वृद्धानें लहान मुलीबरोबर लग्न केलें असतां ती मुलगी परत घेऊन तिचें लग्न तिच्या वयाच्या व गुणाच्या नियमानें जो...पुरुष असेल, त्याजबरोबर लावून द्यावें,” “प्राण्यांना त्रास देतात...( त्या ) पोरांनां शरीरदंड सरकारांतून करावा. मग तीं पोरें...उंच पदवीच्या मनुष्यांचीं असलीं तरी चिंता नाहीं,” “हिंदुस्थान देशांतील राजकीय लेखन...जी देवनागरी पूर्ण लिपी तिच्यांत असावें,” अशा प्रकारचे उदार, व्यापक दृष्टीचे विचार विष्णुबुवांनीं एकोणिसाव्या शतकाचे मध्यास पसरविले ही गोष्ट खरोखरच अभिमानास्पद वाटते. राजा वंशपरंपरेचा नसावा, ‘प्रज्येंतील लोकांचा’ तो नेमण्याचा हक्क आहे; ईश्वरी देणगीचे पदार्थांवर कर नसावा, असे निर्बंधही त्यांनीं लिहून ठेविले आहेत.

---

# १० न्यायमूर्ति रानडे



१. अव्वल इंग्रजींतील दुसरी पिढी ज्ञानानें व विचारानें पहिल्या पिढीहून पुढारलेली वाटते. विशेषतः प्राप्त परिस्थितीचें यथार्थ ज्ञान व देशाचा हळुहळू होणारा, पण वरपांगीं पाहाणारास न दिसणारा, ऱ्हास ह्या दोन्ही गोष्टी दुसऱ्या पिढीस स्पष्टपणें कळून चुकल्या. इतकेंच नव्हे, तर ह्या रोगावर काय उपाययोजना करावी हेंही त्या पिढींतील धुरीणांनीं सांगून टाकिलें. न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे ( १८४२–१९०१ ) हेच त्या पिढीचे अग्रगण्य होत. ते आपल्या विद्याभ्यासानें व बुद्धिमत्तेनें ‘ पदवीधर-मुकुटमणि ’ [ Prince of Graduates ] या पदवीस योग्य ठरले.

एतद्देशीय विद्यार्थ्यांची हुषारी व इंग्रजी भाषाज्ञान यांची मजल कोठपर्यंत जाऊं शकते, याचें उदाहरण म्हणून रानड्यांकडे अंगुलिनिर्देश करण्याचा कौतुकपूर्ण प्रयत्न इंग्रज विद्याधिकारी करीत असत. विद्याधिकाऱ्यांची बहाल मर्जी रानड्यांवर होती म्हणूनच कीं काय कोण जाणे, ते प्रथमपासून सरकारी नोकरीकडे वळले. परंतु सरकारी बंधन स्वीकारूनही लोकसेवा भरपूर करतां येते, हें रानड्यांनींच आपल्या उदाहरणानें सर्वांच्या नजरेस आणलें. त्यावेळच्या समाजांत सार्वजनिक कार्य असें कांहीं असतें ह्याची फारशी जाणीव नव्हती. शिवाय, सरकारी नोकर म्हटला कीं तो बाह्य जगाला मुकलाच, कचेरी हेंच त्याचें कार्यालय, त्याच्याबाहेर कार्य करण्यास त्याला सवड ( सर्व अर्थांनीं ) कशी ती नसतेच, अशी आजही बहुतेकांची कल्पना आहे. पण रानड्यांनीं महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व सार्वजनिक चळवळींशीं संबंध ठेविला. फार काय हिंदुस्थानांतील सर्व कार्यकर्ते न्यायमूर्तींना मार्गदर्शक म्हणून मानीत, इतका त्यांच्या कार्याचा व्याप असे.* पुण्यांतील वक्तृत्वोत्तेजक सभा, वसंतव्याख्यानमाला, औद्योगिक परिषद्, औद्योगिक प्रदर्शन, फिमेल हायस्कूल, नेटिव्ह जनरल लायब्ररी, प्रार्थनासमाज, सार्वजनिक सभा इत्यादि तत्कालीन संस्थांच्या संस्थापकांत रानडे प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षरीत्या असत. राष्ट्रीय सभा ( इन्डियन नॅशनल काँग्रेस ) स्थापण्यांत ज्या चारपांच व्यक्तींचें अंग होतें त्यांतही रानडे प्रमुख होते. सामाजिक परिषदेचें जनकत्वही त्यांजकडेच जातें.

२. अशा सर्वांगीण दृष्टि असलेल्या बुद्धिवन्त पुढाऱ्यानें महाराष्ट्रांत एक विशिष्ट प्रकारचीच विचारसरणी फैलाविली असें नाहीं. त्यांच्या विचारांचें कार्यक्षेत्र पुष्कळ व्यापक आहे. प्रथमतः पुनर्विवाहाकडे त्यांचें लक्ष गेलें हें साहाजिकच. विधवांच्या असहायतेकडे समाजाचें लक्ष खेंचण्याचे प्रयत्न बरींच वर्षें चालू होते. आणि समाजांतील सुशिक्षित विचारी गृहस्थांस ह्या दोषाचें निर्मूलन करावें असें वाटे. मात्र प्रत्यक्ष कृतीस आरंभ असा झाला नव्हता. तो रानड्यांच्या अमदानींत झाला व रानड्यांनीं त्यास मनोभावें

* Gokhale's Speeches, P. 940.

मदत केली. 'इंदुप्रकाश'मधून त्यांनीं पुनर्विवाहास अनुकूल असे लेख लिहिले. मुंबईस सन १८६५ मध्यें विधवाविवाहोत्तेजक मंडळ स्थापन झालें; त्याचे रानडे सभासद होते. त्यानंतर सुमारें चार वर्षांनीं मुंबईंत पहिला पुनर्विवाह झाला, त्याच्या निमंत्रणपत्रिकेवर रानड्यांची सही इतर सुधारकां-बरोबर होती.

येथें एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रानड्यांची अबलोन्नतीसंबंधीं जी खटपट असे, तींत त्यांच्या प्रेमळ मनाची तळमळच अधिक व्यक्त होई. पुरुषांचा स्त्रियांवर चालणारा अधिकार त्यांना खपत नसे. त्यांच्या या विचारांची भिस्त बुद्धिप्रामाण्यवादावर नसून न्याय, दया, आणि शास्त्राधार यांवर असे. जुन्या लोकांचा विरोध घालवून त्यांना सुधारणांकडे प्रवृत्त करण्यासाठीं मूळ शास्त्राचा आधार घेणें वावगें नसलें, तरी विचारांची भूमिका केवल बुद्धीवरच अधिष्ठित असावी, ही अपेक्षा रानड्यांच्या बाबतींत सफल होत नाहीं. ते प्रार्थनासमाजाचे कट्टे अनुयायी व प्रथमचे सभा-सद असल्यानें त्यांच्या मनावरील धर्माचा पगडा जाऊं शकला नाहीं. त्यांचे हे विचार पाहा:—"पूर्वकालीन जे ग्रंथ आहेत, त्यांस आपण शास्त्र म्हणतों, त्यांत स्त्रीजातीचें सदैव रक्षण त्यांच्या पुरुष आप्तांनीं करावें, स्त्रिया सेव्य आहेत, स्त्रिया पूज्य आहेत, स्त्रिया सन्मान्य आहेत, इत्यादि जीं वचनें आपण पहातों, त्यांची आठवण पुरुषांनीं विसरावी, हें मोठें दुर्भाग्य आहे. स्त्रीजातीचे जे दोष आपण वर्णन करतों, त्या-वेळीं ते दोष आपण आपल्या मातेवर, कन्येवर व आपल्या भगिनीवरही आरोपितों, हें लक्षांत राहूं नये, हें आश्चर्य आहे. आपल्या मातेची, कन्येची, भगिनीची, व पत्नीची अशा रीतीनें विटंबना भरसभेंत करावी, याहून अधिक कृतघ्नपणाची कल्पनाच होत नाहीं...सर्व पृथ्वीं-तील लोक आपल्यावर चढ करून आपल्यास तुच्छ मानीत आहेत, त्याची लज्जा वाटावी, हें एकीकडेच राहून पुरुषास काय सत्ता चालवि-ण्याची ती घरांतील आपल्या स्त्रीसमाजावर चालवावी, असें वाटणें याहून अधमपणाची दुसरी कोटी दिसत नाहीं."* मूळ शास्त्रांची आठवण बुजाली

* न. र. फाटक : **न्या. रानडे यांचें चरित्र** पृ. ४०७

म्हणूनच यांत अधिक आक्रोश आढळतो. विचारापेक्षां विकारांचें प्राधान्य वरील उताऱ्यांत दिसत असल्यानें रानड्यांच्या बुद्धिमत्तेला किंचित् उणेपणा येतो ही गोष्ट कबूल केलीच पाहिजे. "स्त्रियांना स्वतंत्रता देणें म्हणजे समुद्रापलीकडच्या परक्यांचें अनुकरण करणें नव्हे. परक्यांचें अनुकरण करणाऱ्या लोकांना आपल्या पूर्वेतिहासाचें स्मरण असत नाहीं. त्या जुन्या उज्ज्वल कालाचा खरा अभिमान त्यांना नाहीं"* 'परमेश्वरी योगायोगानें ज्या पुण्यपुरुषांशीं आमची गांठ आमच्या हितास्तव' पडली, त्यांचें अनुकरण केल्यास काय बिघडलें? किंबहुना पुष्कळ बाबतींत त्यांचें अनुकरण होणें हें अपरिहार्य असतां वरील प्रकारचा युक्तिवाद रानड्यांनीं लढविला. कदाचित् परंपराभिमानी मंडळीस अनुकूल करून घेण्यासाठीं त्यांनीं असें म्हटलें असावें. परंपरेचा अभिमान आणि जुन्या शास्त्रग्रंथांतून आपल्या आधुनिक आचरणास समर्थन हुडकण्याची त्यांची वृत्ति, लोककल्याणाची त्यांची तळमळ व त्यांची सर्वविख्यात बुद्धिमत्ता यांचा मेळ घालतांना अडचणच पडते. तें कांहींही असलें तरी त्यांनीं तत्कालीन समाजाला मार्गदर्शक होण्याचें असें अपूर्व कार्य केलें यांत शंका नाहीं.

३. रानड्यांच्या वेळींच महाराष्ट्रांतील पहिला पुनर्विवाह† मुंबईत झाला म्हणून वर म्हटलेंच. ह्या पुनर्विवाहामुळें महाराष्ट्रांत भावी कालांत समाजोपयोगी संस्था निघाल्या. शिवाय नवीन विचाराचें प्रत्यक्ष कृतींत उतरलेलें स्वरूप म्हणून ह्या विवाहास विशेष महत्त्व आहे. प्रोफेसर धोंडो केशव कर्वे यांचें पुनर्विवाहाकडे लक्ष याच पुनर्विवाहानें वळलें व कर्व्यांच्या पुढील भव्य कामगिरीचा उगम याच महत्त्वपूर्ण घडामोडीनें झाला.×

---

* न. र. फाटक : **न्या. रानडे यांचें चरित्र** पृ. ३७७

† हा विवाह ता. १५ जून १८६९ रोजीं झाला. हाच महाराष्ट्रांतला पहिला पुनर्विवाह असें समजतात. परंतु फुल्यांचे खटपटीनें पुण्यास झालेला शेणवी जातींतील पुनर्विवाह १८६४ सालीं झाला असें फुल्यांचे चरित्रकार, श्री. पं. सि. पाटील, सांगतात. ( **महात्मा फुले** : पृ० ५०-१ )

× **आत्मवृत्त**—( द्वितीयावृत्ति ) पृ० १४५.

" इंदुप्रकाशां "तून पुनर्विवाहास अनुकूल लेख लिहिण्यांत, पुनर्विवाहोत्तेजक मंडळी स्थापण्यांत व पहिला पुनर्विवाह घडवून आणण्यांत विष्णुशास्त्री पंडीत १८२७–७६ यांचें मुख्य अंग होतें. म्हणून त्यांच्या कर्तबगारीचें मोजमाप येथेंच जातांजातां केलें पाहिजे.

पंडितांनीं बंगाली सुधारक ईश्वरचन्द्र विद्यासागर यांच्या विधवाविवाहविषय पुस्तकाचें मराठी भाषान्तर करून पुनर्विवाहास शास्त्राधार असल्याचें महाराष्ट्रांत पुनः एकदां घोषित केलें.* विधवाविवाहाचे फायदे दाखवितांना त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "विधवाविवाह चालू केला असतां वैधव्यापासून आमरणान्त होणाऱ्या यातनांचें निवारण होईल; जारकर्मांचे व गर्भनाशाचे गुन्हे कमी होतील; आणि त्यापासून अनेक कुलांची अप्रतिष्ठा होऊन त्यांस कलंक लागतो, तो लागणार नाहीं. आणि जेथपर्यंत या हितावह चालीचा लोक अंगीकार करणार नाहींत तोंवर कसबीणींचा व्यापार, व्यभिचार, अगम्यगमन व भ्रूणहत्या ( गर्भनाश ) या गोष्टींचे गुन्हे उत्तरोत्तर वाढत जातील, कुलांचे कलंक वाढत जातील आणि विधवांचा दुःखाग्नि अधिकाधिक पेटेल " †

पंडितांच्या या विचारांतसुद्धां बौद्धिक व्यक्तिवादापेक्षां समाजांत माजणाऱ्या अनीतीची भीति प्रामुख्यानें दिसते. भयप्रेरित होऊन कुठल्याही सुधारणेस उद्युक्त होणें हें उच्च प्रकारचें आचरण नव्हे. परंतु बुद्धिवादाचीही कसोटी न लावतां इतर दृष्टीनें त्यांच्या कामगिरीकडे पाहिल्यास व विशेषतः त्यांच्या वेळच्या समाजाची मनोवृत्ति लक्षांत घेतल्यास पंडितांच्या उपक्रमाचें यथार्थ महत्त्व कळून येईल. असो.

४. सुदैवेंकरून रानड्यांना स्वतःच्या आयुष्यांत बरेच कार्यकर्ते व त्यांची कर्तबगारी पाहावयास मिळाली. गोखल्यांस तर त्यांनींच हाताशीं धरून सार्वजनिक कार्यांत पुढें आणलें. मतभेदामुळें कित्येकांशीं रानड्यांचा साहजिकच

---

* १८४० च्या सुमारास गंगाधरशास्त्री फडके यांनीं, बाळशास्त्री जांभेकरांच्या प्रेरणेनें, अशाच प्रकारचें एक स्वतंत्र पुस्तक लिहिलें होतें. पहा पृ. ७८.

† पंडितकृत **विधवाविवाह** आ० २ री, पृ० १८.

विरोधही झाला. त्यांपैकीं पहिली सलामी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं त्यांना दिली. टिळकांशींही रानड्यांचा विरोध झालाच, आणि अशा प्रसंगानेंच रानड्यांचे व इतर कार्यकर्त्यांचे विचार तुलनात्मक चर्चेसाठीं लोकांपुढें आले. हा मतभेद संमतिवयाच्या वादावेळीं (१८९०) तीव्र स्वरूपांत स्पष्ट झाला. सरकारी कायद्याची मदत लोकांनीं केव्हां मागावी व आपल्या समाजांतील अनिष्ट चाली मोडून टाकण्यासाठीं सरकारच्या हातीं आपण होऊन कायद्याचें शस्त्र द्यावें काय हे वादाचे मुद्दे होते. "श्रुतिस्मृतिप्रणीत धर्माचारांऐवजीं अनार्य धर्माचार समाजांत रूढ झाले आहेत...अनार्यधर्मांची हकालपट्टी करण्याचें सामर्थ्य शास्त्र्यांत व शिष्टसंमतींत राहिलें नाहीं. 'तेव्हां नियमन करण्याची सत्ता ज्या ठिकाणीं आहे त्या सत्तेचा उपयोग करून बंदोबस्त झाला पाहिजे.'"* अशी रानड्यांची भूमिका होती. इतर विरोधकांना सरकारकडून कायदा करवून घेण्यांत वाटणारी भीति सरकारी नोकरीमुळें रानड्यांना वाटत नसावी. शिवाय 'इंग्रज हे हिंदुस्थानच्या हितार्थ ईशप्रेषित दूत' अशी रानड्यांची मनोमय भावना. त्यामुळें इतर मंडळींस इंग्रजांबद्दल वाटणारा परकेपणा व संशय न्यायमूर्तींच्या मनांत नव्हता.

रानड्यांची ही मनोवृत्ति एकदां लक्षांत घेतल्यानंतर त्यांच्या विचारांची फोड सहज होईल. 'आधीं राजकीय का सामाजिक?' हा वाद टिळक-आगरकरांमध्यें रंगला असला तरी रानडेही ह्या वादापासून अलिप्त राहिले नव्हते. त्यांनीं राजकीय चळवळ केली. नाहीं असें नाहीं. कारण राष्ट्रीयसभेच्या संस्थापकांपैकीं ते एक असून पहिल्या अधिवेशनांत तर त्यांनीं भारतमंत्र्यांचें कौन्सिल काढून टाकण्याच्या ठरावावर भाषण केलें होतें. व दरवर्षीं अधिवेशनास हजर राहण्याचा त्यांचा परिपाठ असे. तरीही ह्या वादांत त्यांचें निश्चित असें मत कोणत्याही एका पक्षाकडे झुकतें नसून त्यांनीं सामाजिक व राजकीय सुधारणांच्या जोडीस धार्मिक व आर्थिक चळवळींनाही गोंवलें. ह्या सर्व परस्परावलंबी आहेत असें रानडे बजबजावून सांगतात. शरिराच्या कोणत्याही एकाच अवयवाकडे अधिक लक्ष देऊन तो विशेष पुष्ट करण्यांत हांशील नाहीं,

* न. र. फाटक : न्या. रानडेचरित्र, पृ. ३९५.

असा त्यांच्या म्हणण्याचा इत्यर्थ आहे. याही पुढें जाऊन ते असें विचारतात कीं शरिरांतील इंद्रियें बिघडलीं असतां सर्व शरिरास सामर्थ्य कोठून येणार? त्यांचे मूळ शब्द फार महत्त्वाचे आहेत. ते म्हणतात, " You cannot have a good social system when you find yourself low in the scale of political rights, nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on **reason and justice.** You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religious ideals are low and grovelling you cannot succeed in social, economical and political spheres."* म्हणजे पर्यायानें धार्मिक बाबीस रानड्यांनीं अग्रपूजेचा मान दिलेला दिसतो. आणि ही सर्व व्यवस्था कोणाच्या लहरीनें झालेली नसून निसर्गसिद्ध नियमानें ती बद्ध होणार आहे असें ते सांगतात. " This interdependence is not an accident but is the law of our nature."*

थोडासा विचार केल्यास रानड्यांच्या वरील उद्गारांत व्यावहारिक दृष्टीचा भाग अधिक दिसेल. समाजांत कार्यकर्ते नुकतेच पुढें येऊं लागले होते तेव्हां त्यांना एका विवक्षित क्षेत्रांत मर्यादित करणें किंवा एकाच दिशेनें प्रगतीचा गाडा ओढण्यास लावणें इष्ट नव्हतें. राजकारणाला प्राधान्य देऊन—म्हणजेच सरकारविरोधी चळवळ करून—तत्कालीन कार्यकर्त्यांचें भागलें नसतें. कारण नुसत्या राजकीय चळवळीवर भर टाकल्यास तिचें स्वरूप नेमस्त न राहातां अल्पकाळांत 'आत्यंतिक' बनलें असतें, ही अनवस्था रानड्यांना टाळावयाची असावी. शिवाय भिन्न प्रकृतीच्या कार्यकर्त्यांना एकाच घाण्यास जुंपणें शक्य झालें नसतें. आणि म्हणूनच सामाजिक, आर्थिक व धार्मिक सुधारणासुद्धां एकाच दावणींत न्यायमूर्तींनीं गोंविल्या. कोणीकडून तरी कार्यप्रवृत्त झालेलीं माणसें समाजहितरत राहावीं, त्यांच्यांत तरतमभाव नसावा, आपापसांत श्रेष्ठकनिष्ठतेचा वाद माजून कार्यहानि न व्हावी, अशा दूरदृष्टीच्या विचारांनींच कदाचित् न्यायमूर्ति रानड्यांनीं सर्वांगीण सुधारणेचें महत्त्व पुरस्कारिलें असावें.

* *Indian Social Reform* by C. Y. Chintamani, p. 27-28.

एका दृष्टीनें पाहातां तें सर्व खरें आहे. त्यांच्या व्यापक व दूरदृष्टीच्या बुद्धीला असें सुचणें शक्य होतें. यांत त्यांचें धोरण व सावधगिरी स्पष्ट दिसून येतात.

६. रानड्यांचें राजकीय ध्येय व्यक्त झालेलें दिसतें तें असें. हिंदुस्थानचे प्रतिनिधी विलायतच्या पार्लमेन्टांत असावे, आणि हिंदी राज्यकारभाराचे प्रश्न त्यांच्या संमतीनें सोडवावे, असा जबाबदार राज्यपद्धतीचा मागणी-अर्ज रानड्यांनीं १८७४ मध्यें ब्रिटिश पार्लमेन्टकडे पाठविला. प्रान्तोप्रान्तींचे एकंदर अठरा प्रतिनिधी पार्लमेन्टांत पाठविण्याचा हक्क हिंदी जनतेला असावा व सालीना पन्नास रुपयेपर्यंत कर भरणाराला मतदानाचा हक्क असावा, असें त्यांचें म्हणणें होतें. पण हेंसुद्धां कांहीं तावडतोब मिळणारें नसल्यामुळें त्यांनीं तावत्कालपर्यंत म्हणजे आयर्लंड, स्कॉटलंड यांच्या प्रमाणें पार्लमेन्टांत प्रतिनिधी धाडण्याचा हक्क हिंदुस्थानला मिळेपर्यंत, हिंदुस्थानांतलींच कायदे कौन्सिलें सुधारून वाढवावीं असा दुसरा उपाय सुचविला आहे. ह्या प्रकारानें हिंदी लोकमताचा दाब राज्यकर्त्यांवर पडेल असा रानड्यांचा आशावाद होता. सरकारला पाठवावयाच्या विनंति–मागणी–अर्जांत रानड्यांचा हेतु वेगळा दिसतो. नामदार गोखल्यांनीं एतत्संबंधीं एक आठवण मुंबईस हिंदु युनियन क्लबमध्यें रानड्यांच्या पुण्यतिथीचे ( १९०३ ) दिवशीं सांगितली. सार्वजनिक सभेतर्फे गोखल्यांनीं दुष्काळासंबंधीं गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडलीं. त्याला उत्तर म्हणून सरकारतर्फे पत्र पोंहचून 'मजकूर समजल्याचें' ठराविक उत्तर आलें. तेव्हां निराश होऊन गोखल्यांनीं रानड्यांस विचारिलें कीं इतकी मेहनत घेऊन सरकारकडे हीं गाऱ्हाणीं पाठविण्यांत मग अर्थ काय? रानड्यांचें या पृच्छेवरील उत्तर अगदींच स्पष्ट आहे. "आपल्या इतिहासांत आपलें स्थान कोणतें हें तुमच्या लक्षांत येत नाहीं. असले अर्ज सरकारकडे धाडले असले तरी वास्तविक रीत्या ते जनतेला उद्देशूनच आहेत. अशानें तरी लोकांचें लक्ष इकडे लागेल; व तत्संबंधीं कांहीं विचार ते करूं लागतील. अशाच प्रकारचें कार्य वर्षानुवर्षें करावें लागेल. त्यापासून कसलाही परिणाम होणार नाहीं, असेंच धरून चाललें पाहिजे. कारण ह्या प्रकारचें राजकारण आपल्या देशाला अगदीं नवें आहे. शिवाय

आपण लिहिलेला 'मजकूर समजला' असें सरकारानें म्हटलें, हें काय थोडें झालें ?"*

रानड्यांच्या एकंदर विचारसरणींत नेमस्तपणाचें वर्चस्व असतें ही बाब आतां वेगळ्यानें सांगण्याचें कारण नाहीं. त्यांची मनस्थितीच तशी बनलेली होती. मानवी आकांक्षांची मजल फार उंच न जाऊं देतां नजीकचें पण अल्पायासें साधणारें ध्येय पुढें ठेवावें व तें साध्य होतांच दृष्टि आणखी वर न्यावी, असा त्यांचा आग्रह दिसतो. म्हणूनच त्यांनीं नेमस्तपणाचें तत्त्वज्ञान विशद करून सांगितलें. अत्युच्च ध्येयामागें लागणें हा त्यांच्यामतें वेडेपणा आहे. आणि राजकीय चळवळीचा हेतु स्पष्ट सांगतांनासुद्धां सरकाराला जागें करण्यापेक्षां आपल्या लोकांना सार्वजनिक कार्य करण्यास सवड व अनुभव मिळावा अशी त्यांची उत्कट इच्छा होती. अशानें प्रगति अत्यंत मंदगतीनें होते खरी, पण रानडे म्हणतात, सर्वच नव्या संवयींची वाढ पक्की व्हावी असें वाटत असेल तर ती सावकाश झाली पाहिजे.†

७. या एकंदर सर्व लिखाणांत अन्तर्मुख दृष्टि, म्हणजे स्वतःला शिक्षण देण्याची किंवा स्वतःचेच दोष काढण्याची दृष्टि, अधिक दिसून येते. सरकारास बोल मात्र क्वचितच लावलेला दिसतो. मग त्यांच्यावर दोषारोप ठेवणें तर दूरच. याचें कारण स्पष्ट आहे. इंग्रज हे आपले गुरू. त्यांच्या सान्निध्यांत आपण आपला रानटी समाज सोडून सुधारलेल्या समाजांत पदार्पण करूं, ही रानड्यांची मनोवृत्ति असून ईश्वरी नेमानेमानेंच हें घडून आलें, असें ते मानीत. ईश्वरी नेमानेमाबद्दल त्यांचा इतका कटाक्ष कां हें त्यांचीं प्रार्थनासमाजी मतें लक्षांत घेतलीं असतां समजेल. एकदां इंग्रजांना गुरु म्हणून मानिलें किंवा त्यांचा व आपला संबंध परमेश्वरी योगायोगानेंच जमून आला आहे, हें मत स्वीकारलें कीं, इंग्रजांना विरोध करणें शक्य होत नाहीं. मग यांच्याशीं स्वहक्कांसाठीं झगडण्याचा पंथ रानड्यांस रुचला नाहीं यांत विशेष आश्चर्य कसलें.

---

* *Speeches of G. K. Gokhale.* P. 929.

† न. र. फाटक : **रानडेचरित्र.** पान ५८७.

हिंदुस्थानांत परकीय सत्ता स्थापन झाल्यानंतर तिच्या यथार्थ स्वरूपाचें आविष्करण होण्यास कांहीं वेळ लागला, ही गोष्ट क्षम्य मानली पाहिजे. लोकहितवादींनासुद्धां दैवी योगायोगाचें किंवा परमेश्वरी कृपेचें ' वेड ' होतें, असें वर दर्शविलें आहेच. पण त्यांच्या या समजुतीस तत्कालीन इंग्रज अधिकाऱ्यांची उदार वागणूक व पेशवाईतील अंदाधुंदीच्या कालाशीं परमविरोधी असा शांततेचा व न्यायाचा काल लाभला, हीं दोन कारणें होतीं. शिवाय लोकहितवादींना इंग्रजी राज्यव्यवहाराचें तार्किकदृष्टया समीक्षण करण्यास संधि व साधन दोन्ही उपलब्ध नव्हतीं. असें असूनही लोकहितवादींनीं इंग्रजी राजवट ही एक इष्ट कां होईना पण आपत्तिच मानली. रानड्यांची गोष्ट वेगळी होती. त्यांना शास्त्रीय दृष्टि असून इंग्रजी अमदानीपासून होणाऱ्या आर्थिक नुकसानीचें चित्र त्यांनीं एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या चरणाच्या अखेरीस काढलें होतें. हिंदुस्थानांतल्या संपत्तीचें हानिकारक शोषण इंग्रजी राज्यपद्धतीनें कसें पद्धतशीर होत आहे, हें त्यांनीं आंकडेशास्त्राच्या व अर्थशास्त्राच्या सहाय्यानें सिद्ध केलें. त्याच्या जोडीस भौतिक शास्त्रांचा विचारसुद्धां रानड्यांनीं केला होता. असें असतां एखाद्या सश्रद्ध भक्ताप्रमाणें इंग्रजांच्या आक्रमणाला त्यांनीं परमेश्वरी योगायोग म्हणावें व तीच कल्पना उराशीं कायम बाळगावी, हा सुद्धां त्या ' डिव्हाइन डिस्पेन्सेशन 'चा एक प्रकार मानावयाचा कीं काय ?

सारांश काय ? तर लोकहितवादींना दैवी योगायोगाबद्दल म्हणजे हिंदुस्थानवर बसलेल्या इंग्रजी पकडीबद्दल खेद होत असून भावी कालचीं सुखस्वप्नें अमेरिकन धर्तीचीं—स्वातंत्र्याचीं—पडत असतां रानड्यांना मात्र " इंग्रजांच्या हातांतून राज्य काढून घेण्याची गोष्ट बोलणें हा फाजीलपणा " वाटत असे. असा या दोन समाजसेवकांच्या समान समजुतींच्या मुळाशीं मोठा फरक आहे.

८. रानड्यांच्या राजकीय आकांक्षांची मजल, त्यांचें इंग्रजांविषयींचें दैवी योगायोगाचें ' तत्त्वज्ञान,' त्यांची अन्तर्मुख दृष्टि, व सर्वांत अधिक म्हणजे सरकारी नोकरी, या सर्व गोष्टींचा एकत्र विचार केल्यास रानड्यांनीं सामाजिक चळवळींकडे अधिक लक्ष कां दिलें ( स्वतःपुरतें तरी राजकारण दुय्यम प्रतीचें कां ठरविलें ) याचा उलगडा सहज होईल. राजकीय चळवळीचें स्वरूप सरकारविरोधी होणार यांत संशयच नव्हता. निदान सरकारची अशा

चळवळ्यांवर वक्रदृष्टि खास होणार, हें ठरलेलें असून रानड्यांना तें मुळींच मानवलें नसतें. सरकारी नोकरी सांभाळून सरकारच्या डोळ्यांवर येणार नाहीं अशी चळवळ समाजसुधारणेशिवाय दुसरी नसल्यानें त्यांनीं तिचा पुरस्कार केला असावा. मात्र पुढें गोखल्यांना राजकारणाच्या रंगणांत त्यांनीं उतरविलें तेव्हां गोखल्यांनीं राजकीय चळवळीस हात घातला. तरी तिचें स्वरूप सरकारच्या डोळ्यांवर न येतां उलट अधिकाऱ्यांच्या अंतरंगांत शिरून त्यांचें मन वळवील अशा प्रकारचें ' राजमान्य ' राहिलें, ही बाब नजरेआड करतां येत नाहीं.

जुन्या परंपरेचा अभिमान रानड्यांस इतका असे कीं आधुनिक सुधारणेस ऐतिहासिक परंपरा आहे असें ते नेहमीं म्हणत. आणि आपल्या विधानास शास्त्राधार किंवा आप्तवचनें काढून दाखवीत. अशा आधारावर रचलेली सुधारणा ही केव्हांही ' आस्तेकदम ' चालणारी असावयाची, यांत नवल नाहीं. रानड्यांच्या धीम्या वृत्तीस व शांत विचारसरणीस आणि धार्मिक मनोभावनेस कुठल्याही प्रकारची क्रान्तिकारी चळवळ मुळींच मानवली नसती. सुधारणेसंबंधीं ते म्हणतात, " जुन्या परंपरेस अनुसरून फेरबदल करा असें सांगण्यांत सुधारकांचा मनसोक्त क्रांति घडवून आणण्याचा उद्देश नसून धर्माच्या जुनाट वृक्षावर जीं बांडगुळें उत्पन्न झालीं आहेत तीं कापून काढण्याचा त्यांचा उद्देश आहे."*

जुन्या नव्याची सांगड घालण्याची व तडजोड करून आपण प्रगतीकडे जात आहोंत अशी समजूत करून घेण्याची वृत्ति रानड्यांच्या एकंदर आयुष्यांत दिसून येते. तत्त्वनिष्ठेची तडफ व तदनुसार आचरण करण्याचा कडकपणा त्यांचे ठायीं कसोटीचे वेळीं आढळला नाहीं. पुनर्विवाहाचा पुरस्कार रानड्यांनीं मनःपूर्वक आणि कळकळीनें केला खरा, परंतु स्वतःवर पुनर्विवाह करण्याची संधि आली असतां ती झिडकारण्यांत त्यांना वडिलांचें मन दुखविणें हें भलें जंगी कारण मिळालें. आश्चर्य हेंच कीं एवढे मोठे विचारी रानडे आपल्याच कृत्याचें समर्थन करूं लागले. त्याचें म्हणणें असें, " आपणास सत्य वाटणाऱ्या गोष्टीचा आग्रह धरून वडिलांच्या मनास दुःख देणें

* न. र. फाटक : **न्या. रानडेचरित्र.** पृ. ४२४

योग्य नाहीं. कांहीं गोष्टींचा जसा आपल्या मनावर पगडा असतो तसाच तद्विरुद्ध गोष्टींचा वडिलांच्या मनावर ग्रह असतो. मग आपलाच हेका पुरविण्यांत अधिकार कोणता ? वडिलांची समजूत घालावी आणि समजूत पटल्यास उभयतांनीं त्या गोष्टींचा पुरस्कार करण्यास प्रवृत्त व्हावें. ... राजाचा कायदा अन्यायाचा आहे...(पण) सत्यतेच्या जोरावर एकदम एकानेंच तो कायदा मोडल्यानें फायदा होणार नाहीं, कायद्याबद्दलचे आपले विचार दुसऱ्याच्या मनांत भरवून देण्याचे उद्योग चालू ठेवावे. सर्वांचा समज आपल्याप्रमाणें झाला म्हणजे तो कायदा मोडला जाईल. घरच्या वहिवाटीचा तसाच प्रकार आहे ... घरच्या मंडळींशीं नित्य प्रसंग असतो. त्यास सदुपदेश करून मन वळवावें."*

तत्त्वनिष्ठेला अथवा स्वतःला एकदां पटलेल्या विचारांस वरीलप्रकारें मुरड घालावयाची म्हटल्यास कार्यसिद्धि मुंगीच्या गतीनेंही होणार नाहीं, हें आपणास स्पष्ट दिसतें. जगांतील महत्त्वाच्या सुधारणा, फार काय, ज्या धर्माचा रानड्यांना जाज्वल्य अभिमान असे त्या धर्मांतील कांहीं स्थित्यंतरें क्रान्तीच्या तडकाफडकी मार्गानेंच घडून आलीं; असें असतां रानड्यांचा हा आग्रह पटेल कसा ? तरी पण त्यांची मनोवृत्ति समजण्यास त्यासारखा दुसरा पुरावा नाहीं.

९. सामाजिक सुधारणा अथवा प्रार्थनासमाजाची चळवळ या दोन्ही कामगिरीपेक्षां रानड्यांनीं महत्त्वाचें कार्य आर्थिक व औद्योगिक क्षेत्रांत केलें आहे. आणि एवढेंच कार्य जरी त्यांनीं केलें असतें तरी त्यांची श्रेष्ठता कमी झाली नसती. अर्थशास्त्राचा अभ्यास त्यांस विद्यार्थिदशेंत करावा लागला. पण त्यांनीं त्याचा व्यासंग वाढवून हिंदी राजकारणांत त्याचें निराळें महत्त्व पटवून दिलें, हीच रानड्यांची अपूर्व कामगिरी. तत्पूर्वी अर्थशास्त्राचीं प्रमेयें हिंदी परिस्थितीस लावण्यांत कोणी स्वतंत्रपणें बुद्धि खर्चिली नव्हती. शिवाय हिंदी दृष्टीनें, अथवा हिंदुस्थानच्या परिस्थित्यनुसार, अर्थशास्त्राच्या प्रस्थापित सिद्धान्तांत कांहीं फेरबदल करावा लागतो ही कल्पनाच तेव्हां अगदीं नवी होती. रानड्यांनीं असें सिद्ध केलें कीं, गणितशास्त्राप्रमाणें अर्थशास्त्राचे सिद्धान्त अबाधित

* न. र. फाटक: **न्या. रानडेचरित्र.** पृ. ३२९

नाहींत. सार्वजनिक सभेंत असतांना शेतकऱ्यांची दैना कशी होत आहे हें त्यांना यथार्थ रीत्या कळलें होतें; व त्यांनीं आपल्या अर्थशास्त्रीय ज्ञानाचा उपयोग अशा शेतकऱ्यांची निकृष्टावस्था सुधारण्याकडे केला. सरकारनें सहकारी चळवळ हातीं घेण्यापूर्वींच शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणावर उपाय म्हणून या सहकारी चळवळीचें महत्त्व रानड्यांनीं सांगितलें होतें. त्यांचें अर्थशास्त्रीय लिखाण विविध व विपुल असून त्यांत केवळ इंग्रजी शास्त्रज्ञांच्या मतांचें अनुकरण नसून स्वतंत्र विचार पुष्कळ आढळतात. न्यायमूर्तींच्या आर्थिक विचारसरणीवर लिस्ट या जर्मन अर्थशास्त्रज्ञाच्या विचारांची छाप दिसते आणि त्याच्याच अनुरोधानें सरकारनें एतद्देशीय उद्योगधंद्यांस आपुलकीच्या भावानें मदत केली पाहिजे असा रानड्यांचा आग्रह होता.

१०. हिंदुस्थानचा आर्थिक ऱ्हास कसा होत आहे आणि लोकांच्या आळसामुळें देश कसा खालावत आहे, याचीं कारणें रानड्यांना अर्थशास्त्राच्या व्यासंगामुळें समजलीं. तीं त्यांनीं स्पष्टपणें पुढें मांडून धनोत्पादनाच्या साधनांत इकडील लोकांनीं काय करावयास पाहिजे हें सुचविलें. इंग्रजांच्या व्यापारी धोरणामुळें किंवा विलायती मालाची आयात वाढल्यामुळें आमचेकडील व्यापार बसत चालला. रानड्यांनीं ह्या स्थितीची नाडीपरीक्षा बरोबर केली. ती अशी:—
"परदेशच्या व्यापाऱ्यांची स्पर्धा ही विशेष तीव्र भासते याचें कारण तींत नैसर्गिक सामर्थ्य विरुद्ध मनुष्याची मर्यादित शक्ति असा झगडा आहे. कारण परकीय व्यापारी संघटणेच्या पायावर उभे असून शास्त्रीय ज्ञान व कारागिरीचें कसब त्यांच्या मदतीस आहे. पण आपणाकडे मात्र अडाणी व आळशी कामगारांचा नुसता भरणा आहे. अशानें नुसती संपत्तिच नव्हे तर संपत्तीहून अधिक महत्त्वाचें असें कौशल्य, बुद्धि व कारागिरी यांचें उच्चाटन हिंदुस्थानांतून होऊन तीं परकियांकडे जात आहेत."*

कोठल्याही अनर्थाचें मूळ शोधून काढण्याची शास्त्रीय दृष्टि वरील उताऱ्यांत दिसते. रानड्यांचें हें वैशिष्ट्यच म्हणतां येतें कीं, ते कुठल्याही वादाचे वेळीं प्रथम ऐतिहासिक वा तात्त्विक विवेचन करतात. हिंदुस्थानांत

---

* १८९० च्या औद्योगिक परिषदेपुढचें भाषण.

शेतीवर पोट भरणाऱ्यांची संख्या वाढली व उद्योगधंद्याकडे दुर्लक्ष होऊं लागलें, तेव्हां त्या परिस्थितीची दूरदृष्टीनें पहाणी करून रानडे म्हणतात "शेतीच्या धंद्यांत पोट भरणारांचें सामर्थ्य परिमितीचें असतें. इतर धंदे करणारे लोकांचें सामर्थ्य अपरिमित आहे, असें म्हटलें असतां चालेल. ज्या देशांत केवळ शेतकी लोकापेक्षां, म्हणजे खेड्यांत रहाणारे अथवा खेडू लोकांपेक्षां नगरवासी लोकांची म्हणजे इतर कामधंदे करणारे उदमी व कारागीर लोकांची वस्ती जास्त असते, तोच देश सधन व सुखी असा साधारण सिद्धान्त आहे. शेतकरी लोकांवर जुलूम झाला असतां, त्यांची एकजूट होत नाहीं व त्या जुलुमाचा बोभाटा होत नाहीं. इतर कामधंदे करणारे लोक बहुधा मोठ्या समुदायानें राहातात, यामुळें व त्यांस फुरसत चांगली असते व समजही चांगली असते, यामुळें जुलुमाचा जोर फार वेळ चालत नाहीं, निदान बोभाट तरी विशेष होतो. परस्थ लोकांच्या अमलाखालीं जो देश आहे, त्याच्या संबंधानें हा विचार विशेष महत्त्वाचा आहे."* असेच विचार आणखी एका प्रसंगीं प्रदर्शित केलेले दिसतात, "शेतकीवर अवलंबून राहाण्याची संवय आम्हांस जडली आहे. कांसेवरच्या गोचडीसारखी आमची स्थिति आहे. धान्य असूनही दुष्काळांत तें विकत घेण्याची ऐपत शेकडा ८०–९० लोकांना असत नाहीं. आपला पैसा कारखान्यांत घालून आपण बऱ्याच लोकांस भाकर विकत घेण्याला द्रव्य पोंचविलें पाहिजे. मुंबईंत दुष्काळ दिसत नाहीं, याचें कारण काय ? याचा विचार केल्यास कारखान्यांचें महत्व समजून येईल." ×

देशाची आर्थिक हलाखी पाहून व शेतीवर अवलंबून असणारांची संख्या लक्षांत घेऊन रानड्यांनीं 'स्वदेशी' चळवळीचा मंत्र जनतेस दिला. लोकांना धनोत्पादक काम मिळावें व परदेशीं जाणाऱ्या द्रव्यास थोडासा तरी अटकाव व्हावा ह्या हेतूनें त्यांनीं स्वदेशी चळवळीची शिफारस केली. परंतु न्यायमूर्तींच्या या चळवळींत तत्पूर्वी सुमारें चौविस वर्षांपूर्वी लोकहितवादींनीं सांगितलेला

* न. र. फाटक, **रानडे चरित्र**, पृ. १९९

× **कित्ता** पृ. ४७१

व्यापक उद्देश किंवा बहिष्काराची कल्पना नाहीं. सरकारी नोकर असूनही लोकहितवादींनीं बहिष्काराचा उपदेश स्पष्टपणें दिला. तो रानड्यांस सुचला नसेल असें नव्हे. पण त्यांच्या स्वभावास तो पचला नसता हें खास.

आपल्या लोकांतील आळस घालवून त्यांना कार्यप्रवण करण्याकडे रानड्यांचा भारी कटाक्ष असे. एकत्र राहाण्याच्या चालीनें पुष्कळ कुटुंबांची हलाखी झालेली त्यांनीं पाहिली असावी. शिवाय त्या पद्धतीचे दोष अगदीं स्पष्टच होते. बदललेल्या परिस्थितींत विभक्त राहाणें क्रमप्राप्त व श्रेयस्करही ठरलें असतें. पण लोकांचा दुरभिमान आडवा आला. रानड्यांनीं ह्या चालींत फेरफार सुचवितांना म्हटलें, " अविभक्त कुटुंबपद्धतीनें निरुद्योगीपणा व आळस वाढतो. दुसऱ्याच्या कमाईवर टपून बसण्याची संवय जडते. वांटणीच्या पायीं शेंकडो कुटुंबें दीनावस्थेस पोंचलीं आहेत. संचित द्रव्याचे तुकडे तुकडे होऊन त्याचे कवडीपर्यंत विभाग झाल्यानें तिचा उपयोग समाजास अगर व्यक्तीस होत नाहीं. या व अशा अनेक कारणाकरितां एकत्र राहाण्याच्या चालींत फेरफार केला पाहिजे. "* पण याही पद्धतीस शास्त्राधार दाखविण्यास ते चुकले नाहींत. विभक्त राहाण्याची चाल जुनीच आहे असें त्यांचें म्हणणें. आम्ही परक्यांचें अनुकरण करीत नाहीं असें ते बजावतात. " एकत्र रहाण्याची चाल सोडा, असें म्हणणें म्हणजे परक्या चाली उचलणें असा आग्रह धरल्यासारखें होत नाहीं. स्मृतिकालानंतरचे ग्रंथ अविभक्त कुटुंब पद्धतीला विरुद्ध आहेत. मालमत्तेंत स्त्रियांचा हिस्सा ठेवल्याचें या ग्रंथांत आढळतें. एकत्र रहाण्याची चाल मोडण्याचा प्रयत्न जुनाच आहे, पण ही चाल मात्र मोडली नाहीं. "×

११. रानड्यांचे विचार नुसते विचारच न राहतां त्यांनीं ते आचारांत उतरविण्याचाही यथाशक्ति प्रयत्न केल्याचें दिसत असल्यानें त्यांची योग्यता कर्त्या विचारप्रवर्तकाची ठरते. औद्योगिक बाबतींतच पहा. त्यांनीं " धि इन्डस्ट्रियल असोशिएशन ऑफ वेस्टर्न इन्डिया " ही संस्था १८८९ मध्यें स्थापन केली व पुढील सालीं औद्योगिक परिषदही त्यांच्याच प्रेरणेनें

* न. र. फाटक, **रानडे चरित्र** पृ. ३७३

× **कित्ता** पृ. ३७३

अस्तित्वांत आली. स्वदेशीची कल्पना शास्त्रशुद्ध व व्यावहारिक स्वरूपांत उतरविण्यास रानड्यांनीं खटपट केली होती. तिचा आद्योच्चार बहिष्काराच्या कल्पनेसह लोकहितवादींनीं १८४९ मध्येंच केला हें मागें दर्शविलेंच आहे. तरीपण रानड्यांचें एकंदर कार्य म्हणजे स्वतः कार्यरत राहून इतरांस प्रेरक होणें. अर्थात् हें विशेष महत्त्वाचें असल्यामुळें त्यांची योग्यता अधिक ठरते. सार्वजनिक कार्यांची कल्पनाही कोणास नसतां त्यांचे वेळीं पुष्कळ समाजसेवक पुढें आले, याचें श्रेय बव्हंशीं न्यायमूर्तींसच जातें. किंबहुना असेंही म्हणतां येईल कीं, आज निरनिराळ्या क्षेत्रांत लोकोपयोगी कार्यें करणारी मंडळी आहेत त्यांना व त्यांच्या संस्थास्थापकांना न्यायमूर्ति रानड्यांच्या प्रोत्साहनानेंच स्फूर्ति मिळाली आहे. हिंदुस्थानांत सर्वत्र विखुरलेल्या कार्यकर्त्यांशीं त्यांचा पत्रव्यवहार असे व सर्वांनाच ते आदर्श उपदेशक व मार्गदर्शक वाटत. आणि हें कार्य कांहीं लहानसहान नव्हे.

वास्तविक सर्वांगीण सुधारणेचें तत्त्व एकदां अंगिकारल्यानंतर परंपरेचा अभिमान धरणें, हें थोडेंसें विसंगतच होय. न्यायमूर्तींची बुद्धिमत्ता अव्वल दर्जाची असतां ही परंपरेची पकड त्यांच्या मनावरून सुटली नाहीं हें महदाश्चर्य होय. त्यांनीं सुचविलेल्या बहुतेक सर्व सुधारणा केवळ बुद्धीवर अवलंबून नसून तींत शास्त्राधार घेतलेला दिसतो. ह्या त्यांच्या मनोवृत्तीचें यथायोग्य आविष्करण एक दोन वाक्यांतच त्यांनीं स्वतः केलें आहे. आपली इच्छा असली तरी आपणास परंपरा सोडतां येणार नाहीं; आणि सोडतां आली तरी आपण ती मुळींच सोडतां कामा नये,* असा त्यांच्या एकंदर वागणुकीचाही इत्यर्थ दिसतो. या बंधनांत त्यांचे प्रगतिपर विचार कोंडले असल्यानें क्रान्तिकारक अशी सुधारणा त्यांचे हातून मुळींच झाली नाहीं. न्यायमूर्ति शास्त्राधार दाखविणारे परंपराभिमानी सुधारकच ठरतात.

---

* "We could not break with the past if we would; we must not break with it if we could." *G. K. Gokhale. Speeches.* p. 939.

# ११ डॉक्टर भाण्डारकर

१ आचरणानें पसरविलेले विचार
२ स्वतःच्या पात्रतेवर भर
३ तत्त्वनिष्ठ वागणुकीचा आग्रह
४ सुशिक्षिताची व्यापक व्याख्या
५ धार्मिक मतांचा पगडा
६ न्या. चंदावरकर

१. प्रार्थनासमाजानें धार्मिक बाबतींत कामगिरी बजावली, तिचें मोजमाप ठरवितांना मतभेद होण्याचा संभव आहे. परंतु प्रार्थनासमाजी म्हणून जे समाजसेवक महाराष्ट्रास लाभले त्याबद्दलचें श्रेय एकमुखानें या एकश्वरीपंथास जाईल. रानड्यांची प्रथा पुढें चालविणारे विद्वान गृहस्थ प्रार्थनासमाजांत निघाले आणि ढोबळ मानानें पाहातां त्यांच्या कार्यपद्धतींत व विचारसरणींत साम्य आढळलें, तरी अभ्यासासाठीं त्यांतील कांहीं कार्यकर्त्यांचा परिचय करून घेतला पाहिजे. प्रार्थनासमाजी म्हणून सर्वांची मनोभूमिका एक असली तरी परिस्थित्य-नुरूप व स्वतःच्या मगदुराप्रमाणें प्रत्येकानें आपलें वैशिष्ट्य असें दाखविलेंच आहे. डॉक्टर भाण्डारकरांचीच गोष्ट पहा. त्यांना गुरुवर्य हेंच नामाभिधान लावतां येतें. त्यांची शेवटपर्यंत वृत्ति पूज्य व वन्दनीय गुरूसारखीच होती. परमेश्वरावर अढळ विश्वास, स्पष्टवक्तेपणा, तरुण पिढीस पुढें आणण्याची उदार दृष्टि, सदाचरण, विद्येचा व्यासंग इत्यादि गुणांमुळें भांडारकरांचें चरित्र

अभ्यासनीय व अनुकरणीय ठरतें. सरकारी नोकरी किंवा प्रार्थनासमाजी मनोवृत्ति यामुळें राजकारणांत स्वतंत्रपणें वावरण्याची त्यांना इच्छा झाली नसली अथवा शुद्ध समाजसेवेला त्यांनीं पूर्णपणें वाहून घेतलें नसलें, तरी स्वतःच्या उदात्त आचरणानें महाराष्ट्रांतच काय पण इतरत्रही एक नवीन आचारविचारांची परंपरा त्यांनीं चालू केली, असें म्हणतां येतें. आणि म्हणूनच विचारप्रवर्तक ह्या नात्यानें त्यांचा विचार करावयास हवा.

२. भाण्डारकरांपाशीं राजकीय विचार नव्हते असें म्हणणें वेडेपणाचें होईल. इतका विद्वान गृहस्थ कीं, ज्याची विद्वत्ता युरोपांतील निरनिराळ्या विश्वविद्यालयांनीं आपण होऊन मानिली व वानिली त्याला स्वदेशाबद्दल कांहींच वाटत नसेल, हें संभवनीय नाहीं. त्यांचें म्हणणें पाहाः—"जनता, देश, राष्ट्र या कल्पना जितक्या स्पष्टपणें आपल्या मनांत बिंबल्या पाहिजेत तितक्या त्या बिंबलेल्या नाहींत ... राष्ट्रीय हितार्थ झटणें हें आपलें कर्तव्य आहे, ही बुद्धि आपल्यांत व्हावी तशी जागृत झालेली नाहीं...अशाप्रकारें राष्ट्रत्वाचें किंवा समुदायस्वरूपाचें आपणास पूर्ण आकलन न झाल्यामुळें राजकीय गोष्टींत स्वार्थ किंवा व्यक्तिविशेषाचें हित यांचाच आपल्या मनावर परिणाम होतो... अशी स्थिति असल्यामुळें सार्वजनिक कामांत जेथें दोन पक्ष ( Parties ) व्हावयाचे त्यांच्या जागीं तट ( Factions ) होतात व व्यक्तिविशेषाच्या आवडीनावडीपुढें सार्वजनिक हिताकडे दुर्लक्ष होतें."*

वरील विचारांत भांडारकरांची आत्मनिरीक्षणशक्ति व्यक्त होते; तसेंच त्यांचें स्वतःच्या पात्रतेवर भर देण्याचें तत्त्व दिसून येतें. प्रत्येक ठिकाणीं आपले दोष त्यांना विशेष दिसत आणि दूरदृष्टीनें भावी कालचीं चित्रें त्यांना ताबडतोब मनापुढें आणतां येत. त्यामुळें भावी अनर्थ टाळण्यासाठीं ते स्वतःच्या सुधारणेवर अधिक भर देत. म्हणूनच 'युनिव्हर्सिटींत' व्हाइस चॅन्सेलर म्हणून त्यांनीं केलेल्या पहिल्या भाषणांत ( २० फे. १८९४ ) सामाजिक सुधारणेचा प्रश्न प्रामुख्यानें घेतलेला दिसतो. परंतु त्यांचीं विधानें किंवा अनुमानें चूक ठरविणें शक्य नव्हतें. तरुण

* वैद्यकृत **प्रार्थना समाजाचा इतिहास** च. ले. पृ. ३२२

पदवीधरांत मृत्यूचें प्रमाण असावें त्यापेक्षां अधिक आहे याची कारण-परंपरा डॉक्टरसाहेबांनीं बालविवाहाशीं नेऊन भिडविली. न्यायमूर्ति रानड्यांना मात्र ह्या वस्तुस्थितीचें कारण सामाजिक नसून आर्थिक आहे, असें वाटे. अर्थातच हा दृष्टिभेदाचा प्रश्न असला तरी विश्वविद्यालयाचें त्याकडे लक्ष जावयास पाहिजे होतें, तें गेलें नाहीं; व भाण्डारकरांनीं हा प्रश्न पुढें मांडला हें विशेष आहे. प्रत्येक बाबतींत सूक्ष्म व विवेचक दृष्टीनें पाहाण्याची त्यांची रीत प्रशंसनीय वाटते.

३. सामाजिक सुधारणेंत त्यांचें पाऊल इतर प्रार्थनासमाजिस्टांप्रमाणें प्रगति-परच होतें. पण कळकळीचे कार्यकर्ते लाभूनही सुधारकांची मजल फारशी पुढें गेली नाहीं, ही वस्तुस्थिति त्यांना मान्य असे. तिचें कारणही स्पष्ट शब्दांत सांगण्यास ते डगमगत नसत. "आमच्यांतील पुष्कळ शिक्षित लोकांची मनें मुळींच उदार झालेलीं नाहींत, कित्येकांना आम्हीं योजिलेल्या सुधारणा पसंत आहेत, परंतु आपण स्वतः कांहींही करावयास ते बिलकूल तयार नाहींत....आम्हीं सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं आम्हांला जें योग्य, जें न्याय्य, व जें अवश्य वाटत आहे तें सर्व शांतपणें आणि विशेष गवगवा न करितां आम्हीं आचणांत आणिलें पाहिजे. म्हणजे त्या त्या सुधारणा प्रचारांत येतील व त्याच नव्या रूढी बनून जाऊन लोकमान्य होतील."* यावरून नुसत्या बोलण्यापेक्षां आचरणावर भाण्डारकरांचा भर किती असे हें उघड दिसतें. आपलें मत एकदां बोलून दाखविल्यानंतर त्याकरितां वाटेल तें दिव्य करण्यास ते तयार असत. खरें पाहिलें असतां युरोपमध्यें धर्मच्छल झाला तसा हिंदुस्थानांत हिंदूंनीं कोणाचा केलेला नाहीं. सॉक्रेटिस, येशू ख्रिस्त, गॅलिलियो, जोन ऑफ आर्क, मार्टिन लूथर, अशांचीं उदाहरणें आपणाकडे आढळत नाहींत, याचें कारण हिंदु धर्माची सहिष्णुता. असें असतां, एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस † आपल्या बांधवांकडून सत्य-कथनाबद्दल भाण्डारकरांना काय मिळालें ? "दिवसाढवळ्या दगड मारावे...

* वैद्यकृत **प्रार्थनासमाजाचा इतिहास**. च. ले. पृ. ३२५

† क्रीडाभुवनांतील दंगा. १८९१

भल्या मनुष्याच्या घरांत कोंडून घातल्यासारखें करून त्यांचेवर वाळूचा, दगडाचा व कुशब्दांचा वर्षाव करावा " (आगरकर) आणि पोलीसांनीं हा देखावा पाहात असावें. संमतिवयवादाचे वेळीं भाण्डारकरांनीं शास्त्राधारासह असें सिद्ध केलें कीं कायद्यानें जी वयाची अट घालण्याचें घाटत होतें त्यापेक्षां अधिक वयाची अट शास्त्रांत आहे. हें खोटें ठरविणें शक्य नव्हतें. विरोधकांची भिस्त धर्मशास्त्रावर, आणि शास्त्रांचा खरा अर्थ सांगणारे भाण्डारकर'शास्त्री' पुढें येतांच, चिडून विरोधीपक्षानें त्यांचा असा पद्धतशीर छळ केला. भाण्डारकर म्हणजे इतर कोणी नव्हत तर "विद्येनें, वयानें, स्वभावानें, व आचरणानें अत्यंत पूज्य" असे. असो. एवढ्यानें त्यांनीं आपलें सत्यवादित्व मुळींच सोडलें नाहीं, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं.

४. सदाचरणावर, लोकसेवेवर, आणि न्यायबुद्धीवर भाण्डारकरांचा विशेष कटाक्ष असे. विद्यार्थ्यांना ह्याच गोष्टीवर भर देऊन ते उपदेश करीत. आणि 'बोले तैसा चाले' या कोटींतील ते असल्यानें सर्वांना त्यांचेबद्दल अत्यादर वांटे. सुशिक्षिताची व्याख्या त्यांनीं अशी केली आहे. "ज्याला आपल्या स्वतःवर योग्य दाब ठेवतां येत नाहीं, ज्याला सत्य व न्याय ह्यांस अनुसरून आपल्या आचरणास स्वरूप देतां येत नाहीं, किंवा ज्यास आपली विकसित झालेली जी सदसद्विवेक बुद्धि ती ज्या प्रकारचा उपदेश करील त्याप्रमाणें वागतां येत नाहीं, त्यास आपल्या स्वतःला सुशिक्षित असें म्हणवून घेण्याचा कांहीं अधिकारच नाहीं." सुशिक्षित.* शिक्षणाची इतकी व्यापक कल्पना विद्यार्थ्यां-पुढें ठेऊन तदनुसार आचरण केल्यामुळें भाण्डारकरांनीं समाजाचीं उच्च प्रकारची सेवा केली आहे. तरुणांकडे त्यांचें आपुलकीच्या भावनेचें लक्ष असे. जेव्हां जेव्हां संधि आली तेव्हां तेव्हां त्यांनीं तरुण आणि होतकरू विद्वानास उत्तेजन द्यावयाचें हें उदार धोरण आचरिलेलें स्पष्ट दिसतें. न्यायमूर्ति तेलंगांसारख्यांस सिंडिकेट मध्यें यावयास मिळावें म्हणून त्यांनीं १८८२ मध्यें स्वतः 'सिंडिक' होण्याचें नाकारलें, ही गोष्ट फारच थोड्यांस ठाऊक असेल. त्याचप्रमाणें एम. ए. खेरीज खालच्या परिक्षांस परीक्षक होण्याचें नाकारण्यांतही त्यांचा हाच उदार हेतू

* Ends & Aims of College Education. प्रार्थनासमाजाचा इतिहास, पृ.३२५

होता. ही लोकनायकाचे अंगीं आवश्यक असणारी, माणसें तयार करण्याची व त्यांना संधि देऊन पुढें आणण्याची, मनाची तयारी फारच क्वचित् आढळते. म्हणूनच भाण्डारकरांचें महत्त्व विशेष वाटतें.

जातिभेद, पुनर्विवाह, स्त्रीशिक्षण आणि अस्पृश्योद्धार यासंबंधीं त्यांचीं मतें अशींच प्रगमनशील असलीं, तरी त्यांत शास्त्राधाराचा भाग अधिक असे, म्हणजे पूर्वीं असें होतें, आतांही तसेंच असावें, असा त्यांचा म्हणण्याचा रोख असे. बुद्धिप्रामाण्यवादावर त्यांनीं फारसा भर दिलेला नाहीं. अंत्यजोद्धारासाठीं मात्र त्यांनीं व्यावहारिक युक्तिवाद लढविलेला दिसतो. "ह्या लोकांची मला जी माहिती आहे, त्यांच्या बुद्धिबलासंबंधानें माझा जो अनुभव आहे त्यावरून मला असें स्पष्टपणें म्हणतां येतें कीं, अगदीं तिरस्कृत जे महार त्यांच्यामध्यें बुद्धिमान माणसें पुष्कळ असतात व त्यांना उत्तमप्रकारचें शिक्षण सहज देतां येईल. त्यांना असें अज्ञानांतच डांबणें म्हणजे इतक्या बुद्धीला आमच्या देशानें मुकणें होय."*

५. धार्मिक मताचा व पूर्वपरंपरेचा पगडा भाण्डारकरांचे मनावर विलक्षण दिसतो. आणि त्यामुळें वैयक्तिक कर्तृत्वाची त्यांची कल्पना आधुनिक शास्त्राच्या कसोटीस उतरत नाहीं. सामाजिक अथवा राजकीय क्रांति घडवून आणण्याची शक्ति वाटेल तेव्हां, वाटेल त्यास असते असें त्यांचें मत दिसतें. ते म्हणतात, "फ्रेन्च रेव्होल्युशनची रीत आम्हांला नको आहे. इंग्रज लोकांनीं फ्रेन्च रेव्होल्युशननें झालेल्या कार्यासारखींच कार्यें करून दाखवितांना वर्तमान आणि भूत ह्यांची परंपरा राखिली आहे. आम्हींही तसेंच केलें पाहिजे."× म्हणजे कपडे पाहिजे त्या मापाचे तयार करितां येतात, तसेंच क्रान्तीचेंही आहे, असा डॉक्टर मजकुरांच्या म्हणण्याचा रोख दिसतो. वास्तविकरीत्या समाजांतील पिढ्यान-पिढ्या घडणाऱ्या घडामोडींचा परिणाम होऊन परिस्थित्यनुरूपच क्रान्तीची तयारी होत असते. ती स्वतंत्रपणें कोणास, मग तो कितीही प्रभावी असला तरी, 'करतां' येत नाहीं. असो. भाण्डारकरांच्या एकंदर दृष्टिकोणास धर्माचा चष्मा

* वैद्यः **प्रार्थनासमाजाचा इतिहास**, च. ले. पृ. ३१२—३

× **कित्ता** पृ. ३१४

कायमचा बसला असल्यानें त्यांच्या इतर थोडेंबहुत तर्कशुद्ध वाटणाऱ्या विचारांस 'शास्त्रीय' ज्ञानाची कसोटी लागत नाहीं.

६. भाण्डारकरांच्या विचारांची पाहाणी केल्यानंतर त्यांच्याच पंथांतील एका पुढाऱ्याच्या विचारसरणीकडे लक्ष पुरविलें पाहिजे. डॉक्टर भाण्डारकर व न्यायमूर्ति चन्दावरकर या दोघांमध्यें बरेंच साम्य आहे. दोघेही प्रार्थना-समाजाचे अभिमानी व दोघांवरही धर्माचा विलक्षण पगडा. सार्वजनिक आयुष्याला धर्माचें अस्तर आवश्यक आहे, असें दोघांनाही वाटे. चन्दावरकर म्हणतात, "आम्ही सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, धर्माच्या सुधारणेचा प्रश्न हा सर्व प्रकारच्या चळवळींना पायाभूत झाला पाहिजे, आणि लोकांच्या सुधारणेसाठीं त्यांच्या धर्मविषयक समजुतींत सुधारणा न करितां व धर्मास प्राधान्य न देतां दुसऱ्या मार्गानें प्रयत्न करणें म्हणजे विहिरींतून चाळणीनें पाणी काढण्याच्या प्रयत्नासारखें निष्फळ होणारें आहे."* असें असलें, तरी सर्वस्वीं शास्त्राधारावरच सदार ठेवून ते वागत नसत. प्रसंगविशेषीं शास्त्राज्ञा किंवा धर्मभावना यांविरुद्ध जाण्याची त्यांची तयारी असे. संमतिवयवादाचे वेळीं (१८९०–१) शास्त्राज्ञा धुडकून लावाव्या असेंच प्रतिपादन त्यांनीं केलें. ते म्हणत कीं, शास्त्रामध्यें कांहींही आज्ञा असल्या, पण त्या अमानुष आहेत, असें जर सिद्ध झालें, तर धर्माला धोका बसेल, ह्या ओरडीकडे लक्ष देणें हा अविचार आहे...आपला स्वतःचा अनुभव, आपला विवेक, आपली परिस्थिति, व प्रसंग ह्यांकडे पाहून जें न्याय्य, जें सत्य, तेंच आचरणांत आणिलें पाहिजे. मग मार्गामध्यें कशाही अडचणी आल्या तरी हरकत नाहीं.× केवल परंपरेच्या अभिमानाला चिकटून न राहातां परिस्थित्यनुरूप आचारांत बदल करण्याची त्यांची तयारी असल्यामुळें चन्दावरकर भाण्डारकरांहून अधिक बुद्धिवादी भासतात. ही त्यांची वृत्ति आणखीही एका ठिकाणीं व्यक्त झाली आहेः—"लोक काय म्हणतात त्याला भलतेंच महत्त्व देणें हा अविचार आहे. व्यक्ति-मात्राचा श्रेष्ठतम धर्म जो आहे, तो हाच कीं, पूर्ण विचार करून जें कांहीं

---

* वैद्यकृत **प्रार्थनासमाजाचा इतिहास**, च. ले. पृ. २३६

× द्वा. गो. वैद्यः **कित्ता** च. ले. पृ. २२९

आपल्याला योग्य, सत्य, न्याय्य वाटेल तें कर्तव्यबुद्धीनें आचरणांत आणावयाचें; मग त्याच्या योगें कोण राजी होतो व कोणाची इतराजी होते हा विचार मनांत आणावयाचा नाहीं. ह्यालाच म्हणतात नीतिधैर्य. कर्तव्य नीतिधैर्यावर अवलंबून असतें, व त्याच्याचमुळें मनुष्याला मानवजातीची सेवा करण्याचें व सत्यशोधन करण्याचें धैर्य प्राप्त होतें.''*

अंत्यजोद्धारासंबंधींचे त्यांचे विचारही असेच प्रगतिपर आहेत. 'सध्यांची परिस्थिति माणसामाणसांमधील भेदभाव नष्ट होणार, लवकरच नष्ट होणार असें सुचवीत आहे, आणि जरी आमच्या देशांतील श्रेष्ठकनिष्ठपणाचे भेद संपूर्णपणें नष्ट होण्याचें लक्षण आजच दिसत नाहीं, तरी हे निराश्रित लोक यापुढें मागच्याप्रमाणेंच अस्पृश्य, तिरस्कृत राहातील असें कोणीही समजूं नये,' असें चन्दावरकरांनीं स्पष्टपणें बजाविलें. परोपकार करण्यासाठीं म्हणून अस्पृश्योद्धार करावयाचा नसून अस्पृश्यांची उन्नति केल्यानें आपलीच उन्नति होणार, ही जाणीव ठेवण्यास ते बजावतातः—"आपल्या समाजांत अस्पृश्य आहेत तोंपर्यंत आपण अस्पृश्यच राहूं. ज्या समाजांत कित्येकांना कमी लेखण्यांत येतें, व त्यांची अस्पृश्य म्हणून गणना करण्यांत येते, तो समाज स्वतःचीच अवनति स्वतःवर ओढवून घेतो व अशानें अंतीं समूळ नष्ट होतो.''× अस्पृश्यांविषयींची ही भावना उदात्त नाहीं, असें कोण म्हणेल ?

सामाजिक बाबतींत इतके प्रगमनशील विचार प्रकट करणाऱ्या चन्दावरकरांचे राजकीय विचार पाहिले कीं हंसूं येतें. १८८५ सालीं पार्लमेन्टची पुनर्घटना व्हावयाची होती, तेव्हां इंग्लंडांतील मतदारांस हिंदुस्थानविषयक माहिती करून देण्याकरितां मुंबईतील कार्यकर्त्यांनीं त्यांना विलायतेस पाठविलें. त्यांच्या तेथील वक्तृत्वाच्या ओघांत जे विचार बाहेर पडले त्यांची मजल "निरनिराळ्या प्रांतांत मोठमोठ्या हुद्याच्या जागा हिंदी नसणारांस दिल्या आहेत व हिंदुस्थानवर विनाकारण खर्चाचें ओझें लादलें आहे, '' असें सांगण्यापलीकडे गेलेली दिसत नाहीं. त्यांच्या मनाचें हें मार्दव १८९६ सालीं

* वैद्यकृत **प्रार्थनासमाजाचा इतिहास,** च. ले. पृ. २३४-५

× **कित्ता** च. ले. पृ. २३३

कराची येथें भरलेल्या प्रान्तिक परिषदेच्या अध्यक्षस्थानावरून त्यांनीं केलेल्या भाषणांत पुनः एकदां प्रत्ययास येतें:—"आपलें कार्य, वस्तुस्थितीस धरून, नेमस्तपणानें आणि न्यायबुद्धीनें करण्यांत आपलें सामर्थ्य आहे, अशी आपणां सर्वांची समजूत आहे, असें मला वाटतें. राज्यकारभाराचा गाडा अडविणें किंवा स्वार्थी, अन्याय्य हेतूंनीं सरकारवर टीकेची झोड उठविणें, यांसाठीं आपण येथें जमलों नसून **आपला हेतु सरकारास सहाय्य करण्याचा आहे.**"* या उताऱ्यांत व्यक्त झालेली उत्कटता सरकारला पटली, हें त्यांच्या पुढील आयुष्यावरून सहज दिसून येईल. परंतु लोकमताला त्याची मातब्बरी वाटणें शक्य नव्हतें. सरकारी सभागृहांत त्यांचा सन्मान सारखा वाढत राहिला तरी लोकांच्या हृदयमंदिरांत त्यांना अवकाश नव्हता. आणि म्हणूनच लोकमतप्रवर्तक म्हणून त्यांना विशेषसें महत्त्व नाहीं.

---

× वैद्यकृत **प्रार्थनासमाजाचा इतिहास**, च. ले. २२४-५

# १२ विष्णुशास्त्री चिपळूणकर

१ प्रगतीचे सुशिक्षित विरोधक
२ इंग्रजांवर टीका करण्याचा हक्क
३ शहामृगी मनोवृत्ति
४ ब्राह्मण्याचा प्रखर अभिनिवेश
५ कार्यकर्त्यांची कुचेष्टा
६ 'शिवाजी'चा गनिमी कावा
७ शास्त्रीबुवांचें इंग्रजानुकरण
८ राज्यकर्त्यांवर टीका
९ कामगिरीचें मोजमाप

१. अव्वल इंग्रजी अमलांतील सुधारकांच्या सुधारणावादाचें निरीक्षण झाल्यानंतर त्या सुधारणांना विरोधक अशा प्रवाहांचा मागोवा आतां घेतला पाहिजे. जड पदार्थांचे बाबतींत न्यूटननें प्रस्थापिलेला 'इनर्शिया' चा सिद्धान्त सचेतन मानवी विचारांनाही बऱ्याच अंशीं लागू पडतो. विचारप्रवर्तक मंडळी प्रगतिपर किंवा निदान प्राप्त परिस्थितींत बदल सुचविण्याचा मार्ग समाजापुढें ठेवितात, तेव्हां त्यांना विरोध करण्यासाठीं कांहीं मंडळी पुढें सरसावतातच. वास्तविक, प्रगतीचा मार्ग सुचविणारे सुधारक व त्याला विरोध करणारे परंपराभिमानी यांमधील झगड्यांतूनच प्रगतीचा मार्ग निश्चित होत असतो. लोकहितवादी, डॉक्टर भाण्डारकर, न्यायमूर्ति रानडे अशांचे समाजसुधारणेचे प्रयत्न 'आस्तेकदम' वृत्तीचे असले तरी जुनाट लोकांस ते

मुळींच आवडले नाहींत. महाराष्ट्रांतील सुधारणेस सुरवात बाळशास्त्री जांभेकरांनीं केली. पण त्यासाठीं त्यांच्यामागें ग्रामण्याचा ससेमिरा लागला. पुढें लोकहितवादींनीं शतपत्रें लिहिलीं. त्याकरितां त्यांना ब्राह्मणांकडून शिव्याशाप तर मिळालेच; परंतु कोणा एका यथार्थवादीनें 'ज्ञानप्रकाश' मधून त्यांच्यावर टीकेची झोडही उठविली. १८६७ सालीं प्रार्थनासमाज स्थापन झाला, तेव्हांही 'ज्ञानप्रकाश' मधून बरीच प्रतिकूल टीका आली. १८६९ सालच्या पुनर्विवाहामुळें लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, न्या० रानडे वगैरे सुधारकांवर वाळीत पडलें व या विवाहांतूनच पुढें, १८७० सालीं 'वादा' चें प्रकरण उद्भवलें. सुधारक–विरोधकांचें हें द्वंद्व कसें सारखें सुरू होतें तें यावरून दिसून येईल. जुन्या परंपरेचें परिणामकारक समर्थन करून सुधारणावाद्यांची टर उडविणारा 'मराठी भाषेचा शिवाजी' या अवधींतच, १८५० मध्यें, जन्मला. मात्र त्याचें टीकास्त्र निबंधमालेंतून १८७४ सालीं सुरू झालें. म्हणजे प्रार्थनासमाजाची स्थापना झाल्यानंतर सात वर्षांनीं विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं आपल्या प्रभावशाली भाषाशैलीनें एकंदर सुधारणावृत्तीवर जोरानें आघात करण्यास आरंभ केला. तत्कालीन समाजांत पसरलेल्या कांहीं कल्पना भ्रामक व अयोग्य होत्या, म्हणून कांहीं सुधारकवर्गावर सरसहा तुटून पडण्याचें कारण नव्हतें. पण चिपळूणकरांचें वैशिष्ट्य हेंच कीं, ज्या ज्या सुधारणेला इंग्रजी संस्कृतीचा वास येत असेल तिला स्वसंस्कृतिविघातक म्हणून हाणून पाडण्याचा मनोमय प्रयत्न करणें. त्यांचें एकंदर लिखाण सात वर्षें जनतेपुढें परंपरेचा अभिमान उत्पन्न करण्यासाठीं एकसारखें येत होतें. राजकीय दृष्ट्या त्यांनीं विशिष्ट कार्य कोणतें केलें हें आज नक्की सांगतां येत नाहीं; तरीपण चिपळूणकरांनीं स्वदेशाविषयीं अभिमान जागृत केला एवढें निश्चित. वयाच्या बत्तिसाव्या वर्षीं ज्याचें अवतारकृत्य संपलें त्यानें, तेवढ्या अवधींत, हजारबाराशें पानें छापील मजकूर आजमितीसही अभ्यसनीय ठरावा अशा जोरदार भाषेंत लिहून ठेवावा, ही त्याची कर्तबगारी असामान्यच म्हटली पाहिजे.

२. जें जें स्वकीय तें तें टाकाऊ व जें जें परकीय किंवा पाश्चात्य-

प्रणीत तें तें ग्राह्य अशी विचारसरणी शास्त्रीबुवांचे वेळीं कांहीं अंशानें कित्येक सुशिक्षितांत व बऱ्याच अर्धशिक्षितांत पसरली होती खरी. पण स्वकीय व परकीय ज्ञानाचा तौलनिक अभ्यास करून ग्राह्यांश घेणाऱ्या विचारी पंडितांवर शास्त्रीबुवांनीं वरील विधानांतील आत्यंतिक आरोप करून त्यांची कुचेष्टा करण्याचा प्रयत्न (प्राचीन परंपरेचें रक्षण करण्याच्या हेतूनें कां होईना, पण) केला, हें आश्चर्य होय. शास्त्रीबुवांच्या वेळचा बहुतेक सर्व सुशिक्षित समाज दुर्वर्तनांत व बौद्धिक गुलामगिरींत गुरफटला होता, हें जरी खरें असलें तरी रानडे, भांडारकर प्रभृति थोर पुरुषांना त्या समाजाचें प्रतीक मानणें केव्हांही चूकच. अर्थात् शास्त्रीबुवांची सर्वच टीका या व्यक्तींना उद्देशून होती, असें म्हणणें जरी बरोबर नाहीं तरी त्या टीकेंतून तत्कालीन समाजानें तसा अर्थ काढला हें अगदीं खरें. शिवाय चिपळूणकरांची कांहीं कांहीं टीका उघडउघड व्यक्तिनिष्ठ होती. मात्र या सर्व टीकेच्या मुळाशीं त्यांचा प्रखर देशाभिमान व स्वसंस्कृतीविषयींचा कमालीचा आदर होता, हें विसरून चालणार नाहीं. तसेंच, ही सर्व टीका लिहितांना त्यांनीं विलक्षण धैर्य व निर्भय वृत्ति व्यक्त केली आहे. अर्थात् स्वजनांवर कलम चालविणें, हें एका अर्थानें सोपें काम आहे. प्रत्यक्ष अब्रुनुकसानी आल्याखेरीज सहसा कोणी शहाणा कार्यकर्ता कोर्टाची पायरी चढत नाहीं. शिवाय रानड्यांसारखे सुधारक शास्त्री-बुवांची टीका परतविण्याऐवजीं त्यांच्या अंगच्या गुणांचें कौतुक करण्यांतच अधिक निमग्न असत. परंतु ‘मऊ सांपडलें म्हणून कोंपरानें खणणाऱ्यांचें,’ अशा वृत्तीचे चिपळूणकर नव्हते. परकीय सरकारवर वेळप्रसंगीं तुटून पडण्यांत व इंग्रजांचे दोष दाखविण्यांत चिपळूणकरांनीं कमालीचें धाडस व मनाचा खंबीरपणा व्यक्त केला आहे. इंग्रजी अमलाचे दोष स्पष्टपणें लोकांस समजावून सांगणें हा आपला अधिकार असल्याचें ते बजावतात. "इंग्रज जसे देव नव्हेत, तसेच आम्हीही पशु किंवा राक्षस नाहीं. दोघांतही गुणदोष आहेतच आहेत; आणि त्यांविषयीं वाटाघाट करण्याचा अधिकार इंग्रज लोकांस जसा आहे तसाच तो आम्हांसही पण आहे."× एकेकाळीं समाजांत रूढ असलेला सर्वांगीण

× विष्णुशास्त्री चिपळूणकर: निबंधमाला पृ. [illegible]

इंग्रजी वर्चस्वाची ( खोटी ) समजूत निबंधमालाकारांनीं समूळ टाकून दिली. ते म्हणतात, “ सारें सत्य काय तें एका बुकांत सांठविलें आहे, व सारे मनुष्यजातीचे गुण जगन्नियंत्यानें एका राष्ट्रांत कोंडून भरले आहेत, हें मत आम्हांस बिलकूल पसंत नसून त्यासारखें मूर्खपणाचें व अधमपणाचें मत कोणतेंही नाहीं अशी आमची पक्की समजूत आहे. ”×

३. चिपळूणकरांचे पुढें लोकांत स्वाभिमान जागृत करणें एवढेंच ध्येय असावें, असें दिसतें. पण तसें करतांना समाजसुधारणेस विरोध करून राष्ट्राच्या सर्वगामी प्रगतीस विरोधक असा एक कायमचाच वर्ग आपण समाजांत रूढ करीत आहोंत, याची कल्पना त्यांना नसावी. त्यांची असामान्य बुद्धिमत्ता व इंग्रजी ग्रंथांचें त्यांचें ( विवक्षित क्षेत्रांतलेंच, पण ) दांडगें वाचन लक्षांत घेतां त्यांची बुद्धि सामाजिक बाबतींत नसली तरी, इतर बाबतींत व्यापक असावयास पाहिजे होती. परंतु ती तशी मुळींच दिसत नसून त्यांचा निराशावाद व जुन्याला बिलगून राहण्याची विलक्षण आवड, हीं मात्र ठिकठिकाणीं स्पष्ट दिसतात. “ येवढा अवाढव्य देश—ज्यांत आज लक्षावधि फेरफार होऊन गेले, ज्यांत हजारों तऱ्हेचे कोट्यवधि लोक आहेत, ज्याच्या प्राचीन इतिहासाची म्हणण्यासारखी माहिती कोणास कांहींच नाहीं—त्याच्या एकंदर स्थितीविषयींचे खात्रीचे विचार देऊन अमुक अमुक मात्रा द्या म्हणजे त्याचा रोग हटून, त्यास खचीत आराम पडेल असे अभिप्राय देणें म्हणजे केवढें साहसाचें काम आहे ? ” * अशा प्रकारचे एक प्रकारें दर्पोक्तीचे पण वस्तुतः हताशपणाचे उद्गार निबंधमालाकारांनीं काढले. याच विचारांची पुनरावृत्ति त्यांच्या लिखाणांत अनेक वेळां झालेली आढळते. इतकेंच काय, पण आपल्या समाजास किंवा देशास कुठलाच रोग जडला नाहीं असें प्रस्थापित करण्यापर्यंत त्यांची मजल गेली आहे ! “ पूर्वी कधींही पडली नव्हती अशी परकी अंमलाची जबरदस्त मगरमिठी त्यावर (हिंदुस्थानवर) एकाएकीं येऊन पडल्यामुळें त्याची हालचाल अगदीं बंद झाल्यासारखी बाह्यतः दिसते खरी, व इतक्या

× वि. कृ. चिपळूणकर : **निबंधमाला**, पृ. ६५९

* **कित्ता** पृ० ३३६

दिवसांच्या निश्चेष्टतेनें त्याच्यावर पुष्कळ ग्लानि आली आहे हेंही खरें; **तरी एकंदरींत पाहातां आंतल्या शरीरप्रकृतीस कांहीं धक्का पोंहचला आहे असें आम्हांस वाटत नाहीं.**"* दुसऱ्या एका ठिकाणींही अशाच प्रकारचे विचार आढळतात. "पाश्चात्यांनीं इकडील कारागिरी नेऊन तिकडे कारखाने सुरू केले व म्हणून इकडील उद्योगधंदे बसले" अशीं कारणें सांगून विष्णुशास्त्री म्हणतात, "एकंदरींत पाहतां आमच्या बुद्धीचा असा पक्का निश्चय आहे कीं, **आमचे पूर्वींचे सर्व गुण आमच्या ठिकाणीं अद्याप कायम आहेत.** इतकेंच कीं भस्माच्छादित अग्नीप्रमाणें किंवा गंजलेल्या तरवारीप्रमाणें त्यांची हल्लीं स्थिति झाली आहे."† यांतील आत्मविश्वास प्रखर असला तरी तो वस्तुस्थितीस मुळींच धरून नसल्यानें दोषास्पद ठरतो. आणि अशी मनोवृत्ति झाल्यावर प्रगतीची आशाच सोडावी लागते. तौलनिक अभ्यासाचा (अर्थात् चिपळूणकरांच्या अभ्यासाला हें विशेषण लावणें कितपत योग्य आहे हा प्रश्न आहे,) परिणाम चिपळूणकरांचा हा नैराश्यवाद वाढविण्यासच उपयोगी पडला आहे. ते म्हणतात, "आमच्या देशाचा अवाढव्य विस्तार व त्याचें अत्यंत प्राचीनत्व या दोन गोष्टींचाच विचार केला असतां कोणासही कळून येईल कीं त्यास सध्यां जी स्थिति प्राप्त झाली आहे तिची उपपत्ति करण्यास केवळ आमच्या नैसर्गिक मूर्खत्वाकडेच गेलें पाहिजे असें नाहीं."× यावरून निबंधमालाकार विचारप्रवर्तक उपपत्ति सांगणार आहेत अशी अपेक्षा मात्र करूं नये. त्यांचें म्हणणें अगदींच निराळें आहे. "मोठमोठीं शहाणींसुर्तीं राष्ट्रें यापूर्वीं मोठ्या उत्कर्षाला चढून कालेंकरून पार लयाला गेलीं आहेत; व या घटकेपर्यंतही मोठ्या अट्टल शहाण्या राष्ट्रांचीही वेळोवेळ अक्कल गुंग होऊन फटफजिती उडालेली आहे...मग साऱ्या पृथ्वींतील राष्ट्रांस ज्या गोष्टी लागू, व जें अल्पदृष्टित्व मनुष्यधर्मासच खिळलेलें, त्या सर्वांबद्दल एकट्या हिंदुस्थानातच

---

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला,** १०६५

† **कित्ता** पृ. १०६९–१०७०

× **कित्ता** पृ. १०७९

मूर्खत्वाचा आरोप करणें हें केवढें अज्ञान होय!"* कालावर सर्व जबाबदारी टाकण्याचा व आत्मनिरीक्षण न करण्याचा हा आग्रह कितपत प्रगतिपर किंवा त्याचें महत्व तरी किती मानावें हें आतां उघड करून सांगण्याचें कारण नाहीं. ऐतिहासिक घडामोडीकडेसुद्धां निर्मळ दृष्टीनें पाहाण्याची चिपळूणकरांची तयारी नाहीं. "येवढा बुद्धाचा धर्म कीं अवघ्या मानव जातीच्या एका अर्धावर ज्याचा आज अंमल आहे, तो या भरतखंडावर प्रथम पसर पसर पसरला, पण शेवटीं नद्यांच्या वर्षाकालीन पुराप्रमाणें पार सारा ओसरून गेला. येवढा अरबस्थानच्या पैगंबर साहेबांचा धर्म, कीं ज्यानें एका अर्ध्या शतकांत एकीकडे फ्रान्स व स्पेन आणि दुसरीकडे इराण व हिंदुस्थान पाहिलें, पण या देशांत कित्येक शतकें बादशाही अंमलानें चालूनही त्याच्यापासून **हिंदुधर्मास पाहिलें तर काडीइतकाही धक्का पोंहचला नाहीं;** औरंगजेबासारखे, टिप्पूसारखे एक एक मी मी म्हणणारे करडे इमाम होऊन गेले, पण त्या सर्वांचें बारसें व बारावा हीं दोन्ही वैदिक धर्माच्या लोकांनीं पाहिलीं! पिता, पुत्र व पवित्र आत्मा या त्रिकूटानेंही आजपर्यंत येथें जंगजंग पछाडले, पण कांहींएक झालें नाहीं; व इतःपर तर पाद्री साहेबांचा उद्योग दिवसांदिवस अरुण्यरुदितवतच होऊं पाहत आहे. "† भाषासौंदर्याच्या दृष्टीनें ह्या लिखाणांत रमणीयता व श्रवणमाधुर्य असलें, तरी त्यांत सत्यापलापच अधिक असल्यानें त्याची किंमत मुळींच ठरत नाहीं. शास्त्रीबुवांना बुद्ध, इस्लामी, ख्रिस्ती संस्कृतींच्या हल्ल्यांपासून हिंदुधर्माचें कांहीं नुकसान झालें नाहीं, असें वाटत असेल, तर त्यांच्या बुद्धीला व व्यासंगाला तो मोठाच उणेपणा म्हणावा लागेल. परंतु बुद्धीपेक्षां तो दृष्टीचाच दोष आहे, असें मानल्यास निबंध-मालाकार पक्षाभिनिवेशानें अंध होतात असा आरोप येतोच.×

---

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला**, पृ. १०७९

* **कित्ता** पृ. ११५३—११५४

† चिपळूणकरांचे राजकीय विचार स्पष्ट दर्शविणारा राजकीय निबंध सध्यां उपलब्ध नसला तरी त्यांचीं एतद्विषयक मतें वेगळीं असतील असें मानण्याचें कारण दिसत नाहीं. "आमच्या देशाची स्थिति" हा निबंध लिहिल्यानंतर तीस वर्षांनीं तो सरकारी दृष्ट्या आक्षेपार्ह ठरला असला तरी त्यांतील शास्त्रीबुवांचीं मतें त्यांच्या

४. चिपळूणकरांच्या मनोभूमिकेची साधारण ओळख एवढ्यावरून होण्यास हरकत नाहीं. आर्यसंस्कृतीवर असलेल्या अढळ निष्ठेचें व ब्राह्मण्याच्या जाज्वल्य अभिमानाचें प्रतिबिंब त्यांच्या प्रत्येक लिखाणांत आढळतें. ब्राह्मणांवर लोकहितवादींनीं हल्ला चढविला त्याचें स्वरूप यथास्थल दर्शविलेंच आहे. परंतु चिपळूणकरांस (सुमारें पाव शतकानंतर, लोकहितवादींच्या निबंधसंग्रहाचें समीक्षण करण्याच्या निमित्तानें,) त्याचा समाचार घेण्याची हुरहुरी आली व अत्यंत गर्विष्ठपणानें ब्राह्मणांच्या वर्चस्वाचें समर्थन निबंधमालाकारांनीं केलें. तें असें—

"ब्राह्मण कितीही लबाड असले व कितीही दुष्ट असले तरी एक गोष्ट निर्विवाद आहेः—कीं ज्ञानभांडाराच्या किल्ल्या त्यांच्या कमरेला आहेत. **त्यांच्या साह्याशिवाय इतर ज्ञातीस ज्ञानाचा लाभ होण्याचा बहुधा मुळींच मार्ग नाहीं.** पाद्रीसाहेब हजारों रुपये खर्च करून बळीच्या राज्यांतून किंवा चन्द्रलोकावरून इकडे येवोत, व शूद्रांस विद्या पढविण्याविषयीं पाहिजे तितकी खटपट करोत, पण भटांनीं कामांत पडल्यावांचून तें बिलकुल सिद्धीस जावयाचें नाहीं." * अहंकाराची भावना यांत इतकी भरली आहे कीं चिपळूणकरांसारख्या विद्वद्वर्यानें हें विधान केलेलें पाहून, खरें बोलावयाचें तर, त्यांचेबद्दलचा आदर कमी होतो. लोकहितवादींवर आग पाखडण्यांत चिपळूणकरांना नुसता परंपरेचा खोटा अभिमानच होता असें नसून जात्यभिमानाच्या संकुचित वृत्तीसही ते बळी पडलेले दिसतात. ते लिहितात, "ज्या बेट्या परद्वीपस्थ लोकांस इकडची उगच उडत उडत माहिती सुद्धां पुरती मिळत नाहीं, व स्वाभिमानास अगर धर्माभिमानास पेटून जे निरर्गल प्रलाप करतात, त्यांची एक गोष्ट असो; किंवा जे जेथल्या तेथें मोट हाकायाची सोडून किंवा भांडीं ठोकायाचीं सोडून बारा पिढ्यांत न घडलेल्या

---

इतर लिखाणाहून अगदींच भिन्न असतील असें नव्हे. उपलब्ध नसलेल्या निबंधांतील विषयाची व त्यांत प्रगट केलेल्या विचारांची कल्पना येण्यास अन्यत्र आलेले विचारच उपयोगी पडतील. कारण वर उद्धृत केलेलीं अवतरणें आक्षिप्त निबंध लिहिला त्याच वर्षांतलीं आहेत.

† वि. कृ. चिपळूणकर; **निबंधमाला** पृ. १०२४–५

साक्षरत्वसंस्कारास पात्र झाल्यानें पोप कवीनें वर्णिल्याप्रमाणें ज्यांच्या ठायीं विद्यारूप वारुणीच्या पहिल्या झुरक्याचा पूर्ण अंमल ( intoxication of the brain ) नजरेस पडतो, त्यांची गोष्ट एकवेळ राहूंद्या; **पण वाग्देवीचें माहेरघर म्हणून आज सहस्रावधि वर्षें नाणावलेल्या अत्युच्च वर्णांत जन्म झाला असून** व बुद्धीस वैशद्य आणणारी जी पाश्चात्य विद्या तिचाही पुष्कळ संस्कार घडला असून ज्यांस आपल्या देशांत निंद्यतेचा प्रकार जिकडे तिकडे दृष्टीस पडतो...त्यांची शहामत केवढी म्हणावी ! "* विद्वत्ता असूनही तिचा उपयोग प्रगतिपर विचार पसरविण्याकडे न करतां उलट अनिष्ट अशी विचारसरणी फैलावण्यांत केलेला पाहून एकप्रकारचा उद्वेग वाटतो. वस्तुस्थितीचा विपर्यास करण्यांत, स्वतःपुढें इतरांस कःपदार्थ मानण्यांत आणि जुनें असेल त्याचेंच समर्थन करण्यांत शास्त्रीबुवांनीं आपली सर्व मेहनत व विद्वत्ता खर्च केली, हें पाहून वाईट वाटतें.

५. देशसेवेला निरनिराळ्या मार्गांनीं उद्युक्त झालेल्यांचे प्रयत्न सुद्धां चिपळूणकरांना नुसते उपेक्षणीयच वाटले असें नव्हे, तर त्यांची टर उडविण्यास देखील त्यांनीं कमी केलें नाहीं. " आलीकडे तीनचार वर्षांत तर जिकडे तिकडे अशी विलक्षण गडबड होऊन गेली आहे कीं, ज्याला त्याला असें वाटूं लागलें आहे कीं, हा आमचा देश एकदांचा परमोत्कर्षाच्या स्थितीस येऊन पोंचतो कसा ! मग काय; कोणी कलाकौशल्य हातीं घेतलें, कोणी धर्माची सुधारणा करण्याचें पतकरलें, कोणी नवे माग तयार करून म्यांचेस्टर बरोबर टक्कर मारण्याकरतां कंबर बांधली, कोणी पाहिलें कीं इंग्लंड्ची जी येवढी सुधारणा झाली आहे ती केवळ वक्तृत्वामुळें झाली आहे, तेव्हां 'वक्त्यांचे वर्ग सुरू करूं या !' "† कुचेष्टा करण्याचा अनावर मोह शास्त्रीबुवांस झालेला येथें स्पष्ट दिसतो. ते स्वतः या दिशेनें प्रयत्न करीत नव्हतेच, पण इतरांनीं केलेले प्रयत्नसुद्धां त्यांना रुचले नाहींत. इतकेंच नव्हे, तर अशा कार्यकर्त्यांची तंगडीतोड मात्र त्यांनीं आपल्यापरीनें होईल तितकी केली. शैक्षणिक

---

* वि. कृ. चिपळूणकरः **निबंधमाला** पृ. ११७७

† **कित्ता** पृ. २९३--२९४

अथवा औद्योगिक क्षेत्रांतही झालेला फेरबदल त्यांना रुचला नाहीं. मग धार्मिक सुधारणा तर सुतराम् नाहीं. प्रार्थनासमाजावर व इतर नवधर्मपंथियांवर संधि साधेल तेव्हां आपल्या टीकेचें गरळ ओकण्यास त्यांनीं मागें पुढें पाहिलें नाहीं. विषय कुठलाही असो त्यांत विषयांतर झालें असें भासवूं न देतां वेळोवेळीं सर्व सुधारकांवर, विशेषतः प्रार्थनासमाजानुयायांवर त्यांनीं आग पाखडली आहे. त्यांच्या टीकेचा रोख युक्तिवाद करण्याचा मुळींच नसून भलत्याच गोष्टीवर भर देऊन कुचेष्टा करण्याचा असल्यानें, तत्कालीन समाजांत निबंधमाला लोकप्रिय झाली. पण वाटेल त्यावर लेखणी चालविणाऱ्या चिपळूणकरांना खडसावून विचारणारा एक " हितेच्छू " त्या वेळींच त्यांस भेटला असें निबंधमालेंतीलच एका पत्रावरून दिसतें. "आलीकडील सुधारणुकेच्या ज्या कितीएक पद्धति निघाल्या आहेत त्यांचीं कारणें, त्यांतील वास्तविक गुणांचा अंश, व पुढें होणारा परिणाम, या सर्व गोष्टींकडे ' मार्मिक ' लक्ष न पुरवितां त्यांची केवळ विटंबनाच करण्यांत तुम्हांस मोठें भूषण किंवा मौज वाटते याचें मला मोठें आश्चर्य वाटतें...तुमचा एकंदर विषयप्रतिपादन करण्याचा प्रकार पाहिला तर वृथा डौल घालण्याविषयीं जो दोष तुम्हीं इतर सुधारणा करूं इच्छिणारांस लावतां तोच तुमच्यावरही येऊं पाहातो."* असला स्पष्टवक्तेपणा त्यावेळीं प्रगट झाला, हें एका दृष्टीनें अभिमानास्पद होय. तसेंच त्यावरून, आणि विशेषतः निबंधमालाकारांनीं त्या पत्रास आपल्या मालेंत जागा देऊन आक्षेपकांचें म्हणणें खोडून काढण्याचा प्रयत्न केला, त्यावरून बऱ्याच विचारवंतांना निबंधमालेची चावरी वृत्ति पसंत नसावी असें अनुमान काढतां येतें. हितेच्छूनें व्यक्त केलेले विचार समतोल बुद्धीनें लिहिले असून त्यांत गैर असें कांहींच नाहीं. चिपळूणकरांच्या टीकावृत्तीस त्यानें असें उत्तर दिलें आहे कीं त्याची निराळी तरफदारी करण्याचें कारणच पडूं नये. शास्त्रीबुवांच्या टीकेचा रोख इकडील समाजानें ख्रिस्तदासांचें अनुकरण केलें यावर अधिक होता. परंतु हें अनुकरण किंवा इंग्रजी संस्कृतीची आमच्या आचारविचारांवर पडलेली छाप कार्यकारणपरंपरेंत अपरिहार्य अशीच असतां तिजवर सरहा टीकेचा भडिमार करीत राहाणें हाच

---

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला**, पृ. ३३२

मार्ग विष्णुशास्त्र्यांनीं स्वीकारला. या बाबतींत 'हितेच्छु'चें म्हणणें किती विचारपूर्वक आहे पहा. " एकाद्या नष्ट दशेस आलेल्या देशाची उत्तम सुधारलेल्या देशाशीं एकदम गांठ पडली असतां अशा तऱ्हेचा फेरफार होणें हें अगदीं साहजिक आहे. हा सर्वच फेरफार सर्वांशीं चांगला असें तर कधींच होत नाहीं. व सुधारणेच्याही अनेक पद्धति प्रचारांत येऊन नष्ट होतां होतां कांहीं काळानें निकृष्ट प्रतीच्या देशास बऱ्या प्रकारची स्थिरावस्था येते." * हे विचार सयुक्तिक असतां चिपळूणकरांनीं त्यांकडे विशेष लक्ष दिलें नाहीं. मात्र दुर्लक्ष झालें असेंही भासविलें नाहीं.

६. मुद्देसूद वादविवाद करणें किंवा प्रतिपक्षियांचें म्हणणें सप्रमाण खोडून काढणें चिपळूणकरांच्या लेखणीस कधींच रुचलें नाहीं. समोरासमोर हल्ला न करतां हे 'मराठी भाषेचे शिवाजी' शिवछत्रपतीप्रमाणेंच गनिमी काव्याची लढाई देतात, हें साम्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. प्रार्थनासमाज हा कित्येक विचारवन्त सुधारकांनीं एकत्र येऊन, आपल्या धर्मांत सुधारणा हवी असें ठरवून, प्रार्थनेचा पंथ म्हणून काढला. तर्कबुद्धीस न पटणारे असे कांहीं उद्देश व मार्ग त्यांत असतील हें खरें, पण ते दोष कोणाचे अथवा त्या ऐवजीं कोणते मार्ग स्वीकारावे हें न सांगतां शास्त्रीबुवांनीं गनिमी काव्याचा हल्ला चढविला. "ज्यांचा जन्म वेदशास्त्रादिकांचा निवळ अज्ञानानें व दुराग्रहानें उपहास करण्यांत गेला, ज्यांस या देशांत नुसतें बरें म्हणण्याजोगतेंही आजपर्यंत कांहींच दिसलें नाहीं, वैदिक मार्गाचा उत्कर्ष करण्याची ज्यांची इच्छा तर अशी प्रबळ आहे कीं, तो सगळा एकीकडे गुंडाळून ठेवून किंबहुना त्याचा उच्छेद करून डोळे मिटण्याचा व गाणें बजावणें करण्याचा धर्म चोहोंकडे फैलावण्याचा ज्यांचा यत्न सतत चालू आहे,"† अशीं विशेषणें प्रार्थनासमाजिस्टांना चिपळूणकरांनीं लाविलीं. वास्तविक पहातां प्रार्थनासमाजाचा कटाक्ष मूर्तिपूजेवर व देवता-बाहुल्या-वर आहे. प्रार्थना करतांना तंबोऱ्याची सांथ घेणें किंवा डोळे मिटणें हे दुय्यम प्रकार आहेत. पण त्यांचा विपर्यास किती विलक्षण केला आहे

---

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला**, पृ. ३३३

† **कित्ता** पृ. ३१६

पहा. न्यायमूर्ति रानडे किंवा डॉक्टर भाण्डारकर हे प्रार्थनासमाजाचे अध्वर्यु असतां त्यांचा जन्म वेदशास्त्रादिकांचा निव्वळ अज्ञानानें व दुराग्रहानें उपहास करण्यांत गेला असें म्हणणें सत्यास कितपत धरून आहे, हें ज्याचें त्यानेंच ठरवावें. चिपळूणकरांच्या लिखाणांत हाच विशेष वारंवार आढळतो व त्यांतील विपर्यासामुळें त्याचा तिरस्कार वाटूं लागतो. जुनीं मतें असणें किंवा सुधारणेला विरोध करणें यांत गुन्हा—वैयक्तिक स्वरूपाचा गुन्हा—नाहीं. पण मुद्दाम वस्तुस्थितीचा विपर्यास करणें व ती विकृत स्वरूपांत लोकांपुढें मांडणें हें खरोखर अक्षम्य होय. आणखीही एकदोन उदाहरणांवरून चिपळूणकरांची विपर्यास करण्याची पद्धति व मूळ मुद्दा डावलून लावण्याची कला अधिक स्पष्ट होईल. लोकहितवादींचा ब्राह्मणांवरील अर्थाशिवाय मंत्रपठण करण्याचा साधा आरोप खरा असतां निबंधमालाकारांनीं तो परतविण्यासाठीं किती शब्दच्छल, किती मुद्देसांड केली, तें पाहाण्यासारखें आहे. आणि हें सर्व करूनही त्यांनीं बरोबर उलटी कोलांटी घेतली आणि देशमुखांच्याच युक्तिवादाचा अवलंब केला ! " 'ब्राह्मणेन षंडगो वेदो निष्कारणोऽध्येयो ज्ञेयश्च (ब्राह्मणानें निरिच्छतेनें षडांगसहित वेदाचें अध्ययन करावें व त्याचा अर्थ समजून घ्यावा ) अशीं वचनें आढळतात खरीं; पण...श्रुतीच्या कितीही आज्ञा असल्या तरी प्रस्तुत काळाच्या संबंधानें त्यांजविषयीं विचार केला पाहिजे हें उघड आहे. "*

प्रस्तुत काळासंबंधानें विचार करावयास हवा हें जर खरें, तर तो करूनच लोकहितवादींनीं सदर आरोप केला असतां त्यांजवर इतका गिल्ला माजविण्याचें काय कारण ? वेदग्रंथ आतां छापील मिळत असतां "भारवाहकांनीं तो भार आतां जिव्हाग्रीं वागविण्याचें" काय प्रयोजन ? असाच सवाल प्रस्तुत कालाचा विचार करून लोकहितवादींनीं केला होता. याही पुढें जाऊन लोकहितवादी म्हणतात "ब्राह्मण लोकांनीं आतां अर्थावर चित्त द्यावें. केवळ पाठ म्हणणें यांत कांहीं फळ नाहीं."† कारण अर्थावांचून पाठ करण्यानें काय फायदा आहे ? नुसतें पाठांतर किती कुचकामी असतें याची कल्पना देतांना लोकहितवादी म्हणतात, "सडकेवर माती वाहण्याची मजुरी आणि स्तोत्रपाठ सारखाच आहे."×

---

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला**, पृ. ११५८

† लोकहितवादी: **शतपत्रें**, नं. ६३

× **कित्ता** नं. ६९

एवढ्यावरच चिपळूणकरांची मजल थांबत नाहीं. सुधारकांच्या व इतर देशसेवकांच्या सद्धेतूंचीही ते शंका घेतात. दयानंद सरस्वती म्हणजे आर्य-समाजाचे संस्थापक, कीं ज्यांच्या गाढ्या विद्वत्तेबद्दल व सूक्ष्म वेदाध्ययनाबद्दल कोणीच शंका घेण्याचें कारण नव्हतें; त्यांच्याबद्दल चिपळूणकरांनीं वेळीं अवेळीं निबंधमालेंतून काढलेले उद्गार अत्यंत अनुदार असून, कित्येक वेळीं तर सदभिरुचीचा भंग करणारे आहेत. "एकंदरींत त्यांच्या अंगलोटावरून पाहातां व 'सुखार्थिनः कुतो विद्या कुतो विद्यार्थिनः सुखम्' या अनुभविक वचनाकडे किंचित् लक्ष दिलें असतां, स्वामींचे दिवस शास्त्राध्ययनांत कितीसे गेले असतील याची कोणासही सहज कल्पना होणार आहे!"* हे दयानंद म्हणजे "वाराणशी क्षेत्रांतील कैक रथीमहारथींशीं चार तास एकटे उभे राहून वादविवाद करणारे व केवळ नांवाला पराभव पावलेले"† असे. हा वादविवाद १८६९ मध्यें झाला असल्यानें त्याची गंधवार्ताही निबंधमालाकारांस कळली नसेल असें कसें म्हणावें? (बाकीं, ज्यांचें वर्तमानपत्रांचें वाचन उभ्या आयुष्यांत 'ज्ञानप्रकाशा'पलीकडे गेलें नाहीं, त्यांचें या बाबतींतलें अज्ञान आश्चर्यमय नव्हेच!) आणि काशी क्षेत्रांतील पंडितांशीं गीर्वाण भाषेंत एकट्यानें चार तास वाद केला, तरी सुद्धां त्यांची विद्वत्ता 'शंकनीय' अशी चिपळूणकरांना वाटावी हा दोष कोणाचा? परंतु याही पलीकडे जाऊन ग्राम्य आरोप करण्यास ते डगमगले नाहींत. (निबंधमाला पृ. ३४७–८ हीं पहा.) आणि तेसुद्धां प्रार्थनासमाजी लोकांवर! खरी गोष्ट स्पष्टपणें लिहिण्यास चिपळूण-करांनीं कमी केलें नसतें. पण सूचित भाषेंतच हे आरोप आहेत, तेव्हां ते शास्त्रीबुवांच्या कल्पनाजालांतूनच निघाले असले पाहिजेत.

७. शास्त्रीबुवांचा विषदिग्ध प्रतोद तत्कालीन समाजांत फैलावलेल्या इंग्रजानुकरणावर विशेष चाले. पण आश्चर्य हें कीं स्वतः ते या अनुकरणापासून पूर्णपणें अलिप्त नव्हते. चिपळूणकरांची दृष्टि अंतर्मुख असती, त्यांनीं स्वतःच्या लेखनपद्धतीकडे व विचारपद्धतीकडे चिकित्सक बुद्धीनें पाहिलें असतें तर हा अन्तर्विरोध ध्यानांत यायला फार वेळ लागला नसता. मूळ निबंधमाला ज्या

---

* **कित्ता** पृ. ६३०

† **महाराष्ट्र सांवत्सरिक** १९३३, पृ. १७१

उद्देशानें निघाली तो भाषासंवर्धनाचा उद्देश तडीस नेतांना निबंधमालाकारांनीं अनुकरणाचाच मार्ग स्वीकारला. चिपळूणकरांपूर्वीं मराठी भाषेला अवकळा आली होती. महाराष्ट्राची सर्वांगीण सुधारणा करूं इच्छिणाऱ्या तत्कालीन विद्वानांना मराठी मायबोलीची ही दुःस्थिति दिसत नव्हती. इंग्रजींत ग्रंथरचना करण्यांतच ते स्वतःला धन्य मानीत. जे कोणी स्वभाषेंत लिहीत त्यांची मजल भाषांतरें आणि बालबोध गोष्टी यांपलीकडे गेली नव्हती. स्वकीय आणि परकीय विद्वानांच्या उपहासाला पात्र झालेली ते वेळची मराठी भाषा महाराष्ट्राच्या पडत्या परिस्थितीचें केवळ प्रतीक होती. या अवनत आणि अवमानित भाषेला चिपळूणकरांनीं आपल्या प्रभावी लेखनशैलीनें जगांतील थोर भाषांच्या पंक्तीस नेऊन बसविलें. पण ही कामगिरी बजावतांना अनुकरणाचा अवलंब शास्त्रीबुवांनीं अगदीं निःसंकोच केला. चिपळूणकरांच्या लेखनपद्धतीवर ॲडिसन आणि मेकॉले यांची छाप किती जबरदस्त होती तें महशूरच आहे. इंग्रजी गद्यवाङ्मयांत ॲडिसनचें स्थान वैशिष्ट्यनिदर्शक असेंच आहे. त्यानें इंग्रजी निबंधवाङ्मयाचा पाया घातला. खुसखुशीत विनोद व मनोरंजक नीतिबोध यांचा मनोहर संगम ॲडिसनच्या वाङ्मयांत आढळतो. चिपळूणकरांनीं ॲडिसनचें अनुकरण बरेंच केलें. 'इतिहास', 'वाचन', 'लोकभ्रम', 'ग्रंथांवर टीका', 'संपत्तीचा उपभोग' वगैरे निबंधमालेंतील प्रथमप्रथमच्या निबंधांत हें अनुकरण विशेष प्रत्ययास येतें. केसरींतील बहुतेक सर्वच निबंध ॲडिसनच्या वळणावर गेले आहेत. असें असलें, तरी मेकॉले हाच शास्त्रीबोवांचा विशेष आवडता ग्रंथकार होता. त्यांनीं मेकॉलेच्या डौलदार व जोरकस भाषाशैलीचें भरपूर अनुकरण केलें. "मेकॉले हा विद्वान् परंतु उथळ, रसिक परंतु दुराग्रही, विचारी परंतु विकारवश आणि शिष्ट परंतु निंदखोर असा प्रतिभाशाली लेखक होता. मेकॉलेचे हे बहुतेक सर्व गुणावगुण चिपळूणकरांच्या लिखाणांत उतरले आहेत."* मेकॉलेचें हें अनुकरण नुसत्या लेखनशैलीवरच थांबलें नाहीं. आपलीं काव्यविषयक तत्त्वेंही त्यांनीं मेकॉलेपासूनच उचललेलीं दिसतात. 'सुधारणेच्या

---

* ग. त्र्यं. माडखोलकर. **विष्णु कृष्ण चिपळूणकर.** पृ. २८ श्री. माडखोलकर यांनीं चिपळूणकरांची ॲडिसन, मेकॉले, जॉनसन वगैरे ग्रंथकारांशीं केलेली तुलना मननीय आहे.

प्रगतीबरोबर कवितेचा अपकर्ष होतो,' 'अर्धवट सुधारलेल्या लोकांचें वाङ्मय कवित्वरूपानें प्रकट होतें,'—असले भ्रामक सिद्धान्त शास्त्रीबुवांनीं मोठ्या तन्मयतेनें स्वीकारले, या गोष्टीचें नवल वाटतें. परंतु एवढ्यावरच काय? मेकॉलेच्या दोषांचेंही त्यांनीं निरपवाद ग्रहण केलें; व जेव्हां जेव्हां त्यांच्या लेखनपद्धतीवर आक्षेप आले तेव्हां तेव्हां त्यांनीं मेकॉलेकडे अंगुलिनिर्देश केला.† मेकॉलेच्या चावऱ्या वृत्तीचा व डौलदारपणाचा उल्लेख त्यांनीं आपल्या 'इंग्रजी भाषा' या निबंधांत केला असला तरी त्यांनीं या दोषांना कांहीं अंशानें गुणांचेच अनुषंगी मानिलें. "जो ग्रंथकार वाचकांस नेहमींच रंजवूं पाहील व त्यांस नेहमीं थक्क करून टाकण्याचा प्रयत्न करील त्यास निव्वळ सत्यालाच अनुसरून चालणें उपयोगी पडणार नाहीं. मीठमिरचीचा सांठा त्यास आपणापाशीं नेहेमीं भरपूर ठेवावा लागेल."* अर्थात् हें समर्थन पुष्कळांशीं आत्मनिष्ठच आहे. मेकॉलेवरील आपलें भाष्य आपणांसच पूर्णपणें लागू पडतें, हें शास्त्रीबुवांना समजलें असतें तर "मेकॉलेच्या ग्रंथांत असणाऱ्या या महादोषास्तव त्याचें वजन आजलाही पुष्कळ कमी झालें आहे,"* असे उद्गार त्यांनीं खचित काढले नसते.

हे दोष वगळले तर शास्त्रीबुवांचें हें अनुकरण मराठी भाषेला उपकारक असेंच झालें. आणि चिपळूणकरही त्याकडे कौतुकानें पहात असावे. अर्थात् हें लेखनशैलींतील अनुकरण म्हणजे इंग्रजी चालीरीतींचें अनुकरण नव्हे; तें हिंदु संस्कृतीला विघातक ठरत नाहीं, असा युक्तिवाद करून शास्त्रीबुवांचें समर्थन करणें शक्य आहे, आणि तें बरोबरही आहे. कारण, शास्त्रीबुवांचा कटाक्ष इंग्रजानुकरणावरच केवळ नसून त्या अनुकरणानें फैलावलेल्या आचारविचारांवर विशेष आहे. परंतु आचारविचारांत तरी चिपळूणकर पूर्णपणें 'सोंवळे' होते काय? त्यांचे 'संपत्तीचा उपभोग', 'लोकभ्रम' वगैरे निबंध काय दर्शवितात? विष्णु कृष्णांची सुधारकी बुद्धि त्यांत प्रतीत होत नाहीं का? त्यांचे वेळीं महाराष्ट्रांत जी एक विचारांची खळबळ चालली होती, तिच्याच लहरी त्या निबंधांत उठल्या होत्या, असें नव्हे काय? वेळप्रसंगीं आपणही सुधारक होऊं

† वि. कृ. चिपळूणकर, **निबंधमाला**, पृ. ३४७.

* **कित्ता** पृ. ५७०

शकतों एवढें दाखविण्यासाठींच तर नाहींना त्यांनीं ते निबंध लिहिले ? त्या निबंधांतून चिपळूणकरांनीं लोकांच्या वेडगळ समजुतींवर सणसणीत कोरडे तर ओढलेच; परंतु सनातन्यांचें डोकें उठवील असेही विचार प्रगट केले. जातिभेदाविषयींचे त्यांचे विचार पाहा. "आमच्या देशांत जन्मभूमीचा अभिमान शिथिल होण्यास या राष्ट्राचें विस्तीर्णत्व व जातिभेद हीं दोन मोठीं कारणें झालीं आहेत+++दुसरा प्रकार जातिभेदाचा. यानें तर राष्ट्राची फूट अतिशयच पडली आहे. अठरापगड जातींस अठरा टोपकरांनीं गुंडाळून टाकलें, व साऱ्यांच्या हातीं सारखीच करवंटी दिली; पण लोकांचे डोळे अजून उघडत नाहींत," असें स्पष्ट सांगून विष्णुशास्त्री "या देशांतील सगळ्या जाति देशबंधुत्वाच्या थोरल्या नात्यांत अंतर्भूत होऊन, बारीकसारीक क्षुद्र भेदांची मातब्बरी लोक तादृश धरणार नाहींत," असा आशावाद करतात.× विधवांच्या असहायतेबद्दलचे त्यांचे उद्गार अत्यंत कळवळ्याचे व संतापजन्य आहेतः—"ज्या वैधव्यदुःखाची वेदना सहन न होऊन बिचाऱ्या स्त्रियांनीं सुष्टदुष्ट कसाही नवरा असला तरी आपल्या पातिव्रत्यधर्मास जागून अंगावर शहारा येणाऱ्या रीतीनें त्याच्या चितेवर आपल्या देहाची आहुति द्यावी, किंवा तसें न झालें तर आमरणान्त त्याच्या करतां केवळ तपस्व्याच्या वृत्तीनें रहावें, त्याच महादुःखाबद्दल त्यांचा कळवळा कोणास येत नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांच्याच प्रारब्धदशेचें तें फळ असें म्हणून त्यांचा उलटा छळच होण्यास आरंभ होतो, हा प्रकार आमच्या देशास अत्यंत लांछनरूप होय यांत संशय नाहीं...स्त्रियांचें वैधव्य हें जर त्यांच्या अशुभत्वास कारण, तर बाप, भाऊ, बहीण वगैरे कोणी मेल्यानें त्यांच्या नातेवाईकांचें तरी कां तोंड बघावें ?...जी अत्यंत सदाचरणानें आपलें आयुष्य क्रमून आपल्या कुलास तर काय पण सगळ्या मनुष्यजातीस भूषण आणीत आहे...(त्या)...निष्पाप स्त्रीचें दर्शन जर शुभ नव्हे, तर सगळ्या कपाळभर जिनें कुंकवाचा पट्टा ओढला आहे अशा (एकाद्या) नगरभवानीचें...अथवा (एकाद्या) बाजारबसवीचें...अत्यंत शुद्ध दर्शन झालें काय ?"* मग हीच

× ग. त्र्यं. माडखोलकर, **विष्णु कृष्ण चिपळूणकर** पृ. ८३. आपल्या मृत्युपूर्वीं तीनच दिवस अगोदर चिपळूणकरांनीं हा लेख 'केसरीं'तून प्रसिद्ध केला होता.

* वि. कृ. चिपळूणकरः **निबंधमाला** पृ. २०४

कळकळ लोकहितवादींनीं दाखविली तर शास्त्रीबुवांना कां वैषम्य वाटावें ? लोकहितवादींशीं भांडतांना चिपळूणकरांनीं केलेला युक्तिवाद नुसता वितंडवाद वाटतो. इतकेंच नव्हे, तर देशमुखांचीं मतें खोडून काढतांना मिळेल त्या अस्त्राचा उपयोग त्यांनीं केला असल्याचें दिसतें. नाहीं तर ज्या इंग्रज इतिहासकारांवर त्यांनीं तडाखे ओढले त्यांचा पुरावा नाना फडणिसाचें शहाणपण सिद्ध करण्यास त्यांनीं कशाला घेतला असता ?

८. चिपळूणकरांचे सर्वच विचार प्रगतीस विरोधी होते, असें म्हटलें तर अतिशयोक्तीचें होईल. त्यांनीं एका निबंधांत लोकभ्रमांचा निरास केला आहे, म्हणजे लोकांतील अडाणी चाली, शकुनापशकुनावरील विश्वास व ज्योतिषावरील श्रद्धा यांची चर्चा करून हीं सर्व अज्ञानजन्य आहेत असें दर्शविलें आहे. पण हीच चिकित्सक बुद्धि त्यांनीं इतरत्र कोठेंही, सामाजिक सुधारणांचा विचार करीत असतां लाविली नाहीं. एवढें मात्र खरें, कीं सडेतोडपणाबद्दल व वेळप्रसंगीं राज्यकर्त्यांवरही निर्भीड टीका करण्याबद्दल त्यांना श्रेय अवश्य दिलें पाहिजे. इंग्रजांच्या परमन्यायीपणाचे देव्हारे माजूं लागले व इंग्रज करतील तेंच न्याय्य असें मानण्याची प्रवृत्ति बोकाळली, तेव्हां चिपळूणकरांनीं सरकारी नोकरींत राहूनही राज्यकर्ते चुकले, तेव्हां त्यांचे दोष स्पष्टपणें दाखविले. असा धीटपणा चिपळूणकरांपूर्वीं—फार काय त्यांचे कालीं सुद्धां—इतर कोणी दाखविला नाहीं. " एखाद्या अत्यंत भाविक मुसलमानाच्या मनांत सुवर खाणाऱ्या फिरंगी काफराविषयीं जो द्वेष मक्केंत किंवा कुस्तुंतुनिया शहरांत आज वागत असेल तितकाच द्वेष किंवा तिटकारा आमच्या अत्यंत परिपक्व बुद्धीच्या युरोपियनांतही आढळतो. फार तर काय, पण ताडावर चढणाऱ्या मनुष्यावर मौजेनें गोळी घालणें व तो वानर होता येवढेंच म्हटल्यावरून खून माफ होणें, किंवा घोरेवाल्याच्या झिंज्या धरून त्यास बुकलून ठार मारणें व शेवटीं त्याच्या प्राणाची बिचाऱ्याची अवघी तीस रुपये किंमत होणें, असले प्रकार अंमळ ध्यानांत आणले असतां आमचे महासोवळे भट किंवा मोठे करडे इमामही बरे असें वाटूं लागतें ! " * ही सरकारी नोकरानें केलेली सरकारवरील टीका आज मितीस फारशी जहाल वाटली नाहीं, तरी तत्कालीन समाजांत ती जहालच ठरली. न्यायमूर्ति

* वि. कृ. चिपळुणकर : **निबंधमाला**, पृ. ५८८–९

रानडे यांस 'फडके' प्रकरणांत सरकारकडून केवळ संशयामुळें पुष्कळ त्रास व अपमानास्पद प्रकार सोसावे लागले तेव्हां किंवा राष्ट्रीय सभेसाठीं प्रवासांत असतां रानड्यांचें सामान बाहेर काढून एक गोरें बाळ त्यांच्या जागेवर जाऊन बसलें तेव्हां न्यायमूर्तींनीं काढलेले उद्गार चिपळूणकरांच्या वरील उताऱ्याशीं ताडून पाहाण्यासारखे आहेत. पहिले वेळीं "अशा गैर समजुती थोड्या फार अंशांनीं मधून मधून उत्पन्न होणारच"* एवढें खाजगी बोलण्यापलीकडे रानड्यांनीं कांहीं केलें नाहीं. आणि दुसऱ्या प्रसंगीं तर त्यांची ही तुकारामी सोशिक वृत्ति कळसाला पोंहोचलेली दिसते. नामदार गोखले यांनीं त्या गोऱ्या इसमाला धडा शिकवावा या हेतूनें साधी तक्रार तरी करा असें सुचविलें, तेव्हां शांततेची प्रतिमूर्ति असे न्यायमूर्ति उद्गारले "How do we treat members of the depressed classes, our own countrymen even in these days ?...How can we, then, with a clear conscience, blame members of the ruling race, who treat us with contempt. ? "× समाधानाची बाब इतकीच कीं रावसाहेबांनीं असले प्रसंग अत्यंत अपमानास्पद व दुःखदायक असतात, एवढें कबूल तरी केलें. असो. चिपळूणकरांच्या निस्पृह टीकेची मातब्बरी विशेष वाटते ती यामुळेंच.

९. इंग्रजांचे दोष दाखवून त्यांच्याविषयीं तत्कालीन समाजांत पसरलेला अवास्तव आदर नाहींसा करण्यासाठीं मालाकारांनीं बरीच मेहनत घेतली. इंग्रज झाले तरी आपणांप्रमाणेंच मानवप्राणी असून स्खलनशील आहेत व आपणाप्रमाणेंच त्यांच्यांतसुद्धां दोष आढळतात हे 'सिद्धान्त' चिपळूणकरांनीं जनतेला प्रथम पटवून दिले. आणि असें करतांना त्यांची इतरत्र आढळणारी विशिष्ट लेखनशैली विशेष स्फुरते, असें दिसतें. इंग्रजांच्या देशाचें वर्णन वाचकांस त्यांनीं कसें सादर केलें आहे पाहा: "जिकडील अत्यंत सुपीक देश सरासरी इकडच्या उखीर जमिनीबरोबर, जेथें बारा महिने अठरा काळ पाऊस, धुकें, बर्फ यांनीं पिच्छा पुरवून सूर्यदर्शनही कधीं चांगलेंसें होऊं देऊं नये, अशा लोकांस इकडचें समृद्ध व सुखकर देशांचें वैभव सहन न होऊन त्याकडे नाक मुरडण्याचा

* फाटक, **रानडेचरित्र** पृ. ३१८

× वैद्यकृत, **प्रार्थनासमाजाचा इतिहास.** च. ले. पृ. १२०

त्यांनीं आव घालावा ही केवढी मौज आहे !...तिकडचे मोठे गगनचुंबित पर्वत म्हणजे इकडचीं टेकाडें व टेम्स्सारख्या महाप्रचंड नद्या म्हणजे इकडच्या एकाद्या ओहोळाबरोबर, जेथील खाणींतील अमूल्य संपत्ति म्हटली म्हणजे शिसें व कथील, मोठीं स्वादिष्ट फळें म्हणजे इकडील रानफळांसारखीं, व दारिद्र्याधिदेवतेची ज्या देशावर इतकी पूर्ण कृपा कीं, इकडील संपत्तीचा येवढा पूर आज शेकडों वर्षें तिकडे चालत असतां लक्षावधि लोकांस नुसते बटाटे फांकावे लागतात."* ही युक्तिवाद करण्याची पद्धत अगदीं पोरकट वाटली तरी शास्त्रीबुवांचे वेळीं समाजांत पसरलेले गैरसमजही तितकेच पोरकट असल्यामुळें त्यांचा निरास अशा प्रकारेंच होऊं शकला. पण विष्णुशास्त्री एवढ्यावर थांबतात थोडेच ! त्यांनीं आपली बाजू पुढें मांडण्यासाठीं आणखी काय काय सांगितलें पहाः—"देशोदेशीं फिरून शेवटीं मोडकीं तोडकीं जहाजें मोठ्या आर्जवानें मिळवून कोठें पश्चिमेकडे हजारों कोस वेड्यासारखें समुद्रावर फीर, नाहींतर आफ्रिकेला वळसा घालून अनमानधबक्यानें कोठें तरी लाग, एवढी जबरदस्त यातायात आकाशाच्या राज्याच्या वांटेदारांस कोणी करायला सांगितली होती कोण जाणे ? तसेंच शेकडों वर्षें ध्यानीं मनीं स्वप्नीं घोळलेला हिंदुस्थान एकदाचा गावला असतां त्यावर ख्रिस्तदासांच्या येवढ्या झुंडीच्या झुंडी कशा धावल्या हा तरी चमत्कार आहे ! त्याचप्रमाणें पुढें खोट्या सह्या कर, राजद्रोहाच्या मसलतींत शिर, याची मुंडी मुरगाळ, त्याला चिथावून दे, येवढ्या उलाढाली तरी गेलीं शंभर वर्षें आमच्या परम विरक्त व प्राच्य देशांस तुच्छ करणाऱ्या युरोपस्थ बांधवांनीं कशा करतां केल्या बरें ?"× या व इतर उताऱ्यांत व्यक्त होणारी मनोवृत्ति मराठी भाषेंत विष्णुशास्त्र्यांनींच प्रथम प्रसृत केली. त्यांत दुरभिमान आहे. परंतु स्वाभिमानाचें—योग्य अभिमानाचें—मूळ पुष्कळदां दुरभिमानांतच असतें, हें लक्षांत आणलें म्हणजे चिपळूणकरांच्या कामगिरीचें महत्त्व पटेल. तरी पण समाजास अंतीं विघातक व प्रगतीस विरोधक असा एक कळप आपण कायम करून ठेवीत आहोंत याची शुद्ध चिपळूणकरांसारख्या विद्वानास नसावी हें पाहून वाईट वाटतें. कुचेष्टेशिवाय

---

* वि. कृ. चिपळूणकर : **निबंधमाला** पृ. ५९२

× **कित्ता** पृ. ५९३–५९४.

## प्रगतिपर आणि प्रतिगामी

प्रतिष्ठा वाढत नाहीं या ब्रीदवाक्याचा एक पंथ समाजांत आढळतो. त्याचें बीज निबंधमालाकारांनींच पेरावें, हाही प्रकार खेदजनकच होय. हें सर्व आपण स्वसंस्कृतिरक्षणार्थ करीत आहीं, असें त्यांस वाटे. परंतु त्यांच्या सांस्कृतिक कल्पना बऱ्याच कोत्या होत्या. ब्राह्मण्यावरील त्यांचें अलोट प्रेम स्वज्ञातिहितार्थ उद्भवलें असावें किंवा समाजांत प्राप्त झालेलें स्थान व हातीं असलेला अधिकार न सोडण्याची वृत्ति त्यांच्या विचारसरणीच्या बुडाशीं असावी. बदलत्या कालाचा ओघ जाणण्याची दूरदृष्टि शास्त्रीबुवांस नव्हती, असाच निष्कर्ष यावरून निघतो. पोटापाण्याचा धंदा म्हणून ब्राह्मण धर्मकृत्यांकडे पाहूं लागले ही अवनति त्यांची त्यांना कळली नाहीं तरी "पाश्चात्य विद्यावारुणीचे झुरके" मारलेल्या विष्णुशास्त्र्यांस ती समजण्यास मुळींच हरकत नव्हती. परंपरानुयायी समाज हातीं असलेली सत्ता सोडण्यास केव्हांही नाखुष असतोच. पण सुशिक्षितांनीं, इंग्रजी ग्रंथ पढलेल्यांनीं व लोकांस उपदेश करण्याचा आव आणणारांनीं तरी असा वेडेपणा दाखवावयास नको होता.

शास्त्रीबोवांच्या विचारसरणींत प्रगतिपर आणि प्रतिगामी तत्त्वांचें मोठें विचित्र मिश्रण होतें, हें वरील विवेचनावरून सहज लक्षांत येईल. आपल्या जोरकस लेखनशैलीनें त्यांनीं महाराष्ट्रांत देशाभिमानाचें वारें पसरविलें, ही त्यांची कामगिरी अमोलिक खरी. पण त्यांच्या देशाभिमानाला समाजसुधारणेची जोड नसल्यामुळें तो एकांगीच ठरला. शास्त्रीबोवा सुशिक्षित होते, व्यासंगीही होते, परंतु विद्वान् नव्हते. त्यांनीं पांडित्याचा केवढाही आव आणला असला तरी त्यांची विद्वत्ता बेताबाताचीच होती, हें सहज समजतें. त्यांची बुद्धि निर्विकार नव्हती व दृष्टिही शास्त्रीय नव्हती. त्यांच्या स्वदेशप्रेमाच्या व स्वसंस्कृत्यभिमानाच्या कल्पना प्राथमिक होत्या. अर्थातच त्यांचें स्वरूप पुष्कळदां अगदीं विकृत झालें. राष्ट्राची सर्वांगीण प्रगति होऊन तिचें बूड सुस्थिर होण्यास सर्व सुधारणा एकसमयावच्छेदें करून होणें जरूर होतें. ही विचारसरणी महाराष्ट्रा-पुढें ठेवण्याचा मान आगरकरांकडेच जातो.

---

# १३ प्रिन्सिपाल आगरकर.



न्यायमूर्ति रानडे यांची परंपरा चालविणारे नामदार गोखले यांस रानड्यांनींच हाताशीं धरून सार्वजनिक सेवेचें शिक्षण दिलें. न्यायमूर्तींचें हें कर्तृत्व चिपळूणकरांच्या अंगीं नव्हतें. परंतु एका अर्थानें निबंधमालाकारांनीं आरंभिलेल्या विवक्षित कार्याची परंपरा चालविणारे देशसेवक पुढें आले. ते चिपळूणकरांचे चेले नसले तरी चिपळूणकरांनींच त्यांच्या कार्यांत उत्तेजन व प्रोत्साहन दिलें होतें. हे देशसेवक म्हणजे आगरकर व टिळक होत. प्रस्तुत निरीक्षणाच्या सोयीसाठीं आगरकरांना प्रथम हातीं घ्यावें लागतें. कारण गोखले व टिळक त्या मानानें पुढें बरींच वर्षें जगले व आगरकर मात्र आपलें कार्य आटोपून जलदीनें परलोकाप्रत निघून गेले.

महाराष्ट्राच्या प्रमुख कार्यकर्त्यांत व विचारी पुरुषांत प्रिन्सिपॉल आगरकर (१८५६–९५) यांचें स्थान वैशिष्ट्यनिदर्शक असेंच आहे. आणि त्याचें कारण म्हणजे ते बुद्धिप्रामाण्यवादी होते. परंपरेचा अभिमान किंवा शास्त्राधार हुडकण्याची वृत्ति त्यांच्या अंगीं मुळींच नसून त्यांचा सर्व भर विचारावर आहे.

म्हणूनच त्यांच्या लिखाणांत सर्वत्र स्पष्टवक्तेपणा आढळतो. आणि हा गुण कित्येक वेळीं अत्यंत तिखट असल्याचें प्रत्ययास येतें. आगरकरांच्या निर्भीड विचारसरणीचें कारण कदाचित् असें असावें कीं बालपणापासून अत्यंत दारिद्र्यांत दिवस गेल्यामुळें आगरकरांना जगाचा अगदीं कटु अनुभव आला होता. तें कांहींही असलें, तरी सर्वस्वीं स्वावलंबनावर एम. ए. पर्यंतचा अभ्यास करून त्यांनीं जी विलक्षण चिकाटी व कडक तत्त्वनिष्ठा दाखविली तिला आपल्या आधुनिक इतिहासांत तरी तोड नाहीं. हालअपेष्टांत दिवस गेले असतांही मोठेपणीं भारी पगाराची नोकरी न शोधतां आणि तशी नोकरी आपण होऊन चालून आली तरीही तिचा स्वीकार न करतां अखेरपर्यंत स्वार्थत्याग करून अल्पवेतनावर गुजराण करण्याचें व्रत त्यांनीं आपण होऊन स्वीकारलें, ही एकच बाब त्यांच्या तत्त्वनिष्ठेची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे.

२. चिपळूणकरांच्या सान्निध्यानें लोकशिक्षणाचें काम करण्यास टिळक-आगरकरांना स्फूर्ति मिळाली व त्यांनीं सर्वांनीं मिळून (इतर सहकाऱ्यां-समवेत) न्यू इंग्लिश स्कूल (१८८०) व फर्ग्युसन कॉलेज (१८८४) या शिक्षणसंस्था स्थापिल्या. परंतु मुलांना शाळेंत शिकविण्याच्या जोडीसच लोकांना शिक्षण देण्यासाठीं या ज्ञानप्रसारेच्छू मंडळीनें 'केसरी' व 'मराठा' हीं मराठी इंग्रजी वर्तमानपत्रें काढलीं (१८८१). प्रथम कांहीं वर्षें केसरींतून आगरकर व टिळक या दोघांची विचारसरणी पुढें आली. पण सहा साडेसहा वर्षांनीं आगरकरांनीं केसरीचा संबंध सोडून स्वतंत्र 'सुधारक' काढला* व केसरी-मराठ्याचें क्षेत्र एकट्या टिळकांना वावरण्यास मिळालें. इतःपर आगरकरांनीं आपले विचार सुधारकांतून मांडले व केसरींतून टिळक आपलें मत प्रतिपादूं लागले. पूर्वीं संयुक्त असलेला समवयस्कांचा विचारौघ ह्यापुढें भिन्न—व पुष्कळदां परस्परविरोधी—स्वरूपांत वाहूं लागला.

आगरकर व टिळक यांचा खटका आधीं सामाजिक कीं आधीं राजकीय या वादग्रस्त मुद्यावर उडाला. रानड्यांचा या बाबतींतील निर्णय किती धोरणी व गुंतागुंतीचा आहे हें यथास्थल पाहिलें. रानड्यांनंतर राजकीय सुधारणेलाच प्राधान्य देऊन इतर सुधारणांकडे कानाडोळा करणारा टिळकपक्ष व सर्वांगीण

* सुधारक. पुणें. सुरू १८८८.

सुधारणेवर एकसमयाच्छेदेंकरून भर देणारा आगरकरपक्ष यांचा वाद बरीच वर्षे महाराष्ट्राच्या सार्वजनिक आयुष्यांत प्रतिबिंबित झालेला दिसतो. आगरकरांच्या सर्वांगीण विचारसरणींत एक महत्वाचा विशेष आहे. तो हा कीं प्रत्येक सुधारणेस तेतत्वज्ञानाचा चौथरा उभारतात. म्हणजे त्यांचे विचार एका विशिष्ट तत्वज्ञानावर अधिष्ठित आहेत. हें विधान थोडेसें विशद केलें पाहिजे. मागें वर्णिलेल्या लोकहितवादींच्या सुधारणा पाहा. त्यांना व्यक्तिवादी म्हटलें. परंतु सुधारा-णांच्या निश्चित् स्वरूपाची त्यांना पूर्णांशानें जाणीव होती, किंवा व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाचा सर्व अंगेंउपांगें ध्यानांत धरून त्यांनीं अभ्यास केला होता, असें वाटत नाहीं. त्यांचा व्यक्तिवाद कांहींसा स्वाभाविक असून कांहींसा इंग्रजानुकरणानें आला होता. ते बुद्धिवादी खरे; पण केवळ बुद्धीला प्रामाण्य देऊन जें जें अनुमान निघेल त्याचा स्वीकार करावयास ते तयार झाले असते, असें म्हणणें धाडसाचें ठरेल. त्यांच्या बुद्धीला धर्मभावनांची वगैरे मुरड पडली नव्हती, असें नाहीं. पण आगरकर बुद्धिप्रामाण्यवादी होते.× त्यांची दृष्टि सर्वस्वीं 'शास्त्रीय' होती. शास्त्रशुद्ध अभ्यासाला व निर्विकार

× आगरकर जर इतके बुद्धिप्रामाण्यवादी होते, धर्मभावना किंवा रूढ समजुती यांचा त्यांच्या मनावर जर मुळींच पगडा नव्हता, तर त्यांनीं "मूळ प्रकृति म्हणजे भारतीय आर्यत्व न सांडतां" (**निबंधसंग्रह १**–पृ. ६) नवीन कल्पनांचा स्वीकार करावा, असें कां सांगितलें? भारतीय आर्यत्वाचा इतका पुळका त्यांना कां, असा प्रश्न कांहीं तर्ककर्कश विचारतील. परंतु हा प्रश्न विचारतांना 'भारतीय आर्यत्वाला' आगरकरांनीं 'मूळ प्रकृति' असें संबोधिलें आहे, या गोष्टीकडे त्यांचें दुर्लक्ष होतें. आगरकर व्यक्तिवादी होते. प्रत्येक मनुष्यमात्रांत कांहीं एक व्यक्तित्व असतें; त्याचा पूर्ण विकास होण्यांतच समजाचें हित सांठविलेलें आहे—ही समजूत व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाच्या मुळाशीं आहे. हीच विचारसरणी थोड्याबहुत व्यापक स्वरूपांत आगरकर येथें मांडीत आहेत. दरेक व्यक्तीला जसें कांहीं व्यक्तित्व, जशी कांहीं 'मूळ प्रकृति' असते, तशीच ती प्रत्येक राष्ट्राला व प्रत्येक समाजाला असते, एवढाच आगरकरांच्या या 'भावनावशते'-चा अर्थ दिसतो. राष्ट्राची 'मूळ प्रकृति' नैसर्गिक असते; तिच्या विकासांतच राष्ट्राचें सामर्थ्य असतें; तिचा नाश करणें हितावह नाहीं; म्हणून तीं सांडूं नका, एवढेंच आगरकरांचें म्हणणें. त्यांत त्यांच्या बुद्धिप्रामाण्यवादाला किंवा व्यक्तिवा-दाला कोठेंच बाध येत नाहीं.

मनाला जीं तत्त्वें पटलीं त्यांचा त्यांनीं स्वीकार केला. तत्त्वनिष्ठ विचारसरणीचें महत्त्व त्यांना विशेष वाटे. कोटल्याही विचारसरणीस कांहीं मूळ तत्त्वांचा पाय दिल्याखेरीज तिची उभारणी पक्की होत नाहीं हें आगकर पूर्णपणें जाणून होते. "तारवांस जसें सुकाणूं, समुद्रपर्यटन करणारांस जसें दिङ्निर्णायक यंत्र, सुवर्णकारास जशी निकषशिला, अंधास जशी यष्टि व इमारतीस जसा पाया तशीं सामाजिक रचनेस, व्यवस्थेस व स्थित्यंतरास हीं तत्त्वें आहेत."† बुद्धिवादाला तत्त्वज्ञानाचा पाया व तत्त्वज्ञान निश्चित करण्यांत बुद्धीचें प्रामाण्य हा अन्योन्य संबंध महाराष्ट्रांत पूर्वीं कधींहीं न आढळलेला व आगरकरांनंतर सुमारें चाळीस वर्षांतही विशेष नजरेंत न आलेला असा अपूर्व व अभूत आहे. "ज्या तत्त्वांचें अवलंबन केल्यामुळें इतर राष्ट्रें अधिकाधिक सुधारत चाललीं त्या तत्त्वांचा स्वीकार करावयास आम्हीं आनंदानें तयार झालें पाहिजे.*" या दृष्टीनेंच त्यांनीं आपल्या तत्त्वज्ञानाचा चौथरा उभारला.

३. आगरकरांचें समग्र तत्त्वज्ञान बुद्धिवादावरच अधिष्ठित होतें, असें म्हटलें. या त्यांच्या विशेषामुळेंच ते रानडे वगैरे 'सुधारक' मंडळींहून निराळे भासतात. रानडे सुधारक खरे, पण त्यांचा परंपरेचा अभिमान सुटला नव्हता. या कारणानेंच ते प्रत्येक सुधारणेस शास्त्राधार हुडकण्याचा खटाटोप करीत. विचार आणि विवेक यांवरच सर्व भर देण्याची त्यांची तयारी नव्हती. जी स्थूल क्रूरता व विषमता त्यांच्या नजरेंत भरे ती दूर करण्याचा प्रयत्न ते मनोभावें करीत. परंतु या क्रूरतेच्या मुळाशीं जीं तत्त्वें, ज्या समजुती आहेत, त्यांचें निर्मूलन करण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला नाहीं. × यामुळेंच त्यांच्या सुधारणेस गौणत्व प्राप्त होतें. मूळ तत्त्वांनाच हात घालण्याची आगरकरांची प्रवृत्ति असे. "ज्या दुर्मतांनीं, दुराग्रहांनीं व दुराचारांनीं महारोगाप्रमाणें या देशाच्या बुद्धीचा, नीतीचा व शरीरसामर्थ्याचा हजारों वर्षें फडशा चालविला आहे, त्यांचें यथाशक्ति निर्मूलन करण्याचा प्रयत्न करणें "+ त्यांना

† आगरकरः **निबंधसंग्रह** भाग १—पृ० १०

* **कित्ता** भाग १ " सुधारक काढण्याचा हेतु. "

× प्रो. मा. दा. अळतेकर : **गोपाळ गणेश आगरकर** पृ. ३०८ पाहा.

+ आगरकर **निबंधसंग्रह** पृ. ४८.

अत्यंत उचित वाटे. आणि हें कार्य पार पाडतांना त्यांची सर्व मदार विवेकावर होती—विश्वासावर (श्रद्धेवर) नव्हती. ते म्हणतातः—“विवेक पूर्ण जागृत झाला नव्हता तोंपर्यंत विश्वासानें किंवा श्रद्धेनें प्रत्येक गोष्टींत आपला अंमल चालविला यांत कांहीं वावगें झालें नाहीं...... पण हें कोठ-पर्यंत ? अधिक चांगलें तत्त्व अस्तित्वांत आलें नाहीं तोंपर्यंत. तें आलें कीं जुन्या प्रमादी तत्त्वानें आपलीं राजचिन्हें श्रेष्ठ तत्त्वाच्या स्वाधीन केलीं पाहिजेत. हें सरळ अधिकारांतर येथून पुढें विश्वास आणि विवेक यांच्या दरम्यान होणार आहे अशी आमची समजूत आहे, व ती तशी असल्यामुळें विश्वासा-वलंबी कल्पनांस व आचारांस विवेकाची आंच देऊन झाळून पाहाणें, हें सुधारकाच्या (म्ह० आगरकरांच्या) अनेक कर्तव्यांपैकीं एक कर्तव्य होऊन बसतें.” ×

अर्थातच पोथ्या उघडून शास्त्राधार हुडकीत बसण्याची गरज आगरकरांना भासली नाहीं. इतकेंच नव्हे, तर मनुष्यप्राण्याचा अत्यंत जिव्हाळ्याचा असा जो धर्म त्याची चर्चा करतांना त्यांनीं विवेकाची अत्यंत कठिण कसोटी लावली आहे. साहजिकच बहुजनसमाज आगरकरांना ‘नास्तिक’ लेखी. परंतु आगरक-रांचीं धर्मविषयक मतें इतकीं एकांगी नव्हतीं. त्यांचे वेळीं अज्ञेयवादाला विशेष भाव चढला होता. त्या वादाची मांडणी आगरकरांनीं अशी केली आहेः— “एका अंगाला नास्तिक म्हणजे बेधडक परमेश्वर नाहीं असें म्हणणारे थोडेसे लोक, व दुसऱ्या अंगाला एकच परमेश्वर आहे, व त्याच्या स्वरूपाचें व गुणाचें ज्ञान मनुष्यमात्रांस करून घेतां येतें, इतकेंच नाहीं, तर तें करून घेणें, त्याला शरण जाणें, त्याला भजणें, त्याला भिणें व त्याच्या इच्छेप्रमाणें वर्तन करणें हेंच मनुष्यास योग्य आहे, व असें करणारे मनुष्य जन्ममरणापासून मुक्त होऊन त्या ईश्वरस्वरूपांत जाऊन मिळतात किंवा मोक्षाप्रत पावतात, असें मानणारे दुसरे लोक यांच्या दरम्यान कांहीं लोक आहेत. ते असें म्हणतात कीं, जगत्कारण आहे हें आम्हांस कबूल आहे, पण आमच्या सध्यांच्या ज्ञानेंद्रियांनीं त्याच्या स्वरूपाचें खरें ज्ञान आम्हांस कधींही होण्याचा संभव नाहीं. येथील कित्येक तत्त्ववेत्यांचा विचार येथपर्यंत येऊन ठेपला असून इतर सुधारलेल्या देशांतही अलीकडे हेंच मत

× आगरकरः निबंधसंग्रह १—पृष्ठ:७०.

प्रबळ होत चाललें आहे. तेव्हां ईशस्वरूप आमच्या सांप्रतच्या ज्ञानेंद्रियांस अगम्य आहे हा धर्मसंबंधीं शेवटचा सिद्धांत आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. " * सदोदित अद्ययावत् सिद्धान्त पारखून व अभ्यासून चालणारे आगरकर अज्ञेयवादी असावे, असें या उताऱ्यावरून वाटतें. परंतु तें खरें दिसत नाहीं. अज्ञेयवाद बुद्धि-प्रामाण्यवादाशीं विसंगत आहे. कारण, "जगत्कारण आहे हें (त्यास) कबूल आहे." पण ही बाब अद्याप बुद्धिप्रामाण्यवादानें सिद्ध झालेली नाहीं. तेव्हां आगरकर संदेहवादी होते, असें म्हणणेंच अधिक उचित ठरेल. ईश्वराचें अस्तित्व बुद्धीनें सिद्ध झालेलें नाहीं; तें असिद्धही नाहीं. अर्थात् ज्ञानवृद्धीबरोबर जें सिद्ध होईल तें मानणें हेंच बुद्धिप्रामाण्यवाद्यांचें ध्येय ठरतें. व तसेंच ध्येय आगरकरांचें होतें. मात्र जरी ते संदेहवादी होते तरी " 'संशयात्मा विनश्यति' याप्रमाणें त्यांची स्थिति झाली नाहीं. "† स्वतःच्या तत्त्वज्ञानाला उचित असें धार्मिक ध्येय त्यांनीं मनांत वागविलें होतें. ते म्हणतात, 'मनुष्यतेचें ऐहिक सुखवर्धन ह्या सार्वत्रिक भावी धर्माची दीक्षा ज्यांनीं घेतली असेल त्यांनीं कोणास न भितां, आपल्या मनास जें शुद्ध, प्रशस्त व कल्याणप्रद वाटत असेल तें दुसऱ्यास सांगावें आणि तदनुसार होईल तेवढें आचरण करावें हेंच त्यांस उचित आहे. " × अर्थात् 'ऐहिक सुखवर्धन' या शब्दप्रयोगाचा अर्थ 'खाना पिना और चैन करना' असा संकुचित व विकृत घ्यावयाचा नाहीं. आगरकर मिल्लप्रभृति उपयुक्ततावाद्यांचे अनुयायी होते. उपयुक्ततावाद्यांनीं सुखाची व्याख्या 'अधिकाधिकांचें अधिकाधिक सुख' ‡ अशी केली आहे, ती ध्यानांत आणली म्हणजे आगरकरांच्या शब्दप्रयोगाचें व्यापक आणि उदात्त स्वरूप सहज पटेल. या सुखाला स्वार्थाचा वासही येत नाहीं. तें कोणाही व्यक्तीचें एकटीचें नव्हे. त्याची परिपूर्ति तें इतरांसमवेत अनुभवल्यानेंच होत असते. तसेंच, या सुखाची कल्पना म्हणजे 'तूपरोटी' ची

---

* आगरकर: **निबंधसंग्रह** १—पृ० ३४.

† वि. ह. कुळकर्णी : (आगरकर) **अर्वाचिन मराठी वाङ्मय सेवक** १-पृ० २०.

× आगरकर : **निबंधसंग्रह** १—पृ० १७८.

‡ "The greatest happiness of the greatest number"— *Jeremy Bentham.*

कल्पना नव्हे. उदरंभरणापलीकडे माणसाला कांहीं अधिक उदात्त ध्येयें असतात याचा विसर उपयुक्ततावाद्यांना पडलेला नाहीं. ‘ आहार, निद्रा व मैथुन ’ यांपलीकडची बौद्धिक, नैतिक, राजकीय, शैक्षणिक, सामाजिक वगैरे सांस्कृतिक ध्येयें मनुष्यानें आत्मसात् केलीं आहेत. त्यांचा उत्तम प्रकारें परिपोष करून त्यांची पूर्तता करून घेणें हेंच मनुष्याचें सर्वोत्तम कार्य. फक्त त्या कार्याचें स्वरूप आणि व्याप्ति ठरवितांना मनुष्यानें स्वर्गांत भराऱ्या न मारतां पृथ्वीवर यावें, या अवनितलावर दृष्टि स्थिरवावी, एवढेंच आगरकर म्हणतात. स्वर्ग आहे कीं नाहीं, ईश्वराचें अस्तित्व खरें किंवा खोटें, याविषयीं बुद्धिवाद्यांच्या मनांत संदेह असला तरी मनुष्याचीं व्यावहारिक ध्येयें नेहमीं इहपर असावीं, असेंच त्यांना वाटतें. म्हणूनच आगरकरांनीं ‘ ऐहिक सुखवर्धन ’ हा शब्दप्रयोग उपयोजिला; कोणत्याही स्वार्थी किंवा संकुचित बुद्धीनें तो उपयोजिला नाहीं.

४. व्यक्तिवाद हा आगरकरांच्या विवेचनाचा गाभा म्हणतां येईल. त्यांचा व्यक्तिवाद अशा स्वरूपाचा आहे:—“ व्यक्तींच्या हिताकडे दुर्लक्ष झालें तरी हरकत नाहीं; समाजाचें हित साधलें म्हणजे झालें, असें बोलणें म्हणजे असंबद्ध प्रलाप करण्यासारखें होय. कारण व्यक्तींच्या हिताहून निराळें असें समाजाचें हित नाहीं.... मनुष्यें समाज स्थापूं लागल्याबरोबर त्यांत जीं शारीरिक किंवा मानसिक सामर्थ्यानें इतरांहून श्रेष्ठ असतील......त्यांच्या हातीं सत्ता असणें व दुर्बलांना दास्य करावें लागणें हें ज्या दिशेकडे उतार असेल त्या दिशेस पाणी जाण्यासारखें आहे. हा ओघ बंद करून सर्वांस सारखें, निदान होईल तितकें सारखें, सुख मिळण्याची व्यवस्था होत जाणें म्हणजे सुधारक होत जाणें असें म्हणण्यास हरकत नाहीं. ”* ह्याच तत्त्वानुरोधानें त्यांचें राजकीय धोरण बनलेलें दिसतें. ‘ राजसत्तेचा अंमल शक्य तितका कमी असावा व लोकांनीं होतां होईतों स्वायत्त असावें ’ असा त्यांच्या शिकवणीचा मतितार्थ अहे. पण त्याबरोबरच शासनसंस्थेचें कर्तव्य सांगण्यास ते विसरले नाहींत. “ समाजाची उन्नति होण्यास एका प्रकारची नियामक व्यवस्था जरी अत्यावश्यक आहे, तरी ती फाजील होतां कामा नये. नियामक व्यवस्था अस्तित्वांत आली म्हणजे समाजाच्या अंगीं एक प्रकारचें दार्ढ्य येऊं लागतें. व जों जों ती व्यवस्था वाढत जाईल तों तों

* आगरकर : १ निबंधसंग्रह भाग १—पृ० ४१-४२.

तें दार्ढ्य अधिकाधिक प्रबल होत जाऊन, समाजांतील लवचिकपणा अगदीं नाहींसा होतो, व ज्या मानानें हा लवचिकपणा नाहींसा होत जातो त्या मानानें समाजांतील पुढील सुधारणेस प्रतिबंध होतो. म्हणून ज्यांच्या हातीं राज्यसूत्रें असतील त्यांनीं वरील विचार रात्रंदिवस डोळ्यांपुढें ठेवून, सरकारी अंमल अगदीं बेतापुरता चालावयाचा असा निश्चय केला पाहिजे. ज्या देशांतील लोक चिखलांत रुतलेल्या गाईप्रमाणें हातपाय हालविण्यास अगदीं असमर्थ झाले असतील अशांस गाळांतून बाहेर पडून दोन पावलें टाकतां येण्यापुरती मदत सरकारनें अवश्य केली पाहिजे. पण त्यापुढें त्यांना आपल्या पायांनीं चालूं न देणें म्हणजे त्यांस निरंतर पंगू करून ठेऊन त्यांचें आणि त्याबरोबर आपलेंही नुकसान करून घेणें होय, हें अंमलदारांनीं कधींही विसरतां कामा नये. ” †

“ राजसत्तेचा अंमल शक्य तितका कमी असावा व लोकांनीं शक्य तितकें स्वायत्त असावें ” असें प्रतिपादणारे आगरकर सामाजिक सुधारणा घडवून आणण्याचे कार्यांत सरकारची मदत–आणि तीही परकी आणि परधर्मी सरकारची मदत–घ्यावयास तयार असत, हें त्यांच्या तत्त्वज्ञानास कितपत धरून होतें, असा संशय उद्भवणें अगदीं साहजिक आहे. परंतु आगरकरांचें या बाबींतलें धोरण त्यांच्या तात्त्विक विवेचनास धरूनच आहे. सर्वच सुधारणा कायद्याच्या मदतीनें सुसाध्य आहेत किंवा त्यांपैकीं कांहीं कायद्यानें सुसाध्य असल्या तरी त्या सर्वांवर कायद्याची अंमलबजावणी व्हावी, असें आगरकरांचें मुळींच मत नव्हतें. पण याचें कारण ‘ आमचें सरकार परकीय आहे हें नव्हे; किंवा सामाजिक गोष्टींत सरकारनें हात घालणें गैरशिस्त आहे... असेंही नव्हे. ’ आगरकरांचा एतद्विषयक युक्तिवाद त्यांच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वज्ञानास अनुरूप असाच आहे. “ व्यक्तीच्या ज्या आचरणापासून समाजाचें प्रत्यक्ष अपरिमित नुकसान होत नसेल, तें आचरण त्या व्यक्तीस घातक असलें तथापि त्यानें तें करूं नये अशी समाजानें सक्ति करण्याचा समाजास अधिकार नाहीं. ”× उदाहरणार्थ व्यभिचार किंवा मदिरापान हीं करणारांचें त्यांपासून कितीही नुकसान

† आगरकरः **निबंधसंग्रह** २ पृ० १४९–१५०.

× **कित्ता** पृ. १००.

होत असलें तरी त्यापासून समाजास त्रास पोंहचल्यावांचून समाजानें त्यांच्यावर विशिष्ट आचरणाची सक्ति करणें योग्य होणार नाहीं. उलटपक्षीं सती, विधवाविवाहनिषेध, विधवावपन...इत्यादि सामाजिक संकेतांनीं व्यक्तिस्वातंत्र्याची गळचेपी होत असल्यामुळें समाजानें—आणि समाज तयार नसल्यास 'समाजाचा विशेष जोरदार प्रतिनिधी जें सरकार' त्यानें – त्या संकेतांची सक्ति दूर केली पाहिजे. या तत्त्वानुसार आगरकर सती आणि विधवाविवाह यांच्या कायद्यांना जोराचा पाठिंबा देऊन असुक वयाच्या आंत मुळींच वपन करूं नये व त्यापुढेंही तें स्त्रीच्या मर्जीविरुद्ध होऊं नये' अशा कायद्याची मागणी करीत. बालविवाहाची चाल मोडण्यांत सरकारची मदत मागतांना आगरकरांनीं हेंच तत्त्व पुढें ठेविलें होतें. 'लग्न म्हणजे पोरकट खेळ नव्हे, त्याचा व समाजाच्या हिताचा फार निकट संबंध आहे;' अर्थात् या गोष्टींत ढवळाढवळ करण्याचा सरकारला अधिकार आहे अशी त्यांची विचारसरणी होती. "व्यक्तिस्वातंत्र्य व समाजबंधन यांच्या ज्या योग्य मर्यादा आहेत त्यांचा अतिक्रम होतो कीं काय, एवढ्याच धोरणानें कायदा असावा कीं नाहीं हें ठरविलें पाहिजे—"× या तत्वाच्या पायावरच आगरकरांच्या एतद्विषयक विचारांची उभारणी झाली होती.

आगरकरांचा व्यक्तिवाद किती लवचिक पण तर्कशुद्ध होता हें यावरून सहज दिसून येईल. व्यक्तिवादाचें मूळचें तात्त्विक स्वरूप खरोखरच फार उदात्त आहे. प्रत्येक व्यक्तिमात्राच्या ठायीं एक प्रकारचें वैशिष्ट्य—यालाच व्यक्तित्व म्हणावयाचें–असतें, व त्याची पूर्ण आणि अप्रतिहत वाढ होण्यांतच समाजाचें कल्याण आहे, हा व्यक्तिवादाचा मूळचा खरा अर्थ. प्रत्येक व्यक्तीचें स्वतंत्र असें एक चैतन्य आणि स्वत्व असतें. त्या चैतन्याची व त्या स्वत्वाची संपूर्ण आणि खुली वाढ झाल्यानेंच समाजाच्या मानवी संपत्तींत विविधता येते व त्यायोगें त्याची कार्यक्षमता वाढते; आणि म्हणूनच दरेक व्यक्तीला स्वतःच्या स्वत्वाचा विकास करावयास समाजानें पूर्ण स्वातंत्र्य दिलें पाहिजे व तें देण्यांतच त्याचें हित आहे,—असा व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाचा इत्यर्थ आहे. परंतु प्रत्येक मनुष्यमात्राचें वैशिष्ट्य समाजहितकारक असेलच हें कसें?

× आगरकर : निबंधसंग्रह. २–पृ. १०३

मनुष्याच्या सर्वच प्रवृत्ती समाजाला उपकारक ठरतील हें कशावरून ? मनुष्य प्राण्यांत जशा चांगल्या प्रवृत्ती आहेत तशा वाईटही आहेत. या वाईट प्रवृत्तींना दाबून टाकण्याची आवश्यकता नाहीं का ? दरेक व्यक्तीच्या अंगचें चैतन्य—तिचें स्वत्व—मौलिकतेचें, प्रतिभाशक्तीचें द्योतक असतेंच, याला काय आधार ? ज्याला आपण मौलिकता असें म्हणतों ती पुष्कळवेळां चक्रमपणाचीच निदर्शक ठरत नाहीं का ? चक्रमपणा म्हणजे व्यक्तित्व नव्हे; व्यक्तित्वाचें तें केवळ विडंबन आहे.† अनिर्बंधतेनें—संपूर्ण स्वातंत्र्यानें—विविधता वाढेल, असें जरी कबूल केलें तरी त्या विविधतेचें स्वरूप अगदींच प्राथमिक असेल—सुसंस्कृत नसेल—तर तिचा उपयोग काय ? समाजाच्या प्रथमच्या रानटी अवस्थेंत स्वभावाची विविधता कदाचित् अधिक सांपडेल. म्हणून कांहीं तो समाज आदर्शवत् ठरत नाहीं.

अप्रतिहत स्वातंत्र्याच्या या मर्यादा लक्षांत न आल्यामुळें १९ व्या शतकांतील व्यक्तिवादाचें स्वरूप इतकें एकांगी व संकुचित राहिलें. त्यांतच त्या तत्त्वज्ञानाला डार्विनच्या विकासवादाची जोड मिळाली; व त्याचें स्वरूप अधिकच विकृत झालें. हर्बर्ट स्पेन्सरला 'जीवनकलहा'च्या सिद्धान्तांत या तत्त्वज्ञानाला शास्त्रीय पाठिंबा सांपडला. मनुष्यसमाजाला त्यानें एक सेंद्रिय घटक (organism) असें कल्पिलें.* अर्थातच समाजाच्या ऐतिहासिक विकासाची पाहाणी डार्विनच्या सिद्धान्तानुसार करणें केवळ तर्कशुद्धच नव्हे तर अगदीं शास्त्रीय वाटलें. आणि स्पेन्सरनें तशी पहाणी करून काढलेलीं अनुमानें (कांहीं लोकांपुरतीं कां होईना) अगदीं शास्त्रशुद्ध अतएव अबाधित ठरलीं. ज्या व्यक्तींना समाजांत आपलें स्थान टिकवितां येणार नाहीं, तीं मरायलाच योग्य; त्यांना वांचविण्यासाठीं धडपड करणें समाजाला कल्याणप्रद नाहीं, त्यांची योग्यता नासक्या अवयवांसारखीं; त्यांना कापून-कमी करून—टाकणेंच बरें.—असलें

† Eccentricity is but the parody of individuality—Professor MacCun.

* मानवी समाजाची सुरवात करारा (contract) नें झाली असें स्पेन्सरचें मत होतें. मग त्याला सेंद्रिय कल्पून त्याचा विकास डार्विनच्या विकासवादानुसार होतो असें मानणें कितपत तर्कशुद्ध आहे ?

अमानुष तत्त्वज्ञान स्पेन्सरनें व्यक्तिवादाच्या नांवाखालीं पसरविलें. अर्थात् ज्यांची माणुसकी या तत्त्वज्ञानाच्या डोहांत बुडाली नव्हती त्यांनीं या रानटी शिकवणीला विरोध केला तर नवल आहे.

व्यक्तिवादी तत्त्वज्ञानाला विकृत स्वरूप प्राप्त होण्यास आणखी एक कारण होतें. स्पर्धायुगाच्या वातावरणांत हें तत्त्वज्ञान फैलावलें, असें मागें लोकहितवादींच्या विचारसरणीची छाननी करतांना म्हटलें. त्या युगानें आपल्या या अपत्याचा स्वतःच्याच स्वार्थाकरितां उपयोग करून घेतला. स्पर्धेच्या तत्त्वाची तरफदारी करण्यासाठींच हें तत्त्वज्ञान कित्येकांना प्रिय झालें होतें. व्यक्तींचे आर्थिक व्यवहार सरकार किंवा लोकमत यांकडून कसलीही अडचण न येतां स्वतंत्रपणें चालावे, असें मत धारण करणाऱ्यांना या तत्त्वज्ञानाचा बराच उपयोग झाला. 'मनुष्यप्राणी स्वभावतःच स्वार्थी आहे; अर्थात् स्वतःचें हित पाहाण्यास प्रत्येक व्यक्ति पूर्णपणें समर्थ आहे; मग त्यांत सरकार वगैरे संस्थांनीं पडण्याचें काय कारण?'—ही विचारसरणी फैलावल्यामुळें ऐपतवाल्या वर्गाचें चांगलेंच फावलें. कामगारांना भरडून काढून स्पर्धायुगाच्या मामल्यांत स्वतःचें स्थान टिकविण्यास या तत्त्वज्ञानाचा चांगलाच उपयोग झाला. परंतु त्यायोगें उत्पन्न झालेली कामगारवर्गाची दुःस्थिति फार काल चालणें शक्य नव्हतें. ती दूर करण्यासाठीं सरकारला लोकांच्या आर्थिक व्यवहारांत लौकरच हात घालावा लागला व अशा तऱ्हेनें व्यक्तिवादी तत्त्वज्ञानास पहिला शह बसला.

पण व्यक्तिवादाला खरा धक्का बसला तो समाजसत्तावाद्यांकडून. साम्यवादी विचारसरणीचा परिणाम या तत्त्वज्ञानावर झाला. त्यांतच मनुष्यस्वभावाच्या वाढत्या ज्ञानाची भर पडली. मानसशास्त्राच्या अभ्यासामुळें मानवी स्वभावाची अधिक कल्पना आली व मनुष्याच्या साहजिक प्रवृत्तींचें अधिक ज्ञान झालें. व्यक्तीच्या साहजिक प्रेरणांचा योग्य परिपोष करून त्यांचा समाज–संवर्धनाला उपयोग कसा करून घेतां येईल इकडे विचारवंतांचें लक्ष पोंचलें. प्रत्येक व्यक्तिमात्राच्या वैशिष्ट्याचा विकास व्हावयाला हवा, हें कबूल. पण तो समाज आणि व्यक्ति या दोहोंनाही पोषक ठरेल या अर्थानेंच. म्हणून आजचे व्यक्तिवादी निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार करतांना क्वचितच आढळतात.

त्यापैकीं कित्येकांचीं मतें तर साम्यवाद्यांच्या मतांशीं अधिक जुळतात. समाजाचें हित पाहाणें आवश्यकच आहे; पण तें पाहतांना त्या समाजांतील घटकांचें व्यक्तित्व चिरडूं नका, एवढाच त्यांचा आग्रह दिसतो. या तत्त्वज्ञानाला सामाजिक व्यक्तिवाद हेंच नामाभिधान अधिक शोभेल.

आगरकरांचा व्यक्तिवादही असाच प्रगमनशील आहे. व्यक्तिवादाचें अत्यंत तीव्र स्वरूप व्यक्त होतें तें खाजगी मालमत्तेच्या व्यवस्थेंत. या व्यवस्थेसंबंधीं आगरकरांनीं प्रकट केलेले विचार पाहिले म्हणजे त्यांच्या व्यक्तिवादाची योग्य कल्पना येईल. ‘ दत्तकाची अवश्यकता ’ × या लेखांत ते विचार प्रदर्शित झाले आहेत. ‘ अर्थशास्त्रदृष्ट्या प्रत्येक मनुष्याचा आपल्या स्वकष्टार्जित द्रव्यावरही, आम्ही सामान्यतः मानतों त्यापेक्षां फारच कमी हक्क आहे, ’ * असें म्हणून आगरकर पुढें लिहितात, ‘ द्रव्यसंचय सुखप्राप्तीसाठीं असल्यामुळें, तो एका व्यक्तीनें केला असो, किंवा समाजानें केला असो, त्याचा योग्य कामीं व्यय व्हावा, यांतच व्यक्तीचें व समाजाचें हित आहे. ‘ वसुधैव कुटुंबकम् ’ या उदार दृष्टीनें पाहिलें असतां, समाजाची अति उत्कर्षावस्था म्हटली म्हणजे व्यक्तिमात्रास सारखें काम व सारखें सुख असावें, ही होय. व असें होण्यास सुखप्राप्तीचें साधन जें द्रव्य तें समाजांत एकतर सारखें वांटून दिलें पाहिजे, किंवा एकत्र असल्यास समाजाच्या समायिक ताब्यांत असावें......तथापि समाजाचा पूर्वीचा इतिहास, व मनुष्याच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति, हीं मनांत आलीं म्हणजे ही सत्ययुगांतील स्थिति आपणांस कधीं तरी लाभेल किंवा नाहीं, याचाच विचार पडतो. ’ † म्हणूनच स्वार्जित द्रव्यावर व्यक्तीचा हक्क आगरकर मान्य करतात. ‘ मनुष्यमात्रास स्वार्जितावर जो हक्क आहे, तो स्वयंभू नाहीं, तर...समाजानें तो त्यास दिलेला असून, त्यांत बहुधा समाजाचें हित होतें म्हणूनच तो दिला आहे. व त्याकरितां स्वार्जिताचा उपयोग

---

× **केसरींतील निवडक निबंध.** भाग १ पृ. २६-४४. या लेखावर आगरकरांचें नांव नाहीं. परंतु त्यांत व्यक्त झालेली विचारपद्धति व लेखनशैली यांचा विचार केला, तर तो आगरकरांच्याच लेखणींतून उतरला आहे असें निर्विवाद वाटतें.

* **कित्ता** पृ. ३७.

† **कित्ता.**

समाजाच्या हिताकडे करणें, हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. ' † खाजगी मालमत्ता ही ईशनिर्मित आहे, तिच्यांत फरक करणें हें मानव्याच्या पलीकडचें आहे, असलीं आचरट मतें आगरकरांचीं नव्हतीं. या संस्थेचें सामाजिक स्वरूप जाणण्याची त्यांचीं दृष्टि, नेहमींप्रमाणेंच, शास्त्रीय होती. म्हणूनच खाजगी जिंदगीच्या व्यवस्थेमुळें जे दोष उत्पन्न झाले आहेत, त्यांजकडे आगरकरांचें लक्ष वेधल्याविना राहिलें नाहीं. मनुष्यास खाजगी मालमत्तेचा हक्क दिल्यानें, त्याच्या हातून तिचा गैरउपयोग होण्याचा संभव असतो; व या समाजरचनेमुळें कांहीं थोडे लोक श्रीमंत व इतर दरिद्री राहातात—असे दोन दोष आगरकरांनीं दाखविले. हे दोष शक्य तितके कमी करणें हेंच आपलें ध्येय असावें. 'स्वार्जितावर पूर्ण अधिकार दिल्यानें आधींच समाजांत द्रव्याचा विषम विभाग होत आहे. पण जरी कसा तरी द्रव्यसंचय व्हावा, येवढ्याकरितां समाजानें तो कबूल केला आहे, तरी **द्रव्याची वांटणी समाजांत सारखी होऊन सर्वत्रांस सारखें सुख व्हावें, हा आपला इष्ट हेतु असल्यामुळें,** जेव्हां जेव्हां स्वार्जितावर जितका हक्क दिल्याखेरीज द्रव्यसंचय कोणी करणार नाहीं, तितका हक्क कायम राखून द्रव्याची लोकांत सारखी वांटणी करितां येईल किंवा एकाचा द्रव्यसंचय सर्वत्रांच्या उपयोगास लावितां येईल, तेव्हां तेव्हां आपणांस त्या प्रसंगाचा पूर्ण उपयोग करून घेतला पाहिजे. दत्तक घेण्याचा काळ हा अशाच प्रसंगांतील मुख्य प्रसंग म्हटला तरी चालेल. '* अर्थात् द्रव्यसंचय करण्यासाठीं खाजगी मालमत्तेची गरज नाहीं असें सिद्ध झालें असतें, तर तिचा त्याग करावयास आगरकर आनंदानें तयार झाले असते. मात्र जी दुसरी व्यवस्था येईल त्यांत मनुष्याचें व्यक्तित्व कायम राहून त्याचा यथायोग्य विकास झाला म्हणजे झालें. आगरकरांची ही विचारपरंपरा प्रगमनशील अशा सामाजिक व्यक्तिवादाचें द्योतक ठरत नाहीं काय ? तसेंच, व्यवहारांतील प्रश्नांकडे—लहानथोर सर्वच बाबींकडे—ते या दृष्टीनेंच

† **केसरींतील निवडक निबंध** भाग १ पृ. ३८.

* **कित्ता.**

सेवक, गुरु आणि शिष्य, विक्रेता आणि ग्राहक यांतील व्यवहार आणि संबंध उत्तरोत्तर बलात्कारानें न होतां संमतिपूर्वक होत जाणार आहेत. ” ×

या उताऱ्यांत आगरकरांचा आशावाद दिसून येतोच; पण त्याचबरोबर त्यांची स्वातंत्र्याची व्याख्या किती तत्त्वनिष्ठ आणि व्यापक होती हेंही दिसतें. समाजांत प्रत्येकाला प्रत्येक बाबतींत समता आणि स्वातंत्र्य पाहिजे हें आगरकरांच्या तत्त्वज्ञानाचें सार होतें. “ सर्व मानवप्राणि जन्मतः सारख्या योग्यतेचे अधिकारी असून त्यांचे हक्कही एकसारखे असतात; व ती योग्यता व ते हक्क त्यांच्याकडे राहाणें त्यांच्या कमी अधिक बुद्धिविकासावर व उद्योगशीलतेवर अवलंबून आहे या श्रेष्ठ तत्वाची जगांत प्रस्थापना ” ‡ करणें हा आगरकरांच्या सुधारणेचा मुख्य पाया होता. अर्थात् हे समान अधिकार फक्त सामाजिक किंवा राजकीय अशा आकुंचित क्षेत्रांत कसे राहातील ? म्हणून आगरकरांजवळ हा प्रश्न कधीं उपस्थित झालाच नाहीं. त्यांची सुधारणा सर्वगामी होती.

या तत्त्वज्ञानी भूमिकेमुळें त्यांच्या राजकीय आकांक्षा व्यापक झाल्या आहेत. राजकीय चळवळीच्या प्रत्यक्ष आखाड्यांत आगरकर उतरले नाहींत हें खरें, पण त्यामुळें त्यांच्या राजकीय पंथाविषयीं निश्चित विधान करणें कठिण झालें आहे हेंही खरें. परंतु एवढें नक्की सांगतां येईल कीं, आगरकर मवाळ नव्हते. नेमस्तपक्षाचें राजकारण त्यांच्या मनोवृत्तीस मानवणारें नव्हतें. आणि याची जाणीव आगरकरांच्या नेमस्तपक्षीय चहात्यांस टिळकांनीं करून दिली होती. वर्तमानपत्रांतून वेळप्रसंगीं प्रचलित राजपद्धतीवर त्यांनीं टीका केली, त्या वेळीं त्यांचा इतरत्र दिसून येणारा—कोणाची भीडमुर्वत न ठेवणारा—स्वभाव व्यक्त झाला आहे. गुडघे टेकून राजकीय हक्क मागणें हें त्यांच्या स्वभावास पटलें तर नसतेंच, पण तें त्यांच्या तत्त्वज्ञानाशींही तितकेंसें सुसंगत नाहीं. प्रत्येक व्यक्तीला आणि राष्ट्राला व्यक्तित्व आणि वैशिष्ट्य आहे व त्याचा विकास झालाच पाहिजे एवढें सिद्ध झाल्यावर जी जी शक्ति त्या विकासाला विरोध करीत असेल तिला तिला विरोध करणें, हें व्यक्तीचें ( तसेंच राष्ट्राचें ) कर्तव्यच ठरतें. आणि पुढें मागें तें कर्तव्य बजाविण्यांतही येतें. आगरकरांना हें

× आगरकर : **निबंधसंग्रह** भा. १–पृ. ३६–३९.
‡ **कित्ता** भाग. ३ पृ. १८०.

पूर्णपणें ज्ञात होतें. आणि म्हणूनच 'राजकर्त्यांनो, लक्षांत ठेवा,' 'लोभ मूलानि पापानि,'' असा इषारा सत्ताधिकाऱ्यांना त्यांनीं वेळोवेळीं दिला. आगरकर राजकारणांत पडले नाहींत, पण याचा अर्थ ते राष्ट्राच्या राजकारणांत लक्ष घालीत नव्हते किंवा देशाच्या भवितव्याविषयीं ते उदासीन होते असा नव्हे. स्वातंत्र्याची तात्त्विक व्याख्या ते सांगतच (आणि ती कामगिरी खरो-खरच अमोलिक होती); परंतु हिंदी राजकारणाकडेही त्यांचें लक्ष असे. हिंदी राष्ट्रीय सभेनें काय मिळेपर्यंत कार्य करीत रहावें, हें सांगतांना आगर-करांनीं आपल्या स्वराज्यविषयक ध्येयाची रूपरेखा दर्शविली आहे. "....आमच्या सरकारचें कमीअधिक नियमन आमच्या हातीं आल्याखेरीज राष्ट्रीयसभेचें कर्तव्य संपलें असें कसें म्हणतां येईल?" हा प्रश्न विचारून आगरकर म्हण-तात, "**ज्याप्रमाणें हिंदुस्थानचें राज्य इंग्लंडांतून होत राहील त्याप्रमाणें इंग्लंडाच्या धर्तीवर येथें स्थापलेल्या राजकीय संस्थांत अधिकाराचा उणेपणा राहिलाच पाहिजे. पण जर या संबंधानें इंग्लंडाचें अनुकरण करणें इष्ट असेल तर तेथील हौस ऑफ कॉमन्ससारखी राजसभा येथें स्थापण्यांत येई तों राष्ट्रसभेचा कार्यभाग उरकला असें म्हणणें अप्रयोजक ठरणार आहे.**"* म्हणजे आगरकरांची किमान राजकीय भूक इंग्रजी राज्यपद्धतीपर्यंत होती.

६. जॉन स्टयुअर्ट मिल्ल् व हर्बर्ट स्पेन्सर या तत्त्वज्ञांच्या विचारसरणीचें प्रतिबिंब आगरकरांच्या लिखाणांत सर्वत्र आढळेल. व्यक्तिवादी तत्त्वज्ञान व तदन्तर्गत समता, स्वातंत्र्य आणि संमति यांचा गुरुमंत्र आगरकरांनीं ह्याच तत्त्ववेत्त्यांकडून घेतला. पण आगरकरांनीं परकीय विचारवंतांचे विचार उचलले म्हणून त्यांना गौणत्व येत नाहीं. उलट, तें तत्त्वज्ञान स्वतः विचार करून, पचवून आपल्या समाजांत पसरविण्याचा मनोमय प्रयत्न त्यांनीं केला याबद्दल त्यांस महत्वाचें श्रेय देतां येतें. निवड करण्यांत व पचविण्यांत आणि पचवून एतद्देशीय परिस्थितीस तें यथार्थतेनें लावून दाखविण्यांत आगरकरांनीं स्वतंत्र बुद्धि दर्शविली. आणि ही सर्व खटपट प्रगतिपर असून बुद्धिप्रामाण्यवादावर

---

* आगरकर: **निबंधसंग्रह** भाग ३—पृ० १२९. हा मजकूर स्वतः आगरकरांनींच जाड जाड ठशांत छापला आहे.

अधिष्ठित असल्यामुळें आगरकर अव्वल दर्जाचे विचारप्रवर्तक ठरतात. प्रत्येक जीवाला इतरांच्या तत्सम सुखाआड न येतां सुखसंपादन करण्याचा अधिकार आहे, या तत्त्वाच्या प्रकाशांत आगरकरांनीं हजामतीपासून देवदेवतार्चनापयत सर्व सामाजिक व धार्मिक प्रश्न निरखूनपारखून पाहिले. विधवा, अडाणी स्त्रिया, नाडलेले अस्पृश्य—यांच्या प्रश्नांकडे अत्यंत सूक्ष्मतेनें आपली तत्त्वविशुद्ध नजर रोखून आगरकर त्यांच्या प्रश्नांची चिकित्सा करीत. स्त्रीशिक्षण, प्रौढविवाह, पुनर्विवाह, अस्पृश्योद्धार, जातिभेदउन्मूलन वगैरे सुधारणांची तरफदारी ते वारंवार करीत; पण ती केवळ न्याय, दया वगैरे हृद्य तत्वांनीं प्रेरित होऊनच नव्हे, तर अत्यंत तत्वनिष्ठेनें. आगरकरांनीं शेतकरी, मजूर, अस्पृश्य वगैरे दलितवर्गांविषयीं फारसें लिहिलें नाहीं, हें खरें. त्यांचें लक्ष पांढरपेशा वर्गाकडे प्रामुख्यानें गेलें हेंही खरें. परंतु याचें कारण त्यांचें ध्येय संकुचित होतें, असें नव्हे. त्यांच्या वेळीं विशेष चालना मिळालेल्या विषयांवर त्यांची लेखणी अधिक चालावी, हें साहजिकच नव्हे काय ? शिवाय, ज्या सुशिक्षित पांढरपेशा वर्गाच्या सुधारणेकडे त्यांनीं आपलें लक्ष विशेष पोंचविलें, त्या वर्गाच्या ध्येय आणि कर्तव्य यांविषयींच्या कल्पना ढोंगी नसतील तर त्यावर विशेष जबाबदारी पडत नाहीं का ? आणि त्या वर्गाला या जबाबदरीची जाणीव तीव्रतेनें व्हावयास नको काय ? आगरकर ' तरुण सुशिक्षितांस विज्ञापना ' या आपल्या उत्कृष्ट लेखांत लिहितात, " आज जीं सुधारलेलीं राष्ट्रें आहेत त्यांपैकीं प्रत्येकांत विचार करणारे, उपभोग घेणारे व श्रम करणारे, असे तीन ठळक वर्ग दृष्टीस पडत असून ते उत्पन्न करणारीं कारणें दिवसेंदिवस क्षीण होत आहेत; आणि जसजशीं ती अधिकाधिक क्षीण होत जातील तसतशी समाजस्थ असमता नाहींशी होऊन विचार, उपभोग आणि शरीरश्रम या गोष्टी सर्वांस समप्रमाणानें कराव्या लागतील; आणि तसें झालें म्हणजे समाजास खरी बळकटी आणि स्थिरता आली व उन्नतावस्था प्राप्त झाली असें म्हणतां येईल. ही असमता दूर करण्याच्या खटपटीचा बोजा पहिल्या वर्गांतील ( म्ह० विचार करणाऱ्या ) लोकांवर पडतो." या उताऱ्यांत व्यक्त झालेलें विश्लेषण आजमितीस यद्यपि तितकेंसें पटत नसलें, तरी त्यांत व्यक्त झालेलें उदात्त ध्येय आगरकरांच्या ध्येयदर्शित्वाचें द्योतक ठरत नाहीं काय ? त्यांच्या

विचारसरणींत सांप्रतकाळीं कांहीं दोष आढळतील किंवा ते वेळींही ते असतील. पण तेवढ्यानें आगरकरांची योग्यता कमी ठरत नाहीं. सर्वस्वीं निर्दोष अशी विचारसरणी पुढें मांडणारे विचारवंत किती व कोठें आहेत ?

७ आगरकरांची ध्येयनिष्ठा इतकी प्रखर होती, अन्यायाची त्यांना आलेली चीड इतकी तीव्र होती कीं, तिचा निषेध करतांना मऊपणानें लिहिणें त्यांना सर्वस्वीं असाध्य होतें. अन्यायावर शस्त्र चालवितांना त्यांच्या हाताला स्फुरण चढे. समाजावर किंवा समाजांतील वेडगळ समजुतीवर त्यांनीं जे कोरडे ओढले ते स्पष्टवक्तेपणाचे व जालीम टीकेचे नमुने म्हणून सदैव वाचनीय ठरतील. समाजांत कोठेंही अन्याय आढळला—त्यांच्या तत्त्वज्ञानास धक्का देणारीं कसलींही कृत्यें दृष्टीस पडलीं—कीं त्यांना मनस्वी चीड येई. हीच चीड त्यांच्या या प्रखर टीकेच्या मुळाशीं आहे. त्यांची सर्व मदार बुद्धिप्रामाण्यवादावर होती. या वादाच्या विस्तवांत विशुद्ध केलेल्या मतांस अज्ञानामुळें विरोध झाला तर त्याची पर्वा त्यांनीं कां करावी ? "कोट्यवधि अक्षरशत्रु व विचारशून्य मनुष्यांनीं आपल्या अडाणी समजुतीप्रमाणें चांगलें म्हटलें; अज्ञान व धर्मभोळ्या लोकांच्या आचरट धर्मकल्पनांची व वेडसर सामाजिक विचारांची प्रसंशा करून, त्यापासून निघेल तेवढी माया काढणाऱ्या स्वार्थपरायण उदरंभरू हजारों टवाळांनीं शिव्यांचा वर्षाव केला किंवा छीः थू करण्याचा प्रयत्न केला; शेकडों अविचार व हेकड लोकांनीं नाकें मुरडलीं किंवा तिरस्कार केला—सारांश ज्यांना मनुष्याच्या पूर्णावस्थेचें रूप बिलकूल समजलें नाहीं किंवा ती घडून येण्यास काय केलें पाहिजे हें ठाऊक नाहीं—अशांच्या पर्वतप्राय झुंडीच्या झुंडी तुटून पडल्या तरी–जो खरा विचारी आहे—अशानें वरच्यासारख्या क्षुद्र लोकांच्या अवकृपेला, रागाला किंवा उपहास्यतेला यत्किंचितही न भितां आपल्या मनास योग्य वाटेल तें लिहावें, बोलावें व सांगावें हेंच त्यास उचित होय."*

इतक्या निधड्या छातीचे व भरभक्कम विचारांच्या बुरुजावर उभे असलेले आगरकर लोकप्रिय ठरले नाहींत किंवा त्यांच्या लोकसेवेचें चीजही झालें नाहीं; उलट, त्यांच्या हयातींत त्यांची प्रेतयात्रा खुद्द पुण्यांत—त्यांच्या वास्तव्य-

*आगरकर **निबंधसंग्रह** भाग १ पृ. ९

स्थानीं—निधावी, एवढा विरोध त्यांनीं कमावला. जनतेनें त्यांच्या कामगिरीचें मुळींच महत्त्व जाणलें नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांना खुनाच्या धमक्या देऊन आणि त्यांची वेळींअवेळीं टवाळी करून तिनें आपल्या क्षुद्र मनाची हौस पुरवून घेतली. अर्थात् अशिक्षित आणि अंधश्रद्ध बहुजन-समाज चेवला, संतापला म्हणजे विवेकशून्य बनतो व मूर्खपणाचे अनेक चाळे करूं लागतो. परंतु लोकसंग्रह करून हिंदुस्थानला स्वातंत्र्याच्या शिखरावर त्वरित नेऊन बसविण्याचा चंग बांधलेल्या पुढाऱ्यांनीं अधिक सावधगिरी दर्शविण्यास हवी होती. त्यांनीं लोकांना गलिच्छ गालीप्रदानापासून व तत्सम इतर मूर्खत्वापासून परावृत्त करावयास हवें होतें. परंतु चिपळूणकरांच्या कुचेष्टा-पंथानें जाणाऱ्या या लोकाग्रणींना स्वतःच्याच गुरुबंधूच्या चारित्र्याची चाड राहिली नाहीं व ते आपल्या वास्तविक कर्तव्यास मुकले.

८. आगरकरांनीं व्यावहारिक जगापासून आपली फारकत करून घेतली, असें सकृद्दर्शनीं वाटलें तरी त्या म्हणण्यांत विशेष अर्थ नाहीं. कारण फारकत करून घेतली म्हणजे काय केलें? त्यांची शैक्षणिक कामगिरी व्यावहारिक स्वरूपाची ठरते कीं नाहीं? त्यांची समाजसुधारणेची चळवळ त्याच स्वरूपाची नाहीं का? राजकीय आखाड्यांत ते उतरले नाहींत, व्यासपिठावर येऊन मोठमोठीं भाषणें त्यांनीं केलीं नाहींत, सभागृहामध्यें गळ्यांत हार मिरविले नाहींत—हें अगदीं खरें. पण राजकीय चळवळ ते करते तर सामाजिक व शैक्षणिक कामगिरी त्यांच्या हातून पार पडती का? याचा विचार करून पहावा. तसेंच, ते राजकीय चळवळीच्या प्राङ्गणांत उतरते, तर हिंदुस्थान आज स्वराज्याच्या समाधानांत असता, असें नक्की म्हणतां येईल का? याचाही विचार करावा. आगरकरांनीं लोकसंग्रह केला नाहीं; त्यांनीं लोकानुरंजन केलें नाहीं. अगदीं खरें. पण याचा अर्थ इतकाच कीं, लोकसमुहाच्या आचरट समजुतींना मान तुकवून त्यांनीं स्वतः-च्या विचारांत व आचरणांत तडजोड करण्याचें नाकारलें; याचा अर्थ इतकाच कीं, त्यांचें समग्र आयुष्य तत्त्वनिष्ठ व तत्त्वमय असेंच होतें. महाराष्ट्राचा आत्मा अभिमानानें स्फुरावा, अशीच नाहीं का ही कर्तबगारी? आगरकरांनीं राजकारणाची पुंगी वाजविली नाहीं (' वाजली तर वाजली नाहींतर मोडून खाल्ली ' अशी त्यांची वृत्ति नव्हतीच!); त्यांनीं समाजसुधारणेचेंच ' तुणतुणें ' वाजविलें.

म्हणून कांहीं ते लढवय्ये नाहींत, असें नव्हे. आगरकर अव्वल दर्जाचे लढवय्ये होते. ते तात्त्विक लढवय्येच असतील कदाचित्. पण व्यापकदृष्टीनें पाहातां अशा लढवय्यांची गरज समाजाला विशेष असते. आगरकरांनीं ती गरज बरीच पुरविली.

९. तर्कशुद्ध विचारसरणी, कडक तत्त्वनिष्ठा, स्वार्थत्यागी जीवित...इत्यादि गुणांमुळें आगरकर अद्वितीय विभूति वाटतात.* त्यांच्या कष्टमय जीवितामुळें त्यांचें विभूतिमत्त्व अधिकच खुलून दिसतें. लोकाकरितां, लोकांत राहून, लोकांवरच सडेतोड टीका करण्यास विशेष धारिष्ट्य लागतें. तसेंच, लोकांचा रोष सहन करूनही लोकसेवा करण्यास मनाची शांति खंबीर असावी लागते. प्रिन्सिपाल आगरकर या दोनही कसोटीस पुरेपूर उतरले. " 'मऊ मेणाहूनि आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेदूं ऐसे ' हें तुकारामानें केलेलें वर्णन आगरकरांना अक्षरशः लागू पडतें. समाजांतील हरएक व्यक्तीच्या दुःखानें कळवून जाण्याला अंतःकरण लोण्याहूनहि मऊ असावें लागतें; पण तें दुःख नाहींसें करण्याकरतां परंपरेला चिकटून राहाणाऱ्या समाजावर कोरडे उडवायला हृदय दगडाहूनहि कठीण केलें पाहिजे. " × आगरकरांनीं ह्या दोन्ही गोष्टी साधल्या. आणि म्हणूनच त्यांच्याबरोबरीनें येणारा निर्भीड व त्यांच्याइतकी कळकळ असलेला 'लोकहितवादी ' अद्याप महाराष्ट्रांत कोणी झालाच नाहीं, असें म्हणणें क्रमप्राप्त ठरतें. परंतु महाराष्ट्रियांनीं या लोकोत्तर विभूतीच्या कार्याचें चीज मुळींच केलें नाहीं हें पाहून मनाला पराकाष्ठेचा विषाद वाटतो. त्यामुळें महराष्ट्रास–मराठी बुद्धिमत्तेस–असहिष्णुतेचा व गाजरपारखीपणाचा दोष लागतो. आगरकर-दिन पाळण्याची चाल आहे हें खरें. परंतु परवांपरवांपर्यंत महाराष्ट्रांत आगरकरांचें जाहीर स्मारक नव्हतें,$ हें कशाचें द्योतक आहे ? आगरकरांची योग्यता संपूर्णतया ओळखण्याची पात्रता महाराष्ट्रियांच्या अंगीं नाहीं, असेंच यावरून समजावयाचें कीं काय ?

---

* "..............................................the elements
So mix'd in him that Nature might stand up
And say to all the world, 'This was a man !' "

हें शेक्सिपअरनें केलेलें ब्रूटसचें वर्णन आगरकरांना तंतोतंत लागू पडतें.

× वि. स. खांडेकरः **आगरकर चरित्र**. पृ. ११३.

$ **आगरकर हायस्कूल फॉर गर्ल्स, पुणें.** स्थापना १९३४. आपलें स्मारक म्हणून मुलींची वेगळी शाळा निघावी ही कल्पना आगरकरांस कितपत रुचली असती ?

# १४ लोकमान्य टिळक.



१. शाळामास्तर म्हणून सार्वजनिक आयुष्यक्रम सुरू करणारे टिळक कांहीं वर्षांनीं पत्रकर्ते झाले, ही यदृच्छया घडलेली गोष्ट हिंदुस्थानच्या इतिहासाला वळण लावणारी ठरली, असें म्हणणें अतिशयोक्तीचें नव्हे. या पूर्वी झालेले (रानड्यांचें नांव वगळल्यास) सर्व कार्यकर्ते, केवळ प्रांतिक कक्षेंतच प्रभावी ठरले. परंतु रानड्यांपेक्षांही अधिक कणखर, अधिक करारी, अधिक कर्तबगार व अधिक निर्भीड असे टिळक असल्यानें त्यांना अखिल भारतीय स्थान प्राप्त

झालें. शिवाय रानडे हे बडे सरकारी हुद्देदार व 'पदवीधर' होते हें विसरून चालावयाचें नाहीं. रानडे राजमान्य होते, तर टिळकांचें नांव उच्चारतांच अधिकाऱ्यांच्या कपाळाला आंठ्या चढत. पण टिळक 'लोकमान्य' होते तसे इतर कोणीच नव्हते हेंही खरें. टिळकांची राजकीय कामगिरी काय या प्रश्नाचें थोडक्यांत उत्तर देतां येणें कठिण आहे. त्यांनीं केलेली समग्र कामगिरी पाहिली म्हणजे तिची व्यापकता कळून येईल.

इंग्रजी राज्य आपणांवर आलें तें इष्ट का अनिष्ट हें लोकांना समजावून देतांना टिळक म्हणतात, ... "वाढती लोकसंख्या, बुडता व्यापार, सरकारचा अवाढव्य होत असलेला खर्च, आणि उत्तरोत्तर निःसत्त्व होत चाललेली जमीन, यामुळें हिंदुस्थानची इंग्रजी राज्याखालीं काय स्थिति होईल याची कोणाहि विचारी मनुष्यास सहज भीति पडेल. हिंदुस्थानांतून प्रतिवर्षी जास्त जास्त माल परदेशास जाऊं लागला तर त्यांत समाधान मानण्याचें कांहींएक कारण नाहीं. या मालाच्या मोबदला माल आम्हांस येत असता तर गोष्ट निराळी. परंतु कोट्यवधि रुपयांच्या मालाबद्दल युरोपियन लोकांची व सोल्जरांची नोकरी हाच जेथें आम्हांस मोबदला मिळतो तेथें...आम्हीं आपल्या खुषीनें अगर जुलमानें आमच्यापुढील वाढलेल्या ताटांतील भाकरीचा जास्त जास्त भाग विलायतेस रवाना करतों असेंच म्हटलें पाहिजे."*

सर्वसाधारण माणसास सुद्धां सहज समजेल अशा पद्धतीनें कुठलाही विषय समजावून सांगण्याची टिळकांची हातोटी अप्रतिम आहे. इंग्रजांच्या राज्यापासून आम्हांला कांहीं फायदा झाला नाहीं असें टिळक मुळींच म्हणत नाहींत. त्यांची दृष्टि साफ आहे. कुठल्याही पूर्वग्रहानें ते पहात नसून त्यांच्या विचारांत चौकस बुद्धि स्पष्ट दिसते. ते म्हणतात—"इंग्रजी राज्यांत आम्हांस झालेले फायदे म्हटले म्हणजेः—१ शांतता; २ कायद्याची सर्वत्र व्यवस्था; ३ अपराधांचा बंदोबस्त; ४ सार्वजनिक आरोग्य; ५ व्यापारसमृद्धि; ६ शेतकी सुधारणा; ७ खनिज व उद्भिज संपत्तीची अभिरुद्धि; ८ विद्यादानाच्या अनुपम सोयी; ९ स्वराज्य

* लो० टिळकांचे केसरींतील लेख १—१३६

कारभाऱ्यांची प्राप्ति; १० लेखनस्वातंत्र्य; ११ यंत्रादि सुखसामुग्रीचा परिचय आणि १२ स्वातंत्र्याची अभिरुची हे होत.''+

२. अशा फायद्यांचा लाभ करून घेणें–आलेली संधि पूर्णत्वानें आपल्या हिताकडे लावणें–हें टिळकांचें वैशिष्ट्य. म्हणून त्यांनीं हरप्रसंगीं आपल्या वाचकांना प्राप्त परिस्थितीची जाणीव करून दिली व ''असें असें करा'' हें टुमणें मागें लावलें. इ. स. १८९६ मध्यें सर्वत्र दुष्काळ पडला. तेव्हां टिळकांनीं लोकांना आपले कायदेशीर हक्क समजावून दिले आणि हक्क बजावून घेण्यास शिकविलें. ''जेथें जेथें दुष्काळ पडला आहे तेथल्या तेथल्या लोकांनीं कलेक्टरसाहेबांकडे जाऊन (१) आमच्या जमिनीवर सारा यंदां सोडा; (२) आमच्या गांवच्या आसपास कामें काढून आम्हांस मजुरी द्या; (३) तगाईच्या रूपानें शेतकीच्या कामाकरितां कर्जाऊ पैसे द्या, अशा अर्थाचे अर्ज केले पाहिजेत.'' † अशा प्रकारें कायदेशीर दाद मागण्याची शिकवण पूर्वीं कधीं रयतेस फारशी मिळाली नव्हती. पण टिळकांनीं हें काम अविरत केलें.

''वेळींच लोकांनीं जागें होऊन ह्या होऊं घातलेल्या नव्या कायद्यासंबंधानें आपले विचार सरकारपुढें मांडणें अत्यंत अवश्यक आहे'' अशी भयसूचक घंटा मुंबई इलाख्यांतील स्थानिक स्वराज्यावर नियंत्रण घालूं पाहणारा कायदा चर्चेसाठीं निघाला, तेव्हां टिळकांनीं वाजवून जनतेस जागें केलें. फेर-पाहाणीची अमलबजावणी झाली तेव्हां किंवा जमिनीच्या मालकीचा वाद उपस्थित झाला तेव्हांही टिळकांची हीच जागरूक वृत्ति व लोकांना नव्या अमदानींत नव्या कायद्यानें झगडण्यास शिकविण्याची हातोटी दिसून येते. कारण, सरकार कायदेशीर व परमन्यायीही असलें ''तरी देवाप्रमाणें आहे. तें आपण होऊन कांहीं बोलत नाहीं, त्यास कौल लावावा लागतो; व तो कौल लावण्यास गुरवाची जरूर लागते. व थोडासा धूपहि जाळावा लागतो. करितां 'फॅमिन रिलीफ कोड' लोकांनीं नीट समजावून घेतल्याखेरीज गरीब लोकांच्या जिवाचा कधींहि पूर्ण बचाव व्हावयाचा नाहीं.'' ×

+ लो॰ टिळकांचे केसरींतील लेख १—७३

† कित्ता १—५८१

× कित्ता १—५८३

३. एवढेंच सांगून टिळक थांबले नाहींत. रयतेनें आपले हक्क बजावण्याविषयीं किती तत्पर असावयास हवें हें त्यांना प्रत्येक शेतकऱ्याला समजावून द्यावयाचें होतें. सरकार आपण होऊन कांहीं देत नाहीं एवढें पटवून दिल्यावर ते सांगतात:- "दुष्काळाची खरी तजवीज सरकारकडूनच झाली पाहिजे; व ती सरकार खुषी असलें तरी त्याच्या हातून करवून घेणें हें पुष्कळ अंशीं लोकांच्या हातांत आहे, हें लोकांनीं कधींहि विसरतां कामा नये; व एवढ्याच करितां आम्ही केसरींतून त्यांस पुनः पुनः इशारा करीत आहों." राजदरबारचा हक्क संपादण्याच्या रीतीसंबंधीं शिक्षण देणारे – हातांत लेखणी धरून शिकवावें त्याप्रमाणें शिकविणारे – टिळक सार्वजनिक शाळामास्तरच नव्हत काय? हिंदी प्रजा परतंत्र आहे, तरी हल्लींच्या काळीं परतंत्रांनासुद्धां कांहीं अधिकार आहेत; साम्राज्यसरकारच्या मुलखावर सूर्य कधींही मावळत नसला तरी त्यांच्या राज्यकारभाराला कांहीं नियंत्रण आहे, ही जाणीव टिळकांनीं सर्व प्रजेला करून दिली. राजकीय विचार करणें म्हणजे कांहीं पाप नव्हे असें सांगून त्यांनीं आपल्या हक्कांची फोड अशी केली आहे, "सुशिक्षित म्हणविणाऱ्या प्रत्येकाच्या डोक्यांत राजकीय विचार घोळूं लागतील व राजकीय सुधारणे-प्रीत्यर्थ प्रयत्न करण्याची त्याला हांव सुटेल तर त्यांत कांहींच गैर नाहीं. आम्हांला राज्यकारभारांत घ्या, आमची सल्लामसलत ऐका, तुमच्यांतले हे दोष काढा, अमुकांचा संग्रह करा, अमका कर हवा आणि तमका नको, येथें तुम्हीं चुकतां, तिकडे तुमचें लक्ष पोचत नाहीं, इत्यादि गोष्टी उघडपणें सरकारास सांगण्याचा आमचा हक्क आहे." *

एवढेंच नाहीं, तर टिळकांनीं सरकारची कायदा बदलण्याची शक्ति मान्य केली असून, तो बदलेपर्यंत तरी आपल्या हक्कांच्या मर्यादा ओळखून झगडलेंच पाहिजे असा त्यांचा आग्रह आहे. स्वतःच्या जबाबदारीसंबंधीं ते लिहितात: "सरकारनें आम्हांस बोलण्याची व लिहिण्याची जी मोकळीक दिली आहे ती त्यास जास्त वाटल्यास तें केव्हांही कमी करण्यास समर्थ आहे; परंतु ज्या काळीं कायद्याप्रमाणें जितकी मोकळीक दिलेली असेल तिचा पूर्ण फायदा घेऊन

* लो० टिळकांचे केसरींतील लेख १—७२

लोकमत जागृत करण्याचें व सरकारपाशीं आम्हीं मागत असलेल्या हक्कांचें समर्थन करण्याचें जें काम आम्हीं पत्करलें आहे तें काम निर्भयपणें चालविणें आम्हांस जरूर आहे. "×

४. स्वहक्कांबद्दलची ही तीव्र जाणीव टिळकांचे पूर्वी कोणास विशेष झाली नव्हती. आणि आज राजकीय लढ्याचें जें स्वरूप दृष्टीस पडतें त्याचा पाया दुसरा कोणता असणार ? नुसती जाणीव करून देऊनच टिळक थांबले नाहींत. आपण होऊन त्यांनीं "रयतेची तरफदारी" स्वीकारली व त्याबाबत त्यांनीं किती हाल सोसले व काय दिव्य केलें हें सांगण्याची जरूरी नाहीं. प्रजेला स्वहक्कांसाठीं झगडावें लागणार तें नोकरशाहीशीं व तिची वृत्ति जाणून टिळकांनीं त्या भांडणाची ओळख जनतेला करून दिली. सत्ता गाजविण्याची हौस सर्व देशांतील अधिकाऱ्यांस नेहमींचीच असते व तिला उद्देशून टिळक म्हणतातः—"हे दिवस दांडगाईचे नाहींत, कायद्याचे आहेत, हें रयत व सरकारी अमलदार ह्या दोघांनींही लक्षांत ठेवलें पाहिजे. अमुक आणे पीक बुडाल्यास साऱ्याची तहकुबी अगर माफी मिळेल असा जर कायदा आहे, तर सरकारी अधिकाऱ्यांनीं लोकांस ती माफी अवश्य दिली पाहिजे; व लोकांनींहि ती निश्चयानें पण शांततेनें आग्रहपूर्वक मागून घेतली पाहिजे." * टिळकांचा भर सनदशीर चळवळीवर असून त्यांनीं लोकांत नव्हतें तें धैर्य आणण्याचा प्रयत्न कसा केला हें वरील उताऱ्यांवरून कळतें.

५. लोकहिताकडे होत असलेलें सरकारचें दुर्लक्ष लोकांच्या नजरेस आणतांना टिळकांनीं त्यांच्या स्वातंत्र्येच्छेची तरफदारी केली. नोकरांचे लाड चालविणें हें जर न्याय्य ठरतें तर प्रजेची स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं चळवळहि अगदीं न्याय्य आहे असें टिळकांनीं दर्शविलें.

कायद्याचा अतिक्रम होऊन अधिकाऱ्यांचे हातून प्रजेची गांजणूक कशी होते हें टिळकांनीं अनेक वेळां सरकारचे नजरेस आणून देण्याचा प्रयत्न केला. प्रजेच्या हक्कांवर गदा येऊं नये म्हणून जपण्याची त्यांनीं जेव्हां जेव्हां तत्परता दाखविली

× लो० टिळकांचे केसरींतील लेख २ पृ० ९—१०
* कित्ता १ पृ० ५८८—८९

तेव्हां तेव्हां त्यांनीं व्यापक दृष्टीनेंच विचार केला आहे. “तो प्रांत दूरचा–आपणांस त्याच्याशीं काय करावयाचें ?” असली बेफिकिरी टिळकांच्या गाऱ्हाण्यांत कधीं सांपडत नाहीं. डहाणू उंबरगांव पेट्यांतील जमिनींची फेरपहाणी होऊन जुलूम झाला; रेल्वेची ‘सुधारणा’ झाली याच आधारावर तेथील “सारे दुप्पट तिप्पट वाढविले.” टिळक म्हणतात, “दोन तृतियांशाहून जास्ती सारा वाढवूं नये असा सरकारचा नियम असतांही सर्व्हे अधिकाऱ्यांनीं त्याचें उल्लंघन केलें. एवढेंच नव्हे तर सरकारी नियमाप्रमाणें पाहिलें तर या सुधारणेचा सर्व फायदा शेतकऱ्यांसच मिळाला पाहिजे. पण नवीन सारे ठरवितांना सर्व्हे अधिकाऱ्यांनीं या गोष्टीकडे बिलकूल लक्ष दिलें नाहीं.”× १९०५ च्या वंगभंगामुळें झालेल्या बंगालसारख्या परप्रांतीय चळवळींशीं टिळक किती समरस झाले होते हें सर्वश्रुतच आहे.

८. टिळकांच्या या सर्व शिकवणींत लोकांना राजकीय हक्कांची जाणीव करून देण्याचा तर हेतु आहेच, पण लोकहितासाठीं झटण्याचा – आपापल्यापरी कार्य करण्याचा—धडाही त्यांनीं दिला आहे. ठिकठिकाणच्या सुशिक्षितांनीं शेतकऱ्यांस मदत करावी, अर्ज लिहून द्यावे, आपलें मत सरकारला स्पष्टपणें कळवावें, यांत संघटितपणें लोकसेवा करण्याचा त्यांनीं एक मार्ग दाखविला आहे. त्यांनीं आपल्या लेखांमधून जनतेला एक नवी दृष्टि दिली. सरकारला भिऊन वागण्याचा शिरस्ता कायम झाला होता तो काढून टाकून टिळकांनीं राजकीय चळवळ करण्यांत कुठलेंच ‘पातक’ नसल्याचें जनतेला पटवून दिलें. एवढेंच काय पण सरकारच्या बऱ्यावाईट कृत्यांवर टीका करण्याचा आपला हक्क टिळक बरोबर बजावीत. सरकार सामर्थ्यशाली असलें तरी त्यावर टीका करण्यास टिळक मुळींच कचरत नसत. त्यांचें म्हणणें अगदीं स्पष्ट असे. मुंबईचे गव्हर्नर किंवा हिंदुस्थानचे व्हाइसरॉय वेळोवेळीं बदलून गेले तेव्हां त्यांच्या कारकिर्दीचा आढावा टिळकांनीं निर्भीडपणें घेतलेला आढळतो. “आमच्या तिजोरींतून दरमहा दहा हजार रुपये देऊन खऱ्या कर्तबगारीचीं माणसें हिंदुस्थानांत पाठवावयास जर विलायत सरकारास मिळत नसतील तर या जागा मुळींच काढून टाकाव्या अथवा पाहिजे असल्यास आणखी पगार देऊन योग्य

× लो० टिळकांचे केसरींतील लेख २—६८

माणसें इकडे पाठवावीं अशी राणीसरकारास आमची प्रार्थना आहे." × मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सँढर्स्ट परत निघाले तेव्हांचे टिळकांचे हे उद्गार आहेत. "त्यांची कारकिर्द सर्वतोपरी आमच्या नुकसानीची व त्रासाची झाली."* हें चार लेखांत त्यांनीं स्पष्ट करून सांगितलें. कर्झनशाही संपली तेव्हांही तिचा समारोप बराच झणझणीत भाषेंत केला आहे. अशा वरिष्ठ अधिकाऱ्यांवर रास्त टीका करण्याचे प्रसंग टिळकांनीं व्यर्थ दवडले नाहींत. आणि अशा टीकेमुळें जनतेला स्वहक्कांची जाणीव व्हावी हाच त्यांचा हेतु होता. गव्हर्नरांच्या कारकिर्दीचें निरीक्षण करण्याच्या आपल्या हक्काचें स्पष्टीकरण टिळकांनीं असें केलें:—"आमचें हित कोणतें आणि गैरहित कोणतें हें आम्हांस कळूं लागलें आहे. आणि कोणत्याहि गव्हर्नराच्या गुणावगुणांचें आम्ही जें परीक्षण करणार तें ह्याच कसोटीस लावून करणार." †

७. स्वहक्कांसाठीं झगडत असतां टिळकांनीं हरतऱ्हेचा युक्तिवाद लढविल्याचें दिसतें. इंग्लंडनें आपल्याच हिताच्या दृष्टीनें तरी हिंदुस्थानला स्वराज्य द्यावें, व त्याला परतंत्र ठेवूं नये असें त्यांनीं सुचविलें. युरोपमध्यें युद्धाचीं पूर्वचिन्हें दिसत होतीं, प्रत्येक राष्ट्राची मुलुख मारण्याची हौस वाढत होती, 'अनावर राज्यविस्तार' करण्याची धडपड चालू होती, तेव्हां 'हिंदुस्थानची अंतर्व्यवस्था' पाहण्याच्या निमित्तानें टिळकांनीं म्हटलें, "....सर्व सुरळीत व्यवहार चालला आहे तोंपर्यंत ठीक आहे. पण युरोपांतील बलाढ्य राष्ट्रांमध्यें जी चढाओढ चाललेली आहे ती ज्या वेळीं निकरास येईल तेव्हां अशा रीतीनें मृतप्राय केलेल्या हिंदुस्थानचें इंग्लंडच्या गळ्यांतील ओझें इंग्लंडास असह्य नाहीं तरी अडचणीचें झाल्याखेरीज राहणार नाहीं." § विषयप्रतिपादन कोणत्याही निमित्तानें असो, टिळकांनीं त्याचा संबंध हिंदुस्थानच्या परावलंबी अवस्थेकडे नेऊन भिडविलाच. इंपिरिॲलिझमला टिळकांनीं 'पाच्छाहीपणा' असा शब्द योजून तो एक जबरीचाच प्रकार आहे हें युक्तिवादानें पटवून दिलें. इंग्लंडचें यापासून

× लो॰ टिळकांचे केसरींतील लेख २—१२७
* कित्ता २—१२५
† कित्ता २—१२७
§ कित्ता २—१३५

नुकसान होईल असें टिळकांनीं दाखविलें असून हिंदी आकांक्षांचें ‘ तुणतुणें ’ वाजविण्यासही ते विसरले नाहींत.

८. “ दोघांचेहि गळे दोरीनें एकत्र बांधले जात असतां ती दोरी आवळण्याचा प्रयत्न करणें हें उभयतांसहि श्रेयस्कर नाहीं व एवढ्याचसाठीं इंग्लंडनें इतर देशांस गुलाम बनवून ‘को ऽ न्यो ऽ स्ति सदृशं मया ’ असा डौल मारण्यापेक्षां योग्य तितकें वर्चस्व आपणाकडे ठेवून जिंकलेल्या देशांना स्वातंत्र्याची जोड मिळवून देण्यास झटावें हेंच त्याच्या हिताचें असून नीतिदृष्ट्या भूषणास्पद व फायद्याचें आहे.” +

जनतेंत स्वाभिमानी विचार उत्पन्न करण्याचें कार्य टिळकांनीं फारच कौशल्यपूर्वक केलें असें म्हणतां येतें. तिचा दैववाद, जुन्या ग्रंथांवरील श्रद्धा, धर्मावरील भक्ति...ह्या सर्वांचा उपयोग राजकीय जागृति करण्याकडे आणि कार्योद्युक्तांचा आशावाद वाढविण्याकडे त्यांनीं केला. एकच उदाहरण पहा. कर्झन साहेबांनीं कलकत्त्याचें सुंदर वर्णन केलें आणि हें सर्व इंग्रजी करामतीचें फळ – युरोपियन संसर्ग व सहवास याचा परिणाम – असें प्रतिपादिलें. ह्या सगळ्या ‘शिळोप्याच्या चार गप्पा’ असें म्हणून त्यांचा समाचार घेतांना टिळक लिहितातः– “ कलकत्ता इंग्रजांनीं वसविलें व इंग्रजी राज्याची राजधानी म्हणूनच तें भरभराटीस आलें, हें खरें आहे. पण त्याबद्दल एवढा डौल मिरविण्याचें कांहीं कारण नाहीं. ह्या हिंदुस्थानाच्या भूमीवर रामाची अयोध्या, पांडवांचें इन्द्रप्रस्थ, विक्रमाची उज्जनी, पृथ्वीराजाचें कनोज, मोगलांची दिल्ली आणि दक्षिणेंतील विजयनगर हीं शहरेंहि एकदां संपत्तीनें, वैभवानें व शोभेनें इतरांस खालीं मान घालावयास लावीत असत. पण आतां त्यांची काय स्थिति झाली आहे ! ” ×

९. टिळकांनीं कोठलें विवक्षित ध्येय लोकांपुढें ठेवलें हें सांगणें सोपें आहे. टिळक लढवय्ये होते. ध्येयाकडे दृष्टि लावून नुसतें तत्त्वचिंतन करणारे नव्हते. अर्थात् प्रथम राजकीय जागृति करून लोकांना सरकारशीं स्वहक्कांकरितां झगड-

---

+ लो० टिळकांचे केसरींतील लेख २—३८३

× कित्ता २—३९८

ण्यास शिकविल्यानंतरच त्यांना ध्येयाचा प्रश्न पडला. इंग्रजांच्या राजकारभाराचा हेतु जनतेच्या कानींकपाळीं आदळल्यावरच राजकीय ध्येयाचें स्मरण ते तिला करून देऊं लागले. उत्तरआयुष्यांत टिळकांनीं स्वराज्यसंघाची चळवळ केली तेव्हां त्यांनीं आपलें ध्येय स्पष्टपणें पुढें ठेवलें. मृत्युपूर्वीं थोडे दिवस 'काँग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी'चा जाहीरनामा त्यांनीं काढला, त्यावरून टिळकांचें ध्येय स्पष्टच दिसून येतें.

**मुलांच्या चालीनें चालावें । मुलांचें मनोगतें बोलावें।**
**तैसें जनांस शिकवावें । हळू हळू ॥**

हा व्यवहारी मार्ग टिळकांना पटला होता व तोच त्यांनीं आचरिला. आपल्या पुढील कार्याची वास्तविक कल्पना समाजास झाल्यानें पराभववृत्तीमुळें त्यास कार्य करण्याऐवजीं नैराश्याचाच झटका येईल हें जाणून, तसेंच, हळूहळू ध्येय पुढें पुढें सरकावीत नेल्यामुळें कार्यार्थी समाज आत्मविश्वासावर अधिक नेटानें पुढें जातो हें नीट ओळखून टिळकांनीं कल्पनासाम्राज्यांत भराऱ्या मारण्याचें अजिबात टाळलें. त्यांच्या एकंदर आयुष्यक्रमावरून त्यांच्या व्यवहार्यतेची ओळख पटते किंवा त्यांची लढाऊवृत्ति दिसून येते. लोकांचा मगदूर योग्य प्रकारें जाणल्यामुळें अव्यहार्य असा कार्यक्रम त्यांनीं कधींच आंखला नाहीं; व तो साध्य झाला नाहीं म्हणून लोकांच्याच डोक्यावर चुकारपणाचें खापर फोडण्याचा प्रसंग त्यांजवर कधींच आला नाहीं. तर प्रथम सहजसाध्य अशा सनदशीर चळवळी करण्यासच लोकांना त्यांनीं प्रवृत्त केलें. किरकोळ गाऱ्हाण्यासाठीं त्यांनीं चळवळ करून लोकांत आत्मविश्वास आणला. आणि ह्या आत्मविश्वासाच्या जोरावरच चढते कार्यक्रम स्वीकारणें त्यांना सोईचें झालें. त्यामुळें राजकारणांतील उपरति किंवा नैराश्याचा वैताग टिळकांच्या अनुयायांत त्यांचे काळीं आढळला नाहीं. उलट टिळकांच्या नेतृत्वाखालीं कार्य करण्यास अधिकाधिक मंडळी उत्साहानें पुढें आली. म्हणूनच 'लोकसंग्रह' टिळकांना साधला तसा अद्याप कोणाला साधला नाहीं, असें म्हणणें शक्य आणि सयुक्तिक ठरतें. शेतकऱ्यांना अर्ज करावयास सांगणाऱ्या टिळकांनींच शेवटीं "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे" हा मंत्र घरोघर पसरविला. पण त्यासाठीं त्यांची तीन तपांची खडतर तपश्चर्या

खर्ची पडली. टिळकांच्या स्वराज्याची कल्पना अशी होतीः—"स्वराज्य म्हणजे दुसरें तिसरें कांहीं नाहीं. माझ्या घरचा कारभार मी पहाणें याचेंच नांव स्वराज्य. नोकरांचें राज्य जाऊन लोकांचें राज्य व्हावें याचेंच नांव स्वराज्य. कलेक्टर, कमिशनर, गव्हर्नर हुषार आहेत. ते आम्हाला पाहिजेत. पण ते आमच्या हाताखालीं पाहिजेत. ते नोकर असावेत, मालक नकोत. याचेंच नांव स्वराज्य."* टिळकांचें ध्येय साम्राज्यांतर्गत स्वराज्याचेंच आहे हें त्यांच्या जाहिरनाम्या-वरून दिसून येतें. "सर्व मानवजातींत बंधुभाव वाढून एकंदर मनुष्यमात्राची उन्नति होण्यासाठीं ब्रिटिश साम्राज्यमंडळांत हिंदुस्थान सामील आसावा;"... "परंतु ग्रेट ब्रिटन धरून...जे भागीदार आहेत त्यांच्या बरोबरीनें हिंदुस्थानचा दर्जा रहावा व त्याचा कारभार पूर्णपणें त्याच्या ताब्यांत असावा;" अशी मागणी कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षानें केली. "राष्ट्रांचें स्वातंत्र्य...रक्षण करणें आणि एका देशाकडून दुसऱ्या देशाची होणारी व्यापारी लुबाडणूक बंद पाडणें या गोष्टी घडवून आणणाऱ्या" राष्ट्रसंघाचें डेमोक्रॅटिक पक्षानें अभिनंदन केलें. "शिक्षण, चळवळ व संघटना" ह्या ब्रीद वाक्यावर उभारलेला हा पक्ष दडप-शाहीचे कायदे रद्द करून तुरुंगांत सुधारणा घडविणार होता...शेतींतील व कारखान्यांतील मजुरांचे कामाचे तास व किमान मजुरी ठरवून राहण्याचीहि सोय करणार होता. रेल्वे राष्ट्रीय मालकीच्या करून देशी उद्योगधंद्यांना संरक्षण देणार होता. भाषावार प्रांतरचना, जातीजातींतील सलोखा, देशी भाषांचा प्रचार हेही त्या कार्यक्रमांतलेच भाग होत. लष्करी खर्च कमी करणें, राष्ट्रीय स्वयंसेवकदल उभारणें व करांचा बोजा हलका करणें ... अशीं बरींच स्तुत्य व उपयुक्त कार्यें ह्या पक्षाच्या जाहिरनाम्यांत× आढळतात व त्यावरून टिळकांची व्यापक दृष्टि समजते.

१०. हें राजकीय ध्येय ठरल्यानंतर तें गांठण्याचे त्यांचे मार्ग पाहूं. "देशास स्वराज्य मिळविण्याकरितां शत्रूस वेळप्रसंगीं नमस्कार घालण्यापासून तों राज्यक्रांतिकारक कोणताहि शेवटचा बंडखोरीचा अति जालीम उपाय ज्यास

---

* केसरीप्रबोध १—८१

× लो० टिळकांचे केसरींतील लेख ३ पृ० ४७९—८२

सुचेल तो अवलंबण्यास मी तयार आहे * " असे वैतागलेले उद्गार काढूनही टिळकांनीं शेवटपर्यंत सनदशीर मार्गाचा अवलंब केला याचें कारण राजकारणाकडे निवळ भावनावशतेनें न पाहातां व्यवहारी कायदेशीर रीतीनें पाहाण्याची त्यांची दृष्टि होय. बहिष्काराची चळवळ स्वदेशी चळवळीस मदतनीस म्हणून त्यांनीं घेतली ते वेळीं टिळक आपल्या मार्गाबद्दल असें सांगतात. "न्याय, नीति आणि ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगति यांचा...पाठिंबा असला म्हणजे मग आमचे प्रयत्न कायद्याचे मर्यादेंत येतात कीं बाहेर पडतात याची आम्हीं पर्वा करून उपयोगी नाहीं. कारण कायदा परक्यांचे हातांत आहे. आतां एवढें खरें कीं, **कायदा मोडला गेला तर शिक्षा होणार; परंतु कायदा जर जुलमी असेल तर ही शिक्षा सोसूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे; एरवीं इलाज नाहीं.** नीति आणि कायदा यांची जेव्हां फारकत होते तेव्हां असेच प्रकार घडून यावयाचे. "†

ही बहिष्काराची चळवळ टिळकांनीं स्वीकारली केव्हां ? तर "वीस वर्षें राष्ट्रीय सभेची ओरड एकसारखी चालू आहे; आणि...नुसत्या ओरडीनें राजकीय बाबतींत तरी सत्ताधारी लोकांचीं मनें वळत नाहींत एवढें सिद्ध झालें आहे" तेव्हां. कारण, टिळक म्हणतात, "हिंदी लोकांच्या अंगांत करारीपणा वाढला किंवा एकराष्ट्रीयत्वाची कल्पना अधिक जागृत झाली तर सत्ताधारी इंग्रज लोक स्वच्छंद रीतीनें चरत आहेत त्यांस कांहीं तरी आळा पडणार. "× अशा प्रकारें राज्यकारभाराचा गाडा अडवून धरण्यांत किंवा "कायदेभंग" करण्यांत टिळकांना 'गैर सदनशीर' असें कांहीं वाटत नव्हतें हें उघड आहे. या दोन्ही बाबतींत गोखल्यांच्या मतांशीं त्यांच्या विचारांची तुलना करून पहाण्यासारखी आहे. असो.

११. टिळकांची आतांपर्यंतची वृत्ति त्यांच्या उत्तर आयुष्क्रमांतील वृत्तीशीं ताडून पाहिल्यास महत्त्वाचा फरक आढळतो. मंडालेस सहा वर्षें राहून १६ जून

* केसरीप्रबोध १—९३

† लो० टिळकांचे केसरींतील लेख ३—१७१

* कित्ता ३—६

× कित्ता ३—७

सुचेल तो अवलंबण्यास मी तयार आहे * " असे वैतागलेले उद्गार काढूनही टिळकांनीं शेवटपर्यंत सनदशीर मार्गाचा अवलंब केला याचें कारण राजकारणाकडे निवळ भावनावशतेनें न पाहातां व्यवहारी कायदेशीर रीतीनें पाहाण्याची त्यांची दृष्टि होय. बहिष्काराची चळवळ स्वदेशी चळवळीस मदतनीस म्हणून त्यांनीं घेतली ते वेळीं टिळक आपल्या मार्गाबद्दल असें सांगतात. " न्याय, नीति आणि ऐतिहासिक परंपरा किंवा प्रगति यांचा...पाठिंबा असला म्हणजे मग आमचे प्रयत्न कायद्याचे मर्यादेंत येतात कीं बाहेर पडतात याची आम्हीं पर्वा करून उपयोगी नाहीं. कारण कायदा परक्यांचे हातांत आहे. आतां एवढें खरें कीं, **कायदा मोडला गेला तर शिक्षा होणार; परंतु कायदा जर जुलमी असेल तर ही शिक्षा सोसूनच त्याचा प्रतिकार केला पाहिजे; एरवीं इलाज नाहीं.** नीति आणि कायदा यांची जेव्हां फारकत होते तेव्हां असेच प्रकार घडून यावयाचे. "†

ही बहिष्काराची चळवळ टिळकांनीं स्वीकारली केव्हां ? तर " वीस वर्षें राष्ट्रीय सभेची ओरड एकसारखी चालू आहे; आणि...नुसत्या ओरडीनें राजकीय बाबतींत तरी सत्ताधारी लोकांचीं मनें वळत नाहींत एवढें सिद्ध झालें आहे" तेव्हां. कारण, टिळक म्हणतात, " हिंदी लोकांच्या अंगांत करारीपणा वाढला किंवा एकराष्ट्रीयत्वाची कल्पना अधिक जागृत झाली तर सत्ताधारी इंग्रज लोक स्वच्छंद रीतीनें चरत आहेत त्यांस कांहीं तरी आळा पडणार. "× अशा प्रकारें राज्यकारभाराचा गाडा अडवून धरण्यांत किंवा " कायदेभंग " करण्यांत टिळकांना 'गैर सदनशीर' असें कांहीं वाटत नव्हतें हें उघड आहे. या दोन्ही बाबतींत गोखल्यांच्या मतांशीं त्यांच्या विचारांची तुलना करून पहाण्यासारखी आहे. असो.

११. टिळकांची आतांपर्यंतची वृत्ति त्यांच्या उत्तर आयुष्क्रमांतील वृत्तीशीं ताडून पाहिल्यास महत्त्वाचा फरक आढळतो. मंडालेस सहा वर्षें राहून १६ जून

* केसरीप्रबोध १—९३
† लो० टिळकांचे केसरींतील लेख ३—१७१
* कित्ता ३—६
× कित्ता ३—७

# स्वराज्यसंघाची स्थापना

१९१४ रोजीं टिळक पुण्यास परत आल्यानंतर त्यांच्या मतांत व राजकीय विचारांत बराच फरक पडलेला दिसतो. मात्र तुरुंगवास किंवा वार्धक्य यांचा परिणाम त्यांचे मनावर झाला नसून बदललेल्या परिस्थितीचा हा सर्व खेळ म्हणतां येईल. युरोपांतील महायुद्धही लवकरच सुरू झालें आणि त्या निमित्तानें टिळकांच्या बदललेल्या विचारांस बाहेर पडतां आलें. राष्ट्रीय सभेला स्वराज्य-संघाचें कार्य करण्यास थोडी अडचण दिसतांच टिळकांनीं स्वतःच्या जबाबदारी-वर तो संघ स्थापला ( २८–४–१६ ); मतप्रसारार्थ व लोकांत जागृति करण्यासाठीं देशभर दौरे काढले; विलायतेस शिष्टमंडळ नेण्याची योजना केली; होमरूल बिल तयार करविलें, अशी सर्वांगीण तयारी केली. "होमरूल" हा शब्द त्यांनीं खेडो-पाडीं, घरोघरीं फैलावला. पण त्या वेळची टिळकांची विचारसरणी अशी होती :—

" स्वराज्याची ही मागणी जितकी लोकांच्या हिताची तितकीच साम्राज्याच्या हिताची असून कालतः प्राप्त झालेली आहे. आणि अशा वेळीं हिंदुस्थानच्या भावी राज्यपद्धतीबद्दल आमचे विचार आम्हीं जर ब्रिटिश मुत्सद्द्यांपुढें किंवा पार्लमेंटपुढें मांडले नाहींत तर बैल गेल्यावर झोपा करणाऱ्या मूर्ख माणसांच्या पंक्तीस आम्हांस बसावें लागेल...तात्पर्य, होमरूल लीगची किंवा स्वराज्यसंघाची हल्लीं जी स्थापना झाली आहे ती साम्राज्याला बळकटी आणण्याकरितांच झालेली आहे. यांत स्थानिक सरकारास किंवा सरकारी अधिकारी वर्गास त्रास देण्याचा बिलकुल हेतु नाहीं....आम्ही जें काय मागणार तें बादशहाजवळ किंवा पार्लमेंटजवळ आणि तेंही पूर्ण कायदेशीर रितीनेंच."×

पण ह्या फरकाचें मूळ म्हणजे ब्रिटिशांच्या न्यायी व कृतज्ञ स्वभावावर असलेली टिळकांची बेसुमार भिस्त. ब्रिटिशांवर संकट आलें आहे, तेव्हां अशा समयीं तन-मन-धनेंकरून आपण त्यांस एकीकडे मदत करूं व दुसरीकडे आम्हांस काय हवें याची मागणी करूं — म्हणजे आपला कार्यभाग साधेल असा टिळकांचा आशावाद होता. म्हणूनच ते हिंदुस्थान सरकारला रिक्रूटभरतीच्या कामांतही मदत करूं लागले. इतकेंच नव्हे तर त्यांनीं ५००० रिक्रूट ६ महिन्यांत मिळवून देण्याची हमी घेतली व हें साध्य न झाल्यास स्वतः ५०,००० रुपये

---

×—लो० टिळकांचे केसरींतील लेख ३–३३६

हरण्याची तयारी दर्शविली. गांधींजवळ त्यांनीं हरावयाच्या रकमेचा चेक पाठवून दिलाही होता. मात्र त्यांची एक अट होती कीं नव्या रिक्रूटांना योग्यता पाहून जात–धर्म हा निर्बंध न मानतां उच्च लष्करी हुद्दा मिळाला पाहिजे। एवढ्यावरच घोडें अडलें. हिंदुस्थान सरकारनें टिळकांची अट स्वीकारली नाहीं व टिळकांना पैसे हरण्याचा प्रसंग आलाच नाहीं हा भाग वेगळा; पण आशावादाच्या जोरावर आलेल्या संधीचा अधिकांत अधिक उपयोग करून घेण्यांत टिळक कसे कुशल होते तें या गोष्टीवरून स्पष्ट होतें.

१२. टिळक स्वजनांशीं कसे वागत होते याचें आतां वेगळें वर्णन देण्याचें प्रयोजन नाहीं. हिंदुमुसलमानांचे दंगे टिळकांच्या वेळीं फार माजले, व टिळकांनीं गणेशोत्सव व शिवछत्रपतींचा उत्सव करण्याची प्रथा पाडून मुसलमान भाईंना चिडवलें असा आरोप कित्येक जबाबदार मंडळीही करतात. पण हिंदु-मुसलमानांचा विरोध नाहींसा करण्यासाठीं लोकांनीं सुचविलेला मार्ग पाहिल्यास वरील आरोपांतील फोलपणा उघड होतो. हिंदू पीर-ताबुतांना भजूं लागले तेव्हां त्यांना कोणत्या तरी हिंदू उपास्य देवतांचा उत्सव करावयास लावणें हें गैर कसें ठरतें? शिवाय टिळकांची परधर्माचे बाबतींतली उदार वृत्ति पाहिल्यास त्यांच्या धर्मसहिष्णुतेची नीट ओळख होईल. हिंदु-मुसलमान दंग्याची लाट १८९३ मध्यें उसळली होती तेव्हां टिळकांनीं पुष्कळ लेख लिहून सरकार व दोन्ही जमातीचे लोक यांस काय करावयास पाहिजे तें निःसंदिग्धपणें सांगितलें. “दंग्यामध्यें हिंदु, मुसलमान आणि सरकार असे तीन पक्ष असतात ... सरकारी अधिकारी यांनीं आपलें वर्तन नेहमीं निःपक्षपातीपणाचें ठेवणें ही पहिली गोष्ट होय. मुसलमान-हिंदूंचे सण एके दिवशीं आले असतां एकास तुमची नागपंचमी राहूं द्या असें म्हणणें जितकें अन्यायाचें आहे तितकेंच गोकुळाष्टमीनिमित्त डोले काढूं नका असा हुकूम देणेंहि अगदीं गैरशिस्त होय. अशा व्यवस्थेनें कोणा तरी एका जातीच्या लोकांचीं मनें नेहमीं असंतुष्ट होऊन...संधि साधेल तेव्हां सूड घेण्यास ते तयार होतात. हिंदु व मुसलमान यांतील तंटे जर मिटवायचे असले तर दोन्ही लोकांचे सणवार व उत्साह (त्सव ?) त्यांस निर्विघ्नपणें पार पाडूं देण्यास सरकारनें मदत केली पाहिजे. मुसलमान लोकांनीं हिंदू लोकांच्या मोहल्ल्यांत गाई मारल्या तर मुसलमानांस शिक्षा

झाली पाहिजे, व कोणीही हिंदु मुसलमान खाटकाच्या घरांत शिरून दंगा करून गाय सोडवून आणील तर तोहि शिक्षेस पात्र धरला पाहिजे." × ही टिळकांची विचारसरणी किती रास्त आहे ? अर्थात् प्रत्येक पक्ष हट्टाला पेटलेला असल्यामुळें टिळकांचें हें लिहिणें फुकट गेलें. परंतु लोकमान्यांचें हिंदु-मुसलमान प्रश्नाविषयींचें धोरण किती उदार होतें हें यावरून सहज दिसून येईल.

१३. राजकीय प्रश्नांत दिसणारी त्यांची चिकित्सक बुद्धि सर्वच क्षेत्रांत तितक्याच सफाईनें वावरते असें दिसतें. प्रत्येक वेळीं आपल्या हक्कांचा प्रश्न येतो असें वाटलें, सरकारशीं झगडण्यास मिळतें असें दिसलें, कीं टिळक हुरुपानें त्यांत पडत. त्यांची एकंदर मनोवृत्तीच लढाऊ होती. त्यामुळें कसलीही चर्चा असो, सरकारवर टीका करण्याचा किंवा लोकांची तरफदारी करण्याचा प्रसंग म्हणून टिळकांनीं फुकट दवडला नाहीं. प्लेगच्या वेळचीच गोष्ट पहा. + 'टोंचून' घेण्याबाबत खास अभ्यास करून शास्त्रीय मुद्यांवरच सरकारवर हल्ला करण्यास ते तयार होते ! सरकारची वकिली करण्यासाठीं स्वकीयांपैकीं कांहीं मंडळी पुढें आली तरी टिळकांनीं त्यांनाही निरुत्तर केलें. प्लेगच्या लसीसंबंधीं चर्चा चालली तेव्हां टिळकांनीं सरकारची शास्त्रीय चूक त्याच्या नजरेस आणली ती अशीः—"रसायनशाळेंत जनावरावर प्रयोग करून त्याबद्दलचे कायमचे सिद्धान्त ठरल्यावर मग मनुष्यास हें विष देण्यास लागावें हा शास्त्रोक्त मार्ग आहे. अशा तऱ्हेचे प्रयोग हाफकिन साहेबांच्या लसीचे संबंधानें झाले आहेत कीं नाहीं व झाले असल्यास त्यापासून काय काय सिद्धान्त निष्पन्न झाले हें आधीं कळणें आमच्या मतें जरूरीचें आहे." † आणि ह्यासंबंधीं चिकित्सा अडाणी खेडवळासही समजेल अशा पद्धतीनें त्यांनीं केली आहे. पण ह्या टीकेचा एकंदर रोख जनतेचे हक्क काय आहेत व ते कसे बजावून घ्यावे हें समजावून सांगण्याचा स्पष्ट दिसतो. सरकारला अशा चळवळ्याशीं वागतांना अर्थातच डोकें खाजवावें लागे.

---

× लो० टिळकांचे केसरींतील लेख १—१२१६
+ प्लेगप्रकरण १८९६–७
† लो० टिळकांचे केसरींतील लेख २—९६

१४. अशा प्रकारें लोकांना कार्यप्रवण करतांना टिळकांनीं मुख्य एक गोष्ट लक्षांत ठेविली. बहुजनसमाजाला डिंवचून, त्यावर टीका करून, किंवा त्याचे दोष दाखवून त्याची अवहेलना करण्यानें आपलें कार्य साधावयाचें नाहीं अशी त्यांनीं पक्की खूणगांठ बांधली होती. म्हणून सामाजिक बाबतींत सुधारणा करण्याचे टिळकांचे मार्ग भिन्न होते व त्यांचे विचारही कित्येक प्रसंगीं सर्वांगीण प्रगतीला विरोधक वाटतात. परंतु त्या सामाजिक विरोधाचा हेतु राजकीय झगड्यावर शक्ति केंद्रीभूत करण्याचा होता. म्हणूनच तसा विरोध करतांनाही सरकारशीं भांडण्याचा प्रसंग त्यांनीं व्यर्थ दवडला नाहीं. संमतिवयाच्या वादप्रसंगीं × त्यांनीं पुराणमताला उचलून धरलें, तें सरकारचे हात बळकट करण्यास त्यांचा विरोध होता म्हणून. राजसत्तेनें समाजसुधारणेचे अधिकार घ्यावे. नाहीं असें नाहीं. पण टिळकांची त्याला अट आहे ती अशी— "पेशवे सामाजिक बाबींत ढवळाढवळ करीत; लग्नें, बहिष्कार, कन्याविक्रयनिषेध....इत्यादि बाबींत पेशवाई सरकारचा हात असला तरी, इंग्रज सरकारास तसा अधिकार मुळींच असूं नये. सरकार स्वधर्मी आणि स्वदेशी असतां त्यांचे हातांत जे अधिकार असणें इष्ट असतें ते सर्व अधिकार परधर्मी आणि परकी सरकारनें हातांत घेणें योग्य व इष्ट नाहीं." + समाजांतील चालीरीती ठराविक रहात नसून कालमानानुरूप त्यांत फेरबदल घडला आहे व तो तसा सध्यांही घडला पाहिजे हें प्रगतीचें बीज टिळक मुळींच नाकबूल करीत नसत. त्यांचें म्हणणें एकच. समाजाला जडलेला नवा रोग प्रथम हटवूं या. मग पुराणमतवादित्व, अडाणी समजुती, विचाराभाव या जुन्या रोगांचें पाहूं. एकाच वेळीं सर्वत्र लढाई सुरू केल्यास शक्ति विभागली जाईल म्हणून राजकीय कार्यावरच त्यांनीं लक्ष दिलें. सामाजिक सुधारणा नको असें ते मुळींच म्हणत नाहीं. "आमचा समाज पुरातन असून तो पूर्वापार चालत आलेल्या कांहीं नियमांनीं बद्ध झालेला आहे. हे सर्व नियम एकाच कालीं अस्तित्वांत आले आहेत असें नाहीं, तर देशकालानुरूप त्यांत फेरफार होऊन त्यांस हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें आहे. हें प्रस्तुतचें स्वरूप हल्लींच्या

× संमतिवयाचा वाद १८९०–१

+ लो० टिळकांचे केसरींतील लेख ४–२७५

परिस्थितीस अनुकूल नसल्यास त्यांत फेरफार करणें अवश्य आहे."* असें त्यांनीं बजाविलें होतें.

१५ समाजशक्ति न विभागतां एका राजकीय चळवळीवरच भर देऊन टिळकांनीं फारशी चूक केली असें म्हणतां येत नाहीं. त्यांची कामगिरी नांगरटीच्या स्वरूपाची होती. राजकीय चळवळीचें बीज पेरण्यास लागणारी मनोभूमि त्यांनीं तयार केली. म्हणून त्यांच्या पदरीं "विधायक" कामगिरीचें गांठोडें नाहीं असें मानण्याचा कित्येकांचा प्रघात आहे, तो चूक ठरतो. टिळकांमुळेंच—त्यांच्या अविरत खटपटीमुळेंच—आजची राजकीय जागृति शक्य झाली, ही बाब कोणालाही विसरतां यावयाची नाहीं. शैथिल्यावस्थेंत असलेल्या समाजास आधीं आपली दुःस्थिति समजावून देऊन, त्या दुरवस्थेची जबाबदारी 'प्रभुपदीं विराजणाऱ्या' इंग्रजांवर टाकणें, हेंच मुळीं अशक्यप्राय कार्य. तें टिळकांनीं साधलें. झालेल्या नुकसानीचा डोंगर भला मोठा वाटला किंवा इंग्रजांची सत्ता अपरिमित वाटली, तरी हताश न होतां आशावादीपणाचा धडा टिळकांनीं दिला. काम बिकट आहे किंवा परिस्थिति विपरीत आहे म्हणून टिळकांनीं आशा कधींच सोडली नाहीं. उलट अशी लोकांची स्थिति होईल हें जाणून त्यांना आशा सोडूं नका म्हणून विनविलें. ते म्हणतात, "वीस वर्षें हीं राष्ट्राच्या इतिहासांत कांहींच नाहींत...करितां गेल्या वीस वर्षांत आमची पीछेहाट झाली असें म्हणून उदासीन होण्यांत कांहीं अर्थ नाहीं. राष्ट्रीय दृष्ट्या आमची स्थिति आज इतकी निकृष्ट आहे कीं, ती यापेक्षां जास्त निकृष्ट होणें अशक्य आहे; आणि कालचक्राच्या फेऱ्यांत केव्हांना केव्हांतरी ती आतां वर आलीच पाहिजे अशी आमची खात्री आहे."× कालचक्राचा दृष्टांत असहायतेचा वाटला तरी तो आशाप्रवर्तक आहे. टिळकांची भरींव कामगिरी ती हीच कीं, त्यांनीं हताश, निर्बल, उदासीन, किंकर्तव्यमूढ समाजाला कार्यप्रवण केलें. अशा तऱ्हेची शिकवण टिळकांना ज्या समाजाला वारंवार द्यावी लागली तो समाज कोणत्या अवस्थेंत असेल हें थोड्या विचारानें सहज ताडतां येतें.

---

* **लो० टिळकांचे केसरींतील लेख** ४ पृ० ३७८–९

× **कित्ता** २–३१६

टिळकांच्या कामगिरीचा परिणाम टिळकोत्तर कालांतील कार्यपद्धतीवरून अनुमानिणें कठीण नाहीं.

१६. टिळकांना कर्मयोगी म्हणतात. त्यांनीं गीतेचा अर्थ कर्मयोगपर लावून धार्मिक वाङ्मयांत क्रांति करणारा "गीतारहस्य" अथवा "कर्मयोगशास्त्र" हा ग्रंथ प्रसिद्ध केल्यानें त्यांच्या ठिकाणीं लोक अत्यादरानें दैवी अंश कल्पूं लागले. "ओरायन," "आर्क्टिक होम इन् दि वेदाज्" या ग्रंथांतूनही टिळकांची गाढी विद्वत्ता व तीक्ष्ण चिकित्सक बुद्धि प्रकट झाली आहे. पण टिळकांच्या अपूर्व बुद्धिसामर्थ्याचा उपयोग ग्रंथलेखनाकडे न होतां लोकांच्या गाऱ्हाण्यांची दाद लागावी म्हणून झगडण्यांत झाला हें पाहून त्यांच्या त्यागाची कल्पना येते. स्वतंत्र व विवेचक बुद्धि राजकारणांत, तशीच या शास्त्रीय स्वरूपाच्या ग्रंथांतही आढळते. आणि फावल्या वेळीं किंवा म्हातारपणीं धर्म करतात तसें राजकरण (लोकसेवा) न मानतां डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा संबंध सुटल्यापासून तो मृत्यूपर्यंत टिळकांनीं एकच–लोकसेवेचा–धंदा केला. न्यायमूर्ति रानड्यांनीं सरकारी नोकरी संभाळून जनहितार्थ आपल्याला नित्य नेमानें वेळ खर्च करतां येतो हें स्वतःच्या उदाहरणानें दाखविलें तर टिळकांनीं त्याच्याही पुढें आघाडी मारून सरकारी नोकरीचा अभिलाष न धरतां अखेरपर्यंत लोककार्यास वाहून घेतां येतें हें सर्वांना पटेल अशा प्रकारें दर्शविलें. टिळकांपूर्वी किंवा त्यांच्या वेळींही सार्वजनिक कार्य म्हणजे दुय्यम असें मानीत. पण तो नूर बदलला टिळकांनींच. अनेक अडचणी सोसून, सरकारचा राग सहन करून, कोणाची भीडभाड न राखतां समाजसेवा करण्यास तरुणांना स्वोदाहरणानें प्रोत्साहन दिलें ही टिळकांची अव्वल दर्जाची कामगिरी अद्यापही कुणाला साधली नाहीं.

टिळकांच्या धार्मिक मनोवृत्तीचा परिणाम त्यांचा आशावाद व कर्मयोग वाढविण्यास कारणीभूत झाला. त्यांच्यावर निराश होण्याचे किंवा हताश होऊन वैतागण्याचे किती तरी प्रसंग आले. पण टिळकांचा उत्साह कांहीं कमी झाला नाहीं. सरकारशीं भांडण्यांत त्यांचें सार्वजनिक आयुष्य गेलें असलें, तरी खासगी जीवनक्रमांतही ते संकटांशीं झुंजत होतेच. त्यांना त्या झगड्याचा कधीं कंटाळा आला नाहीं हेंच विशेष. त्यांना आठ वर्षें काळेपाण्याची शिक्षा ठोठावली तेव्हां त्यांनीं काढलेले उद्गार, ताईमहाराज-खटल्यांत त्यांचें आटलेलें रक्त व

अखेरीस चिरोल खटल्यांत त्यांजवर झालेला आघात—हीं सर्व त्यांच्या धैर्याचीं कसोटी पाहाणारीं कृत्यें होत. इंग्रजी न्यायबुद्धीवरील त्यांचा विश्वास इतका अढळ होता कीं उतार वयांत ते इंग्लंडास दुहेरी हेतूसाठीं गेले. * स्वराज्यसंघातर्फे शिष्टमंडळ तिकडे नेऊन इंग्रज मतदारांना हिंदी आकांक्षांची माहिती करून देणें हा एक व दुसरा हेतु म्हणजे सर व्हॅलंटाईन चिरोलनें हिंदुस्थानविषयक माहिती लिहितांना टिळकांची बदनामी केली होती, त्यास शासन करावयाचें. पण तेथें वज्राघाताप्रमाणें जबरदस्त निराशा पदरीं पडली – दोन अडीच लाखांचा भुर्दंड खटल्यापायीं भरावा लागला.† तरी टिळकांची मनःस्थिति काय होती ? खटल्याचा विपरीत निकाल लागतांच वैतागानें ते परतले नाहींत. तर तेथेंच पुढें आठ नऊ महिने स्वराज्य संघाचें काम त्यांनीं चालू ठेवलें ! निरनिराळीं पत्रकें काढून इंग्रजी जनतेच्या मनांत हिंदुस्थानविषयक सहानुभूति उत्पन्न केली. मजूर पक्षाचें वाढतें बळ ताडून त्यांच्याशीं संधानें बांधून त्या पक्षास टिळकांनीं २,००० पौंड देणगीदाखल दिले. × म्हणजे खटल्याच्या वज्राघातानेंही त्यांचा आशावाद कमी झाला नाहीं किंवा कर्मयोग भंगला नाहीं ! मॉंटफर्ड सुधारणांच्या वेळेसही तोच प्रकार. "रिफार्म ॲक्ट अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक" + असला तरी पण तो चालविण्यासाठीं निवडणुकी लढविण्याची तयारी टिळकांची होतीच. कार्यरत राहणें हाच टिळकांचा बाणा होता.

टिळकांनीं मॉंटफर्ड सुधारणांच्या बाबतींत स्वीकारलेलें धोरण अमलांत आणण्यास ते जिवंत राहिले नाहींत. नव्या निवडणुकी लढविण्यासाठीं टिळकांनीं व्यवस्थेशीर तयारी केली होती; पण त्यांना कैलासवासी होऊन सवा–दीड महिना होण्याच्या आंतच " निवडणुकींत भाग घेऊं नये " असें ठरल्यानें ती सर्व फुकट गेली. असहकारितेचा ठराव कलकत्त्याच्या खास कॉंग्रेसमध्यें मंजूर झाल्यामुळें हिंदी राजकारणाचा गाडा अगदीं वेगळ्याच रुळांवरून जाऊं लागला. महात्मा गांधी अग्रेसर ठरून सर्व राष्ट्र त्यांचे मागें आहे असें वाटलें. अशा प्रकारें टिळककालपर्यंत विचारांची प्रगति झाली.

* विलायतची सफर १९१८—१९१९

† चिरोल केसचा निकाल १९१९

× **केसरी प्रबोध** १—९६

+ **किता** १–२३७

# १५ नामदार गोखले

१ ध्येय एकच; पण मार्ग भिन्न
२ राजमान्य आणि लोकमान्य
३ स्वदेशी हवी; पण बहिष्कार नको.
४ निःशस्त्र प्रतिकाराला पाठिंबा
५ दुबळा आशावाद
६ Public life must be spiritualized

१. टिळकांच्या हयातींतच त्यांचे एक प्रतिपक्षी म्हणून गोखले (१८५६-१९१५) नांवाजले. एका अर्थानें गोखले हे टिळकांचेच काय पण कुणाच्चेच प्रतिस्पर्धी नव्हते. फक्त दोघांचे मार्ग भिन्न होते, व प्रसंगोपात्त टिळकांना गोखल्यांवर टीका करावी लागली, एवढ्यानेंच ते प्रतिस्पर्धी बनले. वास्तविक पहातां टिळक–आगरकरांचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेवून गोखले सार्वजनिक कार्यात पडले. फर्ग्यूसन कॉलेजमधील अध्यापनाचें काम करीत असतांच न्या. रानड्यांशीं त्याचा संबंध आला व तदुत्तर कालांत रानड्यांच्या शिकवणीनुसारच गोखले वागले, म्हणून गोखले हे रानड्यांचे चेले, निःसीम चाहते व अनुयायी म्हणतां येतात. टिळकांप्रमाणेंच सार्वजनिक कार्याला वाहून घ्यावयाचें हें ध्येय गोखल्यांपुढें होतें; तरी त्यांचे मार्ग अगदींच भिन्न होते. आणि ह्या दोन्ही कर्त्या पुरुषांचा विरोध ऐतिहासिक दृष्ट्या अवलोकन केल्यास विशेष उद्बोधक वाटतो.

जहाल–मवाळ हा भेद टिळक–गोखल्यांतच अधिक विरोधानें रंगला तेव्हां ह्याचीही चर्चा आपाततः येथें येईल.

गोखले आपलें अध्ययनाचें कार्य संपवून कायदेकौन्सिलांत गेले ( १९०२ ). व्हाइसरायपुढें त्यांचीं भाषणें वेळोवेळीं होत, तेव्हां सरकारी व्यवस्थेवर टीका करण्याची संधि त्यांना पुष्कळ मिळे; आणि टिळक बाहेर राहून, जनतेंत कार्य करतांना सरकारवर टीका करीत व त्याकरितां तुरुंगांतही जात. याच मार्ग-भिन्नतेंत टिळक व गोखले यांच्या कार्यभिन्नतेचें बीज आहे. सरकारदरबारीं जाऊन लोकांच्या आकांक्षा सांगणें, राज्यव्यवस्थेंत सुधारणा सुचविणें व नापसंत कृत्यांबद्दल निषेध प्रकट करणें, हे गोखल्यांचे मार्ग. तर टिळक जनतेची बाजू घेऊन सरकारशीं भांडत. “ आमचा हक्क आहे , तो आम्हाला मिळाला पाहिजे ” असा रोख टिळकांचा; गोखले म्हणत, “राज्यकर्त्यांनीं असें करणें न्याय्य नव्हे, लोक खवळतील, जरा डोळे उघडून पहा. ” म्हणजे दोघांचे मार्ग वेगळे; दृष्टिकोन निराळा. एक जनतेच्या हिताला जपे तर दुसरा सरकारी अडचणींचा विचार करी. रयतेच्या हक्कांची पायमल्ली झाल्याचें टिळकांना दिसे तर गोखल्यांना सरकारी अधिकाऱ्यांच्या मार्गांतले अडथळे दिसून येत....अशा मतभिन्नत्वामुळें जहाल–मवाळ हे पक्ष अधिक जोरानें गाजूं लागले. दोन्ही पुरुषांच्या प्रकृतींतला हा फरक ठिकठिकाणीं व्यक्त झालेला आढळतो.

टिळकांची चळवळ सनदशीर होती हें मागील प्रकरणांतील उताऱ्यांवरून स्पष्ट होईल. गोखले तर सनदशीर मार्गांचे अध्वर्यू. असें असतां दोघांत भेद पडला तो सरकारशीं काय नातें ठेवावें या संबंधांत. गोखले रानड्यांचे एकनिष्ठ भक्त व चेले असल्यानें त्यांनीं ‘ ईश्वरी योगायोगाचें सूत्र ’ शिरोधार्य केलें यांत आश्चर्य नाहीं. भारत-सेवक-समाजाचे सेवक होणारास हें आद्यतत्त्व मान्य करावेंच लागतें कीं, “ ब्रिटिशांचा हिंदुस्थानशीं संबंध दैवी योजनेमुळें हिंदुस्थानच्या हितासाठींच आला. ” टिळकांचें इंग्रजांबद्दल काय मत होतें तें पुनः सांगण्याची आवश्यकता नाहीं. दोघांचेंही ध्येय एकच म्हणजे “ साम्राज्यांतर्गत स्वराज्य ”. पण मोठी तफावत पडली ती येथील अधिकाऱ्यांशीं वागण्यांत. टिळक त्यांना “ कोठावळे ” म्हणून निर्देश करीत. पण गोखले यांचें सरकारी अधिकाऱ्यां-विषयीं वेगळें मत होतें. “ आम्हांस पाहिजे तें हेंच कीं सरकारचे अधिकारी

परकी असले तरी त्यांची वृत्ति राष्ट्रीय आहे व त्यांचें लक्ष हिंदुस्थानच्य हिताकडे अधिक आहे." † दुसऱ्याही एका वेळीं त्यांनीं म्हटलें "सध्यां राष्ट्राला कशाची जरूर असेल तर ती राष्ट्रीय वृत्तीच्या — मग तें परकी अधिकाऱ्यांच्या हातांतलें असलें तरी चालेल — सरकारची. आमच्या हिताकडे प्रथम लक्ष देणारें हें सरकार आहे आणि आमच्या इच्छांना थोडा तरी मान् द्यावा असें त्या (सरकार) ला वाटतें, एवढें समाधानही आम्हांस बस्स आहे."*

२. त्या दोन्ही उताऱ्यांत गोखले सरकारी अधिकाऱ्यांची मर्जी किती युक्तीनें संपादतात तें दिसून येतें. याचे उलट टिळकांचें. सरकारी अधिकाऱ्यां-वर हल्ला चढविण्याची टिळकांची पद्धत किती तीव्र असे? यामुळेंच सरकारी अधिका-ऱ्यांना एक हवासा वाटे तर दुसरा दृष्टीसमोरही चालेना. गोखल्यांच्या राजमा-न्यतेचें व टिळकांवरील सरकारी रोषाचें आतां वेगळें स्पष्टीकरण नकोच. पण आणखीही कांहीं प्रसंगांवरून गोखल्यांची मनोरचना लक्षांत येईल. राजद्रोही सभाबंदीच्या बिलावरील चर्चा चालू असता (१९११) कौंसिलचे एक सभासद मि. अली इमाम यांनीं गोखल्यांचा गौरवपूर्ण उल्लेख करण्याच्या हेतूनें त्यांना "Leader of the opposition" – प्रतिपक्षाचे पुढारी असें संबोधिलें. पण गोखल्यांना ते शब्द लागले व त्यांनीं स्पष्टीकरणार्थ म्हटलें, "सरकारचा व आमचा मतभेद होतो त्याला विरोध म्हणणें रास्त नव्हे. सरकारशीं सहमत असण्याचेच प्रसंग येथें आमचेवर अधिक येतात. सरकारला विरोध करण्याचे प्रसंग त्या मानानें अगदीं थोडे..."+ ह्या पूर्वीही मोर्ले–मिंटो सुधारणांचा हप्ता मिळाला, तेव्हां गोखले म्हणतात—"गव्हर्नरसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं बोल-तांना मला एक अडचण वाटते. कारण मला योग्य तीं स्तुतिसुमनें गव्हर्नरसाहे-बांवर उधळतां येत नाहींत. परंतु असल्या अपूर्व प्रसंगांचें महत्त्व लक्षांत घेऊन इतर सभासद या शिष्टाचारभंगाबद्दल क्षमा करतील अशी आशा आहे."‡ अशा

---

† Speeches of G. K. Gokhale (Natesan, 2nd Edn.) p. 28

* *Ibid,* p. 148.

\+ *Ibid,* p. 395.

‡ *Ibid,* p. 214–5–6

शब्दांनीं सुरुवात करून गोखल्यांनीं सुधारणांच्या हत्याबद्दल मोर्ले-मिंटोंना मनसोक्त दुवा दिला; " राष्ट्रावर आपले असह्य उपकार झाले " म्हणून म्हटलें. पण ह्यासबंधींचा टिळकांचा " टोणग्याचे आंचळ " हा लेख पहा. त्यांत किती फरक आहे? ना० सुबाराव यांनीं जहाल-मवाळांतला भेद एका तडजोडीच्या पत्रांत सांगितला आहे, तोच टिळक आणि गोखले यांच्या मनोवृत्तींतील फरक. " जहाल पक्ष असें म्हणतात तो राष्ट्रीय सभेंतलाच एक पक्ष आहे...त्यांचें धोरण सरकारविरुद्ध सनदशीरपणानें तक्रार करण्याचें असतें; व ज्यांना कॉन्स्टिट्यूशनॅलिस्ट म्हणतात त्या मवाळांचें धोरण सामान्यतः सरकारच्या बाजूला राहण्याचें असतें. दोघांचें ध्येय एकच म्हणजे साम्राज्यांतर्गत स्वराज्य मिळविणें हेंच आहे. हें ध्येय मिळविण्याच्या रीतींतला हा जो फरक तोच दोहों पक्षांतला फरक. " ×

३. अनेक निमित्तांनीं टिळक-गोखले यांचे वाद झाले, मतभेद माजले. पण सर्व वेळीं कारण एकच. मनोवृत्तींतला फरक. स्वदेशी आणि बहिष्काराची चळवळ निघाली, तेव्हां टिळकांनीं तिला मनोभावें उचलून धरली-बंगाल्यांना महाराष्ट्राचा पाठिंबा आहे हें सोदाहरण दर्शविलें. पण त्यावेळीं गोखले म्हणत, " बंगालनें केलें हें बंगालच्या दृष्टीनें रास्त असेल. पण आपण ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून कसें चालेल? बहिष्कारानें स्वदेशी चळवळीला कांहीं जोर येत नाहीं. "† याचें कारण मात्र गोखल्यांनीं और दाखविलें. " बॉयकॉट' ह्या शब्दाची व्युत्पत्ति अशी आहे कीं, तिजशीं संलग्न असलेल्या अनिष्ट आठवणी येतात. आणि त्यांत एक सूडबुद्धीची भावना—दुसऱ्यांस दुखविण्याची इच्छा—व्यक्त होते. आणि आपलें व इंग्लंडचें नातें लक्षांत घेतल्यास अशी इच्छा अगदींच अस्थानीं होय. " *

एतत्संबंधीं टिळकांचे विचार असे आहेत—" अधिकार आणि स्वार्थ यांनीं डोळ्यांवर आलेलें पटल तोंडाच्या वाऱ्यानें फुंकून कधींही नाहींसें होत नाहीं.

---

× लो० टिळकांचे केसरींतील लेख ३—३९८

† G. K. Gokhale *Speeches.* P. 819-822

* ......Boycott, owing to its origin has got unsavoury associations and it conveys to the mind before everything else a vindictive desire to injure another. Such a desire on our part as a normal feature of our relations with England *is of course out of question.*——*Ibid*--p. 821.

जे लोक आमचें ऐकत नाहींत अथवा आमच्या विनवणीकडे लक्ष देत नाहींत त्यांचें राज्य आमच्यावर असलें तरी निदान व्यापाराचे कामीं त्यांस सहाय्य करण्याचें आम्हीं साफ नाकारलें पाहिजे....राज्यकर्त्यांविरुद्ध बंड करणें गैरकायदा आहे किंबहुना गुन्हा आहे; पण बहिष्काराचा तसा प्रकार नाहीं. राज्यकर्त्यांपुढें आपलीं गाऱ्हाणीं सयुक्तिक रीतीनें मांडण्याचें सोडून द्या असें आम्हीं म्हणत नाहीं. देशाच्या इतिहासांत हल्लींच्यासारखे आणीबाणीचे प्रसंग क्वचित् येत असतात आणि जेव्हां येतात तेव्हां आपण जर त्यांचा फायदा करून घेतला नाहीं तर आमच्या मूर्खपणाची आणि कर्तव्यशून्यतेची कमाल झाली असेंच म्हणावें लागेल."* एवढेंच नव्हे, तर जागतिक इतिहासांतील चीन, इटली, अमेरिका या राष्ट्रांनीं बहिष्कारयोगाचा उपयोग केल्याचें दर्शवून टिळकांनीं त्या साधनाची सफलता स्पष्टपणें पटवून दिली आहे. गोखले व टिळक यांच्या विचारांत असें अंतर पाहिल्यास त्यांच्यामध्यें विरोध रंगला यांत आश्चर्य वाटत नाहीं.

४. पण इतके हळव्या मनाचे गोखलेसुद्धां करबंदीच्या चळवळीस सदनशीर म्हणत असत. अलाहाबाद येथील त्यांचें भाषणच पहा—"ढोबळ मानानें पाहतां बंड करणें, परचक्रास सहाय्य करणें किंवा अत्याचार करणें **या तीन बाबी वगळल्यास बाकीचे सर्व मार्ग सनदशीर होत**...प्रार्थना करणें, अर्ज पाठविणें वगैरे एका टोंकाला आहेत. निःशस्त्र प्रतिकार किंवा गाऱ्हाणें दूर होईपर्यंत करबंदी हे मार्ग दुसऱ्या टोंकाचे होत"...+ इतकेंच काय, पण दक्षिण आफ्रिकेहून गांधींचा सत्याग्रह पाहून ते परत मुंबईस आले‡ तेव्हां गांधींबद्दल व त्यांनीं चालविलेल्या निःशस्त्र प्रतिकाराबद्दल गोखले काय म्हणाले तेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. "तेथील परिस्थिति लक्षांत घेतल्यास ट्रान्सव्हालमध्यें गांधींनीं आरंभिलेला निःशस्त्र प्रतिकार न्याय्य आहे; इतकेंच नव्हे, तर सर्व स्वाभिमानी मनुष्यांचें तें कर्तव्यच आहे." त्याच व्याख्यानांत ते आणखी असें म्हणतात, "निःशस्त्र प्रतिकार म्हणजे तरी काय? एखाद्या अन्यायाची कायद्याला न जुमानतां, कायदेभंगाबद्दल असेल ती शिक्षा भोगणें हाच निःशस्त्र प्रतिकार

---

* **लो॰ टिळकांचे केसरींतील लेख** ३ पृ. ८–११
\+ G. K. Gokhale *Speeches*. p. 1106–7
‡ गोखल्यांची आफ्रिकेची सफर १९१२

होय. " अशी समजूत करून दिल्यानंतर गोखल्यांनीं गांधींच्या कृतीचें समर्थन केलें. " गांधी निःशस्त्र प्रतिकार करीत आहेत हेंच सर्वस्वीं योग्य आहे अशी आमची सर्वांची समजूत आहे."*

म्हणजे 'डायरेक्ट ॲक्शन' हें सनदशीर मानणारे गोखले गांधींच्या कृत्यांचें मनःपूर्वक समर्थन करतात हें उघड आहे. करबंदीचा किंवा निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं अवलंबावयाचा हें त्यांनींच सांगितलें असल्यानें गांधींनीं इतर सर्व उपाय थकल्यावरच निर्वाणीचें हें शस्त्र बाहेर काढलें असलें पाहिजे यांत शंका नाहीं. कारण गोखल्यांनीं गांधींच्या आत्यंतिक कृत्याला मान डोलविली ती पूर्ण विचारांतींच.

५. असें असलें तरी दक्षिण आफ्रिकेंत शिष्टाई संपवितांना तेथील परिस्थितीचें नीट निरीक्षण करून नामदारसाहेबांनीं काय निष्कर्ष काढला पहा:— " एक गोष्ट निश्चित आहे कीं, हा वाद कायमचा मिटला जावा, असें वाटत असेल तर, **युरोपियनांना मान्य होईल अशीच तडजोड काढली पाहिजे.** कारण कसेंही झालें तरी **युरोपियन हे येथील प्रमुख नागरिक होत.** युरोपियनांच्या मनांत हिंदी लोकांच्या वाढीची भीति असली तर कुठलीही तडजोड यशस्वी ठरणार नाहीं. म्हणून युरोपियनांच्या मनांतली ही भीति नाहींशी करण्यासाठीं **हिंदी लोकांनीं एक जाहीर आश्वासन दिलें पाहिजे !** शिवाय **हिंदी जनतेच्या अस्तित्वामुळें युरोपियनांच्या राजकीय संस्थांना कसलाही विटाळ होणार नाहीं, त्यांचा दर्जा कमी होणार नाहीं, अशीही खात्री हिंदी लोकांकडून युरोपियनांना मिळाली पाहिजे !** " +

स्वाभिमानी गोखल्यांनीं ही कबुली दिली—नव्हे, आपल्या बांधवांना उपदेश केला हें पाहून युरोपियनांनीं गोखल्यांवर बेहद्द खूष कां होऊं नये ? कदाचित् प्रिटोरिया येथें युरोपियनांपुढेंच हें भाषण असल्यानें अशी भाषा वापरणें त्यांना प्राप्त असावें ! पण मनाचा दुबळेपणा म्हणतात तो हाच.

* G. K. Gokhale: *Speeches*. p. 891-2

† Ibid. p. 876.

प्रत्येक वेळीं गोखल्यांना भीति ही कीं, "सरकारला आपण डिंवचतों कीं काय ?" "एवढ्यानें सरकार नाखूष होईल कीं कसें ?" कित्येक धर्मभोळ्या लोकांची देवासंबंधीं समजूत असते तशी गोखल्यांची सरकारविषयीं दिसते. 'अमुक अमुक व्रतें, वैकल्यें केलीं, ब्राह्मणभोजनें घातलीं, मंत्रजप केला,...कीं देव खूष झालाच पाहिजे. मग आपणांवर संकटें कशीं येणार ?" ही देवभोळी समजूत विचाराभावदर्शक—अज्ञानजन्य—असून तिनें देवाला किती नीचपण येतें याची कल्पनाही त्या भक्तांना नसते. तशीच गोष्ट गोखल्यांची झाली असा आरोप होई तो चूक कसा ? गोखल्यांना आशावाद होता, पण तो बुद्धीवर अधिष्ठित नसून भावनांवर उभारलेला असे. हिंदुस्थानची लायकी वाढत जाईल तसतसे इंग्रजांकडून हिंदुस्थानला राजकीय सुधारणांचे हप्ते मिळणार, ही गोखल्यांची आशा. "स्वातंत्र्यानें लोक स्वतंत्रतेला लायक होतात आणि लोक लायक झाल्यावर त्यांना स्वातंत्र्य देऊं असें म्हणण्यापेक्षां त्यांना आधीं स्वतंत्र करणेंच अधिक श्रेयस्कर होय," हें ग्लॅडस्टनचें उदार तत्त्व मान्य करूनही गोखले म्हणतात: "आपली राजकीय प्रगति 'आस्ते कदम'च झाली पाहिजे आणि प्रत्येक टप्याचे अखेरीस 'अल्पकाल'पर्यंत आपणांस उमेदवारी ही केलीच पहिजे. नंतरच मग पुढें पाऊल टाकतां येईल."* कारण, पाश्चिमात्य पद्धतीनुसार राजकीय संस्था चालविण्यासाठीं लागणाऱ्या जबाबदारीची योग्य जाणीव, आपणांसारख्या पौर्वात्यांना शिक्षण घेऊन व प्रयोग करूनच होणार, ही "गोखल्यांच्या मतें," अगदीं रास्त बाब आहे.

म्हणूनच बहिष्काराचें तत्त्व औद्योगिक क्षेत्रांत सरहा लागू करण्यास गोखले तयार नव्हते. मग राजकीय बहिष्काराची गोष्टच कशाला ? वीस वर्षें राष्ट्रीय सभेनें कंठशोष केला तरी सरकार त्या मागण्यांकडे लक्ष देत नाहीं हें पाहून टिळकांनीं जरा कडक उपायाची सूचना केली व 'बहिष्कार'शस्त्र उपयोगी पडेल असें म्हटलें. पण गोखले मात्र तसें करण्यास मुळींच कबूल नाहींत. 'वीस वर्षें केलेली मागणी मंजूर झाली नाहीं म्हणून निराश होण्याचें कारण नाहीं....राजकीय हक्क हे काय नुसत्या विनंतीनें मिळतात ? त्यासाठीं लोकांत

* **बनारस कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरील भाषण [१९०५]** *Speeches* p. 829–30

पात्रता असावयास पाहिजे आणि ते मिळविण्यास कितीतरी दीर्घकालीन झगडे करावे लागतात.....इतक्यांत निराश होण्याचें कारण नाहीं. इंग्लंडमधील विरोधक पक्षाचा अधिकार जाऊन आतां उदारपक्ष सत्तारूढ झाला आहे. आतां आपणांस पुष्कळच आशा असून येथें करण्यासारखें कार्यही पुष्कळ आहे." + अशा आशयाचें आशावादी मत कुणाला पटेल ? टिळकांचें म्हणणें असें कीं, " मोर्लेसाहेब गोडीगुलाबीनें कांहीं देत नाहींत तर त्यांचा नातू पुढें येईल; तो नाहीं तर त्यांचा पणतू देईल, या आशेवर लोकांस ठेवण्याचा प्रयत्न करणें म्हणजे राष्ट्राचा एक प्रकारें द्रोह करण्यासारखें होय. स्वराज्याचे हक्क प्राप्त करून घेण्याची इच्छा जितकी कायदेशीर आहे, तितकेच अडवणुकीचे मार्गही कायदेशीर आहेत. हे मार्ग स्वीकारण्याचें ज्यांस धैर्य नाहीं त्यांनीं लोकांचा विनाकारण बुद्धिभेद न करतां घरीं स्वस्थ बसावें हें चांगलें. असो. " ×

६. टिळक व गोखले यांच्यामधील मतभेदाचें मुख्य कारण दोघांची भिन्न मनोभूमिका हेंच होतें. त्याविषयीं चर्चा न वाढवितां गोखल्यांचे आणखी विचार पाहिले पाहिजेत. 'भारत सेवक समाज' १९०५ मध्यें स्थापून गोखल्यांनीं आपली परंपरा चालू ठेविली. त्यावेळीं त्यांनीं घातलेले निर्बंध व उद्दिष्ट हेतु स्पष्ट केले:—

" ब्रिटिशांचा हिंदुस्थानशीं संबंध दैवी योजनेमुळेंच हिंदुस्थानच्या हितासाठीं आला असें आद्य तत्त्व भारत सेवक समाजाच्या सभासदांनीं मानलें पाहिजे." ह्या समाजाचें ध्येय 'साम्राज्यांतर्गत स्वराज्य' व देशबांधवांची उन्नति हें आहे. तें सनदशीर मार्गांनीं गांठण्यासाठीं कार्यकर्ते तयार करण्याची जबाबदारी 'समाजा'नें घ्यावयाची असून त्यांनीं खालील मार्ग स्वीकारावयाचे:—

१. स्वोदाहरणानें व उपदेशानें जनतेंत उत्कट देशप्रीति जागृत करणें.

२. राजकीय ज्ञानप्रसार करून चळवळी आरंभणें.

३. जातीजातींत सहकार्य व सलोखा वाढविणें.

४. शिक्षणसंवर्धनास मदत करणें ( विशेषतः शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण ).

---

+ Gokhale: *Speeches* p. 1107-08

× केसरी २०-८-१९०७

५. औद्योगिक चळवळींस प्रोत्साहन देणें.

६. मागासलेल्यांची उन्नति करणें. +

हें सर्व लिहितांना गोखल्यांच्या मनावर कुठल्या तरी धर्मांचा पगडा होता असें दिसतें. सभासदांनीं घ्यावयाच्या 'सात शपथा' त्यांनीं सांगितल्या असून public life must be spiritualised असा त्यांचा आग्रह आहे. कदाचित् रावबाजीच्या वेळची अंदाधुंदी व गोखले यांच्या बाळपणची "They have made vice fashionable in Poona" ही परिस्थिति गोखल्यांच्या सारखी नजरेपुढें असावी व म्हणूनच त्यांनीं असा आग्रह धरला असावा. गोखल्यांनीं 'सेवकां'साठीं दुसरा एक निर्बंध घातला होता. निदान पांच वर्षें समाजांत अभ्यास केल्याविना कोणालाही 'समाजा'चे सभासद होतां येतच नाहीं. त्यामुळें 'सर्व्हंटस्' हे 'स्टूडंटस्' असतात. हा अभ्यासाचा आग्रह विशेष महत्त्वाचा आहे. कारण त्यामुळेंच 'सेवकां'चीं मतें, त्यांना अनुयायांचें पाठबळ नसलें तरी, ग्राह्य ठरतात. निःस्वार्थी, मेहनती व संघशक्तीनें देशकार्यास वाहून घेणाऱ्या मंडळींचा समाज स्थापून, त्यांच्या अभ्यासाची सोय लावली, चरितार्थाची व्यवस्था केली, शिस्त बांधून दिली, स्वोदाहरणाचा आदर्श त्यांचेपुढें ठेवला ही गोखल्यांची कर्तृत्वशक्ति श्रेष्ठ दर्जाची आहे, याविषयीं वाद करण्याचें कारण नाहीं.

---

+ Preamble to the Annual Reports of the Servants of India Society.

# १६ युद्धोत्तर महाराष्ट्र



१. दीर्घकालीन आजाराला व्यक्तीच्या आयुष्यांत जें महत्त्व आहे, तेंच महत्त्व दीर्घकालीन युद्धाला राष्ट्राच्या आयुष्यांत प्राप्त होतें. बहुतकालपर्यंत मृत्यूशीं झुंजून शेवटीं त्याच्या तावडींतून बाहेर पडल्यावर माणसाला एक नवीन दृष्टि प्राप्त होते. परिचयाचे चेहेरे, आणि ओळखीचीं स्थळेंही, एक प्रकारचें नवीन स्वरूप धारण करतात. पूर्वीचें आयुष्य कितीतरी पटींनीं दूर गेल्यासारखें वाटतें. राष्ट्राचेंही तसेंच आहे. चारदोन वर्षांच्या युद्धानें त्याच्या आयुष्यांत व दृष्टिकोणांत विलक्षण फरक पडतो. युद्धाचीं चारदोन वर्षें शांतताकालाच्या एकदोन तपासारखीं असतात. गेलें महायुद्धच पाहा. तें सारें चारच वर्षें टिकलें. पण त्यानें जगाच्या आयुष्यांत कांहीं पिढ्यांचा फरक घडवून

आणला. युद्धोत्तर कालांतील मनोवृत्तीला युद्धपूर्व जग कितीतरी पटींनीं जुनें वाटूं लागलें.

त्या महायुद्धाच्या स्वरूपांतच या फरकाचें रहस्य सांठविलेलें आहे. महायुद्धाच्या पूर्वीचा काल चढत्या कमानीसारखा होता. भांडवलशाहीची विकासावस्था असें त्या कालाचें वर्णन करावयास हरकत नाहीं. गेलें महायुद्ध त्या विकासान्वयेंच घडून आलें. कारण भांडवलशाहीच्या शर्यतींत, म्हणजे जगांतील अधिकाधिक मुलूख स्वतःच्या नियंत्रणाखालीं आणण्याच्या स्पर्धेत पुढें येण्याकरितां, पहिली जागा पटकविण्याकरितां, सर्व युरोपियन राष्ट्रें मनोभावें झगडत होतीं. अमेरिकेनेंही आपला घोडा त्या शर्यतींत ढकलला होता. स्पर्धेच्या मदानें उन्मत्त झालेलीं हीं साम्राज्यवादीं राष्ट्रें त्या संग्रामांत झगडलीं. कांहीं राष्ट्रांचा जय होऊन इतरांचा पाडाव झाला, असें ठराविक वर्णन या महायुद्धाचेंही करतां येईल; परंतु सम्यक्‌दृष्टीनें पाहातां तें युद्ध जित आणि जेते या दोघांनाही चांगलेंच भोंवलें. युद्ध सुरू असतां प्रत्येक राष्ट्र आपलें शक्तिसर्वस्व एकवटून जय मिळविण्यासाठीं प्रयत्नांची पराकाष्ठा करीत असतेंच. त्या कालांत झालेल्या ऱ्हासाची भरपाई विजयानें करतां येईल अशी आशा प्रत्येक राष्ट्राला असतेच. आणि त्या अपेक्षांनुसारच व्हर्सायच्या तहाच्या अटी ठरविण्यांत आल्या. भावी असंतोषाचीं बीजें या तहांतच आपण पेरून ठेवीत आहों, याची जाणीव विजयाच्या धुंदीनें बेहोष झालेल्या राष्ट्रांना राहिली नाहीं. पण एवढ्यावरच भागलें असें नव्हे. १९१४–१८ च्या महायुद्धांत भांडवलशाहीचें शक्तिसर्वस्वच कामास आलें. युद्धोत्तर कालांत युद्धकालीन ऱ्हासाची भरपाई करण्याचीं भांडवलशाही राष्ट्रांचीं सुखस्वप्नें नुसतीं स्वप्नेंच ठरलीं. कारण, इतउत्तर भांडवलशाहीचा पडता काळ सुरू झाला. युद्ध बंद होऊन एकदोन वर्षें झालीं न झालीं तोंच भांडवलशाही जग आर्थिक मंदीच्या जबरदस्त फेऱ्यांत सांपडलें. आणि ती मंदी या वेळ पावेतों (मार्च १९३५) कमीअधिक प्रमाणांत सर्व भांडवलशाही जगांत कायम आहे. या मंदीचे परिणाम अर्थात्‌ व्हायचे तेच झाले. कारखाने बंद पडले, गुदामांना टाळीं बसलीं, पगारांत कपात झाली, संपाचें प्रमाण वाढलें, सर्वत्र बेकारी माजली आणि एकंदर मनुष्यसमाज शांतताभंग आणि मानसिक प्रक्षोभ यांच्या धुरकट आवरणांत वावरूं लागला.

२. पण महायुद्धाचे हिंदुस्थानवर झालेले परिणाम महत्त्वाचे आणि वैशिष्ट्यपूर्ण आहेत. महायुद्धाचा काल हिंदुस्थानला एका दृष्टीनें भाग्याचाच गेला. युद्ध-कालीन अडचणींमुळें हिंदुस्थानच्या बाजारांत परकीय भांडवलवाल्यांची चढाओढ कमी झाली आणि एक प्रकारचें कृत्रिम संरक्षण हिंदी उद्योगधंद्यांच्या वांट्यास आलें. याचा फायदा एतद्देशीय उद्योगधंद्यांस साहजिकच मिळाला आणि ते उद्योगधंदे त्या कालांत अपूर्व उत्कर्ष पावले. हिंदुस्थानची औद्योगिक प्रगति होणें साम्राज्याच्या दृष्टीनें किती अगत्याचें आहे तें या कालांत ब्रिटिशांचे ध्यानांत आल्यामुळें हिंदी उद्योगधंद्यांविषयींची सरकारची उदासीनता बरीच कमी झाली. 'इंडस्ट्रिअल कमिशन'ची नेमणूक या बदललेल्या मनोवृत्तीचेंच द्योतक होय. हिंदी भांडवलदार वर्गानें या आनुकूल्याचा फायदा यथामति करून घेतला आणि हिंदुस्थानचें उत्पादन सामर्थ्य बरेंच वाढविलें. युद्धोत्तर कालांत हिंदुस्थानची गणना जगांतील औद्योगिक राष्ट्रांत होऊं लागली, आणि राष्ट्रसंघानें तर त्याला या दृष्टीनें पहिल्या आठ राष्ट्रांत बसविलें. शिवाय या स्थित्यंतरानें हिंदुस्थानचे बाहेरच्या जगाशीं असलेले आर्थिक हितसंबंध अधिक निगडित झाले व जागतिक आर्थिक घडामोडींचा परिणाम हिंदराष्ट्राला अधिक तीव्रतेनें जाणवूं लागला असल्याचें लौकरच प्रत्ययास आलें. युद्धकालीन अवधींत हिंदी उद्योगधंद्यांना तेजी चढली. पण युद्ध पुरें होऊन भांडवलशाही जग आर्थिक अरिष्टांत सांपडलें, तेव्हां अल्पावधींतच त्या अरिष्टाचे परिणाम हिंदुस्थानाला भोंवले. एकदोन वर्षांतच आर्थिक मंदीचे वारे हिंदभूमीवर वाहूं लागले. आर्थिक मंदीचे परिणाम साधारणपणें सर्वत्र सारखेच असतात. संप, बेकारी, औद्योगिक हलाखी आणि अशांतता–हीं मंदीचीं सर्व कटु फळें हिंदुस्थानास अनुभवायला मिळालीं.

३. पण सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वाचा असा दुसरा एक अनुभव महायुद्धानें हिंदुस्थानच्या प्रत्ययास आणून दिला. एकराष्ट्रीयत्वाच्या कल्पनेची वाढ हाच तो अनुभव. राष्ट्रीयत्वाची भावना भारतवर्षाला अगदीं नवीन आहे. इंग्रजी अमल येथें सुरू होण्यापूर्वी हिंददेश राजकीय दृष्ट्या तरी सरंजामावस्थेंतच होता. अनेक राज्यकर्ते व अनेक घराणीं त्यावर राज्य करीत होतीं. या घराण्यांमध्यें तो प्रदेश विभागलेला होता. अर्थातच या राज्यकर्त्यांचे प्रजेला आपापल्या राज्यापलीकडील देशाची काळजी करण्याचें, त्याबद्दल अभिमान बाळगिण्याचें, कारण

नव्हतें. परंतु ज्या दिवशीं हीं सर्व राज्यें रसातळाला गेलीं, ज्या दिवशीं इंग्रजां एकछत्री साम्राज्य अखिल हिंदुस्थानावर चालू झालें, त्यादिवशीं या विभ' राजनिष्ठेचें कारण नष्ट पावून एकराष्ट्रीयत्वाचें बीजारोपण हिंदी अंतःकरणां झालें. इंग्रजी राज्यपद्धति व तदनुगत आर्थिक व इतर सुधारणा या एकराष्ट्री त्वाला उपकारकच ठरल्या. ज्या दिवशीं आगगाडीचा पहिला रूळ हिंदभूव घातला, ज्या दिवशीं तारेचा पहिला खांब पृथ्वीच्या या भागां शिरला, ज्या दिवशीं येथें टपालाची पहिली डांक गेली व ज्या दिवश हिंदुस्थानांत इंग्रजी पद्धतीनें विद्यादान सुरू झालें, त्या दिवसापासून या राष्ट्री भावनेला स्थिर स्वरूप प्राप्त होऊं लागलें. एकाच राज्यपद्धतीखालीं राबणाऱ्य प्रजेचे राजकीय हितसंबंध एकसारखेच असावे, एकाच जीवनपद्धतीवर पोस लेल्या जीवांच्या आशा आकांक्षा एकाच सांच्यांत तयार व्हाव्या, असा सर्व साधारण नियम आहे. याच नियमानुसार हिंदवासियांचे हितसंबंध ज्यास्त निगडित झाले. आणि इतउत्तर हिंददेशांत एकराष्ट्रीयत्वाचा अविरत विकास होत गेला. याचें सुंदर प्रत्यंतर १८८५ सालीं राष्ट्रीय सभा स्थापन झाली, तेव्हां आलें. राष्ट्रीय सभेच्या कार्यानें या भावनेचा परिपोष विशेष पद्धतशीरपणें केला; व १९०५ च्या वंगभंगावेळीं या भावनेचीं कीर्ति हिंदुस्थानाबाहेर जगभर पसरली.

१९१४–१८ च्या महायुद्धानें तर या भावनेंत अभूतपूर्व अशी वाढ घडवून आणली. 'युद्धस्य वार्ता रम्या' तर खरीच. पण ती एक प्रभावी मतप्रवर्तिकाही आहे. मनुष्याचें हृदय हलवून त्यांत चैतन्य भरण्याचें सामर्थ्य युद्धाच्या वार्तेंत असतें. हेंच युद्धोत्पादित चैतन्य पाश्चात्य तरुणांच्या रोमरोमांत शिरलें; व त्यानें प्रेरित होऊन त्यांच्या झुंडीच्या झुंडी रणांगणाकडे धांव घेऊं लागल्या. कॉलेजचें आनंदमय विश्व, आईबापांच्या मायेची पाखर, पत्नीचें जिव्हाळ्याचें प्रेम व जगण्याची दुर्दमनीय इच्छा यापैकीं कशाचेंही बंधन त्यांच्या मार्गांत उभें राहूं शकलें नाहीं. पाश्चात्य तरुणांच्या या निर्व्याज स्वार्थ-त्यागाचीं वर्णनें हिंदी जनता वर्तमानपत्रांतून अधाशीपणें वाचीत होती. आणि ज्या भावनेनें प्रेरित होऊन हे तरुण आपल्या प्राणाची आहुति इतक्या

तत्परतेनें देत होते ती राष्ट्रीयत्वाची भावना हिंदी जनतेच्या अंतःकरणांत खळबळ उडवूं लागली. विशेषतः साम्राज्याला हिंदुस्थानची गरज किती आहे हें महायुद्धानें हिंदी प्रजेच्या प्रत्ययास आणल्यामुळें तिचा आत्मा अभिमानानें स्फुरूं लागला. आत्मविश्वासाचें राष्ट्रीय तेज तिच्या डोळ्यांत खेळूं लागलें. हिंदी जनता उत्कटत्वानें राष्ट्रीय बनली.

या राष्ट्रीयत्वाचा उपयोग हिंदुस्थाननें स्वराज्यसाधनासाठीं करून घेतला असता तर तें स्वाभाविक तसेंच मुत्सद्देगिरीचें ठरलें नसतें का ? महायुद्धाच्या वेळीं ब्रिटिश सरकार विलक्षण पेंचांत सांपडलें होतें. सबंध साम्राज्याचें भवितव्य हवेंत लोंबकळत होतें. हिंदुस्थानकडून झाली त्याहून रेंसभर कमी मदत होती तर त्याची धडगत नव्हती. अशा परिस्थितींत हिंदुस्थानच्या मागणीला ब्रिटिश मुत्सद्यांनीं खास नकार दिला नसता. हिंदुस्थानांत असंतोषाची एक ठिणगीही राहूं देणें—तिला वेळींच न शमविणें—साम्राज्यनाशाला कारण झालें असतें. आणि म्हणूनच हिंदुस्थानची मागणी पुरविण्याचे प्रयत्न ब्रिटिश सरकारनें केले असते. पण या संधीचा* गैरफायदा म्हणा हिंदुस्थाननें घेतला नाहीं व लढाई जिंकण्याच्या कार्यांत ब्रिटिश सरकारला हिंदी जनतेनें मनोभावें मदतच केली.× स्वार्थाची कदर तिनें मुळींच बाळगली नाहीं.

हिंदुस्थानच्या या अपूर्व त्यागाचीं कारणें उघड आहेत. महायुद्ध लढण्याचे जाहीर हेतू अगदीं उदात्त होते. जगांतील सर्व युद्धांचें निर्मूलन करण्यासाठीं

---

* "The need of the Empire is India's opportunity" असा खुद्द बादशाहांचाच संदेश होता ( २७-४-१९१८ ).

× या मदतीचें स्वरूप खालील आंकड्यांवरून समजेल: "The total contribution of India's personnel was thus 14,57,000 of whom 9,43,000 served overseas and no less than 1,06,594 suffered casualties. The number of animals sent was 1,75,000. During the war 1,855 miles of railway track, 229 locomotives, and 5,989 vehicles were sent out and 940 crafts of various descriptions for services on rivers and on seas were made available for war service. It is difficult to estimate accurately the contributions in money, but roughly they amounted in all to no less than 130 millions of pounds or nearly 200 crores."

हा शेवटचा संग्राम होत आहे; सर्व जगांत लोकशाहीची अनियंत्रित स्थापना करून समता, न्याय व स्वयंनिर्णय यांचें साम्राज्य पसरविण्यासाठींच आपण लढत आहोंत अशी गगनभेदी घोषणा साम्राज्यवादी राष्ट्रें करीत होतीं. त्या घोषणेवर हिंदी राष्ट्रानें विश्वास ठेवला. युद्ध जिंकलें तर ब्रिटिश साम्राज्यांत मानाची व समतेची जागा हिंदुस्थानला मिळेल अशी आशा त्यानें बाळगिली.

४. पण हिंदुस्थानच्या वांट्यास काय आलें ? रौलेट ॲक्ट, जालियनवाला बाग, हद्दपारी आणि शिक्षा. मॉन्टेग्यू व चेम्सफर्ड या जोडगोळीनें तयार केलेला सुधारणांचा हप्ता आला, त्यानें तर हिंदुस्थानच्या सर्व आशाआकांक्षांना समूळ हरताळच फांसला. सबंध राष्ट्र निराशेनें व अपमानानें जळूं लागलें. त्याची भरपाई करण्याचे मार्ग राष्ट्रीय सभा हुडकूं लागली. व शेवटीं १९१९ च्या कलकत्ता येथील जादा कॉंग्रेसनें महात्मा गांधींचा कार्यक्रम मान्य करून अन्यायाच्या प्रतिकारासाठीं असहकारतेचें शिंग फुंकलें.

पण कलकत्त्याच्या ठरावाला सबंध राष्ट्राचा पाठिंबा नव्हता. बंगाल, महाराष्ट्र व कर्नाटक या प्रान्तांना महात्मा गांधींचें साधुत्वाचें राजकारण मानवलें नाहीं. त्या प्रान्तांतील बहुतेक पुढाऱ्यांनीं गांधींच्या ठरावाला विरोधच केला. पण गांधींच्या बाजूस प्रचंड बहुमत होतें व त्यांनीं कलकत्त्याची सभा जिंकली. कांहीं काल 'काय करावें ?' या निष्क्रिय विचारांत घालविल्यावर महाराष्ट्र नागपुरास ( १९२० ) राष्ट्रीय संग्रामांत सामील झाला. कौंसिलच्या निवडणुकी हाच तेव्हां महत्त्वाचा उपस्थित प्रश्न होता. परंतु असहकारतेच्या ठरावाबरहुकूम राष्ट्रीय सभेनें निवडणुकीवर कडकडीत बहिष्कार घालण्याचें ठरविलें. कलकत्त्याचा इतर कार्यक्रमही अमलांत येत होता. विद्यार्थीवर्ग सरकारी-निमसरकारी शिक्षणसंस्थांतून बाहेर पडूं लागला; वकील कोर्टाची पायरी चढण्याचें नाकारूं लागले; खादीचा वापर वाढूं लागला व टिळकस्वराज्य फंडाचे आंकडे फुगूं लागले.

महात्मा गांधी एक वर्षांत स्वराज्य प्राप्त करून देणार होते. त्यांचा सर्व भर शांततावादावर होता. सरकारशीं संबंध शक्य तितका कमी करून, राज्य चाल-

विण्यास लोकांचें सहकार्य लागतें तें शक्य तितकें नाकारून आणि सरकारचा रोष झाला तर होईल तो दंड शांतपणें सोसून सरकारचा सात्त्विक आत्मा जागृत करणें, हें महात्माजींच्या राजकारणाचें मर्म आहे. त्याबरहुकूम कार्यक्रम सुरू झाला. परंतु सरकारची ती सात्त्विक बुद्धि जागी होण्याचें लक्षण दिसेना. बार्डो-लीस करबंदीची चळवळ करून सरकारला वठणीस आणण्याचे बेत गांधी करूं लागले. पण इकडे जनता त्यांच्या निष्क्रिय शांततावादाला कंटाळत होती. मे १९२१ मध्यें मालेगांवाला दंगा होऊन कांहीं पोलीस प्राणास मुकले. नोव्हेंबर-मध्यें युवराजांची स्वारी हिंदुस्थानांत आली तेव्हां मुंबईच्या जनतेनें त्यांच्यावर बहिष्कार पुकारतांना महात्माजींच्या तत्त्वांवरही बहिष्कार टाकून अनन्वित अत्याचार माजविले. महात्मा गांधींना हा जोराचा धक्काच होता; व त्यामुळें निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ इतक्यांत हातांत घेणें शक्य नाहीं, असें त्यानीं जाहीर केलें. पण गांधींच्या सात्त्विक बुद्धीचे पडसाद सरकारी वातावरणांत उठण्याचें लक्षण दिसेना. दडपशाहीचें सत्र सुरूच राहिलें, व बार्डोलीच्या कार्यक्रमाचा विचार पुन्हा जोरानें होऊं लागला. पण इतक्यांत चौरी चौऱ्याला दंगा झाल्यामुळें बार्डोली येथील कॉंग्रेस वार्किंग कमिटीच्या सभेंत कायदेभंग मागें घ्यायचें ठरलें. पण महाराष्ट्राच्या मनाला ही धरसोड मुळींच मानली नाहीं; व कमिटीच्या दिल्ली येथील सभेंत महाराष्ट्रीय पक्षानें निंदाव्यंजक ठरावही आणला. तो अर्थातच फेटाळला गेला, आणि पूर्वीची असहकारतेची निष्क्रिय परिस्थितीच कायम राहिली.

पण असें किती दिवस चालणार? या प्रश्नाचें उत्तर द्यावयास, तुरुंगांत अस-ल्यामुळें, म० गांधी समर्थ नव्हते. त्यांच्या अनुयायांनाही तें उत्तर सुचेना. सविनय कायदेभंग करण्यास देशाची तयारी होण्यासाठीं असहकारतेचा कार्यक्रम आहे; इतक्यांत कायदेभंग शक्य नाहीं; अर्थात् विधायक कार्यक्रम तेवढाच शिल्लक उरतो, असें पुष्कळसें अनिश्चित उत्तर महात्माजींचे चेले देऊं लागले. पण सर्वांचेंच समाधान या उत्तरानें कसें होणार? अर्थातच कार्यक्रम बदला, अशी ओरड माजली व गांधींच्या अनुयायांत फेर व नाफेर असे तट पडले. कार्य असें विशेष होत नव्हतेंच. एकमेकांच्या उखाळ्या पाखाळ्या काढण्यांतच परस्प-रांच्या कार्यशक्तीचा व्यय [ अपव्यय ] होत होता.

या परिस्थितीची जाणीव अल्पावधींतच होऊन कॉंग्रेसनें लोकमत अजमाविण्यासाठीं कायदेभंग कमिटी नेमली. या कमिटीचा निर्णय असहकारतेच्या विरुद्ध पडून कौंसिलांच्या द्वारें चळवळ चालविण्याचा ' बूट ' निघाला. महाराष्ट्राला ही घडामोड विशेष प्रिय अशीच होती. गयेच्या राष्ट्रीय सभेंत दास-नेहरू यांनीं स्वराज्यपक्ष स्थापिला, तेव्हां मूठभर नाफेरवाल्यांखेरीज इतर बहुतेक महाराष्ट्रीय कार्यकर्ते श्री० न. नि. केळकर यांच्या नेतृत्वाखालीं दासबाबूंना मिळाले. परंतु स्वराज्यपक्षाशींही या कार्यकर्त्यांनीं फार काल पटलें नाहीं. प्रतिसहकारपक्ष या नांवाची एक शाखा त्या पक्षाला त्यांनीं फोडली आणि ' सहकार्याला सहकार्य व असहकाराला असहकार ' अशा तत्त्वानें १९२६ च्या निवडणुकी लढविल्या. पण कौन्सिलांतील राजकारणानें स्वराज्य थोडेंच मिळणार होतें ? त्याचा फोलपणा प्रत्ययास यावयाला फार काल लागला नाहीं. तरुणवर्गाला कॉंग्रेसचें हें धरसोडीचें धोरण मानवणें शक्यच नव्हतें. जागतिक मंदीचें स्वरूप अधिकाधिक भेसूर होत असल्यामुळें तरुणांच्या असंतोषांत भरच पडली. उपाशी पोटाला क्रांतिकारक तत्त्वें सहज पटतात, या नियमानें त्यांच्यांत साम्यवादी तत्त्वें वेगवतीनें फैलावूं लागलीं. तरुणांचे ध्येयांना वेगळें वळण मिळालें व त्यांचा तात्त्विक ध्येयवाद बळावला. तरुणांच्या अंतःकरणांतील ही खळबळ बाहेर पडावयास वेळ लागला नाहीं. जिकडे तिकडे तरुण संघ स्थापन झाले व त्यांच्या सभांत संपूर्ण स्वातंत्र्याच्या घोषणा होऊं लागल्या. कांहीं तरुणांना तर या स्वातंत्र्याची रूपरेषा साम्यवादानें ठरावी असेंच वाटत होतें; व त्या दिशेनें ते शेतकरी-कामकरी वर्गांची संघटनाही करूं लागले. परंतु सरकारचें निश्चल धोरण ढळेना. इतकेंच नव्हे, तर सायमन साहेबांच्या नेतृत्वाखालीं श्वेत कमिशन हिंदुस्थानांत धाडून या आगींत त्यानें तेलच ओतलें. मग राष्ट्राचा राग भडकण्यास वेळ किती ? रागाचा स्फोट चळवळींत होऊन कायदेभंगास सुरवात झाली. लोकांनी प्रथम ' निमकका कायदा तोड दिया ' केलें. पण त्यानें भागेना, तेव्हां त्यांनी जंगलसत्याग्रहाचा मार्ग स्वीकारला. हजारों तरुण त्या सत्याग्रहांत सामील होऊन तुरुंगांत गेले. पण मध्येंच लॉर्ड इर्विननें निमंत्रण स्वीकारून महात्मा गांधींनीं तह केला व कांहीं काल वर्तुळ परिषदेचें सनदशीर राजकारण

अमलांत आलें. पण स्वराज्य इंग्लंडांत अडकून बसलें होतें तें मोकळें होईना. हिंदी चळवळीची जाहिरात याहून अधिक अर्थ या राजकारणाला राहिला नाहीं. अर्थातच सत्याग्रह, कायदेभंग, तुरुंगवास या सर्वांची पुनरावृत्ति झाली. पण सर्व व्यर्थ. राष्ट्राचे प्रयत्न थकले. महात्मा गांधींनीं आपलें लक्ष अस्पृश्योद्धाराकडे लावलें. शेवटीं चळवळ थांबली. निराशेचें साम्राज्य सर्वत्र पसरलें. रणांगणावरील उत्साह मावळला कीं सभागृहांतील निरुत्साही कार्यक्रम सुचूं लागतो. तसेंच आतांही झालें. कौन्सिलांतील कार्यक्रमाला स्वतः गांधींनीं पाठिंबा दिला व सनदशीर चळवळीचे दिवस पुनश्च अवतरले.

९. युद्धोत्तर कालांतील राजकीय संग्रामाचा हा असा इतिहास आहे. या संग्रामाचें स्वरूप अखिल भारताएवढें विराट असल्यामुळें महाराष्ट्राला त्यापासून अलिप्त राहाणें शक्यच नव्हतें. त्याप्रमाणें गांधींच्या दोन्ही-तिन्ही चळवळींत महाराष्ट्रानें भाग घेतला व आपला खांदा राष्ट्रीय चक्राला लावला. परंतु महाराष्ट्र म. गांधींच्या कार्यक्रमांत पूर्णपणें, नव्हे बहुतांशानेंही, विलीन झाला नाहीं. कांहीं महाराष्ट्रियांनीं गांधींचीं तत्त्वें पूर्णपणें आत्मसात् करून घेतलीं हें खरें; कांहीं भावनाप्रधान तरुण महात्माजींचे एकनिष्ठ चेले बनले हेंही खरें. परंतु बुद्धिप्रधान महाराष्ट्र सदासर्वदा चिकित्सक राहिला असेंच म्हटलें पाहिजे. १९२०–२१ च्या चळवळींत महाराष्ट्रानें भाग घेतला. पण पहिली संधि लाभतांच त्यानें आपली नाखुषी व्यक्त केली. स्वतंत्र अशी कायदेभंगाची चळवळ ( मुळशी सत्याग्रहाचा एक अपवाद सोडून ) महाराष्ट्रानें जवळ जवळ केलीच नाहीं. मुळशी सत्याग्रहामुळें करारी, त्यागी व कळकळीची अशी कांहीं मंडळी पुढें आली. परंतु त्यावेळीं प्राप्त झालेल्या अपयशामुळें त्यांपैकीं कित्येकांचा गांधींच्या तत्त्वांवरचा विश्वास उडाला; व ते दुसरे मार्ग चोखाळूं लागले. एकंदरींत महात्मा गांधींना महाराष्ट्रांत पाठबळ असें कमीच. विरोधच फार. या विरोधांत दोन प्रकार दिसतात. एक जुन्या टिळकपक्षियांचा. लोकमान्य वारल्यावर जगाची प्रगति होणें शक्य आहे, याची जाणीव यांना जवळजवळ नसतेच. पण तशी जाणीव तीव्रतेनें ज्याला झाली आहे असा एक वर्ग गांधींचा विरोधक दिसतो. तो म्हणजे साम्यवादी तरुणांचा. त्यांच्या प्रयत्नांचें पर्यालोचन करण्यापूर्वी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे, ती हीच कीं, लोकमान्यांच्या अवसानानंतर

समाजाला काबूंत ठेवणारा असा करारी व करामतीचा पुढारी महाराष्ट्रांत कोणी झालाच नाहीं. महाराष्ट्रियांच्या ठायीं बुद्धि आहे; कळकळही आहे. पण महाराष्ट्र–प्रकृति थोडीशी अहंभावी व संदेहवादी दिसते. दुसऱ्याच्या आज्ञा, त्यांच्या योग्यायोग्यतेवर पूर्ण विश्वास टाकून, अमलांत आणणें, त्याबरहुकूम वर्तन करणें, हें महाराष्ट्रीय प्रकृतीस फारसें मानवत नाहीं. असें कार्य होण्यास नेता नेईल त्या मार्गानें निःशंकपणें जाण्यास अनुयायांच्या मनाची तयारी लागते. ही निःशंकता, हा विश्वास जितका अधिक स्वयंस्फूर्त व प्रामाणिक तितका त्याचा उपयोग अधिक. पण बुद्धिप्रधान प्रकृति अशा अंध वर्तणुकीस तितकीशी अनुकूल नसते. नेत्याच्या अनुज्ञेवर निर्विकार चित्तानें विश्वास टाकून कार्य करीत राहाणें तिला मानवत नाहीं. अशा प्रकृतीला स्वतःला कार्य करणें अशक्य असलें तरी दुसऱ्याच्या ज्ञानाची व कार्यक्रमाची चिकित्सा करण्याची आवड फार. पण त्यामुळें मतभेद अतिशय जलद माजतो. महाराष्ट्रांत साध्यासुध्या गोष्टींवरही मतभेद उद्भवून कशीं रणें माजतात हें सुप्रसिद्धच आहे. पण लोकमान्य टिळकांसारखा असामान्य बुद्धीचा व करामतीचा कार्यकर्ता याही प्रकृतीला हवें तसें वळवितो हें अनेकवार सिद्ध झालें आहे. तसा करारी व हिकमतीचा पुढारी आज महाराष्ट्रांत नसल्यामुळें बुद्धि व कळकळ हीं दोन्ही असून राष्ट्राच्या राजकारणांत महाराष्ट्र आज मागें पडला आहे.

महात्मा गांधींच्या असहकारितेला महाराष्ट्रांत विरोधच अधिक, असें वर म्हटलें. पण याचा अर्थ असा नव्हे कीं गांधींच्या चळवळीनें महाराष्ट्रावर कसलाच परिणाम झाला नाहीं, किंवा त्यामुळें महाराष्ट्राच्या राजकारणाला कसलेंच वळण लागलें नाहीं. महात्मा गांधींसारखी तेजस्वी व्यक्ति इतकी परिणामशून्य असेल असें म्हणणेंच मुळीं वेडेपणाचें होईल. महात्माजींची तपश्चर्या, त्यांचा स्वार्थत्याग, त्यांची साधुवृत्ति, त्यांची नेतृत्वशक्ति, त्यांचें दलितवर्गाबद्दलचें प्रेम, त्यांची कळकळ इत्यादि गोष्टींचा दाब कसलीही मनोवृत्ति असली तरी तिच्यावर थोड्याबहुत प्रमाणांत हा पडणारच. महाराष्ट्राच्या बुद्धिप्रधान प्रकृतीला त्यांची धरसोड, त्यांचा लहरीपणा, त्यांचे साधुतुल्य परंतु अव्यवहार्य मार्ग पटले नाहींत हें खरें असलें तरी त्यांनीं घडवून आणलेल्या प्रचंड चळवळीमुळें महाराष्ट्राच्या राजकारणांत खळबळ उडविली एवढें निश्चित. विशेषतः टिळक-

पक्षियांवर त्यांच्या चळवळीनें केलेले परिणाम बरेच तीव्र स्वरूपाचे आहेत. १९२०-२१ च्या चळवळीनें केसरी पक्षाच्या राजकारणाला फक्त एक जोराचा धक्काच बसला; पण १९३० च्या चळवळीनें त्या पक्षाला एकदम दुय्यम पदावर नेमस्तांच्या जोडीला बसविलें. लोकमान्य हयात असतांना तरुणांच्या मनावर केसरी-पक्षाचा विलक्षण दाब असे. त्या वेळची तरुण पिढी टिळकांच्या मनानें विचार करीत असे असें म्हणणें गैरवाजवी ठरणार नाहीं. परंतु आजच्या तरुण पिढी-वर केसरी-पक्षाचें वजन जवळजवळ विरामशून्याएवढें आहे असें म्हटलें असतां चालेल. राजकीय वातावरणांत केसरीपक्षाचें वजन किती खालावलें आहे, याचें प्रत्यंतर गेल्या निवडणुकीनें उत्तम प्रकारें आणून दिलें.

एका दृष्टीनें केसरी-पक्षाचें स्थान नेमस्तांच्याही खालीं गेलेलें आढळेल. टिळकांच्या वेळीं सामाजिक सुधारणांचा प्रश्न राजकीय चळवळीपासून अलिप्त ठेवण्याकडे महाराष्ट्रीय जहालांचा कल असे. राजकीय सुधारणा पदरांत पडल्या-खेरीज सामाजिक सुधारणांची धडपड व्यर्थ आहे; त्यामुळें विनाकारण बुद्धिभेद माजतो व आपलीच शक्ति कमी होते, असा त्यांचा युक्तिवाद होता. नेमस्तपक्ष सामाजिक सुधारणांकडेच अधिक लक्ष देई. पण सर्व सुधारणा एकसमयावच्छेदें करून झाल्या पाहिजेत असें मत ठांसून मांडण्याचें कार्य आगरकरांनीं केलें. या सर्वगामी चळवळीवरच महात्मा गांधी भर देत असतात. व म्हणूनच त्यांच्या कार्यक्रमांत अस्पृश्योद्धारासारख्या सामाजिक प्रश्नांना विशेष महत्त्व आलें आहे. पण महात्माजींचा एक विशेष बुद्धिप्रधान महाराष्ट्राला पटणें जवळजवळ अशक्यच दिसतें. राजकीय वा सामाजिक – सर्वच प्रश्नांकडे पाहाण्याची गांधींची दृष्टि धर्मनिष्ठ असते. धार्मिक बुद्धीनें प्रेरित होऊ-नच त्यांनीं आपल्या चळवळीचा पसारा मांडला आहे. पण महाराष्ट्राच्या चिकित्सक बुद्धीला धर्म आणि राजकारण यांमधील ही सांगड अनवश्यक वाटल्याखेरीज राहात नाहीं. महात्मा गांधी स्वतःच्या तत्त्वांना आपल्या आत्मिक आयुष्याशीं एकरूप मानतात. पण महाराष्ट्रियांच्या गळीं ही समजूत उतरणें बरेंच कठीण आहे. महाराष्ट्र-प्रकृति बरीच चिकित्सक आणि बरीच बुद्धिप्रधान आहे. आणि म्हणूनच महाराष्ट्राचे ध्येयवादी तरुण भौतिकतावादी समाजसत्ता-वादाकडेच अधिक आस्थेनें धांव घेत असलेले दिसतात.

६. महाराष्ट्रांतील कम्युनिस्ट चळवळीचा इतिहास अवलोकिला तर हें सहज पटेल. १९२०-२१ च्या असहकारितेच्या चळवळींत पुष्कळ तरुण सामील झाले. परंतु ती चळवळ एकदोन वर्षांतच थंडावल्यामुळें त्यांपैकीं कित्येकांची तीव्र निराशा झाली. अर्थातच त्यांचा गांधींच्या तत्त्वांवरील विश्वास उडून ते दुसरे मार्ग हुडकूं लागले. अशा स्थितींत कांहीं तरुणांचें लक्ष कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाकडे व मजुरांच्या चळवळीकडे वळणें साहजिक होतें. १९१७ सालीं, महायुद्ध सुरू असतांना, रशियन कम्युनिस्ट पार्टीनें लेनिनचें नेतृत्व स्वीकारून कामगारक्रान्ति घडवून आणली. या प्रचंड घडामोडीकडे हिंदुस्थानचें लक्ष वेधल्याखेरीज कसें राहील? साहजिकच मार्क्सप्रणीत तत्त्वज्ञानाकडे तरुणांची दृष्टि गेली आणि गांधींच्या तत्त्वज्ञानाशीं त्याची तुलना होऊं लागली. ज्यांचा कल मार्क्सच्या तत्त्वांकडे झुकला त्यांना आपलें तत्त्वज्ञान आचरणांत आणण्याचीं साधनें आपोआपच निर्माण होत होतीं. युद्धोत्तर महाराष्ट्रांत आर्थिक स्थित्यंतरामुळें मजुरांच्या चळवळीस एकदम महत्त्व आलें. महायुद्धापूर्वी येथील मजुरांत वर्गजागृतीची भावना जवळजवळ मुळींच नव्हती असें म्हटलें असतां चालेल. १९०८ सालीं मुंबईस गिरणी-कामगारांचा सार्वत्रिक संप अगदीं स्वयंस्फूर्तीनें झाला व एकसारखा तीन दिवस टिकला. पण त्याचें ध्येय टिळकांना झालेल्या शिक्षेचा निषेध करण्याचें होतें—स्वतःच्या म्हणजे स्ववर्गीयांच्या विशिष्ट मागण्या पुरवून घेणें, हें नव्हतें. तसा संप मुंबईत १९१८ सालीं झाला. त्यानंतर मुंबईत झालेले संप निश्चित मागण्या, संघशक्ति, लढाऊवृत्ति इत्यादि बाबींमुळें महत्त्वाचे ठरतात. याची जाणीव गिरणीमालकांना ताबडतोब झाली, हें मिल ओनर्स असोसिएशनचे अध्यक्ष सर दिनशा वाच्छा यांनीं एप्रिल १९१८ मध्यें काढलेल्या उद्गारांवरून स्पष्ट दिसतें. "भांडवलदार आणि कामगार यांमध्यें लांबणारे व निश्चयपूर्वक लढविले जाणारे संप यापुढें निर्माण होणार हें निश्चित आहे. १९ व्या शतकारंभींच्या कामगार वर्गापेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेचा कामगार वर्ग व त्याची चळवळ आतां अस्तित्वांत येणार...सारांश कामगारवर्ग आपल्या कामाचा, आपल्या श्रमाचा मालक बनण्याची, आपल्या स्वातंत्र्याची मागणी करणार. ह्या नवीन स्थित्यंतराची दिशा दाखविणारे वारे वाहूं लागले आहेत...महायुद्धामुळें

थोडा काळ दडून राहिलेला कामगारांचा असंतोष सर्वत्र फैलावत आहे, हें सांगण्याची गरज आहे काय ? " सर वाच्छांचे हे शब्द भविष्यवाणीचे ठरले. आणि त्याचीं कारणें उघड आहेत. महायुद्धाचे हिंदुस्थानावर झालेले परिणाम वर वर्णिलेच आहेत. युद्धकालीन तेजीनें चमकून जाऊन भांडवलवाल्यांनीं अचाट फायदा लाटला. पण त्याचे परिणाम त्याला अल्पावधींतच भोंवले—आर्थिक मंदीची झळ हिंदुस्थानलाही लागली व त्यांतच जपानच्या चढाओढीची भर पडली. दोनतीन वर्षांतच भांडवलवाला वर्ग कुरकुरूं लागून पगारकपात व कामवाढ यांसारखे उपाय योजूं लागला. पण मालकांच्या ह्या बेतांस निमूटपणें मान तुकविण्यास कामगारवर्ग आतां पूर्वीसारखा अज्ञान व भोळसट राहिला नव्हता. जागतिक कामगार चळवळ, मजुरांच्या हक्कांची मार्क्सप्रणीत सनद, स्वयंनिर्णयाचें तत्त्व इत्यादि गोष्टींचा पूर्ण तत्त्वशुद्ध व तर्कशुद्ध अभ्यास त्यानें केला नसला तरी असेच कांहींसे विचार त्यांच्या कानांवर येऊं लागले होते. शिवाय 'बाप्टिस्टा काका' सारखे मजूर पुढारी राष्ट्रसंघाच्या धोरणानुसार मजूरवर्गांत जागृति करीत असल्यामुळें मजुरांची संघटना व प्रतिकारबुद्धि हीं दिवसेंदिवस वाढत होतीं.

या प्रश्नाकडे असहकारितेनें निराश झालेल्या कांहीं तरुणांचें लक्ष गेलें. मजुरांच्या चळवळीला राजकीय स्वरूप प्राप्त करून दिलें तर हिंदी स्वातंत्र्ययुद्धाला नवीन व जोरदार वळण लागेल अशी कल्पना मनांत डोकावल्यामुळें ते या दृष्टीनें विचार व विचारप्रसार करूं लागले. श्री. डांगे यांचें 'सोशिॲलिस्ट' हें वृत्तपत्र या दिशेनें प्रयत्न करी. सरकारचें लक्ष या स्थित्यंतराकडे होतेंच व १९२४ सालीं 'कानपूर कटाचा खटला' उभारून त्यानें आपली जागरुकता जगाच्या प्रत्ययास आणून दिली. या कटांत श्री. डांगे यांचें नांव गोवलें होतें. सदर खटल्यानें जनतेचें लक्ष रशियन क्रान्तीकडे विशेष जाऊन आधींच असंतुष्ट, नाराज व बेकार असलेल्या समाजाला आकर्षण्यास हें नवें क्षेत्र अधिक समर्थ झालें. गिरणी कामगारांचा जोर वाढत होता. याची प्रचीति या खटल्याच्या दुसऱ्याच वर्षीं आली. १९२५ सालीं मुंबईंत गिरणी कामगारांचा पहिला महत्त्वाचा सार्वत्रिक संप झाला. आणि नेमस्त-पक्षियांचें नेतृत्व स्वीकारूनही कामगारवर्गानें तो यशस्वी रीतीनें शेवटास नेला.

इतउत्तर मुंबईच्या सार्वजनिक आयुष्यांत कम्युनिस्टांचें महत्त्व वाढत गेलें. या पुढल्याच संपांत नेमस्तपक्षीय सुधारणावादी पक्षानें कामगारांचें नेतृत्व गमावलें, तें अद्याप परत मिळविलेलें नाहीं. १९२६ सालीं इंग्लंडमध्यें सार्वत्रिक संप झाला व त्याचे परिणाम इकडेही जाणवले. त्या संपाला मेमध्यें सुरवात झाली. आणि महाराष्ट्रांतला पहिला मे-दिनही या महिन्यांतच साजरा झाला. ता. ६–५–१९२६ रोजीं कामगारांचें स्वतंत्र असें 'क्रान्ति' वृत्तपत्र निघून त्याद्वारें कामगारवर्गाला 'कम्युनिझम'ची शिकवण पद्धतशीरपणें मिळूं लागली. हिंददेशांतील कम्युनिझमच्या इतिहासांत १९२६ साल हें आणखीही एका गोष्टीकरितां संस्मरणीय आहे. १९२६ च्या हिंवाळ्यांत पार्लमेन्टचे हिंदी कम्युनिस्ट सभासद कॉ. सकलातवाला यांनीं हिंदुस्थानला भेट देऊन सर्व देशभर दौरा काढला व आपलें विशिष्ट तत्त्वज्ञान सर्व ठिकाणीं पोंचविलें. पार्लमेन्टसभेचा हिंदी सभासद, व कुशल वक्ता या दोन्ही नात्यांनीं सकलातवाला यांनीं हिंदी जनतेचें, विशेषतः ध्येयवादी तरुणांचें लक्ष स्वतःकडे वेधून घेतलें. पण एवढेंच करून ते थांबले नाहींत. त्यांनीं गांधींची भेट घेतली व त्यांचेशीं लेखणीचे 'दोन शब्द'ही केले. साहजिकच लोकांचें लक्ष या नवीन तत्त्वप्रणालीकडे अधिक जोरानें वेधून कम्युनिस्ट तत्त्वज्ञानाचा अभ्यास हिंदुस्थानांत विशेष तन्मयतेनें होऊं लागला.

याचें प्रत्यंतर लगेच पुढील वर्षीं आलें. १९२७ सालीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं कामकरी–शेतकरी पक्ष स्थापन झाले. मुंबईच्या कामकरी–शेतकरी पक्षाची स्थापना मार्च १९२७ मध्यें झाली; व त्या सालचा मे-दिन कामकरी-शेतकरी पक्षाच्या नेतृत्वाखालीं अत्यंत उत्साहानें साजरा करण्यांत आला. त्या दिवशीं मुंबईकरांना एक अगदीं नवीन दृश्य दृष्टीस पडलें. कामगारांची पहिली मिरवणूक त्या दिवशीं मुंबईच्या रस्त्यावर दिसली. हातांत रक्तध्वज व तोंडावाटे 'भांडवलशाही नष्ट होवो' ही घोषणा या कारणानें त्या मिरवणुकीला एक विशिष्ट महत्त्व आलें होतें.

या कामकरी–शेतकरी पक्षानें मुंबईच्या कामगारवर्गांत एक नवचैतन्य निर्माण केलें. याचा अनुभव १९२८ च्या सार्वत्रिक संपाचे वेळीं आला.

कामगारवर्गाला स्वतःच्या वर्गवैशिष्ट्याची जाणीव होऊं लागलीच. पण त्याचबरोबर राजकीय जागृतीचे वारेही कामगारांच्या मोहल्यांत वाहूं लागले. १९२८ सालच्या सायमनकमिशनवर पडलेल्या बहिष्कारांत मुंबईच्या कामगार-वर्गानें घेतलेला भाग अभूतपूर्व असाच होता. किंबहुना १९२८ हें सालच मुंबई कामगारांच्या इतिहासांत अत्यंत संस्मरणीय रीतीनें गेलें. नेमस्तपक्षीय सुधारणावादी पुढाऱ्यांचें नेतृत्व झुगारून देऊन मुंबईचे कामगार कामकरी-शेतकरी पक्षाच्या पुढारीपणाखालीं या सालीं जमा झाले व त्यांनीं गिरण्यांचा एक सार्वत्रिक संप सहा महिने टिकविला व यशस्वीपणें मिटविला. याच संपांत संपाची लढाऊ संघटणा करण्यासाठीं कामकऱ्यांची पहिली संपकमिटी स्थापन झाली व याच सालीं आंतरराष्ट्रीय मजूर चळवळींत गाजलेली 'मुंबई गिरणी-कामगार युनिअन' ही संस्था अस्तित्वांत आली. त्या वेळच्या कामगार पुढाऱ्यांत स्प्रॅटसारख्या आंग्लदेशियांचा समावेश झाल्याकारणानें कामगारवर्गाच्या आंतर्राष्ट्रीय जुटीची प्रत्यक्ष प्रचीति मुंबईच्या कामगार वर्गाला मिळाली.

पण पुढील ( १९२९ ) सालच्या मार्च महिन्यांत तमाम हिंदुस्थानांतील ३२ कम्युनिस्ट कार्यकर्त्यांना एकदम अटक करून सरकारनें या चळवळीकडे आपलें दुर्लक्ष होत नसल्याचें सिद्ध केलें. या एकंदर ३२–३३ आरोपींत एकचतुर्थांशाहून अधिक मराठी बोलणारे असल्यामुळें ह्या खटल्यानें एकंदर मराठी समाजांत कम्युनिझमबद्दल विलक्षण कुतूहल निर्माण झालें. मीरत कटाचा खटला म्हणजे कम्युनिस्ट मतांना सरकारनें आपण होऊन दिलेली चालनाच म्हणतां येईल. एकाएकीं इतके मजूर–पुढारी कैदेंत अडकल्यामुळें कामगारवर्ग घाबरला नाहीं. त्यानें नवीन पुढारी नेमले आणि पुढल्याच महिन्यांत मुंबईंत आणखी एक सार्वत्रिक संप घडवून आणला आणि तो सहा महिने टिकविला.

पण हा संप दुर्दैवी ठरला. संप फुटून कामगारांना माघार घ्यावी लागली. एवढ्यावरच हें दुर्दैव थांबतें तर फारशी अडचण नव्हती. परंतु मीरत कटां-तील पुढाऱ्यांचे वारसदार नवीन पुढारी कच्चे ठरले; त्यांची तत्त्वनिष्ठा कमताकद ठरली; त्यांची वैयक्तिक महत्त्वाकांक्षा फाजील अभिनिवेशानें उफाळूं लागली. याचा परिणाम तो काय होणार ? मतभेद उद्भवले, पक्षोपक्ष माजले, उखाळ्या-पाखाळ्या निघाल्या आणि मुंबई गिरणीकामगार चळवळीचीं शकलें उडालीं !

नंतर १९३० सालीं जी. आय्. पी. रेल्वे मजुरांना संप झालाच! गिरणी-मजुरांचे छोटे मोठे संपही चालू होते. आणि हे सर्व कार्य करण्यास नव्या दमाचे नवे पुढारी लाभले होते. या नवोदित पुढाऱ्यांना कळकळ होती पण अनुभव नव्हता; ज्ञान होतें पण विनय नव्हता; तत्त्वनिष्ठा होती पण स्वार्थत्याग नव्हता. अर्थात् वैयक्तिक स्पर्धेची भांडणेंच कामगारांच्या सभांत ( वर्तमानपत्रें नव्हतींच ) अधिक अभिनिवेशानें रंगूं लागलीं.

या नवशिक्या पुढाऱ्यांनीं कम्युनिस्ट चळवळीचें अतिशय नुकसान केलें हें कबूल केलेंच पाहिजे. अतिशय आणीबाणीचे वेळीं या पुढाऱ्यांच्या हातांत चळवळीचीं सूत्रें आलीं. १९३० सालीं म. गांधींनीं राष्ट्रीय संग्राम आरंभिल्या-मुळें त्यांना एक सुंदर संधि आली होती. पण हे पुढारी त्या चळवळीतलें आपलें कर्तव्य बजावण्यास चुकले. कामगार चळवळीच्या मार्गें राजकीय स्थित्यंतर घडवून आणणें व शेवटीं कामगार-राज्याची ( कामगारांच्या अनियं-त्रित सत्तेची ) स्थापना करणें हें कोठल्याही कम्युनिस्ट चळवळीचें ध्येय असतें. त्या ध्येयाला चालना यावयास ही सुवर्णसंधि आयती चालून आली होती. परंतु या पुढाऱ्यांनीं ती दवडली. कॉंग्रेसला भांडवलवाल्यांची संस्था लेखून, व कॉंग्रेसची चळवळ ही मूठभर भांडवलवाल्यांनीं धूर्त गांधींच्या सहाय्यानें साम्राज्यशाहीशीं तडजोड करण्यासाठीं चालविलेली चळवळ अशी तिची अवहे-लना करून, इतकेंच नव्हे तर त्या चळवळीला विरोध करणें हें सच्चा कम्युनिस्टाचें कर्तव्य आहे असें मानून कम्युनिस्ट पुढाऱ्यांनीं देशाच्या राजकीय चळवळीशीं आपली फारकत करून घेतली. हें आत्यंतिक धोरण बदलण्याचे व त्यांत यश न आल्यामुळें आपला स्वतःचा असा वेगळा पक्ष स्थापण्याचे प्रयत्न जगद्विख्यात कम्युनिस्ट मानवेन्द्रनाथ रॉय यांनीं केले. परंतु या बालकम्युनिस्टांनीं त्यांची गणना साम्राज्य-शाहीच्या हस्तकांत केली! रॉय यांना हुशार व कष्टाळू कार्यकर्ते न मिळाल्यामुळें व लवकरच त्यांना कानपूर कटाचें 'ऋण' फेडायला जावें लागल्यामुळें त्यांचाही पंथ कमजोर ठरला. पण कामगारवर्ग कॉंग्रेसच्या चळवळी-विषयीं उदासीन नव्हता. कम्युनिस्टांच्या धोरणाला त्यानें धुडकावून लावलें व तो राष्ट्रीय आंदोलनांत सामील झाला. पण राष्ट्रीय चळवळ अयशस्वी ठरली. व

पुनः कांहीं काल कामगारवर्गाचा कल कम्युनिस्टांकडे वळला. याचा उपयोग त्यांनीं १९३४ मध्यें सोलापूर व मुंबई येथें सार्वत्रिक संप घडविण्यासाठीं केला. पण हे संप झाले ... आणि मोडले. मीरत कटांतील पुढारी सुटून आल्यामुळें कामगारवर्गाची कळी जरा खुलली होती, पण मीरत पुढाऱ्यांनीं तुरुंगांतील आयुष्य आपापसांतील भांडणांत घालविलें असल्यामुळें 'मित्र म्हणून गेले आणि शत्रू होऊन आले' अशांतली त्यांची स्थिति होती; व तेही आपलीं भांडणें आतां गिरणगांवांत लढूं लागले. पण सरकार मात्र या भांडणांवर विसंबून राहावयास तयार नव्हतें. त्यानें एक फर्मान काढून हिंदी कम्युनिस्ट पक्ष व तत्सम इतर संस्था बेकायदेशीर ठरविल्या.

गेल्या राष्ट्रीय चळवळींत कम्युनिस्ट पक्षाचा जोर कमी झाला असला, तरी साम्यवादी तत्त्वांची घोषणा करणारा दुसरा एक पक्ष राष्ट्रीय सभेंतच निर्माण झाला आहे. १९३०–३३ च्या कायदेभंगांत 'कायदा तोड दिया' करून जे तरुण तुरुंगांत गेले त्यापैकीं कित्येकांनीं आपल्या मतांचें व हिंदी चळवळीचें अन्तमुर्खदृष्ट्या पर्यालोचन करून साम्यवादाखेरीज हिंददेशाला तरणोपाय नाहीं, असा निष्कर्ष काढला व राष्ट्र–सभान्तर्गत अशा साम्यवादी पक्षाची स्थापना केली. कामकरी–शेतकरी वर्गाला सत्ता प्राप्त करून देणें हेंच या पक्षाचें ध्येय असलें तरी त्याला कम्युनिस्टांचे आततायीपणाचे, अत्याचा-राचे व राष्ट्रसभेशीं फटकून वागण्याचे मार्ग संमत नाहींत. एक दिवस राष्ट्रसभेलाच आपलें ध्येय व मार्ग मान्य करायला लावूं असा आत्मविश्वास त्या पक्षाला आहे. तरीपण त्या पक्षामध्यें किती पक्षभेद उद्भवतील तें निश्चितपणें सांगणें अशक्य आहे. सध्यांचा त्याचा कार्यक्रम बराच संदिग्ध असल्यामुळें वरवर पाहाणरास तरी त्यामध्यें एकी दिसते. पण आपल्या कार्याची रूपरेषा तो अधिक सूक्ष्मतेनें आंखावयास लागेल तर त्या पक्षांतील मतभेद झटकन दृष्टोत्पत्तीस येईल. कारण, त्या पक्षांत गांधीवाद म्हणजेच समाजवाद असें प्रति-पादन करण्याऱ्या व्यक्तींपासून गांधींच्या तत्त्वज्ञानाला समतावादाचा कट्टा शत्रु असें मानणाऱ्या व्यक्तींपर्यंत सर्व समाजासत्तावादी लोकांचा समावेश होत असतो. पण या कॉंग्रेस समाजवादी पक्षांतील — विशेषतः त्याच्या महाराष्ट्र शाखेंतील— एका वर्गाचा निर्देश करणें विशेष अगत्याचें आहे. १९२१ च्या चळवळींत

गांधींचीं तत्त्वें स्वीकारून तीं इतके दिवस उराशीं बाळगणाऱ्या कित्येक गांधी-भक्तांचें मतपरिवर्तन गेल्या आंदोलनानें घडवून आणलें. या लोकांची सहानुभूति बऱ्याच अंशानें समाजवादाकडे झुकत असल्यामुळें त्यांचें मतपरिवर्तन महत्त्वाचें ठरतें. कारण काँग्रेस समाजवादीपक्षच राष्ट्राच्या राजकारणांत इतउत्तर महत्त्वाचे डाव खेळेल असें वाटतें. तो अस्तित्वांत आल्यापासून अल्पावधींतच त्या पक्षाला जें महत्त्व आलें व जी लोकप्रियता लाभली त्यावरून या अनुमानास बरीच बळकटी येते. याच कारणानें या नवतरुण पक्षाची भीति काँग्रेसच्या जुन्या गांधीपक्षीय सन्मान्य शिष्ट पुढाऱ्यांना वाटत असावी. गतसालच्या मुंबई येथील काँग्रेसच्या अधिवेशनांत समाजवादी पक्षानें---विशेषतः त्याच्या दोन महाराष्ट्रीय नेत्यांनीं जी धडाडी व जी चमक दर्शविली, त्यावरून ही भीति अगदींच अस्थानीं आहे असें म्हणवत नाहीं. इंग्रज सरकारला कम्युनिस्टांची जशी भीति वाटते तशीच भीति काँग्रेस सरकारला या समाजवाद्यांची वाटते. सरकारनें कम्युनिस्ट पक्ष बेकायदेशीर ठरविला, तसें समाजवादी पक्षाला ठरविणें ‘धोक्याचें’ असल्यामुळें कांग्रेसनें आपल्या घटनेंत महत्वाचे फेरफार करून घेतले. या फेरबदलानें समाजवादी पक्षास काँग्रेसमध्यें शिरणें व शिरून ती हस्तगत करणें बरेंच कठीण जाईल यांत संदेह नाहीं.

महाराष्ट्रांत या पंथाचा फैलाव विशेष कां याचें उत्तर दिलें पाहिजे. मीरत-कटाच्या खटल्यांत एकतृतियांशाहून अधिक आरोपी मुंबईचे व त्यापैकीं बहुतेक मराठी बोलणारे होते हें पाहिलें कीं मजूर चळवळींत महाराष्ट्राचें व मुंबईचें स्थान किती वरचें आहे, तें सहज समजेल. मुंबईसारख्या उद्योगधंद्यांच्या अवाढव्य आगरांत मजुरांची चळवळ विशेष महत्त्वाची ठरावी हें स्वाभाविकच. मुंबईंत पांच लाखांहून अधिक लोकसंख्या मराठी भाषा बोलते. तेथील राबणारा मोठा वर्ग बहुतेक मराठाच. अशा स्थितींत मुंबईचे मजूरपुढाऱ्यांत महाराष्ट्रीयांचें संख्याधिक्य असलें तर नवल नव्हे. पण समाजवादी तत्त्वज्ञान महाराष्ट्रांत जोमानें फैलावण्याचें कारण महाराष्ट्र-प्रकृतींत शोधणें अधिक सयुक्तिक ठरेल. महाराष्ट्र देश मूळचाच खडकाळ व दरिद्रि. जीवनकलहाचें येथील स्वरूप अतिशय तीव्र. खडकाळ प्रदेशांतील प्रकृति कणखर असावयाची. ती कम्युनिझम सारख्या ‘भीतिप्रद, भयंकर’ तत्त्वांनीं भेदरून जात

नाहीं. उलट उपाशी पोटाला साम्यवाद सहज पटत असल्यामुळें, हें तत्त्वज्ञान फैलण्यास महाराष्ट्रांत अनुकूलता विशेष आहे. महाराष्ट्र–प्रकृतीच्या आणखी एका विशेषामुळें महाराष्ट्रीय तरुण तें सहज लीलेनें पचवूं शकतात. साम्यवादी तत्त्वज्ञान भौतिकतावादी, बुद्धिगम्य असेंच आहे. त्याचें नीट आकलन होऊन तें पूर्णपणें पटायला बुद्धिप्राधान्य लागतें. तें महाराष्ट्रियांत खास आहे. आणि म्हणूनच मार्क्सवादाचा अभ्यास महाराष्ट्रांत इतका साकल्यानें व तन्मयतेनें होऊं शकतो.

७. कम्युनिस्टांच्या चळवळीनें शहरवासी शिक्षितांत आणि कामगारांत खळबळ उडविली; तर ब्राह्मणेतरवादानें खेडेगांवांतील जनतेंत प्रक्षोभ उत्पन्न केला. याचा अर्थ असा नव्हे कीं ब्राह्मणेतरांच्या चळवळीचा संचार शहरांत मुळींच झाला नाहीं. पण एवढें खरें कीं या चळवळीचें तीव्र स्वरूप खेडेगांवांत व लहानसहान शहरांतच विशेष प्रत्ययास आलें. ब्राह्मणेतर चळवळीचें अस्तित्व महाराष्ट्रांत जोतीबा फुले यांच्या वेळेपासून आहे. फुले हेच या चळवळीचे खरेखुरे प्रणेते ठरतात. परंतु १९२० नंतरच तिचें अस्तित्व महाराष्ट्रास विशेष जाणवूं लागलें. ब्राह्मणेतर चळवळीचें नेतृत्व आपाततः सत्यशोधक समाजाकडे जातें. सत्यशोधक समाजाची स्थापना जोतीबा फुले यांनीं ता. २३ सप्टेंबर १८७३ रोजीं केली. या समाजाचीं तीन प्रमुख तत्त्वें अशीं आहेतः—

( १ ) ईश्वर एक असून तो सर्वव्यापी, निर्विकार, निर्गुण व सत्यरूप आहे व सर्व मनुष्य प्राणी त्याचीं प्रिय लेकरें आहेत. ( २ ) ईश्वराची भक्ति करण्याचा प्रत्येक मानवास पूर्ण अधिकार आहे. आईस संतुष्ट करण्यास अगर बापास विनविण्यास जशी त्रयस्थ दलालाची जरूर नसते त्याप्रमाणें सर्वसाक्षी परमेश्वराची भक्ति करण्यास भट दलालाची आवश्यकता नाहीं. ( ३ ) मनुष्य जातीनें श्रेष्ठ ठरत नसून तो गुणानें श्रेष्ठ ठरतो. ×

सत्यसमाजाचीं हीं आद्यतत्त्वें पाहिलीं म्हणजे त्याचें धार्मिक स्वरूप लक्षांत येतें. पाश्चात्यदेशांत प्रोटेस्टंट धर्मपंथानें जी सुधारणा खिश्चन धर्मांत घडवून आणली तशाच प्रकारची सुधारणा हिंदुधर्मांत घडवून आणण्याचा या समाजाचा उद्देश दिसतो. जातिभेदांचें बंड मोडून भक्तिमार्ग सर्वांस सारखा

× पं. सि. पाटील: **म० फुले यांचें चरित्र** पृ० ६३

खुला करून देणें; भिक्षुकशाही नष्ट करून ईश्वरसंनिध जाण्यास सर्वांस सारखी मुभा देणें; मूर्तिपूजा ईश्वरप्राप्तीला आवश्यक नाहीं असें ठरविणें; परमेश्वरप्राप्तीसाठीं चित्तशुद्धि आवश्यक असते, ती प्राप्त करून घेण्यासाठीं दया, क्षमा, शांति वगैरे गुणांचा विकास करणें व त्यावरूनच व्यक्तीचें महत्त्व ठरविणें—प्रोटेस्टंट पंथाचीं हीं तत्त्वें सत्यसमाजानें आत्मसात् करून घेतलेलीं दिसतात. प्रार्थना समाजाचेंही स्वरूप असेंच आहे; आणि तत्त्वतः तरी या दोन समाजांत फारसा फरक दिसत नाहीं. प्रार्थनासमाजाचे पुढारी सर्वसाधारणपणें सुशिक्षित पुढारलेल्या जातींतून आल्यामुळें त्या समाजतत्त्वाचा प्रसार त्या जातींतच विशेष झाला. इतकेंच नव्हे, तर भिक्षुकशाहीचा उगम पुढारलेल्या ब्राह्मण वर्गांत असल्यामुळें प्रार्थना समाजाचा प्रसार होणेंच कठिण गेलें. पण जोतीबा फुले मागासलेल्या माळी जातींत जन्मलेले असल्यामुळें त्यांनीं आपली चळवळ ब्राह्मणेतर बहुजनसमाजांत पसरविली व हजारों लोक आपले अनुयायी करून घेतले. अर्थात् फुल्यांना हें यश थोडें उशीरांच मिळालें. सत्यसमाज स्थापिल्यानंतर सुमारें पन्नास वर्षांनंतर सत्यशोधक चळवळीचें सामुदायिक स्वरूप महाराष्ट्राच्या प्रत्ययास आलें. तोंपर्यंत ती चळवळ कांहीं विशिष्ट व्यक्ती व संस्था यांच्यापुरतीच मर्यादित होती. मागासलेल्या दलित ( exploited ) वर्गांची जागृति हिंदुस्थानांत तरी अगदीं अलीकडेच होत आहे. तिला मिळत असलेलें संघटित स्वरूप अगदीं नवें दिसतें. तशी जागृति होऊन तिला संघटित स्वरूप प्राप्त होण्याइतकी महाराष्ट्रीय समाजाची प्रगति फुल्यांचे वेळीं झाली नव्हती. दलितवर्ग तेव्हां अवनतीच्या गाढ गुंगींत सुप्त होता. परिस्थितींतील स्थित्यंतरामुळें त्याला जाग आली. त्या जागृतीचीं केवळ प्राथमिक चिन्हें फुल्यांच्या कार्यांत व्यक्त होत होतीं. तिचा संघटित आणि मोठ्या प्रमाणावर उपयोग करून घेण्याचा मान कोल्हापूरचे महाराज शाहू छत्रपति यांस मिळतो. त्यांच्या अधिकाराचा उपयोग चळवळीला होऊन अल्पावधींत तिचा वृक्ष जोमानें फोंफावूं लागला. +

---

+ शाहू महाराजांच्या अवसानामुळेंच पुढें ती चळवळ थंडावली, असें कांहीं लोक समजतात; परंतु तिचें स्वरूप इतकें व्यक्तिनिष्ठ नाहीं. ती चळवळ घसरडीस लागण्याचीं कारणें अधिक व्यापक आहेत.

## ब्राह्मणेतरत्वाची व्याख्या

सत्यसमाजाचें स्वरूप हें असें असलें तरी ब्राह्मणेतर चळवळ अधिक व्यापक स्वरूपाची असून ती मुख्यतः सामाजिक आणि राजकीय प्रश्नांचाच विचार करतांना आढळते. ब्राह्मणांचें सोंवळें-ओंवळें, स्पर्शास्पर्श, सरकारी व तत्सम नोकरींतला ब्राह्मणांचा सुळसुळाट, खाजगी संस्थांतलें ब्राह्मणांचें वर्चस्व—त्यांचें धार्मिक, नैतिक, राजकीय व सामाजिक नेतृत्व यांविरुद्ध चळवळ करून हे सर्व हक्क सर्व जातींना सारखे प्राप्त करून देणें हें ब्राह्मणेतर चळवळीचें प्रमुख ध्येय आहे. सत्यशोधक समाजाच्या धार्मिक ध्येयापेक्षां हें ध्येय जसें अधिक व्यापक तसेंच तें हिंदुधर्मदृष्ट्या अधिक नेमस्त दिसतें. हिंदुधर्माच्या तत्त्वाविरुद्ध बंड पुकारलेलें त्यांत कोठेंच दिसून येत नाहीं— विशेषतः सत्यशोधक समाजाच्या तत्त्वत्रयींत व्यक्त झालेला मूर्तिपूजा निषेध* यांत मुळींच आढळत नाहीं. इतकेंच नव्हे, ब्राह्मणेतर चळवळीनें गणेशोत्सव व हरितालिका व्रतपूजा यांत मनोभावें भाग घेतला असल्याचें वेळोवेळीं आढळून येतें. आणि म्हणूनच ब्राह्मणसमाजांत सुधारक मंडळीस जें महत्त्व आहे, तसेंच महत्त्व ब्राह्मणेतर पक्षियांस ब्राह्मणेतर समाजांत प्राप्त होतें.

असें असलें तरी सत्यशोधक समाज व ब्राह्मणेतर चळवळ यांचें संमिश्रण इतकें बेमालूम झालें आहे कीं त्या दोहोंमधील फरक स्पष्टपणें ठरविणें अशक्य झालें आहे. एके काळीं ब्राह्मणेतर पक्षाचें मुखपत्र म्हणून गाजलेल्या 'विजयी मराठा' पत्रानें ब्राम्हणेतरत्वाची म्हणून जी व्याख्या दिली आहे त्यांत या फरकाचा लोपच झालेला दिसतो—"ब्राह्मणेतरत्व म्हणजे आपण ईश्वराच्या तोंडांतून बाहेर पडलों अशी मूर्खपणाची कल्पना नसणें; ब्राह्मणेतरत्व म्हणजे वेदाजवळ आपली बुद्धि गहाण न ठेवणें; ब्राह्मणेतरत्व म्हणजे चातुर्वर्ण्याची चौधारी सुरी हिंदुसमाजाच्या गळ्यावर न ठेवणें; ब्राह्मणेतरत्व म्हणजे धर्मातल्या साऱ्या उज्वल तत्त्वांचें शेंडी, सोंवळें, जाति आणि मूर्ति यांच्या पायावर बलिदान न करणें, ब्राह्मणेतरत्व म्हणजे धर्मापासून स्वातंत्र्याची आणि धर्माचरणापासून माणुसकीची फारकत न करणें." × पण त्याच वृत्तपत्रांत ब्राम्हणेतरांनीं साजरा केलेल्या

---

* पं. सि. पाटील: **फुलेचरित्र**—प्रकरण १० वें

× "**विजयी मराठा**" ११-९-१९२५

गणेशोत्सवाचीं मोठीं रसभरीत वर्णनें येत असत. वस्तुस्थिति अशी दिसते कीं खुद्द ब्राम्हणेतर पुढाऱ्यांनाच या दोहोंतील फरकाची नीटशी जाणीव झालेली नाहीं. आणि त्याविषयीं ते विशेष फिकिरही करीत नाहींत.

ही संदिग्धता एवढ्या मोठ्या चळवळींत टिकूं शकली याचें कारण हेंच कीं त्या चळवळींचें स्वरूप मुख्यत्वेंकरून धार्मिक नसून तें आर्थिक, सामाजिक आणि राजकीय आहे. ब्राम्हणेतर बहुजनसमाजावर असलेल्या ब्राम्हणी वर्चस्वाचें स्वरूप विशेषतः आर्थिक आहे. पेशवाईच्या काळीं सर्व सत्ता ब्राम्हणांच्या हातांत असल्यामुळें मोठमोठ्या नोकऱ्या व इनामें ब्राम्हणांना अगदीं सुलभतेनें मिळालीं. पेशवाई जाऊन नवीन राजवट आली तेव्हां सरकारी नोकरींत समावेश होण्याकरितां शिक्षणाची गरज असल्यामुळें तेथेंही ब्राम्हणांचीच वर्णी लागली. अशा प्रकारें बहुतेक सर्व अधिकाराच्या जागा व थोडाबहुत जमीनजुमला ब्राम्हणांच्या ताब्यांत असल्यामुळें व त्यांतच परंपरागत धार्मिक वर्चस्वाची भर पडल्यामुळें ब्राम्हणांचें वर्चस्व सर्वच शाखांत पसरलें. हें वर्चस्व खेडेगांवांतील ब्राम्हणेतर जनतेस विशेष जाणवतें आणि म्हणूनच या चळवळीचा प्रसार खेड्यापाड्यांतून विशेष जारीनें झाला. कृषिजीवी बहुजनसमाजामध्यें ती चळवळ विशेष लोकप्रिय ठरली. परंतु त्या चळवळीचीं सूत्रें जमीनदार, पाटील वगैरे वरिष्ठ वर्गानें बळकावून स्वतःच्याच हातांत राखल्यामुळें त्या चळवळीचें स्वरूप नेमस्त आणि सरकारपक्षपाती राहिलें. एतद्देशीय जमीनदारांचे हितसंबंध सरकारशीं इतके निगडीत आहेत कीं त्या वर्गाला सरकारविरोधी चळवळ करणें जवळजवळ अशक्यच आहे. अर्थातच त्या वर्गाच्या प्रतिनिधींनीं म्हणजे ब्राह्मणेतर पुढाऱ्यांनीं सरकारी नोकऱ्या मिळविण्यापलीकडे राजकीय अशी चळवळ बहुतेक केलीच नाहीं. असें असलें तरी सरकारला विरोध न करण्याचीं कारणें देतांना त्या पक्षानें बराच धूर्तपणा दर्शविला. आज ब्राह्मणांचें वर्चस्व आहे; त्यांच्या स्वराज्यप्राप्तीच्या चळवळीस मदत केली तर येणारें स्वराज्य ब्राह्मणच गिळंकृत करतील; तस्मात् कौंसिलांत जाऊन सरकारला साह्य करणें अगत्याचें आहे.—असा त्यांचा युक्तिवाद दिसतो. ब्राम्हणेतर पक्षाचीं सूत्रें जमीनदार वर्गाचे स्वाधीन आहेत याचें प्रत्यंतर आणखी एका गोष्टीनें मिळतें. ब्राह्मणेतर पक्षानें मुंबई कौंसिलांत मराठ्यांकरितां स्वतंत्र प्रतिनिधी असावे या मागणीला

विरोध केलेला नाहीं. महाराष्ट्रीय जमीनदारवर्गांत मराठा ज्ञातीचें किती प्राबल्य आहे तें ध्यानांत आणलें कीं यांतील मर्म सहज उलगडेल. ब्राह्मणेतर पुढारी या अशा जातिनिष्ठ सकुंचित दृष्टीनेंच सदोदित विचार करीत असतात, याचा आणखी एक पुरावा पाहा. कोल्हापुरचे महाराज राजाराम छत्रपति यांनीं एका मानपत्रप्रसंगीं पुढील उद्गार काढले होते, " महाराष्ट्रांत बहुसंख्याक मराठ्यांची उन्नति झाल्याखेरीज एकंदर महाराष्ट्राची उन्नति होणें शक्य नाहीं. " × जमीनदार आणि संस्थानिक यांचे अन्योन्य संबंध काय आहेत तें सर्वश्रुतच आहे.

अशा संकुचित दृष्टीनें लढलेल्या चळवळीनें बहुजनसमाजाचें हित तें कसलें होणार ? साहजिकच ब्राह्मणेतर चळवळीच्या लोकप्रियतेस लवकरच ओहोटी लागली. सात-आठ वर्षांपूर्वीचें त्या चळवळीचें स्वरूप आज कोठेंच दिसून येत नाहीं. इतकेंच नव्हे तर पुढाऱ्यांच्या संकुचित दृष्टीमुळें नाराज होऊन कित्येक तरुण कार्यकर्त्यांनीं त्यांच्याविरुद्ध बंड उभारल्यानें ब्राह्मणेतर चळवळींत आज कितीतरी पक्षोपक्ष माजलेले आढळतात. तरुण ब्राह्मणेतर वर्गाची दृष्टि अधिक व्यापक आणि अधिक उदार असल्यामुळें या चळवळीचें सत्यस्वरूप त्याच्या अधिकाधिक ध्यानांत येत आहे. आणि म्हणूनच त्याची वृत्ति आज बरीचशी राष्ट्रीय व थोडीबहुत समाजसत्तावादी बनलेली दिसते. परंतु सर्व ब्राह्मणेतर बहुजनसमाजावर छाप ठेवील अशा योग्यतेचा पुढारी या वर्गास न लाभल्यामुळें त्याचा दृष्टिकोन यावा तितका पुढें येत नाहीं. शिवाय इतउत्तर जातिभेदापेक्षां आर्थिक वर्गवारीला अधिकाधिक महत्व प्राप्त होत असल्यामुळें शुद्ध जातिनिष्ठ चळवळीला यापुढें कितपत महत्त्व उरेल तेंही संशयास्पद ठरतें. या बाबींमुळें ब्राह्मणेतर चळवळीच्या भवितव्याविषयीं निश्चित दिग्दर्शन करणें कठीण आहे. तरीपण ती उत्तरोत्तर महाराष्ट्राच्या राजकीय चळवळींतच विलीन होत जाईल अशीं चिन्हें दिसत आहेत.

८. ब्राम्हणेतरांनीं ब्राम्हणांचें वर्चस्व मानण्याचें नाकारलें तसेंच अस्पृश्यांनीं स्पृश्य समाजाचें वर्चस्व मानण्याचें नाकारलें. अस्पृश्योद्धाची चळवळ ब्राह्मणेतरवादाच्या पाउलावर पाऊल टाकून आली हें खरें असलें तरी तिची प्रगति ब्राम्हणेतर

---

× वा. कृ. भावेः **ब्राह्मणेतरवादाचें स्वरूप**. पृ. १५.

चळवळीप्रमाणें मध्येंच खुंटली नाहीं. उलट राजकीयदृष्ट्या अस्पृश्यांची गणना अल्पसंख्यांकांत झाल्यामुळें व अलीकडे महात्मा गांधींनीं आपल्या कार्याचा विशेष भर अस्पृश्योद्धारावर दिल्यामुळें त्या चळवळाला अधिकाधिक महत्त्व येत आहे. ब्राम्हणेतर चळवळ ही मनुष्याच्या मूलभूत हक्कांसाठीं असल्यामुळें अस्पृश्यांना त्या चळवळींत ध्येयरूप व घेण्यासारखें असें बरेंच सांपडलें. ब्राम्हणेतर पुढाऱ्यांनीं ब्राम्हण-वर्चस्वाविरुद्ध जो जो युक्तिवाद केला, त्याचा त्याचा अवलंब अस्पृश्यांनीं स्पृश्यांच्या वर्चस्वाविरुद्ध केला. इतकेंच नव्हे, तर आपले हक्क प्राप्त करून घेण्यासाठीं गांधीप्रणीत सत्याग्रही तत्त्वांचीही त्यांनीं कांस धरली. पुणें येथील पर्वती-सत्याग्रह किंवा नाशिक येथील काळाराम-सत्याग्रह हीं याचीं सुंदर उदाहरणें होत. परंतु अस्पृश्योद्धाराची चळवळ एवढ्यावरच थांबेल असें वाटत नाहीं. नुसत्या देवालय-प्रवेशानें आमचें समाधान थोडेंच होणार आहे ? आमची आर्थिक गुलामगिरी नष्ट व्हायला हवी—अशा अर्थाचे उद्गार कांहीं दिवसांपूर्वीं डॉ. आंबेडकरांनीं काढले होते, त्यांतील मर्म हेंच. किंवा कम्युनिस्ट पार्टीचा स्टॅलिनप्रणीत कार्यक्रम अस्पृश्यांच्या ‘जनता’ वृत्तपत्रानें अगदीं आदरपूर्वक प्रसिद्ध केला होता, त्याचाही अर्थ तसाच दिसतो.

अस्पृश्योद्धाराच्या चळवळीविषयीं स्पृश्य वर्गाला सहानुभूति वाटण्याचें एक कारण असें. समाजांतील जाचाला कंटाळून अस्पृश्य वर्गाचीं अनेक कुटुंबें परधर्मप्रवेश करीत असतात व त्यामुळें हिंदूंची लोकसंख्या घटते. सांस्कृतिक तसेंच राजकीय दृष्ट्या हें अत्यंत हानिकारक होय असें बऱ्याच हिंदुधर्माभिमान्यांना वाटलें व ते अस्पृश्योद्धाराच्या चळवळीकडे अधिक सहानुभूतीनें पाहूं लागले. हिंदुमहासभेची अस्पृश्यतानिवारक चळवळ पुष्कळांशीं याच अर्थाची आहे. हिंदुमहासभेची हिंदुधर्मसंस्कृतीकडे पाहाण्याची दृष्टि बरीच व्यापक असल्यामुळें अस्पृश्योद्धाराचा समावेश स्वतःच्या कार्यक्रमांत करणें तिला मुळींच जड गेलें नाहीं. खरोखर पाहातां हिंदुमहासभेचें धोरण बरेंच उदार आहे. परंतु हिंदूंच्या वर्चस्वाचीं सुखस्वप्नें व मुसलमानी आक्रमणाची भीति, या दुहेरी कचाटींत तिची विचारसरणी सांपडल्यामुळें तिच्या धोरणाला पुष्कळदां अगदीं संकुचित स्वरूप प्राप्त होतें. अशा स्थितींत महासभेचें कार्यक्षेत्र व सार्वजनिक महत्त्व या दोहोंचाही विकास होणें कठिण झालें तर नवल काय ? शिवाय [ महाराष्ट्रापुरतें

बोलावयाचें झाल्यास ] तिला एकही त्यागी आणि धर्मशील कार्यकर्ता न मिळाल्यामुळें अन्य प्रांतांत [ विशिष्ट मर्यादेंतच कां होईना पण ] हिंदुसभेची जी प्रगति झाली ती महाराष्ट्रांत झाली नाहीं. आणि म्हणूनच आज महाराष्ट्राच्या सार्वजनिक आयुष्यांत हिंदुमहासभेचें स्थान विशेष मानाचें नाहीं.

९. सांप्रतच्या युगाचे दोन विशेष सांगतां येतील. ( १ ) यांत्रिक सुधारणा व औद्योगिक प्रगति. ( २ ) दलितवर्गाची जागृति. पैकीं दलितवर्गाच्या प्रश्नांकडेच युद्धोत्तर महाराष्ट्राचें लक्ष विशेष गेलें. यांत्रिक सुधारणा व उद्योगधंद्यांची वाढ इकडे आपलें जावें तसें लक्ष अजून गेलेलें नाहीं. युद्धकालीन अवधींत हिंदुस्थानचे उद्योगधंदे व उत्पादनसामर्थ्य हीं वाढलीं व सरकारही या बाबतींत अधिक सहानुभूतिपर बनलें असें वर म्हटलें आहे. परंतु युद्धानंतर लवकरच मंदीचें युग अवतरलें व ब्रिटनच्या आर्थिक अनवस्थेमुळें सरकारचें धोरणही बदललें. दलितवर्गाच्या प्रश्नांकडे आपलें लक्ष विशेष जावें यांत नवल नाहीं. आपलें सबंध राष्ट्रच दलित आहे. अशा या दलित राष्ट्राचें राष्ट्रीय आंदोलन, त्यांतील मजूर, ब्राम्हणेतर, अस्पृश्य वगैरे दलितवर्गाची चळवळ, यांचें समीक्षण केल्यानंतर आणखी एका दलित वर्गाच्या हालचालींकडे लक्ष पोहोंचविणें जरूर आहे. गेल्या दहाबारा वर्षांत जगांतील एकंदर महिलावर्गाचा स्वाभिमान विशेष उत्कटत्वानें जागृत झालेला दिसतो. इजिप्त, तुर्कस्थान, चीन, जपान यांसारख्या पौर्वात्य राष्ट्रांतही स्त्रियांच्या चळवळीला महत्त्व येत आहे. याचें कारण गेलें महायुद्ध, असें म्हटलें तर एकाद्याला तो कल्पितसंबंध वाटेल. पण ही गोष्ट अगदीं सत्य आहे. महायुद्धकालीं पुरुषवर्गाचीं कामें करण्याची संधि युरोपस्थ महिलांना मिळाली; व तीं कामें यथायोग्य पार पाडून त्यांनीं स्त्रीवर्गाची त्यागबुद्धि व कार्यक्षमता जगाच्या प्रत्ययास आणली. अर्थातच पुरुषवर्गाची स्त्रियांविषयींची बुद्धि निवळावी यांत नवल काय ? स्त्रियांच्या हक्कांचा विचार अशा परिस्थितींत अधिक सहानुभूतीनें होऊं लागला व जो मतदानाचा हक्क पूर्वीं त्यांना नाना 'धिंगाणे' घालूनही मिळवितां आला नाहीं तो युद्धोत्तर कालांत सहज लीलेनें मिळाला. इतकेंच नव्हे तर पार्लमेन्टच्या सभासदत्वाचीही माळ कित्येक महिलांच्या गळ्यांत पडली.

या सर्व घडामोडींचा परिणाम हिंदुस्थानवर – महाराष्ट्रावर -- झाल्याखेरीज

कसा राहील? आपणही तशीच चळवळ करावी व तसेच हक्क मिळवावे अशी इच्छा महाराष्ट्रीय महिलांना साहजिकच झाली. शिवाय गेल्या १०–१५ वर्षांतील स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीमुळें या चळवळीस अंतःस्फूर्तीची जोड मिळाली आहे. शिकल्यासवरल्यानें स्त्रियांना आर्थिकदृष्ट्या स्वतंत्र जीवन जगणें शक्य आहे हें समजल्यावर सुशिक्षित स्त्रिया चूल व मूल यांतच गुरफटून राहण्यास नाकबूल झाल्या तर नवल नव्हे. स्त्रिया कॉलेजांत जाऊं लागल्या, स्वतंत्रपणें चरितार्थ चालवूं लागल्या तर त्यांच्या पूर्वींच्या 'आर्यमहिले'च्या आदर्श कल्पना बदलल्याशिवाय कशा राहतील? नवऱ्याखेरीज आपल्याला स्वतंत्र अस्तित्व – आपलें स्वतःचें असें व्यक्तित्व–आहे अशा जाणिवेनें सुशिक्षित स्त्री पतीशीं बरोबरीनें वागण्याचा हट्ट धरणारच. आणि इतकी प्रगति झाल्यावर स्त्रियांची चळवळ पूर्वींप्रमाणें प्रौढविवाह, पुनर्विवाह, मिश्रविवाह यांच्या कक्षेंत न राहातां घटस्फोटासारखे स्फोटकारक प्रश्नांचाही विचार करूं लागणारच.

महाराष्ट्रांत गेल्या १०–१५ वर्षांत स्त्री-शिक्षणाची प्रगति फार झपाट्यानें होत आहे. मुंबई इलाख्यांत कॉलेजकुमारिकांची संख्या १९२२–३३ च्या कालांत चौपटीनें वाढली, यावरून या प्रगतीची कल्पना येईल. डॉक्टर, नर्स, शिक्षकीण या नात्यानें दक्षिणी स्त्रिया आज बरींच वर्षें वावरत आहेत. पण अलीकडे वकील, पत्रपंडिता, संपादिका, लेखिका, कृषिविशारदा, स्थापत्यविशारदा याही नात्यानें इकडील स्त्रिया 'मिरवतात.' या सुशिक्षित महिलांची स्वहक्कांबद्दलची दृष्टि बदलल्याखेरीज कशी राहील? तसेंच समाजांतील स्त्रियांच्या स्थानाविषयींच्या प्रचलित कल्पना त्यांना कशा पटतील? आधुनिक सुशिक्षित स्त्रियांची ही बदललेली दृष्टि त्यांच्या वाङ्मयांत आणि महिला परिषदांच्या ठरावांत हरघडीं व्यक्त होते. "सजीव स्त्रियांना निर्जीव बघण्यांतच कांहींना–नव्हे पुष्कळांनाच–आनंद आहे. 'गृहिणी गृहमुच्यते' म्हणावयाचें, पण गृह निश्चेतन. गृहिणीहि मेढखांबासारखीच निश्चेतन. 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः' हें वचन किती गोड आहे! पण वस्तुस्थिति पहातां अशी दिसते कीं नारी ह्या पूज्याकार आहेत. नुसत्या पूजा करण्याला योग्य आहेत. त्यांची देव्हाऱ्यांत स्थापना करावयाची, मग दगडाच्या देवता व या देवता

बसतील खेळत. ही स्थिति निश्चित उद्वेगजनक आहे.''× ही स्थिति बदलण्याची सुशिक्षित स्त्रियांची कल्पना त्यांच्या स्वाभिमानास साजेशीच आहे. "स्त्रियांची देवता म्हणून स्थापना व्हावयास नको आहे. त्यांची मानुषी म्हणून स्थापना व्हावयास पाहिजे आहे. त्यांच्याबद्दल गाइलेलीं गोड गाणीं आंत जहरी आहेत." * तसेंच, "आतां पाश्चात्य राष्ट्रांशीं टक्कर द्यावयाची आहे. .... रूढीच्या शृंखला तोडून स्त्रीपुरुषांपैकीं प्रत्येकाला आर्थिक, सामाजिक, शैक्षणिक साधनांचा पूर्ण उपयोग करण्यास अवसर मिळाला पाहिजे. प्रगमनशील मन, विधायक कार्य आणि कर्त्या स्त्रिया पाहिजे आहेत. म्हणजे प्रत्येक समाजघटकाला आत्मज्ञान होऊन आपोआपच नवें युग निर्माण होईल."† सुशिक्षित स्त्रियांचे विचार आज कोणत्या दिशेनें वहात आहेत याची कल्पना यावरून येईल. स्त्रीवर्गाच्या हक्कांची अंमलबजावणी होण्यासाठीं आज कैक स्त्रिया धडपडत आहेत. त्याकरितां संततिनियमन, रजिस्टर विवाहपद्धति, घटस्फोट यांसारखे मार्ग त्या सुचवीत असतात व तशा अर्थाचे ठराव महिला परिषदांतर्फे पास करून घेत असतात.

हिंदराष्ट्राच्या राजकीय ध्येयानें गेल्या कांहीं वर्षांत 'डोमिनियन स्टेटस्' पासून 'संपूर्ण स्वातंत्र्या'पर्यंत प्रगति केली. महाराष्ट्रीय स्त्रियांची चळवळही अशीच प्रगमनशील दिसते. महाराष्ट्राच्या आधुनिक सुशिक्षित स्त्रिया नुसत्या 'डोमेस्टिक स्टेटस' वर समाधान मानून घ्यावयास तयार नाहींत. घरांत व बाहेर – दोन्ही ठिकाणीं त्यांना पुरुषाबरोबरीनें वागण्यास हवें आहे. व ही समता मिळविण्यास आपण पात्र आहोंत असें दर्शविण्याची त्यांची धडपड पाहिली म्हणजे साभिमान कौतुक वाटतें. गेल्या राष्ट्रीय आंदोलनांतील स्त्रियांची कर्तबगारी अभिमानास्पद नव्हे काय? त्या वेळीं त्यांनीं जो स्वार्थत्याग केला, मातृभूमीच्या पुनरुद्धारासाठीं जे क्लेश सहन केले त्यांची नुसती कल्पना केली तरी आपल्या महिला आतां अबला राहिल्या नाहींत; त्या आतां बलशाली झाल्या आहेत, याची उत्तम प्रचीति येईल. स्त्रीवर्गाची

× खरे व केळकर: **स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा** पृ० ३

* **कित्ता.**

† **कित्ता.** पृ० ४

घटस्फोटाची चळवळ त्यांच्या या आत्मविश्वासाची व स्वाभिमानाचीच द्योतक होय. "हिंदु लग्न एकदां झालें कीं तें वज्रलेप होतें. फसवणूक, लांचलुचपत, सगोत्रता, विजातीयत्व, कपट इत्यादि काय वाटेल तें घडलेलें असो, एकदां लग्नगांठ बसली कीं, ती ब्रह्मदेवालाही उकलत नाहीं! नवरा वेडा, बहिरा, आंधळा, रक्तपितीसारख्या घोर व्याधीनें जर्जर झालेला असला किंबहुना तो क्लीब असला तरी देखील लग्न तें लग्न! तें कधींच रद्द होणार नाहीं! धर्मांतर व जातिभ्रष्टता यानें तरी स्त्रीची सुटका व्हावी!... कारण प्रसंग कसाहि असो, घटस्फोटाचा फट शब्द ती उच्चारील तर ब्रह्महत्या होईल!" × या ब्रह्महत्येचा बागुलबुवा इतउत्तर सुशिक्षित स्त्रियांना भेडसावूं शकणार नाहीं. हिंदु कायद्यानें स्त्रियांची किती दुर्दशा होत असते याची जाणीव आज त्यांना झाली आहे. विवाहविच्छेदाचे किंवा बालजरठविवाहप्रतिबंधाचे कायदे व्हावे म्हणून कित्येक स्वाभिमानी स्त्रिया जारीनें खटपट करीत असतात याचें कारण हेंच. पण नुसती शाब्दिक चळवळ करूनच त्या स्त्रिया थांबतात असें नाहीं. त्याबरहुकूम वागण्याची त्यांची तयारी असते असें बडोदें संस्थानांतील घटस्फोटाच्या कायद्याचा फायदा घेऊन एक महाराष्ट्रीय महिलेनें लग्नविच्छेद मिळविला यावरून सिद्ध होतें. स्त्रियांच्या या जागृतीचे परिणाम दूरवर पोहोंचल्याशिवाय कसे राहातील?

१०. युद्धोत्तर महाराष्ट्रांत समाजाचें हृदय हलवून सोडणारी परिस्थिति व विचार कसे निर्माण झाले याचें दिग्दर्शन येथपर्यंत केलें. राजकीय, आर्थिक, सामाजिक–मानवी जीवनाच्या सर्वच शाखांत क्रांति घडवून आणण्यासाठीं मोठमोठ्या चळवळी महाराष्ट्रांत झाल्या आणि जरी त्या अयशस्वी ठरल्या असल्या तरी त्यांमुळें व त्यांना मूलभूत अशा विचारसरणीमुळें लोकांच्या आचारविचारांत महत्त्वाचे फरक पडले यांत संशय नाहीं. या सर्वच चळवळी प्रत्यक्षाप्रत्यक्षपणें महायुद्धानें ओढविलेल्या संक्रमणाचींच फळें होत. युरोपिअन महायुद्धानें राष्ट्रांच्या आयुष्यांत–म्हणजेच लोकांच्या वागणुकींत व दृष्टिकोनांत दोनतीन पिढ्यांचा बदल घडवून आणला असें या प्रकरणाच्या सुरवातीस म्हटलें त्यांची प्रचीति वाचकांस एवढ्या विवेचनावरून आलीच असेल. हें स्थित्यंतर नुसतें

× खरे व केळकरः **स्त्रियांच्या हक्कांची सुधारणा.** पृ. ३२

वरवरचें नाहीं. त्याचें स्वरूप बरेंच मूलगामी आणि व्यापक आहे. महाराष्ट्राच्या राजकारणांत टिळकपक्षाचें स्थान एकदम खालीं गेलें तें पुनरपि वर येईल—म्हणजे तो पक्ष आपल्या प्रचलित विचार-सरणीच्या जोरावर पुनः पूर्वींइतका मान्यतेस चढेल असें वाटत नाहीं. हिंदुसमाजांतील जातिभेदाचें व ब्राह्मणी वर्चस्वाचें पूर्वींचें बंड आज बरेंच मावळलें असून ज्या मागासलेल्या खेड्यापाड्यांतून तें तग धरून आहे तेथेंही त्यास झपाट्यानें मूठमाती मिळत असल्याचें दिसतें. मजुरांच्या प्रश्नानें तर राष्ट्राच्या सार्वजनिक जीवनांत कमालीचें महत्त्व मिळविलें आहे. इतकेंच नव्हे, तर त्याला लौकरच राजकीय स्वरूप प्राप्त होईल असें वाटतें. आणि या कारणानें नोकरशाही व भांडवलवाले या दोन्ही वर्गांना सुखाची झोंप घेणें अशक्य झालें आहे. ब्राह्मणेतर चळवळ जी अद्यापपर्यंत ब्राह्मणजातीविरुद्धच मोहीम करतांना आढळे तिला यापुढें आर्थिक वळण लागून तिचा मोर्चा जमीनदार वर्गाकडे वळतो कीं काय अशी साधार भीति त्या वर्गाला आजकाल वाटत असते. आणि ही भीति खरी ठरली तर आज एकमेकांना पाण्यांत पाहाणारे ब्राह्मण व ब्राह्मणेतर जमीनदार ( आणि सरदार ) उद्यां गळ्यांत गळा घालून शेतकरी-वर्गाचा नक्षा उतरविण्याचे कानमंत्र करूं लागतील. स्त्रियांच्या चळवळींचें महत्त्व तर फारच थोर आहे. स्त्री जशी गृहिणी तशीच ती माताहि असते. तिचे विचार बदलले तर राष्ट्राच्या अर्ध्याच नव्हे तर तीनचतुर्थांश विभागाच्या आचार-विचारांत फेर होण्याचा संभव असतो. इतकेंच नव्हे तर स्त्रियांचे प्रश्न विवाहादि नाजूक बाबींशीं निगडित असल्यानें समाजाच्या नैतिक विचारसरणीला सहज धक्का देऊं शकतात. महाराष्ट्राच्या गेल्या पंधरा-सोळा वर्षांच्या इतिहासाला संक्रमणावस्था असें यथार्थ नामाभिधान देतां येतें हें यावरून वाच-कांच्या ध्यानांत येईलच.

११. युद्धोत्तर कालांत महाराष्ट्राची विचारसरणी ही अशी बदलली. ही बदललेली विचारसरणी पुढें मांडण्याचें कार्य मध्यमवर्गीय सुशिक्षित तरुण करीत असतात. हें कार्य पार पाडण्यास हेच तरुण सर्वस्वीं लायक आहेत. ज्या वेतनदार (salaried) वर्गांतून ते येतात त्या वर्गास भांडवलाचा पाठिंबा नसल्यामुळें किंवा त्या वर्गाच्या जीवनास भांडवलाचें अधिष्ठान नसल्यामुळें

आर्थिकदृष्ट्या तो वर्ग कामगारवर्गाहून निराळा नाहीं. कामगारवर्ग मुख्यत्वेंकरून शरीरानें राबतो तर हा मेंदूनें राबतो – एवढाच या दोन वर्गांतील फरक. आणि म्हणूनच ह्या वर्गाला ( वरच्या मूठभर वरिष्ठ अंमलदारांचा सुखी वर्ग सोडून ) कामकरी वर्गाच्या आर्थिक – म्हणजे समता स्थापना करण्याच्या – ध्येयाशीं समरस होणें शक्य आहे. किंबहुना कामगार चळवळीचें नेतृत्व पुष्कळदां याच वर्गांतील व्यक्तींनीं स्वीकारलेलें आढळून येतें. अर्थात् समाजाच्या आर्थिक भवितव्याविषयीं निःसंकोचपणें विचार करण्याची धडाडी या वर्गाच्या अंगीं असते. इतकेंच नव्हे, तर आर्थिक स्थित्यंतरानें ओढविणाऱ्या राजकीय व सांस्कृतिक सुधारणा स्वीकारण्याची तयारीही हा वर्ग दाखवूं शकतो. प्रचलित शिक्षणपद्धतीमुळें ( कारण, ती बऱ्याच अंशानें वरिष्ठ वर्गाच्या तंत्रानुसारें चालते ) कित्येक अज्ञानमूलक व अनिष्ट कल्पनांचा प्रादुर्भाव त्याच्या ठिकाणीं होतो हें खरें. पण शिक्षणानें त्याची बुद्धि विकास पावत असल्यामुळें कोणतीहि बुद्धिनिष्ठ विचारसरणी कालांतरानें तरी त्याला पटते. अनेक धर्मभोळ्या कल्पना हा वर्ग उराशीं बाळगतांना दिसला तरी ज्ञानाच्या किरणांनीं त्या कल्पना वितळूं द्यावयाची धमक त्या वर्गांतील विचारी व्यक्ती सहज दर्शवितात. या व्यक्ती प्रायः बुद्धिवादी—त्यांपैकीं कित्येक तर अगदीं बुद्धिप्रामाण्यवादी–असल्यामुळें समाजाचें वैचारिक नेतृत्व बहुधा या वर्गाकडे जातें.

या बुद्धिप्रामाण्यवादी तरुणांची विचारसरणी वर्गाधिष्ठित नसल्यामुळें तिच्या व्यापकतेला विशिष्ट वर्गाच्या अशा संकुचित दृष्टीची मुरड पडत नाहीं. ती बरीच प्रगल्भ व समतोल असूं शकते. शास्त्रीय विज्ञानानें जें ठरेल व बुद्धीला जें पटेल तें ग्रहण करण्याची तयारी ते दर्शवितात. एकाद्या विशिष्ट जनसमूहाचें किंवा वर्गाचें संकुचित धोरण त्यांची विचारपरंपरा अडवूं शकत नाहीं. आणि म्हणूनच त्यांच्या विचारसरणीला शास्त्रीय स्वरूप येण्याचा बराच संभव असतो. आजचें कामगारवर्गाचें समाजसत्तावादी तत्त्वज्ञान हें विधान अधिक स्पष्ट करील. कार्लमार्क्स आणि लेनिन यांच्या विचारांपलीकडे जाण्याची तयारी साम्यवादी पुढारी सहसा दर्शवित नाहींत. मार्क्स-लेनिनच्या विशिष्ट तत्त्वांच्या चष्म्यांतूनच ते जगाकडे पहात असतात. समाजसत्तावाद्यांच्या सदोष दृष्टीमुळेंच त्यांचे अनेक सिद्धान्त अगदीं एकांगी व संकुचित झाले आहेत. मध्यमवर्गीय विचारी

तरुणांना स्वतःची विचारसरणी अशी संकुचित राखण्याचें कांहीं कारण नाहीं. वैज्ञानिक प्रगतीनें जें सिद्ध होईल त्याचा स्वीकार करण्याची त्यांची तयारी असते.

१२. या बदललेल्या नवमतवादी विचारसरणीची तात्त्विक भूमिका आतां पाहिली पाहिजे. मनुष्यसमाजाची उभारणी शास्त्रशुद्ध व तर्कशुद्ध पायावर करणें हें नवमतवादाचें प्रमुख सूत्र होय. त्या करितां मनुष्यस्वभावाचें अचूक ज्ञान असणें अवश्य ठरतें. अलीकडील वैज्ञानिक–विशेषतः मानसशास्त्रीय–प्रगतीमुळें हें ज्ञान प्राप्त करून घेणें पूर्वीपेक्षां अधिक सुलभ झालें आहे. अन्नक्षुधा आणि कामक्षुधा या प्राणीमात्राच्या दोन अत्यंत प्रबल क्षुधा असल्याचें प्राणीशास्त्र सांगतें. इतर सर्व प्रेरणा किंवा सहजप्रवृत्ती याच मूलभूत प्रवृत्तींचीं अंगें उपांगें आहेत. जीवरक्षण आणि सातत्यरक्षण या दोन ध्येयांसाठींच प्राणीमात्र मुख्यत्वें-करून धडपडत असतो. मनुष्यप्राण्याचीं सांस्कृतिक वगैरे इतर अनेक ध्येयें आहेत हें खरें. पण हीं दोन मूलभूत ध्येयें धुडकावून इतर सांस्कृतिक ध्येयांची परिपूर्ति करूं पाहाणें व्यर्थ आहे. आणि म्हणूनच उपरिनिर्दिष्ट नैसर्गिक प्रेरणांची भूक शमण्यास योग्य अवकाश मिळावयास हवा. त्या प्रेरणांचा कोंडमारा करून अनैसर्गिक अशीं सामाजिक ध्येयें साधूं पाहाणें योग्य नाहीं. कारण त्यांचा कोंडमारा केल्यानें तीं मरत नाहींत. या दोन क्षुधा इतक्या प्रबल व जीवनाला इतक्या मूलभूत आहेत कीं जोंवर शरीर जीवंत आहे तोंवर त्याही जीवंत असतात. त्यांची तृप्ति न झाल्यानें त्या नाश पावतात असें नव्हे, तर त्या तशाच दबा धरून बसतात व संधि सांपडेल तेव्हां विकृत स्वरूपांत व्यक्त होतात. या प्रवृत्तींत मूलतः वाईट असें कांहींच नाहीं. जीवन जितकें नैसर्गिक आहेत तित-क्याच त्याही आहेत. पण त्यांना–विशेषतः कामप्रवृत्तीला—आज कैक वर्षें अनिष्ट मानलें जातें. आणि म्हणूनच त्यांना शक्य तों नियंत्रणांत ठेवून समाज-नीति ठरविण्याचे प्रयत्न आजवर झाले. परंतु अलीकडे त्यांचा विचार अधिक तर्कशुद्ध दृष्टीनें होत असून मनुष्याच्या या मूलभूत प्रेरणांचा विचार आज विशेष सहानुभूतीनें केला जातो. कामप्रेरणेच्या कोंडमाऱ्यानें जे घोटाळे उद्भवतात त्यांचा अभ्यास डॉ. फ्राईड व त्यांचे अनुयायी यांनीं विशेष आस्थेनें केला आहे; तर अन्नक्षुधा मारल्यानें जी अनवस्था ओढवते त्याचें विश्लेषण मार्क्स व त्याचे अनु-यायी यांनीं केलें आहे. या कारणानेंच फ्रॉइड व मार्क्स या दोन शास्त्रज्ञांना आज

विशेष मानलें जातें. पण नुसतें विश्लेषण करूनच हे शास्त्रज्ञ थांबलेले नाहींत. या मूलभूत प्रवृत्तींच्या प्रतिरोधानें उद्भवणाऱ्या दुःस्थितीवर आपापल्या विशिष्ट पद्धतीनें उपाययोजनाही त्यांनीं सुचविली आहे. कामवासना दाबली तर अनेक लैंगिक व मानसिक विकृती उत्पन्न होतात असें सिद्ध करून डॉक्टर फ्रॉइड त्यांतून मुक्त होण्याची उपायपद्धति सांगतात. अन्नक्षुधा दाबली तर समाजांत असंतोष माजून गुन्हेगारी प्रवृत्ति बळावते असें मार्क्सनें सिद्ध करून त्यावर उपाय म्हणून समाजसत्तावादाचा पुरस्कार तो करतो. आजचा नवमतवादी तरुण या दोन्ही शास्त्रज्ञांच्या विचारांची उपयुक्तता जाणतात व त्यांतील ग्राह्यांश स्वीकारतात. महाराष्ट्राची नवीन विचारसरणी किंवा नवमतवाद विशेषेंकरून या दोन शास्त्रज्ञांच्या भूमिकांवरून विचार करीत असतो. कार्ल मार्क्स आणि डॉक्टर फ्रॉइड यांच्या विचारांची सांगड घालून जगाकडे पाहाण्याची नवमतवाद्यांची दृष्टि आहे. त्या दृष्टीनेंच ते सुधारणांचा मार्ग ठरवूं इच्छितात. अर्थात् नवमतवादी हा मार्क्स अगर फ्रॉइड यांपैकीं कोणाही एकाचाच अनुयायी नसतो. दोघांच्याही तत्त्वांचें व दुसऱ्या कोणत्याही तर्कशुद्ध तत्त्वाचें संमिश्रण करून जें तत्त्वज्ञान तयार होईल त्याचा स्वीकार तो करील.

१३. नवमतवादी विचारसरणीला सुधारणेचा कोणता कार्यक्रम पटतो त्याचें दिग्दर्शन करून हें प्रकरण आटोपतें घ्यावें. नवमतवादी मार्क्सच्या आर्थिक समतेच्या ध्येयाला मान्यता देतो. सर्व उत्पादनसाधनें समाईक मालकीचीं करून खाजगी जिंदगीची सांप्रतची व्यवस्था संपुष्टांत आणणें हें समतावादाचें ध्येय आहे. याचा अर्थ प्रत्येक लहानसहान ( कोट, टोपी, छत्री सारखी ) वस्तु समाजाच्या मालकीची करणें असें नव्हे. आर्थिक पिळणुकीला मूठमाती देणें एवढें समतावादाचें ध्येय. तें साध्य होण्यास उत्पादनसाधनें सार्वत्रिक मालकीचीं झालीं म्हणजे पुरे. आर्थिक पिळणूक थांबविल्यावर राजकीय पिळणूक नष्ट करणें हें ओघानेंच आलें. अर्थात् लोकसत्तेची ( खऱ्या आणि अर्थपूर्ण लोकसत्तेची; सांप्रतच्या लटक्या लोकसत्तेची नव्हे ) स्थापना करणें हें नवमतवादाचें राजकीय ध्येय बनतें. निरनिराळ्या राष्ट्रांतील आर्थिक व राजकीय विषमता नष्ट केल्यावर एका राष्ट्राची हुकमत दुसऱ्या राष्ट्रावर चालू ठेवणें हें अर्थातच विसंगत. म्हणून नवमतवादी सर्व राष्ट्रांना सारखें स्वातंत्र्य देऊं इच्छितो आणि तत्सिद्ध्यर्थ जागतिक राष्ट्रसंघाच्या योजनेचा पुरस्कार करतो. सध्यां अस्तित्वांत

असलेल्या राष्ट्रसंघाला मात्र त्याचा कसून विरोध आहे. मागासलेल्या राष्ट्रांची पिळणूक कायम राखण्यासाठींच त्याची धडपड असते असें तो स्पष्टच म्हणतो. निदान सांप्रतच्या अन्यायी आंतरराष्ट्रीय संबंधांचें विसर्जन करून सर्व राष्ट्रांना समान योग्यता प्राप्त करून देण्यास सध्यांचा राष्ट्रसंघ अगदीं असमर्थ आहे असें त्याला वाटतें.

आर्थिक समतेची स्थापना करून सर्व संपत्ति राष्ट्राच्या मालकीची केल्यावर कुटुंबसंस्थेची आवश्यकता कितपत उरते हा प्रश्न आहे. खाजगी मालमत्तेची विल्हेवाट लावण्यासाठीं मुख्यत्वेंकरून कुटुंबसंस्था अस्तित्वांत आली. ती खाजगी मालमत्ताच नष्ट झाल्यावर कुटुंबसंस्थेचें प्रयोजन तें काय ? कुटुंबसंस्थेचा नाश केल्यानें आईबापांच्या प्रेमस्निग्ध संगोपनाला लहान मुलें मुकतील हें खरें, पण त्याची भरपाई सरकारतर्फे बालसंगोपनाची नवी शास्त्रीय योजना करून होईल. आईबापांची व मुलांची पूर्ण फारकत करावयाचें टाळूनही कुटुंबसंस्थेचा हा फायदा थोडाबहुत टिकवितां येणें शक्य आहे. लहान मुलांचें संगोपन मातापित्यांनांच कांहीं शर्तींवर करावयास सांगितलें म्हणजे झालें.

सांप्रतच्या नैतिक संकेतांमुळें मनुष्याच्या लैंगिक भावना दाबल्या जातात व त्यामुळें नाना प्रकारच्या लैंगिक व मानसिक विकृती उद्भवतात. त्या दूर करण्यासाठीं प्रचलित वैवाहिक नीतीचा कर्मठपणा थोडा सैल करावा असें फ्रॉइड्ड व त्यांचे अनुयायी यांना वाटतें. आणि सध्यां अस्तित्वांत असलेली पितृसत्ताक कुटुंबपद्धति मोडली तर हें आपोआपच घडून येईल. वस्तुतः आजच्या भांडवलशाहीच्या कालांत विवाहसंस्थेच्या पावित्र्याचा कामगारवर्गांत बराच लोप झाला आहे. आर्थिक अनवस्थेमुळें कामगारांना विवाहसंस्थेचें पावित्र्य टिकविणें अशक्य होतें. आजच्या आर्थिक हलाखीमुळेंही विवाह संस्थेचा नैतिक पाया हादरून जात आहे. तरुण वयांत नैसर्गिक भावना विशेष जोमानें उफाळून येतात, तेव्हां विवाहित होणें अशक्य झाल्यामुळें त्याच वेळीं कित्येक तरुण लैंगिक नीतीचीं बंधनें झुगारून देत असतात. त्यांना परंपरागत नीतीच्या कचाटींत धरून त्यांच्या जीवाची रस्सीखेंच करण्यांत काय अर्थ आहे ? असा नवमतवाद्यांचा सवाल असतो. पण याचा अर्थ नवमतवाद्याला स्वैराचार आवडतो असें नव्हे. मनुष्यप्राणी हा निसर्गतः बहुपत्नीवादी आहे कीं एक-

पत्नीवादी हा प्रश्न अनिश्चित म्हणून दूर टाकला तरी त्याला स्त्रीपुरुषसंबंधांत कांहीं नियमन आवडतें, एवढेंच निश्चित. लैंगिक संबंध जोडतांना दरेक स्त्रीपुरुषाला स्वतंत्रता दिली कीं समाजाला पोषक असें नियमन तो आपण होऊन पाळील यांत संशय नाहीं. पण यासाठीं प्रत्येक मनुष्यमात्रानें परंपरागत रूढीनिर्मित नियंत्रण स्वीकारावयास हवें असें नाहीं.

धार्मिक बाबतींतहि नवमतवाद्याची विचारसरणी अशीच चिकित्सक आहे. धार्मिक प्रश्नांना दोन बाजू असतात. एक धार्मिक आचारविचारांची व दुसरी ईश्वरविषयक तत्त्वज्ञानाची. नवमतवादाची दृष्टि सर्वस्वी तर्कशुद्ध असल्यामुळें ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं तो संदेहवादाची कांस धरतो. ईश्वर आहे अथवा नाहीं?— याबाबत निश्चित असा अभिप्राय विज्ञानशास्त्रानें (बुद्धिप्रामाण्यानें) अद्याप दिलेला नसल्यामुळें त्याविषयीं मुग्धता स्वीकारणें नवमतवाद्याला भागच पडतें. परंतु धार्मिक आचारविचारांत नवमतवाद्याची भूमिका पूर्णपणें निरीश्वर-वादी असते. ईश्वर असो किंवा नसो; आयुष्याचा मार्ग काटतांना त्याची कांहींच गरज भासत नाहीं एवढें निश्चित. अर्थातच त्याचें अस्तिव गृहीत धरून व्यवहार करणें मूर्खपणाचें ठरतें. पण व्यावहारिक धर्माच्या बाबतींत नवमतवादी उदासीन राहात नाहीं. आचारविषयक धर्मप्रणीत कल्पनांचा उपयोग समाजाची प्रचलित व अन्यायकारक परिस्थिति कायम टिकविण्यासाठींच आजपर्यंत वारंवार झाला आहे, एवढें त्याला इतिहासाच्या ज्ञानावरून कळतें. स्वर्ग, नरक, पाप, पुण्य, पातिव्रत्य वगैरे कल्पनांचा उपयोग दलित वर्गानें प्राप्त परिस्थितींतच समा-धान मानून राहावें एतदर्थ सत्ताधारी वर्ग करीत असतो. थोडक्यांत म्हणजे व्यावहारिक धर्म हा अफूच्या गोळीप्रमाणें आहे. दलितवर्गाला गुंगी आणण्या-साठींच त्याचा उपयोग. शिवपूर्व कालांत अशा धर्माचे परिणाम काय झाले हें आपण पाहिलेंच. पेशवाईच्या अखेरीस मराठ्यांची ध्येयनिष्ठा मावळली त्याच-बरोबर धर्माचें बंड वाढलें याचेंही दिग्दर्शन मागें केलें. बहुजनसमाजाला अशा प्रकारें दुबळा, निःसत्त्व, ध्येयशून्य व लाचार करणाऱ्या धर्माचरणाला विरोध करणें हें प्रत्येक नवमतवादी व्यक्तीचें कर्तव्यच ठरत नाहीं का?

१४. ही विचारसरणी इतक्या स्पष्ट व तर्कशुद्ध स्वरूपांत पुढें येतांना क्वचितच आढळते. आणि ती तशी पुढें न येण्याचीं कारणें उघड आहेत.

नवमतवाद्यांच्या तत्त्वानुरोधानें ठरलेली समाजावस्था इतक्यांत अस्तित्वांत येणें शक्य नाहीं. मग त्याबद्दलचीं नुसतीं सुखस्वप्नें रंगविण्यांत काय फायदा? अशा विचारानें नवमतवादी कांहीं तडजोडीच्या सुधारणा सुचवितात. सहविवाहा-(companionate marriage) ची कल्पना या अशाच तडजोडीच्या कार्यक्रमापैकीं होय. विवाहसंस्थेचा विच्छेद आतांच करणें अशक्य आहे. पण तरुण स्त्रीपुरुषांस आर्थिक वगैरे अडचणीमुळें विवाहित होणें व कुटुंबपोषणाची जबाबदारी स्वीकारणें जड जातें. त्यांच्या नैसर्गिक वासना तृप्तीसाठीं तळमळत असतातच. त्यांचा कोंडमारा झाल्यानें अनेक विकृती निर्माण होण्याचा संभव असतो. हा प्रसंग टळावा म्हणून कित्येक विचारवंत सहविवाहासारख्या तात्पुरत्या विवाहाचे मार्ग सुचवितात. अशा विवाहांत संततिप्रतिबंधक उपायांचा अवलंब करणें अपरिहार्य आहे. कारण या विवाहांतून संततीचा उद्भव झाला तर त्या विवाहाला कायमचें स्वरूप आपाततःच प्राप्त होतें. संततिनियमनाची चळवळ नवमतवादी करतात ती मात्र या एवढ्याच अर्थानें नव्हे. आर्थिक हलाखीमुळें संततीची अमर्याद वाढ होऊं देणें अशक्य झालें आहे. संततीचें नियमन करण्यासाठीं ब्रह्मचर्याचा मार्ग कित्येक धर्मनिष्ठ लोक सुचवितात. परंतु त्यामुळें साहजिक भावनांची कुचंबणा होत असल्यामुळें तो मार्ग नवमतवाद्यांना संमत नाहीं. अर्थातच संततिनियमनाच्या कृत्रिम उपकरणांचा पुरस्कार ते करतात.

सध्यां महाराष्ट्रांत बुवाबाजीविरुद्ध जी मोहीम दृष्टीस पडते, ती अशीच तडजोडीच्या स्वरूपाची आहे. वास्तविक, बुवाबाजी हें व्यावहारिक धर्मकारणाचें एक अत्यंत कटु असें पण स्वाभाविक फळ आहे. बुवाबाजीला मूठमाती देणें असेल तर व्यवहारधर्माचें निर्मूलन करण्यास तयार व्हायला हवें. पण 'बुवा-शाही विध्वंसक संघाचे' कार्यकर्ते अशी विचारसरणी फैलावतांना क्वचितच आढळतात. 'धर्म ही अफूची गोळी होय' हें मत पूर्णपणें प्रस्थापित झाल्या-खेरीज बुवाबाजीचा कायमचा अस्त होणें कठिण आहे. पण सध्यांच्या समाजांत या व्यावहारिक धर्माचा समूळ लोप होणें शक्य आहे का? धार्मिक मनोवृत्ति हें दुबळ्या जीवाचें लक्षण आहे. ज्या समाजांत शेंकडा नव्वद लोक दुबळें जीवन कंठीत असतात त्या समाजांत धार्मिक बुद्धीचा लोप व्हावा कसा?

नवमतवाद्यांची दृष्टि मुख्यत्वेंकरून वाङ्मयाच्या द्वारें प्रकट होत असते.

याचें प्रत्यंतर प्रथम 'बंधनाच्या पलीकडे' या कादंबरीनें आणलें. या पुस्तकानें नवमतवादाच्या अस्तित्वाची जाणीव महाराष्ट्रीय जनतेस करून दिली. 'समाज-स्वास्थ्य' मासिक निघून संततिनियमनाची व वैवाहिक नीतीची चर्चा उघडपणें होऊं लागली, हेंही बदललेल्या दृष्टीचेंच द्योतक होय. 'ओलेती'चें चित्र एका सन्मान्य व शिष्ट मासिकानें प्रसिद्ध केल्याबद्दल कित्येक पुराणमतवाद्यांच्या हळव्या मनाला धक्का बसला व त्यामुळें जो वाद उत्पन्न झाला त्यावेळीं कलेनें नीतीची बटीक होतां नये, अशी कलास्वातंत्र्याची तरफदारी करण्यासाठीं कांहीं सुशिक्षित पदवीवर स्त्रिया पुढें सरसावल्या. आणि गतवर्षीं तर एका अनामिकेनें× नीतीच्या हिंदोळ्याला जोराचा झोंका देऊन व्यभिचाराचाही पुरस्कार केला. 'बंधनाच्या पलीकडे,' 'अटकेपार' 'सीमोल्लंघन' हीं आजच्या मराठी वाङ्मयाचीं विसाव्याचीं स्थानें आहेत.

पण हा विसावा सुखानें घेतां येतो असें मात्र नाहीं. जुना पुराणमतवादी समाज नवनीतिवादाशीं सामना द्यावयास पूर्वीप्रमाणें आजही सज्ज आहे. सध्यां महाराष्ट्रांत चाललेला नवमतवाद जुन्या-नव्याचाच झगडा दर्शवितो. नीतीच्या कल्पना हरघडीं बदलत आहेत, त्या एकाच ठशाच्या केव्हांही नव्हत्या, हें सत्य दृष्टिआड केल्यानें कित्येकांना आज समाजाचें नैतिक अधःपतन होणार असें वाटतें. वस्तुस्थितीकडे स्वच्छ नजरेनें न पाहातां परंपरेच्या धुरकट चष्म्यांतून पाहिलें म्हणजे विकृत दृश्येंच नजरेस पडावयाचीं. पण हा वाद राष्ट्राच्या जीवंतपणाचीच साक्ष देईल. नव्याजुन्यामध्यें झगडा झाल्याखेरीज प्रगतीचा मार्ग खुला होत नसतो. त्याशिवाय त्याला निश्चित स्वरूपही प्राप्त होत नसतें. म्हणून सांप्रतचा नवमतवाद महाराष्ट्राच्या प्रगतीचाच द्योतक ठरतो.

---

× अर्थात ही लेखिका अगदींच 'अनामिका' नाहीं. कारण, 'विभावरी शिरूरकर' या टोपण नांवानें ती लिहिते.

# १७ धार्मिक विचार

## १ उपासना मार्ग

१ मिशनऱ्यांच्या कार्यास प्रारंभ
२ ख्रिस्ती हल्ल्यांचा प्रतिकार
३ प्रगतिपर अंधानुकरण
४ परमहंस सभा
५ अनुकूल वातावरण
६ प्रार्थनासमाज
७ **Hindoo Protestantism**
८ कार्यांचा आढावा

१. इंग्रजांचें राज्य इकडे सुरू होतांच ख्रिस्तधर्मीय मिशनऱ्यांच्या संचारास मोकळीक झाली खरी, पण सत्ता हातीं येण्यापूर्वीं आकाशांतील बापाच्या लाडक्या पुत्राचे हे अंध भक्त 'येशू'चा संदेश इकडील मूर्तिपूजकांस सांगण्यासाठीं आले. गोमंतकांत सोळाव्या शतकापासून (इ. स. १५४१ पासून) ख्रिस्ताचे अनुयायी वाढविण्याचा पोर्तुगिझांचा पद्धतशीर राज-प्रयत्न चालू होता, तसा मुंबई इलाख्यांत महाराष्ट्रांत--एकोणिसाव्या शतकाचे आरंभापर्यंत नव्हता. मि० टेलर नामक ख्रिस्ती मिशनऱ्यानें मुंबईंत प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु ईस्ट इंडिया कंपनीच्या डायरेक्टर्सचा स्पष्ट हुकूम मिशनऱ्यांना मुंबईंत राहूं न देण्याचा असल्यानें तेथें कोणाची डाळ शिजेना. पण शेवटीं तीन वर्षें धडपड करून सरकारची परवानगी मोठ्या मिनतवारीनें

मिळवून इ. स. १८१४ पासून त्यांनीं धर्मप्रसाराचें काम उघडपणें चालविलें. युरोपिअन साम्राज्यशाहीच्या विस्ताराला युरोपांत ख्रिस्ती धर्मोपदेशकांची मदत उत्कृष्ट प्रकारें झाली. तोच प्रकार येथें घडला. ठिकठिकाणीं शाळा काढून, इस्पितळें स्थापून, दुष्काळग्रस्तांना अन्नवस्त्र पुरवून, पतित व अस्पृश्य यांना जवळ करून, आपणांबद्दल अनुकूल ग्रह करण्याचा त्यांचा प्रयत्न सहज तडीस गेला. ख्रिस्तीधर्म व त्या धर्मांचे अनुयायी श्रेष्ठ आहेत हें लोकांना पटविण्यास मिशनऱ्यांना वरील भांडवल पुरेसें वाटलें. हिंदु धर्मांतील व्यंगें दर्शवून आपल्या धर्माची थोरवी गावी व ख्रिस्तानुयायी मेंढरांची संख्या वाढवावी हा मिशनऱ्यांचा उपक्रम असे. पाश्चात्य धर्म, पाश्चात्य राज्यकर्ते आणि पाश्चात्य चालीरीती या सर्वांविषयीं अनुकूल मत पसरविण्यास त्या उपदेशाची भरपूर मदत झाली. ख्रिस्ती झालें म्हणजे नोकरी मिळते व मानमरातब वाढतो म्हणून कित्येक इसम धर्मांतरास प्रवृत्त झाले. राज्यकर्त्यांचा धर्म श्रेष्ठ असला पाहिजे या वेडपट भावनेनें कांहींनीं बाप्तिस्मा घेतला. येशूख्रिस्ताचे कांही अत्युत्साही अनुयायी एवढ्यावर समाधान मानावयास तयार नव्हते. मूर्ख व आडदांड विद्यार्थ्याला छडीचा प्रसाद दिल्याविना गुरूचा उपदेश त्याच्या गळीं उतरत नाहीं; तसेंच ख्रिस्ताचा उपदेश मूर्ख हिंदूंना पटविण्यासाठीं एकादवेळेस जबरदस्ती करावी लागली तर बिघडलें कोठें? असा विचार करून मिशनऱ्यांनीं तोही प्रयोग अमलांत आणला × असें दिसतें.

२. स्वधर्मावरील हा हल्ला परतविण्यास हिंदुधर्माचे कित्येक अभिमानी सज्ज होते. त्यांपैकीं कांहींनीं बंडें करून रक्तपाताच्या मार्गानें आपला विरोध प्रगट केला. * आपलें उद्दिष्ट कार्य साधण्यासाठीं ख्रिस्तदासांनीं अविश्रान्त श्रम केले. जत्रा, बाजार, धर्मशाळा, देवळें जिथें जिथें लोकसमूह जमण्याचा संभव असे तेथें तेथें यांच्या धर्मोपदेशाचा पट्टा सुरू असावयाचा. हिंदुर्मांतील दोष दाखविण्याचे त्यांचे मार्ग मात्र और असत. हिंदूंच्या पुराणभक्तीचा फायदा घेण्यासाठीं ते कथा करीत. त्यांच्या प्रवचनाचा प्रकारही हिंदूंच्या मार्गांहून विलक्षण असे!

× न. चिं. केळकरः **टिळकचरित्र भा० १ पृ० ६०.**

* न. र. फाटकः **न्यायमूर्ति रानडेचरित्र** पृ. १०६.

"तुमच्या पातकावर रागीट होऊन देवानें घोर शासन पाठविलें. तुमच्या पातकावर प्रभु कष्टी झाला. तुम्हीं त्याचीं लेकरें त्याला विसरलां...आमचा प्रभु जिवंत दया आहे. प्रीति आहे, उजेड आहे, प्रकाश आहे. दगड नाहीं, झाड नाहीं, माती नाहीं. प्रभू पूर्ण दया आहे. त्याला शरण जा. तो तारण देईल." † तें तारण किती जणांना मिळालें कोण जाणे. पण कांहींनीं हिंदुधर्माला रजा दिली एवढें मात्र खरें. "जसा देव तसा भक्त. देव दगडाचा, देव खोटा. त्याचे भक्त खरे नव्हत. अगदीं खोटे, साफ खोटे, बिलकूल खोटे यांत काय आश्चर्य ?" म्हणून कानीं कपाळीं ओरड चालू असतां असल्या प्रवचनांचा खरा उपयोग त्या 'प्रभूला' किती झाला, त्यामुळें किती ख्रिस्तभक्तांना गति मिळाली तेंही माहीत नाहीं. मिशनऱ्यांच्या कळपांत त्यामुळें बरीच मेंढरें घुसलीं, एवढें निश्चित. पण जुन्या परंपरेची सर्वच मंडळी या मिशनरी मार्गानें फसणारी नव्हती. उलट त्यांनीं स्वधर्मसंरक्षणार्थ आपला पट्टा चालविण्याचें ठरविलें. जेथें जेथें मिशनऱ्यांची सभा असेल तेथें तेथें जाऊन त्यांच्याशीं वादविवाद करावा, इतर वेळीं सभा भरवून स्वधर्ममंडनार्थ प्रवचनें करावीं आणि जमेल तेथें मिशनऱ्यांची टर उडवावी हा या शास्त्रीमंडळीचा उद्योग असे. मोरभट दांडेकर नांवाचे एक गृहस्थ १८३० च्या सुमारास स्वधर्मरक्षणार्थ पुढें सरसावले. त्यांनीं १८४३ मध्यें 'उपदेशचंद्रिका' हें मासिक काढून तिच्याद्वारें मिशनऱ्यांच्या मिथ्या ज्ञानाचें निरसन चालविलें. मोरभट दांडेकर व त्यांची चंद्रिका मागें पडल्यावर १८५० च्या पुढें कृष्णशास्त्री साठे नांवाचे एक विद्वान पंडित वादाच्या आघाडीवर चमकूं लागले. * भाषेची कसरत व कल्पनेचा खेळ करून प्रतिपक्षाच्या प्रतिपादनांतील दोषस्थळें उघड करून दाखविण्याची त्यांची हातोटी अप्रतिम असे. याच वादांत विष्णुबुवा ब्रह्मचारी ( १८२५--७१ ) यांचें नांव गाजलें. बुवांच्या हजरजबाबी बुद्धिमत्तेबद्दल सर्वांनीं कौतुक करावें अशीच ती होती. यानीं थोडें वेदाध्ययन केलें होतें. पण मिशनऱ्यांच्या माराला तेवढें पुरण्यासारखें नव्हतें म्हणून त्यांनीं बायबलचाही अभ्यास केला. मिशनऱ्यांच्या

† धनुर्धारी : **पिराजी पाटील पृ.** १४५–६.

* न० र० फाटकः विष्णुशास्त्री चिपळूणकर ले० ३ **विविधज्ञानविस्तार** (एप्रिल, १९३० ).

प्रत्येक कोटीला प्रतिकोटी लढविण्यांत व त्यांच्या प्रत्येक मुद्याला प्रत्युत्तर देण्यांत बुवांचा हातखंडा होता. आणि म्हणून मिशनऱ्यांना त्यांची दहशत बसली. पाद्र्यांच्या मुद्देबाज व्याख्यानांनीं कुंठित बनलेल्या हिंदुधर्माच्या अभिमान्यांना हा ईश्वर भेटल्यासारखेंच झालें. आणि विष्णुबुवाही या श्रद्धेचा उपयोग स्वतःचें महत्त्व वाढविण्याकडे भरपूर करीत. इतकेंच नव्हे तर आपूल्याला ईश्वरी साक्षात्कार झाला आहे असेंही ते लोकांना भासवीत. असें असलें तरी महाराष्ट्राला मिशनऱ्यांच्या कचाटयांतून सोडविण्यांत त्यांनीं दाखविलेली आस्था आणि कळकळ संस्मरणीय आहे यांत संशय नाहीं. पाद्र्यांशीं तात्त्विक विवाद करूनच ते स्वस्थ राहात नसत. लोकांना व्यावहारिक उपदेश करावा, 'जर बाटाल तर आईबाप रडतील, तुम्हांस दुःख होईल, पतित जातीची स्त्री मिळेल, लोक हंसतील'† वगैरे गोष्टी लहान मुलांस सांगतात तशा सांगाव्या आणि कसेंही करून येशूच्या कळपांत दडलेल्या लांडग्याचें खरें स्वरूप लोकांना दाखवावें, याबद्दल ते सदैव तत्पर असत. त्यांच्या या कामगिरीचें महाराष्ट्रांत अभिमानानें कौतुक झालें. "ह्या आपल्या मुंबई इलाख्यांत इंग्रजी अंमलानंतर पुष्कळ ब्रम्हचारी व धर्मोपदेशक होऊन गेले पण विष्णुबुवासारखा ज्ञाता, सुविचारी, लोककल्याणेच्छु व कर्ता असा दुसरा आमचे पाहाण्यांत नाहीं." असे उद्गार ज्ञानप्रकाशकारांनीं बुवांवर लिहिलेल्या मृत्युलेखांत काढले होते.*

मिशनऱ्यांच्या या चढाईच्या हल्ल्यास तोंड देणारी मंडळी बहुधा शास्त्रीपंडित असून त्यांनीं—विष्णुबोवा ब्रह्मचाऱ्यांचा अपवाद सोडल्यास—स्वधर्माची तरफदारीच अधिक केली. विष्णुबुवांनीं मात्र ख्रिस्तीधर्मावर विसंगतीचे, अनीतीचे वगैरे तडाखे उडविले. परंतु त्यांच्या या हल्ल्यांत बुद्धिवादाची चमक आढळत नाहीं. तशी ती मिशनऱ्यांच्या हिंदुधर्मावरील आरोपांत किंवा ख्रिस्तमहतींतही दिसून येत नव्हती. इंग्रजी शिक्षणानें तयार झालेल्या कांहीं लोकांत ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या उद्योगाविषयीं तिटकारा उत्पन्न झाला तेव्हां मात्र त्यांच्या हल्ल्याचें स्वरूप बदललेलें दिसतें. मिशनऱ्यांनाही सज्ञानी

† रा. पा. आजरेकर : **विष्णुबुवा ब्रह्मचारी चारित्र.**
* न. चिं. केळकर : **टिळकचरित्र भा० १** पृ० ६९.

लोकांपुढें आपली डाळ अशा मार्गानें शिजणार नाहीं हें कळून चुकलें. त्याबरोबरच स्वधर्मावर हल्ला होणार अशी भीति हिंदुधर्माभिमानी शास्त्रीमंडळींस साहजिक वाटूं लागली. कारण इंग्रजी शिक्षणानें निरीश्वरवादाची छोटीसी लाट मध्येंच महाराष्ट्रांत उद्भवली व तिचा मारा ख्रिस्ती मिशनरी आणि व हिंदु शास्त्रीपंडित अशा दोघांनाही बसला. कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनीं पुणें येथें १८५२ मध्यें 'विचारलहरी' पाक्षिक सुरू करून ख्रिस्तमतखंडन आरंभिलें. हा प्रयत्न अशा निरीश्वरवाद्यांचा म्हणतां येईल.

३. तरीही पण धर्मप्रसाराचें काम मिशनऱ्यांनीं अनिरुद्धपणें चालविलें व ख्रिस्ती धर्मानुयायांची संख्या वाढतच होती. स्वधर्माचा त्याग करून ख्रिस्ती झालेल्यांची संख्या १८५२ मध्यें ११४२५ होती. मिशनऱ्यांचें हें बाटविण्याचें कार्य स्तुत्य म्हणावें कीं नाहीं याबद्दल एकमत कधींच होणार नाहीं हें खरें; पण त्यांची तळमळ, चिकाटी, ज्ञानदानाचे प्रयत्न, सेवावृत्ति......इत्यादि गुणांचा परिणाम ते वेळच्या समाजावर हमखास झालेला दिसतो. इतकेंच काय पण, पाद्री मंडळींनीं स्वधर्मप्रसारास्तव हिंदुधर्माची जी नालस्ती व निंदा केली तिचा देखील सुपरिणाम घडून आलेला दृष्टोत्पत्तीस येतो. 'निंदकाचें घर असावें शेजारीं' या संतोक्तीचें प्रत्यंतर ख्रिस्ती भटांनीं आर्यधर्मनिंदा केली तींत सांपडतें. धर्मांत कांहीं तरी सुधारणा केली पाहिजे ही भावना तत्कालीन शिक्षित मंडळींत जागृत झाली, ती इंग्रजी शिक्षणाच्या प्रभावामुळें, असें कांहीं अंशीं म्हणतां येत असलें तरी त्या श्रेयाचा कांहीं वाटा मिशनऱ्यांकडे जाईल यांत शंका नाहीं.

कारण मिशनऱ्यांनीं हिंदुधर्मावर हल्ला चढवून त्यांतील कांहीं हास्यास्पद चालीरीतींची व खुळ्या समजुतींची कुचेष्टा आरंभिली. स्वाभिमानी शिक्षित मंडळीस ती कशी रुचेल? तींतील ग्राह्यांश तेवढा घेऊन बाकीचा धर्मसांगाडा आर्यपरंपरेप्रमाणें ठेवावा; पण परकियांचा ख्रिस्ती धर्म मात्र नको, अशी उत्कट इच्छा त्यांस झाली. धर्मसंस्थापनेचे किंवा नवीन धार्मिक पंथ काढण्याचें काम करण्यास मात्र लायख इसम पुढें येईना. धर्मस्वरूपांत सुधारणा हवी, अज्ञानजन्य आचारांचें उच्चाटन त्यांतून व्हावें, असा आग्रह पुष्कळांचा असला तरी प्रारंभ कसा करावा हा प्रश्न त्यांचे पुढें सारखा

होता. आपल्या मूळ धर्मांत कोणी तरी कांहीं आचार घुसडून दिले आहेत, त्यांना शास्त्राधार नसून रूढीच्या बळावर ते टिकले आहेत, ह्या बाबी थोड्याशा विचारानें कोणालाही पटल्या असत्या; त्याप्रमाणें त्या पटल्याही. म्हणूनच सुधारणा करण्याचा ‘बूट’ निघाला. बालविवाह व विधवांची वाढती संख्या, ह्या तर डोळ्यांत भरण्यासारख्या गोष्टी होत्या आणि कोणाही सहृदय मनुष्यास याकरितां कांहींतरी प्रयत्न केला पाहिजे अशी चुटपुट सारखी लागून राहिली असती—इतकी क्रूर अवस्था विधवांची होती. त्यांत मिशनऱ्यांनीं आपलें टीकास्त्र सोडून तिकडे समाजाचें लक्ष वेधलें व असला क्रूरपणा धर्म्य ठरविणारा धर्म कसा? असे टोमणे देण्यास प्रारंभ केला. हिंदु चालीरितींतील दोष काढून टाकून स्वधर्माचें स्वरूप उज्ज्वल करावें असें कांहीं शिक्षित मंडळीस वाटूं लागलें. अशा समान विचारांची मंडळी त्यावेळीं थोडी नव्हती. दादोबा पांडुरंग, राम बाळकृष्ण ( जयकर ), मोरोबा विनोबा, डॉ. आत्माराम पांडुरंग, तुकाराम तात्या, बाळाभाऊ शिंत्रे, सखारामशास्त्री, लक्ष्मणशास्त्री हळबे, भिकोबा लक्ष्मण व सखाराम लक्ष्मण चव्हाण...* वगैरे मुंबईकरांच्या मनांत असलेच विचार घोळत होते. पण प्रत्यक्ष कार्यारंभ करण्यास कोणीच पुढें येईना. याच सुमारास पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर हे मुंबईस आले होते. त्यांची व व धर्मसुधारणेच्छु मंडळींची गांठ पडली. त्यांच्याकडून मिळालेल्या उत्तेजनानें कदाचित् या मंडळींच्या प्रयत्नास मूर्त स्वरूप आलें असावें. ( पण तें शेवट-पर्यंत गुप्तच राहिलें.) त्यांनीं ‘परमहंस सभा’ स्थापली.× जातिभेदाचा उच्छेद, मूर्तिपूजेचा तीव्र निषेध, एकेश्वरी मताचा पुरस्कार, ईश्वराचें पितृत्व व मानवांचें बंधुत्व या तत्त्वांवर प्रेमसाम्राज्याची उभारणी, इत्यादि उद्देश या सभेचे असत. त्यांत ख्रिस्ती शिकवणीची छाप दिसत नाहीं असें कसें म्हणावें? ख्रिस्ती आहे एवढ्यावरून ती त्याज्य नव्हे किंवा तसल्या कल्पना आर्यधर्मांत मुळींच आढळणार नाहींत असेंही पण नव्हे. मिशनऱ्यांच्या स्वधर्मप्रसार व आर्यधर्मनिंदा या दुहेरी टीकेच्या प्रत्यक्ष परिणामामुळें ही प्रक्रिया कशी घडली हें पाहण्यासाठीं ख्रिस्तधर्म सादृश्य दाखविलें. असो.

---

* द्वा. गो. वैद्य: **प्रार्थना समाजाचा इतिहास** पृ. ८–९.

× १८४० च्या सुमारास.

४. विधवांची असहाय स्थिति पाहून कोणालाही कळवळा आला असता. ' परमहंस ' मंडळींनाही तो आला व म्हणून विधवाविवाह शास्त्रसंमत आहेत यास्तव त्याचा प्रसार करणें हाही ह्या सभेचा एक उद्देश होता. परंतु सर्वांत मोठें गूढ म्हणजे ही सभा गुप्तपणें चालत असे. ' मेसन लॉज 'च्या धर्तीवर चालविण्यासाठीं हा गुप्तपणा त्यांनीं मुद्दाम स्वीकारला होता, का समाजांत उघडपणें आपल्या सुधारणा बोलून दाखविण्याचें धारिष्ट त्यांना नव्हतें म्हणून ते ह्या पडद्याआड लपत, तें आज निश्चितीनें सांगतां येत नाहीं. परंतु त्यांचे हेतु विचारप्रवण व प्रगतिपर असल्यानें ते महत्त्वाचे ठरतात. तत्कालीन समजांतील बहुसंख्याशीं ( मानसिक कां होईना ) बंडखोरीनें वागण्याची त्यांची वृत्ति प्रशंसनीय यांत संशय नाहीं. परमहंस सभेचा दीक्षाविधी ठरलेला असे; व सभेच्या प्रारंभीं व शेवटीं प्रार्थना होई. सभेचे सूत्रधार दादोबा पांडुरंग यांनीं ' पारमहंसिक ब्राह्मधर्म ' नांवाचा दशप्रकरणात्मक ओंवीबद्ध ग्रंथ लिहिला व तो ह्या मंडळींची ' स्मृति ' म्हणावयास हरकत नाहीं. त्यावरून ब्राह्म व परमहंस पंथ हें एक असें दिसतें. दादोबा म्हणतातः—

दया भक्तिशील । मनाचे मवाळ । करिती हळहळ । देशाची या
घ्यावें हातीं त्याणीं । संकल्पाचें जल * । मार्ग हा प्रांजल चालवाया ।
ब्राह्म मंडळींत । कीं एकासमोर । बोलावा विचार । आपला हा ॥
प्रविष्ट पुस्तकीं । स्वनाम लिहून । द्यावें आलिंगन । ब्राह्मास तै ॥
तिथेंच करावें । प्रीतीचें भोजन × । विधि हा संपूर्ण । होय तेव्हां ॥
वृद्धिंगत होई । स्नेह एकमेकीं । ऐशा वागणुकी । चालवाव्या ॥
उघडें सांगावें । आहों ब्राह्म आम्हीं । असा जर तुम्हीं । पूजूं तुम्हां ॥

इतकें सांगितल्यावर प्रार्थनेसंबंधीं दादोबा किती उदार विचार पुढें मांडतात तें पाहिलें पाहिजे.

---

* सर्व जुन्या व हानिकारक समजुतींवर पाणी सोडल्याचें हें निदर्शक मानीत.

× हें प्रीतीचें भोजन म्हणजे खिस्त्यानें बनविलेली पावरोटी सर्वांसमक्ष खाणें. ती खाल्ली कीं जातिभेद मोडले असें मानीत !

करा किंवा टाका । बाह्य धर्म सोंग । ठेवा अंतरंग । शुद्ध तरी ॥
बोला अल्प किंवा । नका कांहीं बोलूं । सत्कर्मीं द्या चालू । हातपाय ॥
कर्मेंचि देताति । फलें सर्व लोकीं । सांगे बुद्ध नाकीं । देव सारे ॥
म्हणोनिया दावा । सदाचरणांत । ज्ञानाचा तो अंत । 'दादो' म्हणे.

यावरून दया, भक्ति, मनाचा 'मवाळपणा' ही या पंथाची पूर्वतयारी असून बाह्याचारांवर त्याचा कटाक्ष होता ही गोष्ट स्पष्ट होते. तसेंच, सदाचरणाची महति सांगून एकमेकांतील स्नेह वृद्धिंगत करण्याचा उपदेश करून शुद्ध अंतरंगाची आवश्यकता पटविली आहे. त्याबरोबर संकल्प सोडण्यांत, आपलें नांव पुस्तकांत लिहिण्यांत व प्रीतिभोजन करण्यांत नवीन पंथाचा कटाक्ष असल्यामुळें या प्रचारकांचे हेतूंवर ख्रिस्ती शिकवणीची बरीच छाप असल्याचें दिसतें. तरी पण तावत्कालपर्यंत रूढ असलेल्या धर्मांत बदल करण्याची विचारशक्तिही त्यांत स्पष्ट दिसते. धर्माच्या बाबींत कोणी ढवळाढवळ करूं नये—तशी करतांच येत नाहीं—अशी भावना सर्वत्र दृढ असतां ख्रिस्तानुकरणानें कां होईना पण धर्मस्वरूपांत बदल करण्याची आपली तयारी आहे हें दर्शविल्यामुळें या सभेचे प्रयत्न प्रगतिपर ठरतात.

परमहंस सभेची व्याप्ति केवळ मुंबईपुरतीच नसून तिच्या शाखा पुणें, अहमदनगर, सातारा, बेळगांव, रत्नागिरी× इत्यादि स्थळीं होत्या. सभासदांची संख्या सुमारें एक हजारापर्यंत गेली असावी. पण सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे अहमदनगर शाखेचे कासमभाई महमदजी ढालवाणी या नांवाचे एक मुसलमान सभासद होते! अशा प्रकारें ही परमहंस मंडळी नवविचारांचा प्रसार गुप्तपणें करीत असतां कोणी तरी सभासदांच्या यादीचें पुस्तक लांबविलें आणि सुमारें वीस वर्षे चाललेलें हें सत्कार्य इ. स. १८६० च्या सुमारास बंद पडलें. नुसती यादी आतां प्रगट होणार या भीतीनेंच परमहंस मंडळीचा उत्साह थंडावला ही बाब मात्र धर्मप्रवर्तकांच्या मानसिक तयारीचें द्योतक ठरत नाहीं.

---

× ह्या सभेच्या शाखा मद्रास, कलकत्ता, काशीपर्यंत पसरल्या होत्या असेंही म्हणतात.

## धर्मसंस्थापनेस अनुकूल वातावरण

५. परमहंस मंडळींची परंपरा अर्थातच बंद राहाणारी नव्हती. वेगळ्या नांवाखालीं ती प्रगट होण्याचा प्रयत्न करूं लागलीच. पण एवढ्यांत ( १८६५ सालीं ) परमहंस सभेचे प्रथमपासूनचे अध्यक्ष राम बाळकृष्ण ( जयकर ) हे वारले. नाहींतर त्यांनीं दुसऱ्या कोठल्यातरी स्वरूपांत ती पुनः खात्रीनें चालविली असती. अशा स्थितींत लोकांच्या कुढलेल्या धार्मिक भावनांना योग्य असा वाव मिळण्यासारखीं दुसरीं कारणें घडलीं. विचार होतेच्; पण ते प्रकट होण्यास अनुकूल अशी संधि यावयाची होती. १८६४ सालीं कलकत्त्याच्या ब्राह्मसमाजाचे प्रचारक केशवचंद्र सेन मुंबईला येऊन व्याख्यानें देऊन गेले होते. त्यांचें वक्तृत्व परिणामकारक असेंच होतें. पण मुंबईचें त्यावेळचें वातावरण धर्ममतप्रसारास मुळींच अनुकूल नव्हतें. कारण, "त्यावेळीं मुंबईचा शेअर बाजार ज्याला त्याला श्रीमंत करूं लागला. पुष्कळ व्यापारी, पुष्कळ पेढ्या व इतर लोक धनाच्या विपुलतेंत पोहूं लागले. सर्वांच्या डोळ्यांवर जणूं धनाचा मद चढला होता.......इ. स. १८६४ सालची मुंबईची दिवाळी फारच उत्साहानें पार पडली." अशा सुखांत धर्माची आठवण होणें शक्य नसतें. आणि म्हणूनच केशवचंद्रांचें वक्तृत्व उपड्या घागरीवर पाण्याप्रमाणें झालें. कुंतीनें श्रीकृष्णाजवळ "विपत्काल दे" असा वर मागितला होता, याचें कारण हेंच. मुंबईस तो विपत्काल लगेच म्हणजे १८६५ मध्यें आला ! धर्मपंथस्थापनेस त्यानंतरच अनुकूल वातावरण निर्माण झालें !:

परंतु आणखीही वेगळ्या दिशेनें अनुकूल साधनें निर्माण होत होतीं. 'इंदुप्रकाश' १८६२ पासून आपली मंदप्रभा फाकीत लोकांत सामाजिक सुधारणेस प्रेरक असे विचार पसरवीत असे. मद्रास येथें १८६५ मध्यें केशवचंद्रसेन यांच्या प्रेरणेनें 'वेद-समाज' स्थापन झाला. त्याची सविस्तर बातमी इंदुप्रकाशानें देऊन संपादकीय विचारही प्रगट केले होते. अर्थात् ही गोष्टसुद्धां त्या वेळच्या लोकांच्या मनःस्थितीचेंच निदर्शक होय. 'नेटिव्ह ओपिनियन' मध्येंही त्यानंतर कांहीं दिवसांनीं मूर्तिपूजा हा अग्रलेख ( खंडनपर ) प्रसिद्ध झाला. त्यामुळें तेव्हां अर्थात् पुष्कळ खळबळ उडाली. मूर्तिपूजेविरुद्ध घेतलेले आक्षेप असे आहेतः—

"...परमेश्वराबद्दल जी मूर्ति तुम्हीं मनुष्याच्या पुढें ठेवाल ती पूज्य मानून तदनुसार त्याच्या मनाचे कल व्हावयाचे. मूर्ति, पाषाण, झाड, गाय किंवा बैल, मनुष्य किंवा स्त्री इत्यादि कोणत्या तरी पदार्थाला परमेश्वर मानून लोक भजतात. परंतु ह्यांतून कोणी एकाची तरी योग्यता परमेश्वराबरोबर आहे काय ?

"...मूर्तींची योजना निघाल्यामुळें देवालयांची आवश्यकता झाली. तसेंच मूर्तींची सर्व प्रकारें काळजी वागविण्याकरितां कोणा तरी मनुष्याचें तेथें रहाणें जरूर पडतें. मूर्तींच्या समागमानें या मनुष्याची योग्यता वाजवीपेक्षां फार वाटते. अज्ञान लोकांस तो केवळ प्रतिदेव आहे असें वाटतें. त्यालाही आपला मोठेपणा वाटूं लागतो....दुर्वासना त्यास सोडीत नाहींत. नानाप्रकारचे लोक देवालयांत येत गेल्यामुळें त्या लोकांवर हरेक प्रकारचा अंमल बसविण्याकडेस त्याच्या मनाची प्रवृत्ति होते."

६. असल्या विचारांवर टीका होऊं लागली व शिक्षित मंडळींत कांहीं दिवस 'मूर्तिपूजेवरील वादळ' हा चर्चेचा विषय होता. आणि ही चर्चा चालू असतांना प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. आधीं १७-१२--१८६६ रोजीं पूर्वींच्या परमहंस मंडळींतील कांहीं लोकांनीं इतरांच्या सहकार्यानें एक सभा भरविली. या सभेंत वादविवाद झाले ते बहुतेक सामाजिक स्वरूपाचे होते. जातिभेद नष्ट करणें, विधवाविवाह रूढ करणें, बालविवाह बंद पाडणें, स्त्री-शिक्षणास उत्तेजन देणें, असल्या प्रश्नांविषयीं बोलणें वाढूं लागलें. पण पारमार्थिक सुखाकडे अधिक लक्ष देण्याचें धोरण ठरून शेवटीं ३१-३-१८६७ रोजीं प्रार्थनासमाजाची स्थापना झाली. मात्र त्यावेळीं प्रार्थनासमाज हें नांव त्या संस्थेस नसून 'एकेश्वर भक्तमंडळी' म्हणून लोक तिला ओळखत. त्या मंड-ळींच्या समाजस्थापनेचा उद्देश व मूलतत्वें अशीं होतीं:—

'देव एकच व निराकार आहे, त्याचें मानसिक भजनपूजन करणें योग्य व आपलें कर्तव्य आहे. मूर्तिपूजा हा असन्मार्ग असून देवास अपमानकारक आणि मनुष्यास नीचत्व आणणारा व दुराचरणाप्रत नेणारा आहे. तेव्हां हा असन्मार्ग सुटून सन्मार्गाची लोकांत प्रवृत्ति व्हावी व सर्व संसारांतील धर्म-संबंधीं कृत्यें ह्या मतास अनुसरून व्हावीं हा या समजाचा उद्देश आहे.'

## प्रार्थनाधर्माचीं मूलतत्त्वें

धर्माचीं मूलतत्त्वें खालीं लिहिल्याप्रमाणें होतीं:—

‘देव एकच आहे, त्याशिवाय दुसरा देव नाहीं असा मी दृढभाव धरतों.

‘सर्व उत्पन्न करणारा एकच देव आहे असें मी समजतों आणि मूर्तिपूजेवर माझी श्रद्धा नाहीं.’

समाजाचा सभासद होण्यास हीं तत्त्वें मान्य असावीं लागत असून शिवाय खालीं लिहिल्याप्रमाणें प्रतिज्ञा करावी लागे:—

‘मी प्रत्यहीं परमेश्वराचें चिंतन करीत जाईन.

‘सत्कर्में आचरावयास व असत्कर्मापासून दूर रहावयास मी प्रयत्न करीन.

‘स्वभावदोषानें कांहीं वाईट कर्म मजपासून घडल्यास त्याविषयीं पश्चात्ताप व्हावा एतदर्थ परमेश्वरापाशीं प्रार्थना करीन.

‘हे परमेश्वर ! ह्या प्रतिज्ञा पाळण्याचें सामर्थ्य मला दे.’§

सर्वांनीं मिळून प्रार्थना करणें, रविवारीं एकत्र जमणें, प्रार्थनेनंतर ‘तथास्तु’* म्हणणें इत्यादि बाह्याचार व एकेश्वरी मत आणि मूर्तिपूजात्याग ह्यांवरून प्रार्थनासमाज म्हणजे कलकत्त्याच्या ब्राह्मसमाजाची नक्कलच वाटूं लागला. इतकेंच नव्हे, तर साहेबांचें तेवढें निंद्य व त्याज्य असें मानणारा बहुजनसमाज या नूतन धर्मपंथाकडे ख्रिस्तीधर्माचें एक अपत्य या दृष्टीनेंच पाहूं लागला. अर्थातच प्रार्थनासमाज व समाजिस्ट मंडळी यांची मनसोक्त कुचेष्टा त्या काळीं झाली. समाजाचे पुढारी आणि सर्वसाधारण हिंदु बहुजनसमाज यांच्या मनोवृत्तींतील तफावत लक्षांत घेतली कीं या बाबीचें आश्चर्य वाटेनासें होतें. व्यापक तात्त्विक दृष्ट्या प्रार्थनासमाज हा भागवतधर्माचाच एक पंथ ठरला तरी बहुजनसमाज नेहमींच धर्माचाराकडे पाहात असल्यामुळें प्रार्थनासमाजाचे प्रार्थनेचे मार्ग त्याला ख्रिस्तानुकरणात्मक वाटले तर नवल नाहीं.

७. ख्रिस्तानुकरणाचा हा आक्षेप फारच जुना होता. राजा राममोहन रॉय

---

§ **द्वा. गो. वैद्य : प्रार्थनासमाजाचा इतिहास** पृ० ३५-६.

* ‘Amen म्हणण्याची ख्रिस्तदासांची पद्धत समाजिस्टांच्या नजरेसमोर असावीसें वाटतें.

यांनीं ‘ ब्राह्मो समाजा ’ची स्थापना केली तेव्हां साक्षात् परधर्माची भिन्न नामाभिधानानें काढलेली आवृत्ति असें त्याचें वर्णन हिंदुधर्माभिमान्यांनीं केलें. राजा राममोहन यांनीं त्या आक्षेपाचें खंडन करण्याचा प्रयत्नही केला होता. ‘ब्रह्मसूत्रोक्त आणि शांकरभाष्यप्रतिपादित ईश्वरोपासनेचा उज्ज्वल मार्ग आपण धरला आहे,’ असें त्यांचें म्हणणें होतें. तशाच प्रकारची कैफियत प्रार्थनासमाजिस्टांनीं स्वतःच्या धर्मपंथावरील खिस्तानुकरणाच्या आक्षेपाचें निरसन करतांना सादर केली. न्यायमूर्ति रानडे, डॉक्टर भाण्डारकर, वामन आबाजी मोडक वगैरे समाजाच्या प्रभावी पुरस्कर्त्यांच्या धर्मविषय कल्पनांचा अभ्यास केला कीं प्रार्थनासमाजावरील ह्या आक्षेपांत फारसें तथ्य नाहीं, हें सहज लक्षांत येतें. भाण्डारकरांच्या धर्मविषयक लेखांत प्राचीन ग्रंथांचाच अनुवाद दिसून येतो. मोडकांना श्रीमद्भगवद्गीता हाच आर्यधर्मसारभूत असा आदर्शग्रंथ वाटे. रानड्यांचा प्राचीन परंपरेचा अभिमान किती प्रखर होता याचें वर्णन मागें आलेंच आहे. रानडे भागवतधर्माचे कट्टे पक्षपाती होते. परमेश्वराला अनन्य भावानें शरण जावें, शरणावस्थेंतच ईश्वरार्पण बुद्धीनें इहलोकींचीं प्राप्त कर्तव्यें करावीं आणि अंतीं ईश्वरांतच विलीन व्हावें, असा भागवत धर्माचा कित्ता आहे. तोच प्रार्थनासमाज गिरवीत आहे असें रानड्यांनीं पदोपदीं सांगितलें. भागवतधर्माला त्यांनीं ‘ हिंदू प्रॉटेस्टँटिझम् ’ असें अन्वर्थक नांव दिलें.* मूळ धर्मांत अविचारानें, दुरभिमानानें, भ्रमानें किंवा परंपरेनें जे निषिद्ध विधि शिरतात त्यांचा निषेध करणारा तो प्रॉटेस्टंट पंथ. युरोपांत या धर्मपंथानें जें कार्य केलें तेंच हिंदुस्थानांत भागवतधर्मानें केलें. संस्कृत भाषेच्या बंडाचा मोड, भक्तिमार्गांत जातिभेदाचें निरसन, मूर्तिपूजेचा त्याग, दया–क्षमा–शांति वगैरे गुणांची अभिवृद्धि वगैरे अनेक सत्कृत्यें करून चित्तशुद्धि व त्यायोगें आत्मोन्नति साधण्याचा मार्ग सदर पंथानें भाविकांस मोकळा करून दिला. तेंच कार्य आज प्रार्थनासमाज करीत आहे, असें रानड्यांनीं पुनः पुन्हा बजाविलें. युरोपांतील प्रॉटेस्टंट पंथ जर खिस्तधर्मविरोधी ठरत नाहीं तर हिंदुस्थानांतील प्रॉटेस्टंट पंथ हिंदुधर्मविरोधी कां ठरावा? रानड्यांचा हिंदुधर्माचा अभिमान किती जाज्ज्वल्य होता तें त्यांनीं आपल्या एका

* Hindoo Protestantism. 1895. हा निबंध त्यांनीं प्रार्थनासमाजाच्या वार्षिक समारंभांत वाचला होता.

व्याख्यानांत* स्पष्टपणें दर्शविलें आहे. ‘हिंदुधर्म अनादि आहे, त्याचा एकच प्रवर्तक नाहीं, ईश्वरी साक्षात्कार आणि अवतार इहलोकीं एकदांच झाला, असें या धर्माचें मत नाहीं; जीवात्मा व परमात्मा यांचा साक्षात् संयोग होऊं शकतो, जीवात्म्याला परमात्म्याशीं अपरोक्षत्वानें हितगुज करतां येतें, असें हिंदुधर्माचें तत्त्व आहे. या गोष्टी इतर धर्मांत नसल्यामुळें ते तितक्या मानानें हीन ठरतात, ’ × असे त्या वेळच्या भाषणांतले रानड्यांचे उद्गार आहेत. हे उद्गार काढणाऱ्या व्यक्तीला ख्रिस्तधर्माचे अनुयायी म्हणणें कसें शक्य ठरतें ? मात्र कांहीं प्रारंभींचे समाजिस्ट तसे असतील.

खरोखर पहातां प्रार्थनासमाजाचा उद्भव होण्याचीं कारणें निराळीं आहेत. इंग्रजी शिक्षण, इंग्रजी राज्यपद्धति, बदललेली समाजस्थिति आणि मिशनरी उपदेश अशा निरनिराळ्या कारणांमुळें इकडील विचारवंतांच्या डोक्यांत नवीन कल्पनांचा उगम झाला, त्यांची दृष्टि अन्तर्मुख झाली व आपल्या धर्मसमजुतींतील व समजांतील दोषांची जाणीव त्यांना झाली. त्या दोषांचें परिमार्जन करण्याच्या प्रयत्नांतच त्या धर्मपंथाचा उदय झाला. अर्थातच त्यावर ख्रिस्तानुकरणाचा शिक्कामोर्तब करून त्याचें स्वरूप विकृत करूं पाहाण्यांत अर्थ नाहीं. तो एक शुद्ध ईश्वरभक्तीचा पंथ आहे, हेंच खरें.

८. आजमितीस समाजाच्या कार्याचा एकंदर आढावा घेतां प्रार्थनासमाज ही संस्था वाढावी तशी न वाढतां कशी तरी तग धरून राहिली आहे, असेंच म्हणावें लागतें. प्रार्थनासमाजानें चालविलेल्या संस्था उपयुक्त आहेत, त्यांचें कार्य वाढत्या प्रमाणावर आहे...हें सर्व खरें असलें तरी खुद्द प्रार्थनासमाज हा आहे तिथेंच आहे. याचें कारण असें दिसतें कीं जेव्हां तो धर्मपंथ निघाला तेव्हांची जनता त्याच्या प्रवर्तकांइतकी प्रगमनशील नव्हती. इंग्रजी संस्कृतीशीं गांठ पडल्यामुळें ज्यांची विचारसरणी बदलली त्यांच्या धर्मविषयक आकांक्षा तृप्त करण्यासच त्याचा उपयोग झाला. दुसरें असें कीं धर्मप्रकरणीं आघाडीवर काम करणारे प्रार्थनासमाजाचे पुढारी राजकारण वगैरे बाबतींत नेमस्त ठरून त्यांनीं जनतेंत अप्रियता कमाविली. अर्थातच धर्मप्रसार करण्यास बहुजनसमाजावर

* Philosophy of Indian Theism. १८९६ सालीं विल्सन कॉलजांत दिलेलें व्याख्यान.

× न. र. फाटकः **रानडेचरित्र** पृ. ५५३.

ज्या प्रकारचें वजन असावें लागतें तसें वजन समाजिस्ट पुढाऱ्यांनीं कधींच मिळविलें नाहीं. तिसरें कारण असें संभवतें कीं धर्मगुरूंच्या ठायीं आवश्यक असलेली स्वार्थत्यागी वृत्ति समाजाच्या पुढाऱ्यांनीं कधींच दाखविली नाहीं. त्यांपैकीं कित्येकांची तर ढोंगी मंडळींत गणना करतां येते. समाजाच्या सभागृहांत धर्मसुधारणेच्या लंब्याचवड्या गप्पा मारूनही स्वगृहीं जुने आचार व चालीरीती चालू ठेवण्यास त्यांची सदैव तयारी असे. हे मार्ग धर्मपंथाचा प्रसार करणारे खास नव्हत. समाजसुधारणेच्या कार्यामुळें प्रार्थनासमाजाला महत्त्व आलें होतें. लोकसेवा करणें हा धर्माचरणाचाच एक भाग आहे, या दृष्टीनें समाजिस्ट पुढारी समाजसुधारणेकडे पाहात असत. सुधारणेचें हें 'धार्मिक' स्वरूप आगरकरांनीं पार बदललें. इतउत्तर समाजसुधारणा हें एक 'सामाजिक' कर्तव्य आहे याच दृष्टीनें तरुण पिढी तिकडे पाहूं लागली. याही कारणामुळें प्रार्थनासमाजाचें महत्त्व घटत चाललें. सध्यां तो पंथ स्थितिस्थापकत्वाला पोंचला आहे, असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

## २ थिऑसफी

अमेरिकेंत स. १८७५ मध्यें थिऑसफी संस्था स्थापन झाल्यावर तिचे आद्य संस्थापक ऑल्कॉट व ब्लॅव्हॅटस्की स. १८७९ च्या जानेवारींत मुंबईस आले. त्यांनीं हिंदुस्थानांत पहिली थिऑसॉफिकल संस्था स्थापली ती मुंबईंतच. (ता. १८–१०–१८७९). ह्या संस्थेंत प्रमुख अशी महाराष्ट्रीय मंडळीच होती असें दिसतें. अध्यक्षस्थानीं श्री. मावळणकर, प्रमुख व्यवस्थापक म्हणून लोकहितवादी, संस्थेचे प्राणाधार म्हणजे तुकाराम तात्या—अशीं नांवें त्यावेळच्या इतिहासांत आढळतात. डॉ. अण्णा मो. कुंटे, डॉ. सर भालचंद्र भाटवडेकर, बडोद्याचे न्यायमूर्ति ज. स. गाडगीळ...ही मंडळी सभासद होती.

थिऑसफीच्या प्रेरणेचें सामान्य स्वरूप असें सांगतां येईल. विश्वबंधुत्वाची भावना वाढवून तदनुसार आचरण करणें, कोणत्याही श्रद्धेचा आग्रह न धरणें, धर्मश्रद्धा व्यापक, संग्राहक, व आधुनिक चिकित्सक विचारपद्धतीला जुळेल अशा पद्धतीनें जीवनांतील मुख्य प्रश्नांचा विचार सांगणें. देहात्मसंबंध, आत्म्याची स्थिति, गति, पुनर्जन्म...इत्यादि गहन प्रश्नांची सयुक्तिक, समर्पक व सदाचारप्रवर्तक मीमांसा थिऑसफी सांगते अशी तिच्यावर निष्ठा असणारांची भावना आहे.

## थिऑसफीचें व्यापक स्वरूप

थिऑसफी हा प्रार्थनासमाजाप्रमाणें ख्रिस्ती टीकाकारांच्या टीकेमुळें व त्यांच्या अनुकरणामुळें निघालेला किंवा आर्यसमाजाप्रमाणें आत्मनिरीक्षणामुळें व पूर्वाभिमानामुळें निघालेला पंथ नव्हे हें स्पष्ट दिसतें. एका विशिष्ट पद्धतीनें विश्वबंधुत्वाचें नातें फैलावणाऱ्या पंथाचा तो सत्यशोधनार्थ एक प्रयत्न होय. म्हणून निवडक विचारी मंडळीस थिऑसफीचें महत्त्व कळलें व ते तींत सामील झाले. व्यापक उद्देश ठेवून प्रामाणिक मतभेदांनाच नव्हे तर मतविरोधांनाही थिऑसफीनें हक्काचें स्थान दिलें आहे. शिवाय निव्वळ पारलौकिक प्रश्नांसंबंधीं थिऑसफीचा आग्रह नाहीं. ऐहिक बाबींविषयींही थिऑसफी तितक्याच विचारानें व आस्थेनें चौकशी करून मत बनविण्यास मदत करीत असल्यानें नुसता "धर्मपंथ" असें त्या संस्थेचें स्वरूप नाहीं. आचार, विचार व व्यवहार या तिहेरी बंधांत थिऑसफीनें धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक, राजकीय अशा विविध विषयांचा समावेष केला आहे. प्रत्येक क्षेत्रांत थिऑसफीची विशिष्ट वृत्ति अथवा दृष्टिकोन आहे. व्यापक ध्येय, संग्राहक वृत्ति, उदार बुद्धि असल्यामुळें मतविरोधाबद्दल असहिष्णुता थिऑसफीच्या अनुयायांना वाटत नाहीं. अशा प्रकारची सर्वव्यापि—बौद्ध, हिंदु, ख्रिस्ती, मुसलमान, पारशी,...सर्व धर्मांना पोटांत घेणारी शिकवण थिऑसफीची असल्यानें, तींत समाजांतील निवडक विचारवंतांचा समावेश झाला. परंतु महाराष्ट्रांत इतर प्रांतांत झाला तितका तिचा प्रसार झाला नाहीं. त्या संस्थेच्या छोट्यामोठ्या अशा सुमारें पावणे चारशें शाखा हिंदुस्थानभर पसरलेल्या असतां महाराष्ट्रानें त्यांतील पुऱ्या पंचवीस देखील आपल्या वांट्यास घेतल्या नाहींत. मुंबईंत महाराष्ट्रियांच्या प्रामुख्यांत थिऑसोफिकल सोसायटीची सुरुवात झाली असली तरी पुढील पिढींत "मावशी" व "बाई" म्हणून मोठमोठ्या मंडळींनीं डॉ. बेझंटांची कुचेष्टाच केली. अर्थात् त्याचीं कारणें राजकीय होतीं. पण मतभेद कितीही तीव्र असला तरी विद्या, व्यासंग, तपश्चर्या, कळकळ, चिकाटी, वाचन, उदार मनोवृत्ति, वय इत्यादि गुणांकडे पाहून डॉ. बेझंटांची चेष्टा व्हावयास नको होती. पण महाराष्ट्राला आगरकरांसारख्या घरच्या विभूतीचें श्रेष्ठत्व उमगलें नाहीं तिथें परदेशस्थ व परभाषी "बाई" चा काय पाड ?

---

## ३ आर्यसमाज

**१ संस्थापक. २ टीकाकार व तुलना. ३ कार्य व भावि स्थिति.**

१ आर्यसमाजाचे संस्थापक दयानंद सरस्वति यांचा जन्म काठेवाड प्रांतांतर्गत मोरवी संस्थानांतील टंकारा गांवीं १८२४ सालीं झाला. यांचे वडील शिवभक्त असल्यामुळें शिवरात्रीचा दिवस यांच्या घरीं विशेष भक्तिभावानें पाळला जाई. अशीच एका शिवरात्रीच्या दिवशीं शिवालयांत वडिलांबरोबर दयानंद जागरण करीत असतां त्यांना शंकराच्या पिंडीवर उंदीर बागडतांना दिसला. त्याबरोबर खरा शंकर तो हा नव्हे असें त्यांच्या मनानें घेतलें व खऱ्या शंकराच्या शोधार्थ त्यांचें बालमन तळमळूं लागलें.

मुलाची ही मनस्थिति वडिलांच्या नजरेस आल्यावर त्यांनीं त्याचें लग्न करण्याचा घाट घातला. वडिलांचा हा विचार दयानंदांस कळतांच रामदासांप्रमाणें ते घरांतून पळाले. वडिलांनीं त्यांचा बराच शोध केला. शेवटीं एकदांचे ते त्यांना सांपडले. पुन्हां त्यांनीं पळूं नये म्हणून त्यांच्यावर खडा पहारा ठेवण्यांत आला. पण एके दिवशीं रात्रीं पहारेकऱ्याचा जरा डोळा लागतांच हे पुन्हां पळाले. यानंतर वडिलांनीं यांचा पाठलाग करण्याचें सोडून दिलें.

पुढें यांनीं संन्यासदीक्षा घेतली. यांचें लक्ष योगाभ्यास व शास्त्राध्ययन करण्याकडे विशेष असल्यामुळें तशा गुरूच्या शोधांत हे बरेच फिरले. शेवटीं विरजानंद नामक प्रज्ञाचक्षु यतीजवळ यांनीं अध्ययनास सुरवात केली व तेथेंच तें पुरें केलें. पूर्वप्रथेप्रमाणें गुरुदक्षिणेप्रीत्यर्थ गुरूनें यांच्याकडून सत्यधर्मप्रसाराचें कार्य अखंड करण्याचें अभिवचन घेतलें.

अभिवचनाच्या पूर्ततेसाठीं हे व्याख्यानें देत फिरूं लागले. हीं व्याख्यानें संस्कृत भाषेमध्यें होत असत. फिरतां फिरतां बंगालमध्यें गेले असतांना प्रख्यात केशवचंद्र सेन व स्वामीजी यांची भेट झाली. केशवचंद्र सेन यांनीं संस्कृत भाषा सर्व साधारण जनतेस समजत नसल्यामुळें सर्व साधारण लोकांस समजेल अशा भाषेंतून उपदेश करण्याविषयीं स्वामीजींना सूचना केली. स्वामीजींना ही सूचना पटली व तदनंतर त्यांनीं हिंदी भाषेचा अवलंब केला.

## महाराष्ट्र व दयानन्द

स्वामीजींनीं सारें उत्तर हिंदुस्थान बरेच वेळां पालथें घातलें होतें. बंगालमध्येंहि त्यांनीं परिभ्रमण केलें होतें. महाराष्ट्रांत मात्र मुंबई व पुणें या व्यतिरिक्त कोठें गेलेले दिसत नाहींत. उत्तरेंत प्रचार करण्यांत व आर्यसमाजाची घडी बसविण्यांत त्यांचीं अनेक वर्षें गेल्यामुळें दक्षिणेकडे विशेष लक्ष देण्यास त्यांस फावलें नसावें. यामुळेंच कदाचित् महाराष्ट्रांत आर्यसमाजाचा उत्तरेप्रमाणें फारसा प्रसार होऊं शकला नसावा.

२ महाराष्ट्रांत आर्यसमाजाचा शिरकाव न होण्याचें श्रेय चिपळूणकरांनीं त्यांच्यावर चढविलेल्या हल्लयाला देण्यांत येत असतें व या एकाच गोष्टीवरून चिपळूणकरांची महतिहि दाखविण्यांत येत असते. पण ज्यांना स्वामीजींना उत्तरेंत किती विरोध झाला याची माहिती आहे व विरोधाला न जुमानतां कार्य करीत राहून तें तडीस नेण्याची मनस्वी वृत्ति स्वामीजींच्या ठिकाणीं किती प्रबल होती हें त्यांच्या चरित्रावगाहनानें ज्यांना ठाऊक झालेलें आहे, त्यांना चिपळूणकरांच्या दोन लेखांनीं स्वामीजी भेदरून जाऊन तो प्रांत सोडून देतील हें शक्य वाटणें असंभवनीय होय.

स्वामीजी संकटांना जुमानणारे नव्हते. महाराष्ट्रांत त्यांच्या मिरवणुकीवर चिखलाचा वर्षाव झाला व त्यांच्या मिरवणुकीच्या दिवशीं गर्दभानंदाची मिरवणूक निघाली इतकेंच. पण उत्तरेंत त्यांच्यावर दगडांचा व विटांचा मारा झाला आणि त्यांना विष देण्याचे व ठार मारण्याचेहि अनेक प्रयोग झाले. स्वामीजी घाबरट व कमकुवत मनाचे असते तर महाराष्ट्रानें योजिलेल्या उपायापेक्षां उत्तरेनें योजिलेल्या या जालिम उपायांनीं ते केव्हांच अस्तंगत झाले असते.

महाराष्ट्रांत त्यांना न्या. मू. रानड्यांसारख्या तत्कालीन विचारी लोकांवर अतिशय वजन असलेल्या पुढाऱ्याचा पाठिंबा तरी होता. पण आर्यसमाजाचें केंद्र समजल्या जाणाऱ्या आजच्या पंजाबांत त्यांचें ज्या तऱ्हेनें स्वागत झालें ती तऱ्हा लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

सत्याच्या बाबतींतील त्यांच्या आग्रही वृत्तीमुळें, लाहोरच्या पहिल्या भेटींत त्यांना उतरावयास जागासुद्धां मिळणें कठीण झालें. सनातन धर्मावरील हल्लयामुळें एकहि सनातनी त्यांना जवळ करण्यास तयार होईना. अशा

स्थितींत एका मुसलमानानें स्वामीजींना आपल्या कोठीवर जागा दिली. ही जागा मिळाल्याच्या दुसऱ्याच दिवशीं त्या मुसलमानाचे उपकार फेडण्यासाठीं स्वामीजींनीं इस्लाम धर्मावर आपला मोर्चा फिरविला. रहावयास जागा नसल्या वेळीं ज्या इसमानें त्यांना आश्रय दिला त्या सद्गृहस्थाचे उपकार असे फेडलेले पाहून सभास्थानीं एका इसमानें त्यांना याविषयीं प्रश्न केला. त्यावर स्वामीजी म्हणाले, "रहावयास कोणीच जागा देत नसतां ज्यानें माझी रहाण्याची सोय केली त्या गृहस्थाचे उपकार त्याच्या तोंडासारखें बोलून फेडण्यापेक्षां त्याला सत्य मार्ग दाखवून फेडणेंच मी आपलें कर्तव्य समजतों."

काशींत स्वामीजी सात वेळ गेले. प्रथम पदार्पणाचे वेळीं स्वामी श्रद्धानंदजींचे वडील तेथें Visiting Police Inspector होते. या इन्स्पेक्टरांच्या घरची मंडळी किती हवालदील झाली होती हें पाहिलें म्हणजे एकंदर लोकांच्या मनस्थितीची कल्पना होईल. श्रद्धानंदजी आपल्या आत्मचरित्रांत म्हणतात

> " काशींत अशी अफवा पसरली कीं वेदशास्त्रसंपन्न असा एक जबरदस्त नास्तिक आलेला आहे. त्याच्या दोहों बाजूंस दिवसा ढवळ्या दोन मशाली पेटत असतात. जो कोणी त्याच्याशीं वादविवाद करावयाला जातो तो त्याच्या प्रभावानें फिक्का पडतो. अशा नास्तिक जादुगाराच्या तावडींत आम्ही उभय बंधु सांपडूं नये म्हणून आमची आई आम्हांला घराबाहेर जाऊं देत नसे. "

या त्रोटक हकीकतीवरून उत्तरेंत स्वामीजींना केवढा मोठा तीव्र विरोध झाला असेल याची कल्पना येईल.

असे स्वामीजी चिपळूणकरांच्या टीकालेखांना, चिखलफेकीला किंवा गर्दभानंदाच्या मिरवणुकीला भिऊन महाराष्ट्र सोडतील हें असंभाव्य होय. ही असंभाव्यता संभवनीय धरली तरी ज्या महाराष्ट्रांत ख्रिस्ती, सत्यशोधक व प्रार्थनासमाज चिपळूणकरी हल्ल्यांना न जुमानतां वाढूं शकले, त्या महाराष्ट्रांत आर्यसमाजासारखा जोरकस व आक्रमणशील समाज मात्र वाढूं शकणें अशक्य होतें असें म्हणण्यांत काय स्वारस्य आहे ?

## केसरींतील मृत्युलेख

चिपळूणकर आपल्या लेखांनीं स्वामीजी बेपत्ता झाल्याचें दाखवीत आहेत. पण पुण्याला दोन महिने व्याख्यानें देऊन स्वामीजी मुंबईला आले व तेथें प्रचार करूं लागले ही साधी गोष्ट त्यांना माहित असूं नये यासारखी शोचनीय स्थिति कोणती ? कारण पुणें व मुंबई यांत फारसें अंतर नाहीं. पण आपण लिहूं तें प्रमाण मानलें जाईल अशी खात्री असल्यावर चौकशी करण्याची तसदी त्यांनीं तरी कां घ्यावी ?

याच ठिकाणीं केसरीनें* स्वामीजींच्या मृत्युलेखांत काय लिहिलें आहे तें देणें अस्थानीं होणार नाहीं.

"...दयानंद हे बुद्धिमान होते व चौकस होते आणि त्यांच्या मृत्यूनें एक थोर पुरुष ह्या जगांतून नाहींसा झाला आहे. पाहिल्याबरोबर किंचित् भीति आणि पूज्यबुद्धि उत्पन्न करणारी शरीरकांति, बहुश्रुतपणा, रसिक वाणी, निःसीम श्रद्धा, समयसूचकता व कोटीक्रम वगैरे धर्मस्थापकांस लागणारे आवश्यक गुण स्वामी दयानंदांत पूर्णपणें वसत होते. तसेंच दयानंद स्वामींत हा एक विशेष गुण होता कीं ते आमच्या शास्त्र्यांप्रमाणें हट्टवादांत न पडतां युक्तिवाद करण्यास नेहमीं तत्पर असत....त्यांच्या विद्वत्तेचें योग्य चीज झालें नाहीं यांत शंका नाहीं; परंतु त्याचें कारण आमची धर्माविषयींची उदासीनता हेंच आहे.

—केसरी ता. ६ नव्हेंबर १८८३

कांहीं लोक दयानंदांची रामदासांशीं तुलना करून त्यांना कमी लेखण्याचा प्रयत्न करीत असतात. पण या दोघांची तुलनाच होऊं शकत नाहीं. रामदासांनीं आपल्या काळीं बरेंच कार्य केलें असेल. पण तें फक्त महाराष्ट्रापुरतेंच आहे. रामदासांच्या नांवाचा व कामगिरीचा विशेष गाजावाजा होण्याचें कारण ते शिवछत्रपतींचे गुरु होते हें होय. त्यांची स्वतंत्र अशी फारशी कामगिरी नाहीं. त्यांचे हिंदुस्थानभर हजारों मठ होते असेंहि कोणीं सांगतात; पण ही निवळ गप्प आहे. कारण मोजदाद करूं गेल्यास ही संख्या कांहीं शेंकडे तरी भरेल कीं नाहीं याची शंकाच आहे. उलट दयानंदांचें थोरपण व्यक्तिगत आहे. सध्यां आर्यसमाजामार्फत चाललेल्या निरनिराळ्या संस्थांचा उगम त्यांच्या शिकवणुकींत व प्रत्यक्ष कार्यांत कोठें ना कोठें तरी आढळून आल्याखेरीज रहाणार नाहीं.

---

* दयानंद सरस्वति, चरित्र व कामगिरी, पृ. २७४.

रामदासांचें कार्यक्षेत्र महाराष्ट्र, त्यांचा धर्म महाराष्ट्रधर्म तर दयानंदांचें कार्यक्षेत्र नुसतें हिंदुस्थानच नसून अखिल विश्व आहे व त्यांचा धर्मही विश्वधर्म आहे. अर्थात् या दोहोंची तुलनाच होऊं शकत नाहीं व ती करणें अयथार्थ आहे.

औरंगजेबाच्या कडव्या कारकीर्दीत समर्थांप्रमाणें बिनबोभाट हजारों मठ स्थापन करणें* स्वामीजींस शक्य झालें नसतें असाहि अभिप्राय कांहीं लेखक व्यक्त करतात. पण त्याच वेळीं औरंगजेबी कडव्या कारकीर्दीत शीख धर्म सध्यांचें त्याचें रूप धारण करण्याच्या मार्गांत होता. हें विसरून कसें चालेल ? तसेंच त्याच्या रूपांतरानें केवढा चमत्कार दाखविला व हिंदु समाजाला एका उत्कृष्ट लढाऊ जातीची कशी कायमची जोड करून दिली हेंहि दृष्टिआड करून चालणार नाहीं. दयानंद त्या वेळीं अवतीर्ण झाले असते तर त्यांनीहि असेंच कांहीं तरी जास्त जोरकस व चिरस्थायी कार्य केलें असतें हें जाणण्यास कल्पनाशक्तीची ओढाताण करण्याची जरूरी नाहीं.

वास्तविक समर्थांना जी अनुकूलता मिळाली होती तिचा त्यांच्या शिष्यांनी योग्य उपयोग केला असता तर आजला कांहीं निराळीच परिस्थिति दिसली असती. पण स्नानसंध्येला मुबलक पाणी व महाराष्ट्राची नव्हाळी होण्याची चिन्हें दिसतांच या पंथाचें कर्तृत्व थंडावलें. आणि समर्थांनंतर त्यांचा धागा-दोरा इतिहासांत किंवा दंतकथेंतहि आढळेनासा झाला.

रामदासांप्रमाणेंच तुकारामादि भागवत सांप्रदायी संतांहून स्वामीजी, त्यांचें कार्य व समाज हीं अगदीं निराळीं आहेत. भागवत सांप्रदायाचा रोख परमार्था-वर विशेष आहे. ऐहिक उन्नतीकडे त्यांचें फारसें लक्ष नाहीं. यांचें आराध्यदैवत जें श्री पांडुरंग त्याचेंहि तेज किंवा प्रभाव आपल्या भक्तसंरक्षणापुरताच आहे. राष्ट्रकार्यकर्त्यां किंवा सांसारिक गरीब लोकांच्या तो उपयोगी आलेला दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. अशा स्थितींत या दोहोंची तुलना कशाला ?

असा हा एकांगी पंथ सर्व साधारण जनतेंत लोकप्रिय होण्याचें मुख्य कारण म्हणजे त्या वेळच्या प्रचलित वैदिक धर्मानें जातिभेदास्तव उपेक्षिलेल्यांस व कोणी आपंगिता नसलेल्यांस त्यानें अपंगिलें व वैदिक कर्मकांडापेक्षां त्याच्या मता-प्रमाणें नामस्मरणाचा सोपा मार्ग त्यांस दाखविला हें होय.

* फडकेकृत श्रीमद्दयानंद पृ. २४१

पण असें झालें तरी हिंदुसमाजांतील उच्चनीचतेच्या वातावरणास त्यानें धक्का बसूं शकला नाहीं. किंवा दलित वर्गांत कायमचा जोम किंवा स्वाभिमानहि उत्पन्न झाला नाहीं. यापेक्षां संस्कृत भाषेऐवजीं मराठींत ग्रंथरचना करून धर्माचें तत्त्व सर्व-साधारण जनतेच्या आवाक्यांत आणून देण्याची कामगिरी जशी त्यांनीं केली तशीच जर वेदद्वार सर्वांस मोकळें करण्यास ते झटले असते तर अधिक चांगलें झालें असतें.

असे प्रयत्न झाले असते तर हिंदुधर्मांत आणखी एका पंथाची भर पँडली नसती, वैदिक रीत्या आपले संस्कार व्हावे या गोष्टीकरितां जीं रणें माजलीं व त्यांतून जो ब्राह्मणब्राह्मणेतर वाद निघाला तो निघताना, आणि महाराष्ट्रांत हा वाद जो चिरस्थायी झालेला दिसतो तो होताना.

ज्ञानेश्वर, तुकाराम वगैरे साधुसंतांना ही गोष्ट अशक्य होती असेंहि नाहीं. पण एक तर आपण करीत आहों याचा परिणाम काय होईल याविषयीं विचार कर-ण्याइतकें त्याचें महत्त्व त्यांना वाटलें नसावें किंवा तितकी दूरदृष्टी त्यांच्या ठायीं नसावी. परिणामस्वरूप वेदाधिकाराचें राखीव कुरण एवढ्या महनीय विभूती जन्मास येऊनहि फक्त ब्राह्मणांकरितांच राखिलें गेलें; तेथें इतरेजनांचा प्रवेश झाला नाहीं.

ब्राह्मणांच्या आग्रहीवृत्तीचा परिणाम त्यांनाहि भोवल्याशिवाय राहिला नाहीं. विरुद्ध बाजूला एकाहून एक श्रेष्ठ विभूती लाभल्यामुळें त्यांच्या प्रभावानें त्यांच्या मार्गाला महत्त्व आलें व यांना शिक्कामोर्तबासह त्याला मान्यता द्यावी लागली; आणि या विभूतींच्या प्रभावानें हे आपल्या मार्गापासून चळले व इतरेजनां-बरोबर ज्ञानसंपादनार्थ वाऱ्या करण्याऐवजीं पंढरीच्या वाऱ्या करूं लागले व वेदघोषाऐवजीं 'ज्ञानेश्वर माऊली'चा घोष करूं लागले.

सर्व समाज एकाच पातळीवर येता तर ही स्थितिहि पत्करली असती; पण तसें झालें नाहीं. त्याला अनेक कारणें आहेत. त्यांतील मुख्य कारण म्हणजे भागवतधर्माचा एकांगीपणा हें होय. यामुळें या पंथाचा उपयोग हिंदुधर्माला जडलेल्या रोगाला मलमपट्टी देण्यापलीकडे होऊं शकला नाहीं.

हिंदुधर्माला जडलेल्या रोगाची चिकित्सा वरील संतमहंतांपेक्षां स्वामी-जींनीं अधिक यथार्थतेनें केली व लोकांच्या गळ्यांत कंठी किंवा माळ घालून

त्यांना समान दर्जावर आणण्यापेक्षां ब्राह्मणाप्रमाणें जानवें व ब्राह्मणापासून चांडालापर्यंत सर्वांस एकाच वैदिक पद्धतीनें वेदाधिकार देऊन त्यांना समान पदावर स्थापन केलें.

या बाहेरल्या देखाव्यावरच स्वामीजी संतुष्ट राहिले नाहींत. सर्वांचें खाणें पिणें, आचार विचार एक व्हावा म्हणून त्यांनीं जन्माऐवजीं गुणकर्माला, निरामिष भोजनाला व प्रत्येक व्यक्तीचे सोळा संस्कार होण्याला प्राधान्य दिलें. आणि या प्राधान्याचा इष्ट तो परिणामहि घडून आला. निदान खाण्यापिण्याच्या बाबतींत तरी आर्यसमाजियांत भेदभाव असलेला दिसून येत नाहीं.

एवढ्यानेंच स्वामीजींचें विशिष्टत्व पुरें होत नाहीं. आजपर्यंतच्या हिंदु साधुसंतांनीं, मग ते भागवत धर्मीय असोत कीं इतर असोत, घरच्या आजीबाईवरच कोरडे ओढले आहेत. इतरांच्या वाटेस जाण्याची त्यांची हिम्मत झालेली दिसत नाहीं. तुकारामासारखी विभूति रामेश्वरशास्त्र्याला हार गेली नाहीं, पण मुसलमान अवलियाला मूठभर तांदूळ घालून तिनें वाटेला लावलें. म्हणजे त्या पंथाविरुद्ध तिनें ‘ब्र’ काढला नाहीं. दत्तासारख्या कडकडीत सोवळ्या देवाला मलिंगाचा वेष देऊन त्या धर्मांचें सोज्ज्वलत्व मान्य करण्यांत आलें; पण आपल्याच धर्मांतील लोकांपासून त्याला सोंवळ्याओवळ्या खातर लांब ठेवण्यांत आलें.

स्वामीजी याहून निराळे आहेत. त्यांनीं हिंदुधर्मावर जितके ताशेरे झाडले तितकेच इतर धर्मांवरहि झाडले. आपला म्हणून त्याचा संभाळ व दुसऱ्याविषयीं आबाळ असें त्यांनीं केलें नाहीं. याबावतींत कोणी मुसलमानी राज्याची सबब पुढें आणण्याचा संभव आहे. पण ज्यांच्या सांगातीं सदैव देव होता त्यांना राज्यकर्त्यांचें भय बाळगण्याची जरुरी काय ?

स्वामीजींच्या विद्वत्तेबद्दल व त्यांच्या वेदांच्या अर्थाबद्दलहि महाराष्ट्रांत शंका प्रदर्शित करण्यांत येत असतात. विद्वत्तेबद्दल एवढें सांगणें पुरे आहे कीं केशवचंद्र सेनांची गांठ पडेपर्यंत त्यांचीं सर्व व्याख्यानें संस्कृत भाषेंतूनच झालीं. स्वामीजींचे वेदभाष्य, सत्यार्थप्रकाश व इतर ग्रंथ अवलोकन केल्यास त्यांचें शास्त्रग्रंथांचें अध्ययन किती सूक्ष्म व सर्वगामी होतें तें दिसून आल्याखेरीज रहाणार नाहीं. हें वाचन नुसतें आर्यसंस्कृतीपुरतेंच होतें असेंहि नाहीं.

ख्रिस्ती, मुसलमान वगैरे इतर संस्कृतींचेहि मुख्य ग्रंथ त्यांतून वगळले गेलेले दिसत नाहींत.

स्वामीजींनीं केलेल्या वेदार्थाबद्दल साशंक होण्याचें निदान महाराष्ट्रीयांस तरी बिलकुल कारण नाहीं. कारण आद्याचार्यांहून भिन्न असें कर्मयोगपर गीताप्रतिपादन जर आम्हांला चालतें व रुचतें आणि त्यामुळेंच जर लोकमान्यांना अद्वितीयत्व प्राप्त होतें तर दयानंदांचा वेदार्थ पूर्वभाष्यकारांहून स्वतंत्र म्हणून त्याज्य कां वाटावा ? लोकमान्यांच्या गीतार्थांत ज्याप्रमाणें विशिष्टत्व आहे त्याचप्रमाणें स्वामीजींच्या वेदार्थांतहि विशिष्टत्व आहे.

वेदाभ्यास करणें म्हणजे अहंकारानें माणुसकी विसरणें होय असा कांहीं भूदेवांच्या आचारविचारावरून पुष्कळांचा गैरसमज झालेला असतो. स्वामीजी याला अपवाद होते हें त्यांच्या आयुष्यांतील अशा प्रकारच्या गोष्टींपैकीं पुढील एकाच गोष्टीवरून दिसून येतें. गंगातटाकीं भ्रमण करीत असतांना एकदां एक बाई कपड्यांत गुंडाळलेलें कांहींतरी गंगौघांत सोडीत असलेली स्वामीजींच्या दृष्टीस पडली. बाई काय टाकीत आहे हें पहाण्याकरितां स्वामीजी तेथेंच थबकले. पहातात तों बाईनें कपड्यांत गुंडाळलेलें आपलें मृत मूल बाहेर काढिलें व तें वाहत्या पाण्यांत सोडिलें. परंतु असें करतांना मुलाला गुंडाळलेला फडका मात्र तिनें पाण्यांत टाकिला नाहीं. तिनें तो धुतला, सुकवला व तो घेऊन अश्रुसिंचन करीत घरीं गेली. हें दृश्य पाहून स्वामीजींचें अंतःकरण कळवळून आलें व त्यांचे तोंडून पुढील शब्द बाहेर पडले

> "भारतवर्ष इतका कंगाल झाला आहे कीं पोटचा गोळा माता पाण्यांत सोडूं शकते, पण त्या गोळ्यावरचें वस्त्र मात्र टाकणें तिला जड जातें. कारण तें पुन्हां मिळणें दुर्लभ आहे. देशाच्या दारिद्र्याचें याहून मूर्तिमंत असें उदाहरण दुसरें कोणतें मिळणार ?"

या दृश्यानें स्वामीजींवर जो परिणाम झाला त्याचें दृश्य फल पुढें अनाथालयें, विधवाश्रम वगैरे स्थापन करण्यांत आणि आर्य समाजियांत सहृदयत्व उत्पन्न करण्यांत झाल्याचें नजरेस येतें.

३. येथवर आर्यसमाजाच्या संस्थापकाविषयीं झालें. आतां त्यानें स्थापलेल्या समाजाविषयीं पाहूं.

आर्यसमाज फक्त वेदांनाच स्वतःप्रमाण मानतो आणि इतर ग्रंथांत जेवढें वेदानुकूल असेल तेवढेंच ग्राह्य समजतो. वेदप्रामाण्य हें मुख्य गमक असलें तरी कालस्थलमान याकडे त्याचें दुर्लक्ष नसतें. समाज त्रैतवादी आहे. म्हणजे प्रकृति, जीव व परमेश्वर हे अनादि व अनंत आहेत असें समजतो. परमेश्वराची भक्ति करण्यांत कोणा मध्यस्थाची किंवा शिफारस करणाराची त्यास जरुरी वाटत नाहीं. मग तो भटभिक्षुक असो, ईश्वराचा पुत्र असो कीं देवदूत असो. दैववाद व अवतारवाद यांवर त्याचा विश्वास नाहीं. समाज चार आश्रम व गुण कर्म स्वभावाप्रमाणें चार वर्ण मानतो. सगुण उपासनेवर त्याचा विश्वास नसून गुणोपासनेवरच त्याचा भर आहे.

अशा या समाजानें काय केलें हें पुढील माहितीवरून कळेल. सध्यां एकंदर १७०० समाज आहेत व प्रचारकांची संख्या सुमारें ३०० आहे. समाजामार्फत ३ पहिल्या दर्जाचीं व ७ दुय्यम दर्जाचीं कॉलेजें, ९० हायस्कूल्स, ३ उपदेशक तयार करण्याचीं विद्यालयें, २० अनाथालयें, ४० विधवा आश्रम, गुरुकुलें, कन्या पाठशाला, कन्या महाविद्यालयें, वगैरे संस्था चालू आहेत.

हिंदुस्थानांतील बहुतेक सर्व प्रांतांतून कमीजास्त प्रमाणांत समाज स्थापन झालेच आहेत. शिवाय ब्रह्मदेश, सियाम, अनामा, कंबोडिया, हांगकांग, पूर्व व दक्षिण आफ्रिका, मॉरिशस, फिजी, ब्रिटिश व डच गायना इत्यादि ठिकाणींहि आर्यसमाजांची स्थापना झालेली असून त्याचें कार्य चालू आहे.

वरील विवरणावरून समाजाच्या धार्मिक किंवा सामाजिक कामगिरीची तेवढीच कल्पना होईल. राजकीय क्षेत्रांत काम करण्याची याची तऱ्हा निराळी आहे. समाजाचें कार्य तात्पुरतें नसल्यामुळें तो समष्टी रूपानें राजकीय क्षेत्रांत पडूं इच्छित नाहीं. तरीहि वैयक्तिक रूपानें त्याच्या अनुयायांनीं बजावलेली कामगिरी कोणाच्याहि नजरेंत भरण्यासारखी आहे. धार्मिक किंवा राष्ट्रीय कार्याकरितां समाजानें बलिदान केलेलें आहे. अस्पृश्याकरितांहि त्यानें केलेलें आहे.

समाजाचें कार्य जमीन तयार करण्याचें आहे व तें तो करीत आहे. त्याच्या कार्याला मुदतीची बंदी नाहीं. दैववादी नसल्यामुळें त्याला निराशेची धास्ती वाटत नाहीं. आणि अवतारवादी नसल्यामुळें अवतार निर्माण होईपर्यंत वाट

पहाण्याची गरज त्याला भासत नाहीं. त्याचें ब्रीदवाक्य कर्म करणें हें आहे. तें केव्हां झपाट्यानें तर केव्हां मुंगीच्या पावलानें चालूच आहे. आणि अनुयायांच्या नालायकीनें तें बंद पडलें तर त्याबद्दल विषाद तरी कां ?

महाराष्ट्रांत आर्यसमाजाचा प्रसार होईल कीं नाहीं हें पाहून विषय पुरा करूं. अशा समाजाची गरज नेहमीं समाजाच्या खालच्या थराला असते. आणि कोणतीही चळवळ खालच्या थराला पटली व तेथें तिनें जोर धरला म्हणजे मग कालांतरानें वरिष्ठ थराला ती ग्राह्य वाटूं लागते. भागवत सांप्रदाय किंवा सत्यशोधक हे पहिल्यानें समाजाच्या खालच्या थरांतच रुजले. पैकीं भागवत सांप्रदायाचा कालांतरानें वरिष्ठ थरांत थोडाफार प्रवेशहि झाला; पण सत्यशोधक चळवळीचें मात्र तसें दिसत नाहीं. याचें कारण विधायक कामगिरीचा अभाव म्हणा किंवा योग्य नेत्याचा अभाव म्हणा किंवा इतर कोणतेंहि कारण म्हणा. परंतु वरिष्ठ थरांत प्रवेश झाला नसला तरी त्या थराकडून विरोधहि होईनासा झाला आहे.

या दोन्ही पंथांचे प्रचारक खालच्या थराला समजेल अशा भाषेंत प्रचार करणारे असल्यामुळें ते प्रचार करूं शकले. आर्यसमाजाची गोष्ट याहून निराळी आहे. त्याचे प्रचारक उत्तर हिंदुस्थानी. त्यांची भाषा हिंदी. तशांत संस्थापकानेंहि हिंदीला प्राधान्य दिलेलें. अशा स्थितींत जोंपर्यंत महाराष्ट्रीय समाजाच्या खालच्या थराला त्याचे भाषेंत समाजाचे सिद्धांत पटवणारे प्रचारक त्याला लाभणार नाहींत तोंपर्यंत आहे हीच स्थिति कायम राहाणार.

ही स्थिति अशीच सदोदित राहील असें मात्र नाहीं. ती बदलेल. पण त्याचें श्रेय महाराष्ट्राच्या एका विविक्षित भागाला मिळणार आहे. महाराष्ट्रा शेजारच्या निजाम राज्यांत आर्यसमाजी वाढत्या प्रमाणांत आहेत. हळू हळू त्यांचा प्रभाव निजामच्या सरहद्दीवरहि पडूं लागला आहे. पण दृष्टोत्पत्तीस येण्यासारखा पडण्यास अजून बराच कालावधि आहे. व तेवढा काल वाट पहाण्यास समाज तयारहि आहे. आणि इतक्याउप्पर महाराष्ट्रांत प्रसार झाला नाहीं किंवा महाराष्ट्रीयांकडून त्याचा सत्कार झाला नाहीं म्हणून एकच समाजाच्या कसोटीचें मुख्य गमक कां मानावें ?

# १८ समालोचन

इंग्रज आले नसते तर ?–युरोपांत झालें तसें झालें असतें ?–हिंदुपद-पादशाहीची स्थापना ?–इंग्रजांचें प्रगतिपर कार्य–निर्बलांची निष्क्रियता – मुसलमानांचा सहवास – अंधानुकरण – तडजोडीचें अनुकरण – बाळशास्त्री जांभेकर–स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व – बुद्धिप्रामाण्यवाद– लोकहितवादींचा बुद्धिवाद व व्यक्तिवाद – नवशिक्षितांचें विचारप्रवर्तन – पदवीधरमुकुटमणि – लोकसत्तात्मक राज्यपद्धति – दडपलेल्या समाजाचा वाली–'देव न मानणारा देवमाणूस'–विष्णु कृष्णाची कामगिरी – सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाची कल्पना – टिळकांच्या कार्याचें महत्त्व–'लोकमान्य' विरुद्ध 'राजमान्य'–नव्या युगाचे नवे प्रवाह – गांधीवाद; मार्क्सवाद; नवमतवाद–बुद्धिप्रामाण्याची कसोटी–महाराष्ट्राचा पहिला साम्यवादी–रानडे आणि आगरकर –आगरकर व नवमतवाद–महाराष्ट्रांत स्वतंत्र विचारांचा अभाव आहे का ?

आजकालच्या महाराष्ट्रांतील वैचारिक प्रगतीचें समीक्षण येथवर केलें. आजकालचा महाराष्ट्र म्हणजे इंग्रजांचा महाराष्ट्र. आज सुमारें दीडशें वर्षें

# ‘ जर–तर ’चा प्रश्न

इंग्रज हिंदुस्थानवर अविरत सत्ता गाजवीत आहेत. हे इंग्रज येथें आलेच नसते तर ?–असा प्रश्न आधुनिक हिंदुस्थानच्या इतिहासाची पाहाणी करतांना वारंवार मनांत येतो. पण असा ‘ जर-तर ’ चा प्रश्न इतिहासकारानें विचारणें कितपत योग्य आहे ? इतिहासकार म्हणजे कांहीं राष्ट्राचा ग्रहपट उघडून बसलेला ज्योतिषी नव्हे. इंग्रजांचा ग्रह येथें नसता तर असें झालें असतें; मराठ्यांचा ग्रह तेथें नसता तर तसें झालें असतें–अशा ठशाचीं उत्तरें इतिहासकाराच्या पोतडींत नसतात. कोणत्याही राष्ट्राचा गतेतिहास अभ्यासून त्याच्या भवितव्या-विषयीं कांहीं अंधुकशीं अनुमानें बांधतां येतात हें खरें. पण या बाबींचा गैर उपयोगच पुष्कळदां केलेला आढळतो. तसा गैर उपयोग करण्याचा उद्देश येथें नाहीं. ‘ जर-तर ’ चा प्रश्न विचारून कोणतेंही निश्चित उत्तर देतां येणार नाहीं, पण असा प्रश्न विचारणें मुळांतच चूक किंवा त्यापासून कांहीं फायदा होण्याचा संभव अगदीं कमी, असें नव्हे. असा प्रश्न विचारल्यानें विचारांना चालना मिळून इतिहासाचें अधिक सम्यक् ज्ञान होण्याची शक्यता असते. या कारणानेंच ‘ इंग्रज येथें आले नसते तर ? ’ या प्रश्नाचा येथें उहापोह करण्याचें ठरविलें आहे.

या प्रश्नाचें एक उत्तर असें दिलें जातें कीं जर इंग्रजांची सत्ता येथें प्रस्थापित न होती तर युरोपांत आज जें दृश्य दृष्टीस पडत आहे तसेंच दृश्य हिंदुस्थानांतही पडलें असतें. म्हणजे ज्याप्रमाणें युरोपखंड आज निरनिराळ्या राष्ट्रांत विभागलें आहे त्याच-प्रमाणें हिंदुस्थानही विभागलें असतें. इतकेंच नव्हे, तर हिंदी राष्ट्रेंही सर्वसाधारणपणें युरोपिअन राष्ट्रें आज ज्या विकासावस्थेंत आहेत त्याच अवस्थेंत असतीं. पण असें निश्चित अनुमान करणें धाडसाचें आहे. कारण या विचारपद्धतींत एक महत्त्वाचा तर्कदोष आढळतो. जगांतील सर्व राष्ट्रें किंवा त्यांच्या संस्कृती यांच्या विकासाचे नियम सारखे, जवळजवळ एकाच ठशाचे असतात, किंवा सर्व राष्ट्रें व संस्कृती सारख्याच अवस्थांतून विकसत जातात, ही समजूत या विधानाच्या बुडाशीं आहे. पण ही समजूत तितकीशी बरोबर नाहीं. प्राचीन कालचें रोमन साम्राज्य किंवा आजचीं पाश्चात्य साम्राज्यें यांचे सांस्कृतिक विकासाचे नियम एकच आहेत असें विधान करणें शक्य आहे का ? चीन–हिंदुस्थान यांसारख्या पौर्वात्य देशांना त्यांचें स्वतःचें असें कांहींच वैशिष्ट्य नाहीं का ? ज्या

नियमानुसार पाश्चात्य राष्ट्रांच्या इतिहासाचें समीक्षण करतां येतें त्या नियमानुरोधानेंच हिंदी इतिहासाची पाहाणी करणें कितपत सयुक्तिक ठरेल ? व्यापारी इंग्रजांची सत्ता येथें स्थापन झाली तेव्हां हिंदुस्थान सरंजामशाहीच्या अवनत अवस्थेंत होता म्हणजे आधुनिक व्यापारी व भांडवलशाही युग अवतरण्यापूर्वीं युरोपांतील राष्ट्रांची जी समाजस्थिति होती तशीच हिंदुस्थानची होती, असें म्हटलें जातें आणि तें कांहींसें बरोबरही आहे. हिंदुस्थानचे कांहीं प्रांत तेव्हां पुष्कळसे सरंजामावस्थेंत होते. परंतु सर्वच हिंदी प्रांतांचें असें वर्णन करणें चूक ठरेल. महाराष्ट्राचेंच उदाहरण आपण घेऊं. महाराष्ट्राची पेशवेकालीन राज्यकारभारपद्धति पुष्कळशी सरंजामी थाटाची होती, हें खरें. वतनें व सरंजाम यांची खैरात आवडत्या सरदारांवर होई हेंही खरें. परंतु बंगालमधील सरदारांप्रमाणें महाराष्ट्रीय सरदारांना शेतकऱ्यांच्या जमिनीवर मालकी कधींच सांगतां आली नाहीं. पेशवेकालीन महाराष्ट्रांत जमीन शेतकऱ्यांच्या मालकीची असे. खरेदी-विक्रीचे संपूर्ण हक्क त्याला असत. इतकेंच नव्हे, तर ते पिढ्यान् पिढ्या चालत आलेले असत.* अर्थात् जमिनीवर—मुख्य उत्पादनसाधनावर—सरदारवर्गाची पूर्ण मालकी असणें, हा जो सरंजामशाहीचा प्रमुख विशेष त्याचा अभाव पेशवेकालीन महाराष्ट्रांत + असल्यामुळें ते वेळचा महाराष्ट्रीय समाज संपूर्णतया सरंजामावस्थेंत होता असें म्हणणें चूक ठरतें. मग इंग्रज आले नसते तरी इकडील प्रजा ( युरोपांतील प्रजा लढली त्याप्रमाणें ) लोकशाहीच्या पुरस्कारार्थ सरदारशाहीच्या विरुद्ध लढली असती किंवा एतद्देशीय व्यापारी वर्गानें पुढेंमागें सत्ता काबीज करून आधुनिक व्यापारी, औद्योगिक, भांडवलशाही समाजाचा पाया घातला असता व लोकसत्तात्मक राज्यपद्धतीची स्थापना केली असती असें निश्चयानें म्हणणें कसें शक्य आहे ? इकडील शेतकरीवर्ग सरंजामशाहीच्या बजबजपुरीला व बेबंदशाहीला वैतागला होता हें खरें. परंतु युरोपिअन व्यापारी व भांडवलदार वर्गानें जीं अभिवचनें देऊन बहुजन शेतकरी समाजाला सरदारवर्गाविरुद्ध उठविलें होतें तशींच अभिवचनें देऊन एतद्देशीय व्यापाऱ्यांना इकडील बहुजनसमाजाला उठवितां आलें असतें असें कसें म्हणतां येईल ? व्यापारी इंग्रजांनीं येथें येऊन ज्याप्रमाणें नवीन व्यापारीयुगाचा पाया

* Elphinstone : *Report on the Territories of the Peshawa*

\+ कोंकणप्रांत सोडून

घातला त्याप्रमाणेंच पुढेंमागें एतद्देशीय व्यापाऱ्यांनींही घातला असता असें निश्चित विधान करणें ( अगदीं चूक नसलें तरी ) खरोखर धाडसाचें ठरेल.

इंग्रज आले नसते तर काय झालें असतें? या प्रश्नाचें दुसरें एक उत्तर मिळतें. इंग्रजांचा अडथळा आला नसता तर मराठ्यांनीं आपलें हिंदुपदपादशाहीचें ध्येय साध्य करून घेतलें असतें असें कांहींना वाटतें. इंग्रज अधिक साहसी, अधिक धोरणी, अधिक हुशार, युद्धकलेंत अधिक निपुण, त्यांच्यामध्यें जूटीची भावना अधिक प्रबल इत्यादि गोष्टींमुळें त्यांनीं मराठ्यांचा पाडाव केला व पेशव्यांच्या राजधानीवर आपलें निशाण फडकविलें. परंतु जर इंग्रज दैवेंकरून येथें न येते तर अखिल हिंदुस्थानवर हिंदुपदपादशाहीची स्थापना होऊन छत्रपतींचें ( पूर्वीं अशोकाचें होतें त्याप्रमाणें ) एकछत्री साम्राज्य पसरलें असतें, असें यांचें म्हणणें. हा आशावाद हिंदुमनाला यद्यपि सुखदायक असला तरी तो चुकीचा आहे हें मराठेशाहीची शेवटची नैराश्यावस्था पाहिली असतां सहज ध्यानांत येईल. पेशवाईच्या उत्तरार्धांत मराठ्यांची ध्येयनिष्ठा बहुतेक मावळली होती. ज्या हिंदुपदपादशाहीच्या ध्येयानें प्रेरित होऊन मराठे सरदारांनीं प्रथमप्रथमची मुलूखगिरी केली तें ध्येय उत्तरपेशवाईंत त्यांना सोडून गेलें होतें. पेशवाईच्या अखेरच्या कालांतील मराठे सरदारांचें वर्तन याची उत्तम साक्ष देईल. त्यांच्या भोंवतीं पडलेली स्वार्थाची जबरदस्त पकड, त्यांना लागलेली सवत्यासुभ्याची विलक्षण चटक, द्रव्याच्या मोहानें त्यांनीं लागोपाठ चार वेळां केलेली आचार्यमठांची लूट, त्यांची आपसांतली दुही व परस्परांविषयींचा कमालीचा अविश्वास—हीं हिंदुपदपादशाहीच्या ध्येयाचीं लक्षणें खास नव्हत. मूठभर सरदारांचीच अशी स्थिति होती असें नव्हे.. ते वेळचा एकंदर महाराष्ट्रीय समाजच दुर्गतीच्या फेऱ्यांत सांपडलेला दिसतो. मराठे सरदारांची आपापसांतील फूट व भांडणें; सर्व देशभर माजलेली बेबंदशाही व अशांतता; गरीब शेतकरी प्रजेवर होणारा अनन्वित जुलूम; व्यापार—उदिमाची हेळसांड—इत्यादि कारणांमुळें एकंदर मराठा समाज खिळखिळा, असंतुष्ट व असहाय झाला होता. सत्ताधिकाऱ्यांची स्वार्थी व बेपर्वाई वृत्ति, धर्माचें व धर्माधिकाऱ्यांचें अवास्तव बंड, व्यापारी वर्गाचें दारिद्र्य व कर्जबाजारीपणा आणि

बहुजनसमाजाची निराशामय परिस्थिति–हेंच ज्या समाजाचे विशेष झाले होते त्या समाजांत ध्येयनिष्ठा व कार्यप्रवणता यांचा लोप झाला तर नवल काय? ज्या वैश्यवर्गाकडे तत्कालीन बहुजनसमाजानें आशेनें पाहावें तोच मुळीं घरभेदी-पणाच्या सत्कृत्यांत गुंग! मग इतरांची काय कथा? अर्थातच जिकडे तिकडे वैतागाचें साम्राज्य माजलें व काय वाटेल तें होवो पण आहे ही परिस्थिति बदलो अशी दुर्बलवृत्ति बळावली. ही परिस्थिति बदलण्याचें कार्य इंग्रजांनीं केलें आणि म्हणूनच त्या राज्यांतरानें विशेषसें कोणाला वाईट वाटलें नाहीं. परदेशीय, पर-धर्मीय सत्ताधिकाऱ्यांचें असें स्वागत करणारा समाज हिंदुपदपादशाहीचें ध्येय कसें गांठूं शकत?

इंग्रज येथें येऊन आपली बलशाली सत्ता न स्थापते तर महाराष्ट्रीय समाज दुर्गतींत अधिकाधिक खोल रुतत जाऊन महाराष्ट्रावर कांहीं वर्षें तरी अंधार-युगाची घनदाट छाया पसरली असती अशी भीति उपर्युक्त निराशाजनक परि-स्थिति पाहून वाटते. आणि म्हणूनच इंग्रजांनीं येथें येऊन शांतता व सुव्यवस्था (किंवा साधी व्यवस्था) स्थापिली ही सांस्कृतिक दृष्ट्या कामगिरीच बजाविली असें म्हणण्याचा मोह अनावर होतो.

पण इंग्रजांचें हें प्रगतिपर कार्य सर्वगामी होणें किंवा तें अव्याहतपणें चालणें स्वभावतःच अशक्य होतें. इंग्रज बोलून चालून परकी. ते येथें आले ते मूळ व्यापार करण्याच्या हेतूनें. (एवढ्या प्रचंड प्रदेशावर पुढेंमागें आपली सत्ता गाजेल याची कल्पनाही तेव्हां त्यांना नव्हती.) त्या व्यापाराचा उत्तरोत्तर उत्कर्ष व्हावा असें त्यांना वाटलें तर तें दोषास्पद कसें? ज्या राज्यांत त्यांचा व्यापार वाढण्याचा संभव नाहीं तें राज्य त्यांनीं चालवावें तरी कां? अर्थात् हिंदुस्थानचा राज्यकारभार पाहातांना इंग्रजांची दृष्टि सदैव स्वहिततत्पर, इंग्लंडच्या फायद्याची, राहिली तें साहजिकच झालें. 'माझ्या मातृभूमीचें कल्याण चिंतणें हें माझें आद्यकर्तव्य आहे' अशा अर्थाचे उद्गार हिंदुस्थानसरकारच्या एका आंग्ल मंत्र्यानें काढले होते त्यांतही कांहीं वावगें नाहीं. पण इंग्रजांच्या या स्वहिततत्पर दृष्टीमुळें हिंदुस्थानचा व्यापार बुडाला, त्याचें पूर्वीचें वैभव मावळलें व हिंदी प्रजा कृषावलंबी बनली. अशा स्थितींत हिंदी समाजाचें चैतन्य हरपून तो एक थंड दगडी गोळा बनला तर आश्चर्य कसलें? अर्थातच इंग्रजांनीं प्रस्थापिलेली

शांतता व व्यवस्था पुष्कळ काळ अबाधित राहिली. मूठभर रामोशी सोडून इतर सर्व वर्ग निर्वीर्य व इंग्रजानुकूल असेच राहिले. पण ही नुसती निर्बलांची निष्क्रियता होती हें विसरून चालणार नाहीं.

या निष्क्रियावस्थेचें वर्णन आतां केलें पाहिजे. इंग्रजांचें साम्राज्य हिंदुस्थानभर पसरून इंग्रजांचा सहवास हिंदी लोकांना घडला ही सांस्कृतिक दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची गोष्ट घडली. या सहवासानें इंग्रजी आणि हिंदी या दोन संस्कृतींची गांठ पडली व त्यांमध्यें विनिमयाचे अनेक प्रसंग उद्भवले. इंग्रजांची संस्कृति ऐतिहासिक दृष्ट्या उच्च दर्जाची होती असें मागें म्हटलें. * पण ज्या सामाजिक व आर्थिक विकासानें ही संस्कृति इंग्रजांना लाभली होती तसा विकास येथें झाल्याखेरीज इकडील लोकांच्या पचनीं ती पडणें शक्य नव्हतें. पण हिंदुस्थानचा हा सामाजिक व आर्थिक विकास सहाजासहजीं झाला नाहीं. परकीय राजकर्त्यांची स्वहिततत्पर दृष्टि व एतद्देशीय समाजाची जुन्याला कवटाळून राहाण्याची वृत्ति–या दोन गोष्टींचा संयोग जमल्यामुळें आर्थिक व सांस्कृतिक सुधारणा हिंदुस्थानांत होणें जड गेलें. हिंदी व्यापारधंदे बुडाल्यामुळें हिंदुस्थानचें आर्थिक संक्रमण मंदावलें. एतद्देशियांच्या परंपराभिमानामुळें इंग्रजी संस्कृतीचा तिरस्कार होऊं लागला. परंतु ही स्थिति फार काल टिकणें शक्य नव्हतें. कालांतरानें हिंदुस्थानांत आर्थिक सुधारणेसाठीं धडपड होऊं लागली व इंग्रजांच्या संस्कृतींतील उच्च तत्त्वांचें अनुकरण कांहीं सुबुद्ध विचारवंतही करूं लागले. पण हा दिवस उजाडेपर्यंतची ( व त्यानंतरचीही थोडीशी ) विचारपरंपरा कांहींशी तडजोडीची व कांहींशी अंधानुकरणाची अशीच राहिली.

इंग्रजांपूर्वी कांहीं शतकें मुसलमानांचा सहवास हिंदु जनतेला घडला होता. त्याही वेळीं दोन संस्कृतींमध्यें अशीच तडजोड झाली. पण तिचीं कारणें मात्र वेगळीं आहेत. मुसलमानांचीही दृष्टि स्वहिततत्परच होती. परंतु ते हिंदुस्थानांतच स्थाईक होऊन राहिल्यामुळें त्यांनीं केलेल्या सुधारणा हिंदुस्थानांतच राहिल्या. अर्थात् त्यांची संस्कृति अनुकरणीय असती तर तिचा फैलाव अगदीं

---

* पाहा: पृ. ६६

सुलभतेनें झाला असता. परंतु मुसलमानांची संस्कृतीच हिंदु संस्कृतीहून उच्च दर्ज्याची नव्हती. शिवाय त्यांनीं ती हिंदु जनतेवर जबरदस्तीनें लादण्याचा प्रयत्न केल्यामुळें हिंदूंची प्रतिकारबुद्धि साहजिकच जागृत झाली, व हिंदु संस्कृतीचें उच्चाटन व्हावयाचें राहिलें. पण हिंदुस्थानवर मुसलमानांनीं कित्येक शतकें राज्य केलें. आणि राज्यकर्त्यांची संस्कृति पुढें मागें जनतेंत फैलावतेच या ऐतिहासिक नियमानें मुसलमानी व हिंदु या दोन संस्कृतींचा थोडाबहुत मिलाफ झालाच. या मिलाफाचें गोड प्रत्यंतर हिंदी कलाकुसरींत विशेष उत्कटत्वानें मिळतें. आजची हिंदी शिल्पकला व हिंदुस्थानी संगीत या मिलाफाचींच फळें होत. कबीर व नानक यांचे धर्मपंथही याच सांस्कृतिक संयोगाचे द्योतक ठरतात.

इंग्रजी आक्रमणाच्या एका विशेषामुळें त्याचे परिणाम थोडे गुंतागुंतीचे झाले. महाराष्ट्रापुरतेंच बोलावयाचें म्हटलें, तर इंग्रजांची पकड आमचेवर जशी बसली तशी मुसलमानांची कधींच बसली नाहीं. इंग्रजांचें सामर्थ्य व स्थाईकता हीं दोन्ही मुसलमानांच्या पेक्षां अधिक होतीं. अर्थातच मुसलमानांचें अनुकरण महाराष्ट्रांत झालें त्याहून अधिक अनुकरण इंग्रजांचें झालें. पण, वर दर्शविल्या-प्रमाणें, त्याचा मार्ग सिधा नव्हता. समाजाचा आर्थिक पाया सुधारल्याखेरीज कोठ-लीही सांस्कृतिक सुधारणा टिकाऊ स्वरूपांत घडवून आणणें कठिण असतें. आर्थिक स्थित्यंतरानें जी सुधारणा होते तीच कायम स्वरूपाची व पुष्कळशी स्वयंस्फूर्त असते. अशी स्वयंस्फूर्त सुधारणा अव्वल इंग्रजींत होणें अशक्य होतें. इंग्रजांची आधुनिक व्यापारी संस्कृति अंगीं बाणण्यास समाजाच्या जीवनांत जें आर्थिक स्थित्यंतर व्हावयास हवें होतें तें होणें इंग्रजांच्या स्वहिततत्पर धोरणामुळें जड गेलें. साहजिकच अव्वल इंग्रजींतील इंग्रजानुकरण स्वयंस्फूर्त नव्हतें. इंग्रजांचें सामर्थ्य, त्यांची सुव्यवस्थित राज्यपद्धति, न्यायदानाची व शिक्षणाची त्यांनीं लावलेली व्यवस्था इत्यादि गोष्टींचा दाब जनतेवर पडला, व त्यामुळें महाराष्ट्रीय समाज—विशेषतः नवशिक्षितांची पिढी—एकदम इंग्रजानुकूल झाली. हे नवशिक्षित बहुधा अर्धशिक्षितच असल्यामुळें व त्यांपैकीं बहुतेक सर्वच सरकारी नोकर असल्यामुळें इंग्रजांचें अनुकरण करणें 'फॅशनेबल' ठरलें.

प्रथम प्रथम दृग्गोचर झालेलें इंग्रजांचें लोकानुनयाचें व प्रगतिपर धोरण कायम टिकणारें असतें तर इंग्रजी संकृति इकडे पसरण्यास फारसा अवधि लागला

नसता. परंतु इंग्रजांचें हें धोरण अल्पावधींतच बदललें. व त्या कारणानें इंग्रजी संक्रमणाचे सांस्कृतिक परिणाम धडधोपट न होतां गुंतागुंतीचे झाले.

इंग्रजांच्या मोहक आचारविचारांमुळें अव्वल इंग्रजींतील पहिली पिढी दिपली हेंच खरें. इंग्रजांच्या चालीरीतींचें अनुकरण – पुष्कळदां केवळ अंधानुकरण–करण्यांतच पुष्कळांना – विशेषतः सरकारी नोकरांना – धन्यता वाटूं लागली. कित्येकांनीं राज्यकर्त्यांचा धर्म स्वीकारला; तर इतर कांहींनीं इंग्रजांच्या गुणापेक्षां त्यांच्या दोषांचाच कित्ता अधिक तन्मयतेनें गिरविण्यास सुरवात केली. They had made vice fashionable in Poona असें नामदार गोखल्यांच्या बाळपणांतील स्थितीचें प्रत्यंतर यावेळीं कितीतरी पटीनें येई. पण सर्वच नवशिक्षित या अंधानुकरणाला बळी पडले नाहींत. स्वतःच्या संस्कृतीचा अभिमान धरूनही आपणांला इंग्रजांचे गुण उचलणें शक्य आहे याची जाणीव त्यांपैकीं कांहींना होती. कै. बाळशास्त्री जांभेकर हे अशांपैकीं अग्रगण्य होत. इंग्रजांपेक्षां आपण कमी आहोंत; सबब ज्ञानप्राप्ति करून त्यांच्या बरोबरीनें येण्याचा प्रयत्न केल्याखेरीज आपणाला तरणोपाय नाहीं असें त्यांना वाटे. यामुळेंच त्यांनीं आपलें सर्व आयुष्य ज्ञानार्जन व ज्ञानदान या दोन कार्यांत वेंचिलें. इंग्रजांच्या प्रगतिपर चालीरीतींबद्दल त्यांना आदर होता; व त्यांचें योग्य तें अनुकरण ते करीतही. जांभेकर सुधारक – कर्ते सुधारक – होते. पण इतर अनेक सुधारकांप्रमाणें त्यांचा स्वसंस्कृतीविषयींचा अभिमान सुटला नव्हता. ख्रिस्ती झालेल्यास त्यांनीं पुनः हिंदु करून घेतलें यांत त्यांचा हिंदु संस्कृतीबद्दलचा तीव्र अभिमान तर व्यक्त होतोच; पण त्याचबरोबर त्यांच्या सुधारणेची कार्यक्षमताही प्रत्ययास येते. पण जांभेकरांची सुधारणाबुद्धि असावी तितकी व्यापक नव्हती. समाजाला लागलेल्या रोगाचें योग्य निदान त्यांना झालें नव्हतें. त्यामुळें त्यांची सर्व मेहनत समाजांत प्रत्यहीं दिसणारीं खुळें काढून टाकण्याचा प्रयत्न करण्यांतच खर्ची झाली. त्या खुळांचें कारण शोधून काढणें त्यांना साधलें नाहीं. शिवाय त्यांचे सर्व प्रयत्न शिक्षित वर्गापुरतेच मर्यादित होते. त्यामुळें जांभेकरांच्या सुधारणाबुद्धीचें स्वरूप पुष्कळसें तडजोडीचेंच ठरतें.

अव्वल इंग्रजींतले दुसरे सुधारक लोकहितवादी. त्यांच्या कार्याचें समालोचन

करण्यापूर्वी जांभेकरांचें हें तडजोडीचें अनुकरण प्रगतिपर कां याचें दिग्दर्शन करावयास हवें. एकंदर जागतिक संस्कृतीचें ऐतिहासिक स्वरूप अभ्यासिलें तर तिचा प्रवाह स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या त्रयीच्या अनुरोधानें वहात असलेला दिसेल. म्हणजे मानवी इतिहासांत या तीन तत्त्वांचा एकसारखा अप्रतिहत विकास झाला आहे असें नव्हे. या तत्त्वांना धुडकावून लावल्यानेंच ज्यांची तुंबडी भरते असे वर्ग व व्यक्ती त्यांना नष्टप्राय करण्यासाठीं टपून बसलेले असतातच. कित्येकदां तर या तत्त्वांच्या गोंडस आवरणाखालींच त्यांचा खून पाडण्याचा प्रयत्न झाला असल्याचें इतिहासावरून कळतें. फ्रेंच क्रान्तीच्या वेळीं मध्यम वैश्यवर्गानें या तीन तत्त्वांकरितांच बंड आरंभिलें. परंतु त्या वर्गाच्या हातीं सत्ता आली तेव्हां हीं तत्त्वें पायदळीं तुडविण्यास या वर्गास काडीइतकें तरी दुःख झालें काय ? खरोखर, कार्ल मार्क्स म्हणतो त्याप्रमाणें, जेव्हां जेव्हां या वर्गानें स्वातंत्र्य, समता आणि बंधुत्व या तीन तत्त्वांची घोषणा केली तेव्हां तेव्हां त्याचें सर्व चित्त घोडदळ, पायदळ आणि तोफखाना यांवरच वेधलेलें असे; कारण या साधनांमुळेंच त्याच्या संपत्तीचें व मालमत्तेचें संरक्षण होणार होतें. अशा या तत्त्वद्रोहामुळें आणि जुलमी वर्गांच्या आसुरी आसक्तीमुळें या तत्त्वांची पिछेहाट झालेली मधुनमधून दिसते. परंतु या पिछेहाटीविरुद्ध झगडण्यास ध्येयवादी वर्ग सदैव तयार असतातच. अशा झगड्यांतूनच प्रगतीचा मार्ग खुला होत असतो. आणि तशी प्रगति झाली असल्याचें आजवरच्या इतिहासावरून दिसतेंही.

या तीन तत्त्वांच्या अभिवृद्ध्यर्थ ज्या व्यक्तींनीं आपले देह झिजविले आणि आपलें विचारसर्वस्व खर्चिलें त्यांनाच प्रगतिपर असें म्हणतां येईल. या पुस्तकांत फक्त विचारांचीच पाहाणी केली असल्यानें कांहीं शेलक्या विचारवंतांचाच येथें विचार केला आहे. त्यांपैकीं ज्यांनीं म्हणून या तत्त्वांच्या प्रसारार्थ आपली बुद्धि उपयोजिली ते सर्व प्रगतिपरच ठरतात. परंतु त्यांपैकीं जे बुद्धिप्रामाण्यवादी आहेत, किंवा बुद्धिप्रामाण्य हेंच ज्यांच्या विचारांचें अधिष्ठान आहे त्यांची योग्यता विशेष महत्त्वाची. कारण मानवी व्यवहारांत बुद्धिप्रामाण्याइतकें दुसरें अचुक साधन कोणतें आहे ? बुद्धि हें अंतिम प्रमाण नव्हे खरें, पण बुद्धिव्यतिरिक्त जीं इतर प्रमाणें आहेत तीं बुद्धीहून अधिक अविश्वसनीय आहेत

याचें काय ? म्हणूनच बुद्धीची मातब्बरी विशेष वाटते. मानवी स्वभावांत बुद्धिप्रामाण्याला अवकाश कमी असतो; मनुष्यप्राणी हा सहजप्रेरणांचाच गुलाम असतो, हें जरी खरें असलें तरी तो जर सर्वस्वीं यांवर विसंबून राहील तर लवकरच नष्टत्वास पोंचेल यांत संशय नाहीं. भावनांच्या खवळलेल्या समुद्रांत बुद्धिप्रामाण्य हाच एकमेव आधार ठरतो.

लोकहितवादींचे विचार जांभेकरांच्या मानानें अधिक व्यापक व सखोल होते. इंग्रजांच्या सहवासानें हिंदुस्थानचे उद्योगधंदे बसले व देशाला दारिद्र्य आलें ह्याची जाणीव त्यांना होती. तें दूर करण्यासाठीं त्यांनीं स्वदेशी व बहिष्कार हे आजलाही अनुकरणीय असे मार्ग सुचविले. त्यांच्या राजकीय आकांक्षा व्यापक होत्या. इंग्रजांना त्यांनीं गुरु लेखिलें तरी त्यांची राजवट ही एक इष्ट अशी पण आपत्तिच आहे असें त्यांना वाटे. त्यांची स्वातंत्र्याचीं सुखस्वप्नें अमेरिकन धर्तीचीं होतीं. लोकहितवादींची दृष्टि चौफेर फिरे. म्हणूनच त्यांच्या लिखाणांत विविध विचार आढळतात. 'शास्त्रास येकीकडे ठेवून' बुद्धीस पटेल तसें वागणें त्यांना प्रिय होतें. पण ते बुद्धिप्रामाण्यवादी खास नव्हते. जुन्या आर्य संस्कृतीवर त्यांची विलक्षण निष्ठा असे. आर्यांची जुनी संस्कृति अत्यंत उज्ज्वल असून मध्यंतरीं पुराणांच्या काळांत हिंदुस्थानचा पडता काळ सुरू झाला असें ते म्हणत. त्यांची ही समजूत किंवा इंग्रजांना ईशप्रेषित मानण्याची त्यांची प्रवृत्ति, यांमुळेंच लोकहितवादींच्या बुद्धिवादास गौणत्व प्राप्त होतें. लोकहितवादींची सुधारणा व्यक्तिवादावर अधिष्ठित होती खरी, पण व्यक्तिवादाचा त्यांनीं पूर्ण शास्त्रीय दृष्टीनें विचार केला होता असें नाहीं. इंग्रजानुकरणाचाच तो एक परिणाम होता. मात्र हें अनुकरण नुसतें अंधानुकरण नव्हतें म्हणूनच लोकहितवादी प्रगतिपर ठरतात.

लोकहितवादींना जुन्या सुधारक मंडळींकडून त्रास झाला. सामाजिक बहिष्काराची झळ त्यांना दोनदां सोसावी लागली. पण स्वमतासाठीं वाटेल ते हाल सोसण्याची त्यांची तयारी नव्हती. म्हणून प्रायश्चित्त घेण्याचा किंवा काशींतील ब्राम्हणांकडून शुद्धिपत्रें आणण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारला. लोकहितवादी कर्ते सुधारक नव्हते. त्यांच्या विचारांस स्वार्थत्यागाची जोड नव्हती. अर्थातच त्यांची अवहेलना करणें सोपें झालें.

लोकहितवादी पुष्कळ वर्षें जगले तरी त्यांचीं सुधारकी मतें प्रथम लोकांच्या पुढें १८५० च्या आंतच आलीं. १८५० नंतर महाराष्ट्रांत सुधारणांचा प्रभातकाल सुरू झाला असें म्हणतां येईल. शासनसंस्थेचें यंत्र व्यवस्थितपणें उभें होऊन सुरळीत चालू राहाण्यास एतद्देशियांशीं सहकार्य करणें इंग्रजांना भागच पडलें. व त्याकरितां त्यांनीं पाश्चात्यपद्धतीनें विद्यादान सुरू केलें. तसेंच देशांत शांतता टिकण्यासाठीं व व्यापारवृद्धि होण्यासाठीं नवीं दळणवळणाचीं साधनें, टपालखातें, तारीयंत्र वगैरे सुधारणा इंग्रजांनीं केल्या. एतद्देशियांना शिक्षण देऊन त्यांची प्रवृत्ति इंग्रजानुकूल करण्याचाही हेतु विद्यादानाच्या धोरणांत समाविष्ट असेल. नवशिक्षितांनीं १८५७ च्या बंडावेळीं इंग्रजांना जो पाठिंबा दिला त्यावरून या अनुमानास बळकटी येते. पण वाघिणीच्या दुधावर पोसलेले आत्मे सदासर्वदा विनम्रच कसे राहतील ? इंग्रजी ग्रंथकारांच्या अभ्यासानें बरींच उदारमतवादी तत्त्वें नवशिक्षित पिढीनें आत्मसात् करून घेतलीं. कांहीं काल हिंदुस्थानांतली इंग्रजी राज्यपद्धति या तत्त्वानुरोधानेंच चालते असें या नवशिक्षितांना वाटलें, आणि म्हणूनच त्यांनीं बंडाच्या वेळीं इंग्रजांचा पक्ष उचलला असावा. परंतु अल्पावधींतच इंग्रजी राज्यपद्धति इंग्रजी ग्रंथांत सांगितलेल्या नियमानुसार चालत नसल्याचें किंबहुना तिनें कित्येकदां ते नियम धुडकावून लाविले असल्याचें त्यांच्या प्रत्ययास आलें, व त्यांच्या मनांत चलबिचल सुरू झाली.

अशा नवशिक्षितांमध्येंच न्या० रानडे यांची गणना होते. विश्वविद्यालयाची अत्युच्च पदवी मिळवून आपल्या ज्ञानानें व व्यासंगानें त्यांनीं पदवीधरमुकुटमणि हें अभिधान प्राप्त करून घेतलें. अर्थशास्त्र व राजनीतिशास्त्र यांच्या गाढ अभ्यासामुळें त्यांना देशाच्या आर्थिक व राजकीय अवनतीची यथार्थ कल्पना आली होती. आपला समाज खुळसट समजुती व अनिष्ट चालीरीती यांत गुरफटला आहे व त्यांतून बाहेर पडल्याखेरीज देशांत एकराष्ट्रीयत्वाची वाढ होऊन त्याला राजकीय दर्जा प्राप्त होणें शक्य नाहीं याची जाणीव त्यांना होती. पण रानड्यांची सुधारणाबुद्धि एकांगी नव्हती. परचक्राच्या फेऱ्यामुळें हिंदुदेश आर्थिक दृष्ट्या निकृष्टावस्थेंत पडला आहे आणि हिंदी उद्योगधंद्यांची वाढ झाल्याखेरीज त्याची उन्नति होणार नाहीं हें त्यांना पटलें होतें. त्यांनीं स्वदेशीवर दिलेलीं व्याख्यानें; इंडस्ट्रिअल असोसिएशन ऑफ वेस्टर्न इंडिया यासारख्या

त्यांनीं स्थापलेल्या संस्था व त्यांनीं भरविलेलीं औद्योगिक प्रदर्शनें—हे प्रयत्न याच दिशेनें होते. ज्याप्रमाणें शरिराच्या एकाच अवयवाचा परिपोष करून शरीर-संवर्धनाचें कार्य साधत नाहीं तद्वतच समाजाच्या एकाच प्रश्नावर किंवा सुधारणेवर भर देऊन देशाचा सर्वांगीण विकास साधणार नाहीं, अशी त्यांची दृढनिष्ठा होती. पण रानड्यांच्या सर्वच सुधारणांना धर्माचें अधिष्ठान होतें. त्यांची सुधारणाबुद्धि सर्वगामी होती; सर्व सुधारणा एकसमयावच्छेदें करून होणें यांतच समाजाचें खरें कल्याण आहे असें त्यांना वाटे. व तसें त्यांनीं आपल्या एका सुप्रसिद्ध वचनांत म्हटलेंही आहे. पण त्यांतही त्यांचा सश्रद्ध दृष्टिकोण दृग्गोचर होतोच. तें वचनच पाहा: 'You cannot have a good social system when you find yourself low in the scale of political rights, nor can you be fit to exercise political rights and privileges unless your social system is based on reason and justice. You cannot have a good economical system when your social arrangements are imperfect. If your religious ideals are low and grovelling you cannot succeed in social, economical and political spheres.'

या सर्वांगीण सुधारणेच्या ध्येयामुळेंच नोकरींत राहूनही रानड्यांनीं राजकीय चळवळ केली. त्यांचें राजकीय ध्येय यद्यपि नेमस्त असलें किंवा इंग्रजांच्या हातांतून राज्य काढून घेण्याच्या गोष्टी त्यांना 'फाजीलपणा' च्या वाटत असल्या, तरी शुद्ध तात्त्विक दृष्ट्या त्यांचे राजकीय विचार क्रान्तिकारकच ठरतात. इंग्लंडच्या पार्लमेन्टांत हिंदी लोकप्रतिनिधींना बसण्याचा अधिकार असावा अशा अर्थाचा अर्ज त्यांनींच प्रथम पार्लमेन्टास पाठविला. या मागणी-अर्जाचें स्वरूप कितीही तडजोडीचें असलें तरी त्यांत एक नवीन तत्त्व विशद झालें, व त्यामुळेंच त्या अर्जाला महत्त्व आहे. रानड्यांना हिंदुस्थानचा कारभार हिंदी लोकांच्या संमतीशिवाय इंग्लंडांतून चालावा हें पसंत नव्हतें. म्हणजे राज्य करण्याचा हक्क ( Sovereignty ) लोकांतच असावा असें त्यांचें म्हणणें होतें. हें तत्त्व हिंदुस्थानांत अगदीं नवीन होतें. तें रानड्यांनीं या अर्जांत व्यक्त केल्यामुळेंच रानड्यांचें महत्त्व विशेष आहे. पण रानड्यांच्या लोकसत्तात्मक ध्येयांत एक वैगुण्य आढळतें. पार्लमेन्टांत हिंदी प्रतिनिधी असावे एवढया मागणीचा अर्थ हिंददेशावर

हिंदी जनतेखेरीज दुसऱ्या कोणाचीही हुकमत चालणार नाहीं, असा होत नाहीं. * असें लोकासत्तात्मक ध्येय व्यक्त करण्याचा मान लोकहितवादींकडे जातो. पण त्यांतही निर्भेळ राष्ट्रीयत्वाचा अभावच होता. शिवाय लोकहितवादींचे विचार वाङ्मयांतच राहिले. स्वतःचें तत्त्व प्रत्यक्ष अमलांत यावें म्हणून रानड्यांनीं अहर्निश खटपट केली तशी देशमुखांनीं केली नव्हती. त्यामुळें रानड्यांची योग्यता केव्हांही वरचढच ठरते.

परंतु रानड्यांच्या सुधारणाबुद्धींत एक मोठा दोष आढळतो. ते बुद्धिप्रामाण्यवादी नव्हते. इंग्रजी ग्रंथांच्या वाचनानें इंग्रजी संस्कृतींतील प्रगतिपर तत्त्वें त्यांना पटलीं होतीं. पण परकीय संस्कृति चांगली असली तरी ती पचविण्यास बुद्धिप्रामाण्य लागतें. पण मनुष्यप्राणी साधारणतः परंपरेचा अभिमानी असतो. हा परंपराभिमान रानड्यांच्या ठायीं उत्कटत्वानें वसत होता. म्हणूनच प्रत्येक सुधारणेला शास्त्राधार दाखविण्याचा त्यांचा अट्टाहास असे. ज्या धर्मपंथाचे ते अभिमानी होते तो धर्मपंथही भागवतधर्माचाच एक पंथ आहे असें त्यांचें म्हणणें होतें. त्यांचा हा परंपराभिमान अर्थशास्त्रासारख्या शास्त्रीय विवेचनांतही डोंकावतो. म्हणूनच त्यांनीं गणितशास्त्राप्रमाणें अर्थशास्त्राचे नियम अबाधित नाहींत, सबब हिंदुस्थानचें अर्थशास्त्र पाश्चात्य अर्थशास्त्राहून निराळें असावें, असें प्रतिपादिलें. इंग्रजांना ईशप्रेषित गुरु मानण्याचा त्यांचा प्रघात किंवा डिव्हाइन डिस्पेन्सेशनचें त्यांचें 'तत्त्वज्ञान'—यामुळेंही रानड्यांच्या बुद्धिवादास वैगुण्य येतें. रानड्यांचा नेमस्तपणा रास्त अडचणींमुळें उद्भवला नव्हता. त्याचा उगम या अशा भोळसट समजुतींतच सांपडतो. म्हणूनच त्याचें स्वरूप हिणकस ठरतें.

रानडे पदवीधरांचे मुकुटमणि खरे. पण त्यांच्या कार्याचें क्षेत्र पदवीधरांपुरतेंच मर्यादित राहिलें. त्यांच्या औद्योगिक चळवळीमुळें त्यांचा संबंध कांहीं

* इंग्लंडच्या पार्लमेन्टांत हिंदी प्रतिनिधी असावे याचा अर्थ हिंदुस्थानवर राज्य करण्याचा हक्क इंग्रजांबरोबर हिंदी जनतेलाही असावा एवढाच होतो. हिंददेशावर अधिकार चालविण्याचा हक्क हिंदी लोकांखेरीज इतर कोणाचाही नाहीं हेंच खरें राष्ट्रीय लोकसत्तेचें तत्त्व.

भांडवलदारांशीं आला असला तरी बहुजनसमाजाला त्यांच्या कार्याची दादही नव्हती. म्हणून रानड्यांची कीर्ति अखिल भारतीय असली तरी ती भारतवर्षाएवढी विशाल नव्हती. तिची मर्यादा सुशिक्षित मंडळीपुरतीच होती. जनसंमर्दाला त्यांचें नांव ऐकूनही ठाऊक नव्हतें.

बहुजनसमाजावर जिचें वजन तेव्हां थोडेंबहुत बसलें व पुढें जोमानें फोंफावून अद्यापही तें कायम आहे अशी रानड्यांची समकालीन व्यक्ति म्हणजे जोतीबा फुले. फुल्यांचें शिक्षण बेताबाताचें असलें तरी त्यांचा व्यासंग बरा होता. व मिशनऱ्यांचे संगतीनें त्यांचे विचार बरेच व्यापक बनले होते. परंतु जो अवघड प्रश्न सोडविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, त्याचा पुरेसा अभ्यास त्यांनीं केला नव्हता. इतकेंच नव्हे, तर little knowledge is a dangerous thing या म्हणीची प्रचीति त्यांचे ग्रंथ चाळतांना वारंवार येते. ब्राह्मणांच्या इराणी पूर्वजांबद्दल त्यांनीं केलेलीं विधानें किंवा ब्राह्मणी वर्चस्वाची त्यांनीं लावलेली उपपत्ति त्यांच्या अभ्यासाभावाचीच साक्ष देतात. परंतु जोतीबांची सुधारणाबुद्धि प्रामाणिक होती. इतकेंच नव्हे, तर दडपलेल्या समाजाच्या दुःखाची जाणीव तिला झाली, यांतच तिचें वैशिष्टय आहे. ब्राह्मणेतर दलित वर्गांचें पुढारीपण त्यांनीं स्वीकारलें, व त्यांचीं गाऱ्हाणीं वेशीवर टांगण्यास ते पुढें सरसावले. त्यांची सुधारणाबुद्धि इतकी विशुद्ध होती कीं त्यांची सर्व विचारसरणी जातिनिष्ठ असूनही त्यांनीं अनाथ बालिकाश्रमस्थापना व पुनर्विवाह यांसारख्या ब्राम्हण व इतर वरचढ वर्ग यांनाच विशेष उपकारक ठरणाऱ्या प्रश्नांबाबत धडपड केली. तरीपण त्यांची जातिनिष्ठ विचारसरणी व त्यांनीं प्रसृत केलेली विशिष्ट अशी ब्राह्मणेतर चळवळ यामुळेंच फुल्यांचें वैशिष्ट्य आहे. एका विशिष्ट जनसमूहाकरितां लढाऊ अशी वेगळी चळवळ करण्याची कल्पना फुल्यांनींच महाराष्ट्राला प्रथम दिली. आणि त्यांतच त्यांचें ऐतिहासिक महत्त्व सांठविलेलें दिसतें.

पण उच्चवर्णीयांच्या दाबाचें खरें शास्त्रीय स्वरूप फुल्यांना ओळखितां आलें नाहीं, हेंच त्यांच्या कामगिरींतलें मोठें वैगुण्य. त्यांना ‘ हिंदु ’ ब्राह्मणाचें वर्चस्व नको होतें. मग त्यांचे जागीं दुसरे ‘ख्रिश्चन’ ब्राह्मण येते तर त्याला त्यांची विशेषशी आडकाठी नव्हती. नाहींतर प्रत्येक खडोपाडीं साहेबाला जमिनी

बक्षिस देऊन या देशांत कायमचे रहिवासी करून ठेवावें अशी गुडघे टेकून त्यांनीं इंग्रजांना प्रार्थना कां केली असती ? फुल्यांना इंग्रज प्रभू तारण देणारे वाटले. आणि हाच त्यांच्या राजकीय अदूरदृष्टीचा उत्तम पुरावा होय.

अशा अदूरदृष्टीपासून सर्वथैव अलिप्त असणारे अव्वल बुद्धिप्रामाण्यवादी सुधारक म्हणजे प्रिन्सिपॉल गोपाळ गणेश आगरकर. आगरकरांचा सर्व भर बुद्धिप्रामाण्यावर असे. व्यक्तिवादी तत्त्वज्ञान त्यांनीं पूर्णत्वानें आत्मसात् करून घेतलें असल्यामुळें स्वातंत्र्य, समता आणि संमति या तत्त्वांशीं ते समरस झाले होते. आगरकरांची सुधारणा सर्वांगीण व सर्वगामी होती. सर्व सुधारणा एकसमयावच्छेदें करून व्हाव्या असा त्यांचा कटाक्ष असे. आणि म्हणूनच ते जसे सामाजिक जहाल होते तसेच राजकीय जहालही होते. वसाहतीचें स्वराज्य ही त्यांच्या राजकीय आकांक्षांची किमान मर्यादा होती. ते राजकीय चळवळीच्या आखाड्यांत उतरले नाहींत म्हणून त्यांनीं व्यावहारिक मार्गाशीं आपली फारकत करून घेतली असें म्हणणें चूक ठरतें. त्यांची सामाजिक व शैक्षणिक कामगिरीच या आरोपाला उत्तर देण्यास समर्थ आहे. शिवाय १८९५ मध्यें ते वारले, तोंपर्यंत हिंदी राजकीय चळवळ मुंडे ठोकून आखाड्यांत उतरलेली नव्हती. लोकमान्य टिळक राजकीय लढवय्ये. पण ते राजद्रोहासाठीं प्रथम तुरुंगांत गेले ते आगरकरांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनीं. दुर्दैवानें आगरकर अल्पायुषी ठरले. परंतु तेवढ्या अवधींतच त्यांनीं सुधारणेचें बावनकशी तत्त्वज्ञान महाराष्ट्रापुढें मांडलें. स्वतःच्या तत्वज्ञानास ते सदैव जागले. त्यांचा अतुल स्वार्थत्याग व कष्टमय आणि तत्त्वनिष्ठ आचरण यामुळें आगरकर विभूतिमत्त्वास पोंचतात. ×

वाघिणीच्या दुधानें ( इंग्रजी शिक्षणानें ) सुधारणेला विरोध करणाऱ्या दुर्धारकांमध्येंही चैतन्य निर्माण केलें. विष्णुशास्त्री चिपळूणकर हे अशा सुधारणाविरोधकांचे अग्रेसर ठरतात. त्यांच्यापूर्वीं जे दुर्धारक होऊन गेले, त्यांचा सुधारणाविरोध पुष्कळसा साहजिक ( instinctive ) होता. चिपळूणकरांचा सुधारणाविरोध

× श्री. खांडेकर यांनीं आगरकरांना 'देव न मानणारा देवमाणूस' म्हटलें तें उगीच नाहीं.

उच्च शिक्षणानेंही दूर झाला नाहीं. विष्णुशास्त्री मोठेसे विद्वान् नव्हते. पण अविचारीही नव्हते. त्यांचा सुधारणाविरोध स्वसंस्कृतीच्या प्रखर अभिमानामुळें उद्भवला होता. देशांत राजकीय राष्ट्रीयत्वाची ( political nationhood ) वाढ होऊन देशाला दर्जा प्राप्त व्हायला हवा असेल तर एतद्देशीय समाजांतील वेडगळ समजुतींचें व अनिष्ट चालीरीतींचें उच्चाटन झालें पाहिजे, असें सुधारकांचें म्हणणें असे. परंतु आपल्या संकृतींत कांहीं वैगुण्य आहे, किंवा आपल्या देशास कांहीं विशेष रोग झाला आहे असें चिपळूणकरांना वाटतच नसे. आणि म्हणून त्यांनीं सर्व सुधारकांची चेष्टा आरंभिली. चिपळूणकरांच्या स्वसंस्कृत्यभिमानाचें रूपान्तर स्वदेशाभिमानांत झाल्यामुळें मात्र त्यांच्या कार्याचें प्रतिगामी स्वरूप थोडेंसें कमी होतें. शास्त्रीबुवांनीं सुधारकांची कुचेष्टा करण्याची प्रथा पाडली हें त्यांचें कार्य अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचें ठरतें. परंतु त्यांनीं स्वदेशाभिमान उत्पन्न करून लोकांस राज्यकर्त्यांकडे चिकित्सक दृष्टीनें पाहावयास शिकविलें ही त्यांची कामगिरी प्रगतिपर विचारांचेंच द्योतक होय. चिपळूणकरांचे काळीं इंग्रजांस ईशप्रेषित गुरु मानण्याची पद्धत शिष्टसंमत असतां त्यांनीं इंग्रज हे तुम्हांआम्हांसारखींच माणसें आहेत व त्यांच्या राज्यकारभारावर टीका करण्याचा लोकांना निश्चित हक्क आहे, याची जाणीव करून दिली, हें कार्य प्रगतिपर नव्हे काय ?

चिपळूणकरांचे शिष्य टिळक. राजकीय प्राङ्गणांत उतरून राजद्रोहाबद्दल शिक्षा होईपर्यंत टिळकांच्या विचारांची दिशा चिपळूणकरी थाटाची पण अधिक विद्वत्ताप्रचुर अशी होती. चिपळूणकरांप्रमाणेंच त्यांना हिंदूंच्या सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाचा प्रखर अभिमान होता. सर्व हिंदी जनता हिंदी संस्कृतीच्या धाग्यानें एकत्र बांधलेली असतां तिच्यामध्यें वेगळें असें राष्ट्रीयत्व तें काय निर्माण करावयाचें ? असा टिळकांचा सवाल असे. हिंददेशास राजकीय राष्ट्रीयत्व प्राप्त करून देण्यास सामाजिक सुधारणांची आवश्यकता ती कसली ? आणि हा सर्व खटाटोप परकीय व परधर्मीय सत्ताधाऱ्यांच्या मध्यस्तीनें करण्यांत शहाणपणा तो कोणता ? अशा सुधारणा हिंदी संस्कृतीला व राष्ट्रीयत्वाला उपकारक होण्याऐवजीं अपायकारकच होतील. सुधारणा हव्या; अवश्य हव्या. पण त्यांसाठीं कांहीं अडून राहिलें आहे असें नव्हे. आधीं राजकीय स्वातंत्र्य मिळवा; मग सामाजिक सुधारणा आपणच घडून येतील—अशी टिळकांची विचारसरणी असे.

टिळकांना स्वसंस्कृतीचा---सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाचा---अभिमान कमालीचा हो( त्याचा विनियोग ते राजकीय जागृतीसाठींच करीत. टिळकांची प्रथमप्रथम' चळवळ या सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाच्या भावनेवरच अधिष्ठित होती. सार्वजनि गणेशोत्सव किंवा श्रीशिवाजी-उत्सव वगैरे चळवळी या भावनेच्या परिपोष साठींच होत्या. त्या करून जनतेंत स्वकीय संस्कृतीबद्दल अभिमान उत्पन्न करा याचा व त्याद्वारें राजकीय जागृति साधावयाची असा टिळकांचा दुहेरी हें असे. टिळकांच्या सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाच्या कल्पनेस मुळींच आधार नाहीं अ म्हणणें यद्यपि चूक असलें तरी ती स्वयंपूर्ण नाहीं एवढें खरें. भारतवर्षां अलीकडे जी राष्ट्रीयत्वाची लाट उसळली आहे तिचें स्वरूप केवळ सांस्कृतिक असतें तर ती आर्यसंस्कृतीइतकी जुनी असावयास हवी. पण ही राष्ट्रीय भावना भारतवर्षास पुष्कळशी नवीन आहे व तिचा उगम नव्या राज्यपद्धतींत व आर्थिक स्थित्यंतरांत आहे हें विसरून चालणार नाहीं. पण टिळकांचें राष्ट्रीयत्व संस्कारक्षम होतें. १९०५ च्या वंगभंगाच्या चळवळीशीं ते किती समरस झाले! त्या चळवळींतच त्यांनीं स्वदेशी व बहिष्कार यांचा मार्ग स्वीकारला. या आर्थिक उपायांस पायाभूत कल्पून टिळकांनीं आपल्या राजकीय कार्यास जेव्हां सुरवात केली तेव्हांच ते खरेखुरे सुधारक बनले असें म्हणतां येतें.

पण एका अर्थानें टिळकांचें सर्व कार्य अत्यंत प्रगतिपर झालें असें म्हटलें पाहिजे. टिळकांचें सबंध आयुष्य सरकारशीं झगडण्यांत गेलें. सरकारशीं भांडण्यांत टिळकांना अमुक एक विशिष्ट कारण लागे असें नव्हे. दुष्काळांत शेतकऱ्यांचीं गाऱ्हाणीं उचलून, क्रॉफर्ड प्रकरणांत मामलेदारांची वकिली पत्करून, वेळप्रसंगीं सावकारांचीही तरफदारी करून, कांहीं वेळां खुद्द संस्थानिकांचा कैवार घेऊन, समाजसुधारणेस विरोध करतांना ती इंग्रजांच्या साहाय्यानें होत आहे म्हणून, या नाहीं त्या निमित्तानें टिळक नोकरशाहीशीं सदैव झुंजत राहिले. सरकारविरोध हेंच त्यांच्या चळवळीचें आद्यतत्त्व होतें. सरकारविरुद्ध कोणतीही तक्रार असो किंवा जनहिताची कसलीही बाब असो टिळक तिची कड घेऊन सरकारशीं भांडायला उठले नाहींत, असें झालेंच नाहीं. जनतेच्या हक्कांविषयीं इतका जागरूक असणारा पुढारी त्या वेळीं दुसरा कोणी नव्हताच. टिळकांनीं विधायक कार्य असें फारसें केलें नाहीं म्हणून

त्यांची कामगिरी हिणकस ठरविण्याचा प्रयत्न कांहीं जणांकडून करण्यांत येतो. व तो परतविण्यासाठीं टिळकांनीं विधायक कामगिरी पुष्कळच केली असें सिद्ध करण्याचा अट्टाहास कांहीं टिळकभक्त करतात. वस्तुतः यांपैकीं कोणासच टिळकांच्या कामगिरीचें खरें मर्म उमगलेलें नाहीं. विधायक कामगिरी-साठीं टिळकांचा जन्म नव्हताच. लोकांना त्यांच्या हक्कांची जाणीव करून द्यावी, त्यांसाठीं त्यांना सरकारशीं झुंजायला लावावें, व एक हक्क मिळाला कीं दुसरा, असा क्रम आंखावा अशी टिळकांच्या कार्याची दिशा असे. या कार्यांतच टिळकांचें राजकीय महत्त्व सांठविलेलें आहे. आणि तें कोणास रतिभरही कमी करतां येणार नाहीं. पण टिळकांचें महत्त्व विशेष प्रत्ययास येतें तें त्यांच्या स्वार्थत्यागामुळें. जनतेसाठीं त्यांनीं जी खडतर हालअपेष्टा सोसली, तिच्यासाठीं त्यांनीं ९–१० वर्षें कारागृहांत जी तपश्चर्या केली, तशी तपश्चर्या त्यांचे वेळीं दुसऱ्या कोणत्याही महाराष्ट्रीय पुढाऱ्यानें केली नव्हती. या सर्व कारणांनीं टिळक बहुजनसमाजाला अत्यंत प्रिय झाले–ते 'लोकमान्य' ठरले. याचमुळें जनसं-मर्दाची विशिष्ट अशी महत्त्वाची चळवळ न करतांही त्यांना राष्ट्रीय चळवळीचें लोण खेडोपाडीं पोंचवितां आलें. ही त्यांची कामगिरी प्रगतिपर नव्हे?

गोखल्यांच्या कार्याचें स्वरूप मात्र मर्यादितच ठरतें. गोखले रानड्यांचे शिष्य खरे, पण त्यांनीं आपल्या गुरूच्या तत्त्वज्ञानाचा कमकुवत भाग तेवढाच उचलला. सरकारी अधिकाऱ्यांचीं मनें वळविणें व एतद्देशियांचें म्हणणें सरकारदरबारीं रुजू करणें यापलीकडे त्यांच्या कार्याची प्रगति फारशी होऊं शकली नाहीं. 'हे पहा. लोक भडकत चालले; सुधारणा द्या. नाहींतर ते आणखी भडकतील,' * ही भाषा जनहिताच्या तरफदारीचें द्योतक जेवढ्या अंशानें ठरते त्याच्या कैक पटीनें सरकारविषयींच्या त्यांच्या आस्थेची ग्वाही देते. 'He tried to rouse the conscience of the government; कबूल. पण या कार्याचें महत्त्वमापन नोकरशाहीला सदसद्विवेकबुद्धि कितपत असते व ती असली तर ती कितपत जागृत झाली, यावरूनच होतें. पण गोखल्यांची सुधारणाबुद्धि प्रामाणिक होती. विधायक कार्यक्रमाची मातब्बरी

---

* Speeches of G. K. Gokhale, p. 171–172

त्यांना विशेष वाटे. तो कार्यक्रम पद्धतशीर व अखंड चालू राहावा या हेतूनें त्यांनीं भारत सेवक समाजासारखी संस्था काढली व आजलाही ती कार्यरत राहावी इतकी कार्यक्षम केली. ही त्यांची कामगिरी मोठीच म्हणावयाची. पण 'ब्रिटिशांचा हिंदुस्थानशीं संबंध दैवी योजनेमुळेंच हिंदुस्थानच्या हितासाठीं आला असें आद्यतत्त्व भारतसेवक समाजाच्या सभासदांनीं मानलें पाहिजे' असा त्या संस्थेचा कटाक्ष असल्यामुळें त्या संस्थेच्या कार्यास गौणत्व प्राप्त झाल्याखेरीज राहात नाहीं.

महात्मा गांधींनीं सविनय कायदेभंगाबाबत गोखल्यांना गुरु लेखिल्यामुळें त्यांना एक निराळेंच महत्त्व आलें आहे. परंतु कायदेभंग करण्याचा जनतेला हक्क आहे अशीं वचनें टिळकांच्याही लिखाणांत आढळतात. तेव्हां ती विचारसरणी महाराष्ट्रापुढें प्रथम ठेवण्याचा मान जसा गोखल्यांना मिळतो तसा तो टिळकांनाही मिळतो. अर्थात् गांधींनीं कोणाला गुरु मानावें हा त्यांचा वैयक्तिक प्रश्न आहे.

टिळक व गोखले यांच्या राजकारणाची समाप्ति होऊन महात्माजींच्या असहकारतेस सुरवात झाली त्याचसुमारास हिंदुस्थानांत–महाराष्ट्रांत—एक नवीन युग अवतरत होतें. १९१४–१९१८ च्या महायुद्धानें जनतेच्या विचारांत अभूतपूर्व अशी क्रान्ति करून सोडली. महायुद्धानंतर महाराष्ट्रांत जी विचारसरणी प्रसृत झाली तिचें स्थूलमानानें 'नवमतवादी' असें वर्णन मागें केलें.× या नवोदित विचारसरणीचा जर कोणता विशेष असेल तर मूलगामीत्व. मूलभूत तत्त्वांना हात घालून सामाजिक व इतर सर्वच प्रश्नांचा विचार करणें, याचाच अर्थ मूलगामीत्व. या नवमतवादी विचारसरणीनें सुचविलेल्या सुधारणाही अशाच मूलगामी अतएव क्रांतिकारक आहेत. महात्मा गांधींचें तत्त्वज्ञानच घ्या. सांप्रतचा असत्य व अशांतता यांवर उभारलेला समाज मोडून सत्य व शांतता या दोन तत्त्वांची प्रतिष्ठा करावयाची हा महात्माजींच्या तत्त्वज्ञानाचा आद्य हेतु. पण असा समाज अस्तित्वांत आणण्यासाठीं खाजगी मालमत्ता, यांत्रिक सुधारणा, सैन्यें-आरमार, शासनसंस्था वगैरे सर्व संस्थांचें समूल उच्चाटन करावयास हवें. त्यांच्या तत्त्वज्ञानावरून महात्मा

× पाहा: प्रकरण १६ वें. **युद्धोत्तर महाराष्ट्र**

गांधी काउंट टॉलस्टॉयसारखे अराजक संन्याशी भासतात. त्यांचें समग्र तत्त्वज्ञान सत्य आणि त्याग यांवर अधिष्ठित आहे. या तत्त्वज्ञानाचें साम्राज्य स्थापणें असेल तर सांप्रतची समाजव्यवस्था मुळापासून उपटून टाकायला नको का ? मार्क्सचें साम्यवादी तत्त्वज्ञानही असेंच क्रांतिकारक आहे. विद्यमान समाजाची संस्थापना खाजगी मालमत्तेवर आहे. त्या संस्थेचें उच्चाटन करण्याचाच चंग साम्यवादी बांधीत असतात. जिला 'नवमतवाद' असें पूर्णत्वानें म्हणतां येतें ती विचारसरणीही अशाच स्वरूपाची आहे. सांप्रतची सर्व समाजव्यवस्था मानवी स्वभावाशीं विसंगत असल्यामुळें त्या समाजांत मनुष्य प्राण्याच्या सहज-प्रवृत्ती सदोदित दडपल्या जातात; अर्थातच त्यामुळें अनेक सामाजिक व वैयक्तिक विकृती उद्भवतात; त्या दूर करणें असेल तर सर्व समाजव्यवस्था मनुष्याच्या साहजिक प्रेरणांना उदात्त वळण लावील अशा प्रकारें रचावयास हवी, असें नवमतवाद्यांचें म्हणणें. युद्धोत्तर महाराष्ट्रांत विचारसरणीचे जे तीन प्रकार प्रामुख्यानें पुढें आले ते अशा प्रकारें मूलगामी आहेत. मनुष्यस्वभाव, समाजसंस्थापना, व तज्जन्य इतर नैतिक वगैरे प्रश्न यांच्या बुडाशीं जाऊन सत्य हुडकण्याची प्रवृत्ति युद्धोत्तर महाराष्ट्रांत विशेष जारीनें पसरली.

पण विचारसरणीचे हे सर्वच प्रकार बुद्धिप्रामाण्यवादाचे कसोटीस उतरतात असें नाहीं. महात्माजींचें तत्त्वज्ञान उघड उघड दैविकतेवर व आत्मिक उन्नतीवर आधारलेलें असल्यानें बुद्धिप्रामाण्याशीं त्याचें वावडेंच असणार. साम्यवादी मात्र स्वतःचें तत्त्वज्ञान पूर्णपणें शास्त्रीय व भौतिकतावादी आहे असें समजतात. पण तें खरें नाहीं. मार्क्सच्या तत्त्वज्ञानांत शास्त्रीय विज्ञान (Science) आणि अतिभौतिक तत्त्वज्ञान (Metaphysics) यांचें मजेदार मिश्रण सांपडतें. व मार्क्सपंथीय तत्त्वज्ञांचे ग्रंथ अभ्यासिले तर दिवसें-दिवस त्या तत्त्वज्ञानाच्या अतिभौतिक विभागाचाच वरचष्मा होत असल्याचें दिसेल. विश्वांतील सर्वच वस्तूंचें नियमन विरोधविकासवादाच्या अनुरोधानें होतें, अशी साम्यवाद्यांची दृढ समजूत आहे. या वादाच्या अनुरोधानें मानवी समाजाचें भवितव्य अजमावितां येतें असेंही ते समजतात. या कारणानेंच त्यांच्या तोंडांत अविरत वावरत असलेली ऐतिहासिक अपरिहार्यतेची (Historical Inevitability) भाषा त्यांच्या 'शास्त्रीय' तत्त्वज्ञानाशीं विसंगत ठरत नाहीं. आणि म्हणूनच जागतिक

संस्कृतीची परिणति समतासमाजांत होणार असें निश्चित विधान ते अगदीं सहजासहजीं करतात. पण शास्त्रीय पद्धतीनें विचार करावयास शिकलेलें मन भवितव्याविषयीं इतकें निश्चयानें बोलत नसतें. विज्ञानशास्त्राला अशीं निःसंदेही अनुमानें मानवत नसतात. त्या शास्त्राचा कल आज तरी संदेहवादाकडेच झुकत आहे. म्हणूनच साम्यवादी तत्त्वज्ञान बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित आहे असें म्हणवत नाहीं. स्वतःच्या आशा–आकांक्षा, स्वतःचे मनोविकार निसर्गाच्या माथीं मारण्याची मनुष्यसमाजाच्या प्राथमिक अवस्थेंतील प्रवृत्तिच या तत्त्वज्ञानांत उत्कटत्वानें दृग्गोचर होते. पण नवमतवादाचें तसें नाहीं. तो वाद सर्वस्वीं शास्त्रशुद्ध व बुद्धिप्रामाण्यवादी आहे. म्हणूनच त्याचें ईश्वरविषयक व तत्सम तत्त्वज्ञान संदेहवादी आहे. बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित असल्यामुळें नवमतवादी विचारसरणीचा उत्तरोत्तर उत्कर्ष व विकास होत जाईल असें वाटतें. पण असें निश्चित विधान करणें धाडसाचें आहे. स्वभावतःच मनुष्यप्राणी बुद्धिप्रामाण्यवादी नसतो. शिवाय ज्या वर्गांच्या आधीन मनुष्यसमाज सर्वसाधारणपणें असतो त्यांच्या प्रकृतीस बुद्धिप्रामाण्य सहसा मानवत नाहीं. तसेंच आजचें युग उदारमतवादीही नाहीं. या कारणानें बुद्धिप्रामाण्यवादी नवमताचा विकास उत्तरोत्तर होईलच असें निश्चयानें म्हणणें कठिण आहे.

महायुद्धापूर्वीं मूलगामी विचारसरणी कोणीच पुढें मांडली नाहीं असें नव्हे. मूलगामी विचारसरणी बहुधा आत्यंतिक वाटते. आत्यंतिक विचारसरणीमुळेंच विष्णुबुवा ब्रह्मचारी यांची येथें आठवण होते. महाराष्ट्राचा आद्य साम्यवादी म्हणून विष्णुबुवांना विलक्षण महत्त्व असलें तरी ते मोठे विचारवंत होते किंवा मोठे विद्वान् असें म्हणतां येत नाहीं. त्यांची वेदग्रंथांवर अनन्यभक्ति होती. परंतु ते ग्रंथ तरी त्यांनीं विचारपूर्वक आणि साकल्यानें अभ्यासिले होते असें नव्हे. वरवर दृष्टि फेंकून जे कांहीं थोडेबहुत विचार हातास लागले त्यांना स्वकल्पित सिद्धांतांची जोड देऊन विष्णुबुवांनीं आपलें तत्त्वज्ञान सजविलें. बरें, हे कपोलकल्पित सिद्धान्त तरी त्यांनीं स्वतः विचार करून काढले होते, असेंही नव्हे. त्यांच्या साक्षात्काराचेच ते पुष्कळदां परिणाम भासतात. ब्रह्मचाऱ्यांचा या ‘साक्षात्कारा’वर निरतिशय विश्वास असे. महात्मा गांधींच्या ‘आंतल्या आवाजा’चाच हाही एक प्रकार दिसतो. अशा इसमाला बुद्धिप्रामाण्यवादी म्हणणें

अर्थातच शक्य नाहीं. परंतु विष्णुबुवांचें तत्त्वज्ञान बुद्धिनिष्ठ नसलें तरी एका अर्थानें मूलगामी होतें. मालकी हक्काला मूठमाती देणें किंवा प्रचलित नीतिमत्तेचें उच्चाटन करणें—हीं कार्यें साधूं पाहाणारें तत्त्वज्ञान मूलगामी कसें नव्हे ? असे आत्यंतिक विचार प्रदर्शित करावयास लागणारें धैर्य व बेपर्वाई विष्णुबुवा एकांडे शिलेदार असल्यानें त्यांजपाशीं व्यवस्थित होती. बुवांचें तत्त्वज्ञान त्यांच्या स्वभावाप्रमाणेंच तत्कालीन समाजाला विक्षिप्त वाटलें व त्यानें त्यांची उपेक्षा केली हें ते वेळच्या सामाजिक परिस्थितीला साजेसेंच झालें.

महायुद्धापूर्वींचे खरे बुद्धिप्रामाण्यवादी मूलगामी तत्त्वज्ञ आगरकर. शास्त्रीय-ज्ञानावर त्यांची अनन्य निष्ठा होती. प्रत्येक प्रश्नाचें शुद्ध शास्त्रीय विवेचन करून त्याला बुद्धीच्या प्रखर प्रकाशांत पारखून मगच त्याविषयीं अनुमानें बांधावयाचीं अशी त्यांची विचारपद्धति असे. आणि म्हणूनच दरेक प्रश्नाच्या मूलभूत तत्त्वांना हात घालण्याचा मार्ग ते स्वीकारीत. असें करतांना भावनेच्या किंवा श्रद्धेच्या आवरणानें त्यांची बुद्धि मलीन होत नसे. या कारणानेंच 'देवतांची उत्पत्ति' वगैरे प्रश्नांवर त्यांनीं अगदीं कसोशीनें व निर्विकार मनानें लिहिलें. पण आगरकरांच्या विचारसरणीचें हें स्वरूप तत्कालीन समाजानें विशेषसें ओळखिलें नाहीं. याचें कारण उघड आहे. आगरकरांच्या सुधारकी विचारसरणीविरुद्ध तत्कालीन दुर्धारक वर्गानें एवढें मोठें काहूर माजविलें कीं त्यांना रानड्यांसारख्या परंपराभिमानी, शास्त्राधारभक्त सुधारकाशीं संगनमत करावें लागलें. वस्तुतः रानडे व आगरकर यांच्या मूलभूत तत्त्वांत काशी-रामेश्वराइतकें अंतर आहे. आज सुधारणावादी कामगारपुढारी व साम्यवादी ( कम्युनिस्ट ) यांच्या विचारसरणीमध्यें जी तफावत आढळते तशी तफावत रानडे व आगरकर यांमध्यें होती. सुधारणावादी कामगारपुढारी 'ट्रेड युनियन्स'च्या साहाय्यानें भांडवलशाहीच्या चवकटींतच कामगारवर्गाची स्थिति सुधारूं पहातात. पण भांडवलशाही नेस्तनाबूत करून समतासमाजाची संस्थापना केल्याखेरीज कामगारवर्गाला स्वातंत्र्य प्राप्त होणार नाहीं असें साम्य-वाद्यांना वाटतें. हिंदुसमाजाचा धार्मिक पाया कायम राखूनच सुधारणा घडवून आणण्याचें रानड्यांचें ध्येय असे. परंतु सुधारणांचा विचार करतांना व्यक्तिवाद हें एकच तत्त्वज्ञान आगरकरांनीं स्वतःपुढें ठेविलें. रानडे आणि आगरकर या

दोन बुद्धिवंतांमध्यें सुधारणेचा वाद रंगला असता तर त्यांमधील अंतर जनतेपुढें विशेष तीव्रतेनें आलें असतें. तसा वाद रंगण्याचा संभवही सहजसुलभ होता. ता. १४ मे १८८५ रोजीं डेक्कन कॉलेजचें वार्षिक संमेलन झालें त्या प्रसंगीं त्या दोघांमध्यें जी चकमक घडली * त्यावरून हें सहज पटतें. या दोघांमध्यें वाद रंगून दोघांचीही विचारसरणी कसोटीस लागली असती तर महाराष्ट्राच्या वैचारिक प्रगतीच्या दृष्टीनें तें अत्यंत उपकारक झालें असतें. परंतु दुर्धारकांनीं त्यांच्यावर टीकेची बेसुमार झोड उठवून त्या दोघांनाही एकाच गटांत लोटलें. आणि आश्चर्य हें कीं ज्या टिळकांनीं डेक्कन कॉलेजांतील खडाजंगीचे प्रसंगीं आगरकरांची पाठ राखली त्यांनींच पुढें त्यांचा पाठपुरावा केला. रानडे आणि आगरकर यांच्यामध्यें वाद रंगल्यानें महाराष्ट्राच्या तात्त्विक विचारसरणीस वैशद्य येणार होतें, तें या दुर्दैवी घटनेमुळें टळलें एवढें खरें.

आगरकरांच्या विचारसरणीचें वास्तविक मूलगामीत्व विशेष तीव्रतेनें लोकांसमोर न येण्यास आणखीही एक कारण घडलें. ज्या व्यक्तिवादी तत्त्वज्ञानासाठीं आगरकरांची सर्व धडपड होती तें तत्त्वज्ञान समाजाच्या आर्थिक व राजकीय संक्रमणामुळें ते वेळीं समाजांत आपाततःच पसरत होतें. आगरकरांच्या विचारांची भरारी मोठी असल्यामुळें तत्कालीन समाजाला तिचें आकलन होणें जड गेलें एवढेंच. म्हणूनच टिळकांसारखे त्यांचे विरोधक त्यांच्या सुधारणांची तात्त्विक उपयुक्तता मान्य करीत. त्यांचा मतभेद फक्त तपशीलासंबंधीं असे. पण आजच्या नवमतवादाचें तसें नाहीं. नवमतवादाचीं तत्त्वें बुद्धिप्रामाण्यावर अधिष्ठित असूनही आगरकरांच्या तत्त्वांहून अधिक मूलगामी आहेत. याचें कारण शोधावयास फार दूरचा प्रवास नको. आगरकरांच्या वेळेपासून जगाच्या शास्त्रीय प्रगतींत जी भर पडली आहे त्याचा फायदा नवमतवादाला मिळत असल्यानें त्याला मनुष्यस्वभावाचें व मानवी इतिहासाचें अधिक सम्यक् ज्ञान झालें आहे. त्यामुळें नवमतवादी विचारसरणी अधिक शास्त्रशुद्ध, तर्कशुद्ध व म्हणूनच अधिक मूलगामी ठरते. शिवाय नवमतवाद्यांचीं सर्वच तत्त्वें आजच्या समाजांत ग्राह्य ठरत आहेत असें नव्हे. एकदोन उदाहरणें हें सहज विशद करील. नवमतवादी

* न. र. फाटकः **न्या. रानडेचरित्र**. पृ. ३७०-२

विचारसरणीला राष्ट्रीय द्वंद्वें पसंत नाहींत. आंतरराष्ट्रीयत्वाचेंच ध्येय तिला मानवतें. परंतु आज जगांत सर्वत्र राष्ट्रीयत्वाचेंच वारें घुमत असल्याचें दिसेल. तसेंच, नवमतवादी प्रकृतीला आर्थिक विषमता मान्य नाहीं. तिला साम्यवादी आर्थिक समाजरचनाच प्रिय आहे. परंतु आजच्या भांडवलशाही जगांत खाजगी मालमत्तेचें संरक्षण अधिक कसोशीनें होत असल्याचें आढळेल. अशा प्रतिगामी प्रवृत्तीं-बरोबर नवमतवादी निकराचा सामना देऊं इच्छितात. व त्यामुळेंच त्यांचे विचार विशेष आत्यंतिक वाटतात. ज्या समाजांत नवमतवाद्यांच्या तडजो-डीच्या सुधारणांविरुद्धही विलक्षण काहूर माजतें, त्या समाजाला त्यांची शुद्ध स्वरूपांतील विचारसरणी वेडेपणाची वाटली तर नवल काय ? पण कोणताही भविष्यवादी तत्कालीन समाजाला वेडपटच वाटतो. पण इतिहासांत त्याचें स्थान भविष्यवादी म्हणूनच टिकतें; वेडपट म्हणून नव्हे.

'पाश्चिमात्यांचे उसने विचार' अशी नवमताची हेटाळणी जुन्या लोकां-कडून होत असते. आणि तिचा विचार करीत असतां महाराष्ट्रांत स्वतंत्र विचारांची उणीव आहे का ? असा प्रश्न उद्भवतो. पण 'स्वतंत्र विचार' या शब्दप्रयोगाचा अर्थ काय ? आजपर्यंत प्रदर्शित झालेले उत्तमोत्तम विचार खरोखर स्वतंत्र आहेत का ? एवढा मोठा विचारप्रवर्तक कार्ल मार्क्स; पण त्याचे विचार तरी सर्वस्वीं स्वतंत्र होते असें म्हणतां येईल काय ? मार्क्सच्या विचारांची पूर्वपीठिका जों जों अधिक अभ्यासावी तों तों त्याचें ऋण अधिक व्यक्त होतें. हेगेलचा विरोधविकासवाद, फॉरबॅखचा भौतिकतावाद, फ्रेंच अर्थशास्त्रज्ञांचा समाजवाद, आंग्ल साम्यवाद्यांचा मजूरवाद व रिकार्डोचें अर्थशास्त्र...इत्यादि अनेक विचारप्रवाहांचा संगम साधूनच मार्क्सनें आपलें तत्त्वज्ञान बनविलें. पण त्यामुळें मार्क्सच्या मौलिकतेस कांहीं बाध येतो असें नाहीं. किंवा त्याच्या तत्त्वज्ञानामुळें घडून आलेल्या विचारक्रांतीस कांहीं वैगुण्य येतें असें नाहीं. मार्क्सच्या विचारसरणीचा विशेष तो हाच कीं तिचें प्रत्यंतर प्रत्यक्ष जीवनांत, आजूबाजूच्या परिस्थितींत सांपडतें. मार्क्सचे विचार आकाशांतून पडले तर नव्हतेच. ठिकठिकाणांहून निरनिराळे विचारप्रवाह एकत्र आणूनच त्यांचा त्यानें प्रभावी संगम साधला, परिस्थितीचें इतर कोणाहूनही अधिक सम्यक् ज्ञान मिळविलें व तिला वळण लावण्याचा मार्ग सुचविला. हीच त्याची

खरी थोरवी. आणि म्हणूनच मार्क्सला स्वतंत्र बुद्धीचा विचारप्रवर्तक असें म्हणतां येतें.

कारण, स्वतंत्र विचारशक्ति म्हणजे काय? जगांतील विविध घटनांचे अन्योन्य संबंध जाणून, त्यांचे धागेदोरे नीट जुळवून व त्यांचा उपयोग करून परिस्थितीला योग्य वळण लावण्याचा मार्ग सुचविणारी जी शक्ति तिला स्वतंत्र विचारशक्ति असें म्हणतां येईल. पण ही शक्ति स्थलकालावलंबी बंधनांतच वावरत असते. अर्थातच कोणतेही विचार या अर्थानें स्वतंत्र असूं शकत नाहींत. कोणत्याही व्यक्तीचे विचार तिच्या कालीं अवगत असलेलें इतिहासदत्त ज्ञान, आजूबाजूची परिस्थिति व त्या व्यक्तीची स्वतःची विचारशक्ति या सर्वांवर अवलंबून असते. या दृष्टीनेंच महाराष्ट्रांत स्वतंत्र विचारांचा अभाव आहे का? या प्रश्नाची छाननी करावयास हवी.

या अनुरोधानें विचार करतां स्वतंत्र विचारशक्तीला महाराष्ट्रांत फारच थोडा वाव आहे असें दिसतें. प्रतिकूल परिस्थिति हें त्याचें विशेष डोळ्यांत भरणारें कारण होय. राजकीय पारतंत्र्य आणि आर्थिक अनवस्था हीं स्वतंत्र प्रज्ञेला पोषक कशीं ठरतील? स्वतंत्र विचारशक्ति अथवा प्रज्ञा ही मनुष्याच्या इतर मानसिक वा शारीरिक शक्तींप्रमाणेंच अनुकूल वातावरणांत विकास पावते व प्रतिकूल कालांत कुंठित होते. महाराष्ट्राची आजची परिस्थिति स्वतंत्र प्रज्ञेला सर्वथैव मारक नसली तरी तिला विशेष पोषक मात्र खास नाहीं. कर्तृत्व हें विचारांचें अधिष्ठान असतें; विचारशक्ति ही प्राधान्येंकरून हेतुपर ('purposive') असते; कार्यप्रवणता हा तिचा स्वाभाविक विशेष होय. परंतु ज्या समाजांत कर्तृत्वशक्तीला विशेषसा अवकाश नाहीं, त्या समाजांत स्वतंत्र विचारशक्तीचा परिपोष योग्य रीतीनें व्हावा कसा? महाराष्ट्र हा मूळचाच दरिद्रि; निसर्गाची मुळीं त्यावर प्रथमपासूनच अवकृपा. अशा स्थितींत मनुष्यानें कांहीं धडपड करून कृत्रिम साधनांनीं थोडीबहुत औद्योगिक प्रगति केली तरच त्याचा निभाव लागणार. पण हीं कृत्रिम साधनें इकडे उपयोजून महाराष्ट्राची कार्यक्षमता व उत्पादनक्षमता वाढविण्यास सध्यांची परिस्थिति कितपत अनुकूल आहे? तशा अनुकूल परिस्थितीच्या अभावीं शास्त्रीय ज्ञानाचा विकास आपल्याकडे विशेष न झाला तर त्यांत नवल काय? उलटपक्षीं, पाश्चात्य राष्ट्रें इतकीं

पुढें गेलीं आहेत, शास्त्रीय प्रगति तेथें इतकी भरपूर व झपाट्यानें झाली आणि होत आहे कीं विज्ञानशास्त्रांत विशेष असें कांहीं करून दाखविण्याची आवश्यकता व संधि हीं दोन्हीही महाराष्ट्राला लाभत नाहींत. आपलें शिक्षण हें सर्वस्वी पाश्चात्य पद्धतीनें चाललें असल्यामुळें पाश्चात्य ज्ञानभांडाराचीं कोठारें आपल्यासमोर अगदीं जलद व सहजासहजीं उघडतात. तीं नानाविध रत्नांनीं इतकीं गजबजलेलीं दिसतात कीं त्यांत अव्वल मराठी ज्ञानरत्नांची कांहीं आवश्यकता आहे असें आपणांस वाटतच नाहीं. तोच प्रकार अर्थशास्त्र वगैरे समाजशास्त्रांच्या बाबतींत आढळतो. दरवर्षी कित्येक हिंदी विद्यार्थी पाश्चात्य विश्वविद्यालयांत अर्थशास्त्राचें अध्ययन करण्यासाठीं जात असतात. त्यांपैकीं किती जणांनीं अर्थशास्त्राच्या मूलभूत सिद्धांतांचा अभ्यास करून त्या दिशेनें अर्थशास्त्राच्या ज्ञानांत भर टाकली आहे? खरोखर विचार करतां आपलें या शास्त्रांतलें ज्ञान पाश्चात्यांच्या मानानें पाव-अर्धपाव शतकानें मागासलेलेंच आहे. आपल्या इकडील अर्थशास्त्रज्ञांची बहुतेक सर्व विचारशक्ति अर्थशास्त्राचीं जुनीं प्रमेयें आपल्या इकडील परिस्थितीला लावून सरकारी प्रतिवृत्तांवर भाष्यें लिहिण्यांत खर्च होते. आणि ही गोष्ट समाजशास्त्राचा जो विभाग आपल्याकडे विशेष तन्मयतेनें अभ्यासिला जातो त्याची, मग इतर विभागांची काय कथा? पण यालाही परिस्थितीच कारणीभूत दिसते. आपल्याकडील अर्थोत्पादनच इतकें जुनेंपुराणें व मागासलेलें असतांना अर्थशास्त्राची प्रगति इकडे होणार तरी कशी?

साहजिकच महाराष्ट्रीय विद्वानांचें लक्ष ललितवाङ्मय व तत्त्वज्ञान यांसारख्या कल्पनागम्य विषयांकडे विशेष जावें यांत नवल नाहीं. प्रतिकूल परिस्थितीमुळें कार्यप्रवणतेचा अवरोध झाला तर मानसिक शक्तीनें अंतराळांत भराऱ्या मारून कल्पनेचीं शिडें उभारणें साहजिक आहे. अर्थात् याचा अर्थ असा नव्हे कीं औद्योगिक देशांत कल्पनागम्य विषयांना अवकाश नाहीं. किंबहुना पोटापाण्याचा प्रश्न तेथें तितकासा तीव्र नसल्यामुळें कल्पनासमाधि लावण्यास विचारी पुरुषांस अधिक अनुकूलता लाभते. येथें म्हणावयाचें तें एवढेंच कीं कर्तृत्वशक्तीला वाव नसल्यामुळें पुष्कळसे कार्योद्युक्त व क्रियावान् जीव कल्पनासाम्राज्यांतील निष्क्रिय विलासांत दंग राहातात. आपल्या इकडील विचारवंतांचें आध्या-

त्मिक ज्ञानाकडे लक्ष अधिक लागतें याचें कारण हेंच असावें. पण या प्रान्तांत तरी स्वतंत्र प्रज्ञेचा विलास कितपत आढळतो? जवळ जवळ मुळींच नाहीं. महाराष्ट्रीय तत्त्वज्ञांची बहुतेक सर्व विचारशक्ति उपलब्ध ग्रंथांवर व सिद्धान्तांवर भाष्यें खरडण्यांतच खर्च होत असते. पण येथेंही इतिहासदत्त ज्ञानाची विशालता व विविधता हेंच कारण असावें. अलीकडे पाश्चात्य तत्त्वज्ञानांत नवनवीन पंथ व नवनवीन प्रमेयें दृगोचर झालेलीं दिसतात. विज्ञानशास्त्राच्या आनुषंगानें विश्वचिंतन करण्याची प्रथा पडल्यामुळें असें होणें साहजिक आहे. परंतु वस्तुतः हे पंथ व हे सिद्धान्त कितपत नवीन आहेत? बर्ट्रँड रसेल यांनीं एके ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें तत्त्वज्ञानाची कितीही प्रगति झालेली दिसली तरी त्याचे मूलभूत प्रश्न अजून प्लटो–ॲरिस्टॉटलच्या वातावरणांतच वावरतांना दिसतात. जी गोष्ट प्लेटो-ॲरिस्टॉटलची तीच इकडच्या उपनिषदांची. मानवजातीची या बाबतींतली विचारसंपदा इतकी गडगंज आहे कीं त्यांत क्रान्ति करून सोडण्यास बरीच तपश्चर्या व अवधि लागेल. कित्येक विचारवन्त आजकाल तत्त्वज्ञानाची हेटाळणी करून त्याला दुय्यम पदावर नेऊन बसविण्याच्या किंबहुना त्याची हकालपट्टी करण्याचा बेत करतात त्याचें कारण हेंच असेल का?

एकंदरींत स्वतंत्रप्रज्ञेचा विलास आपल्याकडेच कमीच. भाषांतरें व भाष्यें करण्याकडेच आपल्या विचारवंतांचा कल अधिक झुकतो. पण जगाकडे पाहून 'मला' असें वाटतें, जगाच्या स्वरूपाबद्दल, जगत्कारणाबद्दल वगैरे 'माझें' असें मत आहे असें सांगणारा स्वतंत्र विचारांचा व निर्भीड बुद्धीचा विचारवंत आपल्याकडे विरळा. पण याचा अर्थ आपल्याइकडे स्वतंत्र प्रज्ञेचा अभाव आहे हाच का? "त्यांतली खरी गोष्ट अशी आहे कीं तत्त्वज्ञान, धर्म, समाजशास्त्र वगैरेंच्या बाबतींत अगदीं मुळापर्यंत जाण्याची व स्वतंत्रपणें विचार करण्याची फारशी ताकद आपणांत आलेली नाहीं; व म्हणूनच आपण दुसऱ्यांच्या ग्रंथांचीं भाषांतरें करून व टीका आणि सारांश लिहून आपलें समाधान करून घेतों आणि लोकांचें समाधान करूं पाहातों"× असें प्रो. वामनराव जोशी म्हणतात. व आपल्याकडे सत्य शोधणारे, सत्य बोलणारे व सत्य ऐकणारे फार थोडे अशी पुस्ती ते जोडतात. अर्थात् 'फारशी' आणि 'फार थोडे' हे शब्दप्रयोग हाताशीं असल्यामुळें

× १५ वें महाराष्ट्र–साहित्य–संमेलन, अध्यक्षीय भाषण (गोवें १९३०)

# स्वतंत्र प्रज्ञेचीं प्रतीकें

प्रो. वामनरावांना आपलें म्हणणें सांवरणें सोपें झालें आहे. परंतु 'आपला परोपजीवी, जिज्ञासाविहीन, निःसत्त्व शाब्दिक काथ्याकूट पाहिला म्हणजे एकादे वेळेस वैताग येऊन अशी इच्छा होते कीं, जुनें सर्व वाङ्मय पूर्णपणें नष्ट व्हावें. म्हणजे तरी आपण जगाकडे ताजातवान्या "आश्चर्यवत्" दृष्टीनें पाहूं लागूं व खऱ्या जिव्हाळ्याचा तात्त्विक विचार आपल्यांत सुरू होईल,'–अशी त्यांची वैतागाची भाषा पाहिली कीं सांप्रत आपल्यांत स्वतंत्रबुद्धीचा पूर्णपणें लोपच झाला आहे असें त्यांना वाटतें कीं काय ? असा संशय येतो. आतां, महाराष्ट्राचा गेला दीडशें वर्षांचा इतिहास पाहिला तर आपणांत जिज्ञासाबुद्धि व स्वतंत्र-प्रज्ञा पाश्चात्यांच्या मानानें बरीच कमी दृष्टीस पडते हें कबूल केलेंच पाहिजे. परंतु हीं दीडशें वर्षें म्हणजे महाराष्ट्राचा पडता काळच होय हें विसरून कसें चालेल ? पेशवाईच्या अखेरच्या काळांत केवळ भुरटे कारकून म्हणून आलेले सामान्य टोपीकर लोक किती जिज्ञासू, कार्योद्युक्त, धाडसी व विचारक्षम होते हें पाहिलें किंवा त्या वेळचा आपला समाज किती जिज्ञासाशून्य, आळशी, अविचारी आणि भेकड होता तें अवलोकिलें कीं आंग्ल प्रकृति महाराष्ट्रीय प्रकृतीच्या मानानें स्वभावतःच वरचढ आहे असें वाटूं लागतें. पण त्या वेळचा मराठी समाज सरंजामशाहीच्या अवनतावस्थेंत असून आंग्लसमाज भांडवलशाहीच्या उत्क्रांतावस्थेंत होता हा फरक ध्यानांत आणला कीं दोन प्रकृतींतील या भेदाची उपपत्ति लागते. वस्तुतः स्वतंत्र प्रज्ञा पूर्वीं महाराष्ट्रियांत होती व आजलाही ती दिसते, असें सहज सिद्ध करतां येईल. महाराष्ट्रांत स्वतंत्रता नांदत होती त्या वेळीं स्वतंत्र-प्रज्ञेचा किती विपुल संचय येथें होता ? शिवाजी-सारखे राष्ट्रपुरुष स्वतंत्र प्रज्ञेचीं उदाहरणें नव्हत तर कसलीं ? पण शिवछत्रपतींहून इतर कित्येक उदाहरणें मराठ्यांच्या इतिहासांतून येथें नमूद करतां येतील. धन-गराच्या अवमानित कुळांत जन्म घेऊन गनिमी काव्याचे डाव खेळणारा मल्हारराव होळकर, अवघ्या अठ्ठावीस वर्षांच्या आयुष्यांत मराठी साम्राज्याच्या फाटलेल्या आकाशास ठिगळ मारणारा माधवराव पेशवा, वीस वर्षांच्या कोंवळ्या वयांत रणांगणावर तेजानें तळपणारी झांशीची शूर राणी लक्ष्मीबाई, दिल्लीस जाऊन मोगल बादशाहीचा कारभार हांकणारा दासीपुत्र महादजी शिंदे – हीं सर्व महा-राष्ट्राच्या स्वतंत्र प्रज्ञेचीं उत्कट प्रतीकें नव्हत काय ? निर्भीड स्पष्टवक्तेपणाही

महाराष्ट्रांत कांहीं कमी नाहीं. लोकहितवादी, जोतीबा फुले, प्रिन्सिपॉल आगरकर वगैरे मंडळी स्वतःला खरी पण जनतेला अप्रिय वाटणारीं मतें किती निर्भयपणें बोलून दाखवीत ? तसेंच, न्यायमूर्ति रानडे यांनीं आपल्या स्वतंत्र बुद्धीची चमक महाराष्ट्रालाच नव्हे तर महाराष्ट्रीयेतरांसही किती उत्कटत्वानें दर्शविली ? ही केवळ पूर्वजांची स्तुति नव्हे. आपल्या पूर्वजांची थोरवी ती त्यांची थोरवी; तें त्यांच्या कर्तृत्वाचें फळ; त्यावर आपण उड्या मारण्यांत कांहीं विशेष अर्थ नाहीं – हें अगदीं खरें. परंतु ज्यांच्या स्वतंत्र प्रज्ञेबद्दल आधुनिक पिढीनेंही अभिमान वहावा अशा व्यक्ती महाराष्ट्रांत या शतकांतही जन्मल्या व जगल्या हेंही तितकेंच खरें. लोकमान्य टिळक, इतिहासाचार्य राजवाडे, गणितज्ञ नारळीकर यांची कर्तबगारी महाराष्ट्रांत स्वतंत्र प्रज्ञा अजूनही– प्रस्तुतच्या प्रतिकूल परिस्थितींतही – जीवंत आहे याची नितांत सुंदर साक्ष देत आहे. मग निरनिराळ्या प्रश्नांच्या मुळाशीं जाऊन स्वतंत्रपणें विचार करण्याची ताकदच आपल्यांत नाहीं अशी तक्रार करण्यांत काय अर्थ आहे ?

दोन चार ठळक व्यक्तींचा नामनिर्देश करून काय उपयोग ? सर्व साधारण महाराष्ट्रियांत ह्या स्वतंत्र विचारशक्तीचा अभावच दिसत नाहीं का ? – असा प्रश्न या विवेचनावर करतां येईल. पण त्याचें उत्तरही कांहीं फारसें अवघड नाहीं. महाराष्ट्र बुद्धिप्रधान आहे. महाराष्ट्राची बुद्धिमत्ता इतर प्रान्तियांच्या मानानें बरीच तिखट असल्याचें वारंवार प्रत्ययास येतें. पण महाराष्ट्र जसा बुद्धिप्रधान आहे तसाच तो दरिद्रिही आहे. किंबहुना मूळचें दारिद्र्य हेंच महाराष्ट्रियांच्या कुशाग्र बुद्धिमत्तेचें कारण असावें. पण हेंच दारिद्र्य त्या बुद्धिमत्तेचें कार्यक्षेत्र संकुचित करण्यास, तिला अनिष्ट मर्यादेंत कोंडण्यास कारणीभूत झालें आहे. महाराष्ट्रांतील जीवनकलहाचें स्वरूप इतकें तीव्र आहे कीं महाराष्ट्राची बरीचशी अव्वल बुद्धिमत्ता त्या विग्रहांतच कामास येते. इतकेंच नव्हे, तर त्या विग्रहांतील दोनही बाजूंची बुद्धिमत्ता महाराष्ट्रियांची अतएव सारखीच तीक्ष्ण असल्यामुळें उडालेली चकमक महाराष्ट्राबाहेरील प्रांतांच्या मानानें बरीच प्रखर असते. अर्थातच जीवनाच्या इतर अधिक उदात्त शाखांत प्रभाव दर्शविण्यास महाराष्ट्रास जड जातें. हा जीवनसंग्राम जर आहे याहून अधिक सुकर झाला तर महाराष्ट्राची प्रज्ञा अधिक तेजस्वी बनून सर्वंकष होईल यांत संदेह नाहीं.

# उसन्या विचाराचें महत्त्व

महाराष्ट्रांत स्वतंत्र प्रज्ञेचा प्रायः अभावच दिसतो, हा आक्षेप नवमतवाद्यांच्या नवविचारांविरुद्ध विशेष दिसतो. पाश्चात्यांच्या विचारांची 'उसनवारी' करून स्वतःच्या बुद्धीचा संसार ही मंडळी सजविते असा पुराणमतवाद्यांचा एक ठराविक आक्षेप असतो. परंतु सांप्रतचें विचारसंक्रमण ही केवळ उसनवारी नसून एक अनिवार्य घटना आहे हें विसरून चालणार नाहीं. पुराण-मतवाद्यांचे मतें सांप्रतचा नवमताचा वाद पौर्वात्य आणि पाश्चात्य या दोन संस्कृतींतील झगड्याचें निदर्शक आहे. आणि यामुळें ते स्वसंस्कृतिविघातक म्हणून नवमताचे विरोधक बनतात. पण त्यांची ही समजूत खरी नाहीं. आजचा नवमतवाद हा पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतींतील विग्रहाचें द्योतक नव्हे. आपला समाज आज 'जाति-वर्ण-आत्मक मध्ययुगीन कल्पनांचा व व्यवहारांचा' त्याग करून स्वातंत्र्य-समतेच्या आधुनिक कल्पनांचा, व आचरणांचा स्वीकार करीत आहे-या स्थित्यंतराचेंच प्रत्यंतर सध्यांच्या नवमतवादांत सांपडतें. पाश्चात्य राष्ट्रें या स्थित्यं-तरांतून अगोदरच गेलीं असल्यानें त्यांच्या विचारसरणीचा अनु-वाद येथें होणें साहजिक आहे. या अनुवादांत परतंत्र प्रज्ञेचा पुरावा शोधूं पाहाणाऱ्या व्यक्तींना हें समजत नाहीं कीं महाराष्ट्राच्या सांप्रतच्या परतंत्र-तेमुळें व प्रतिकूल आर्थिक वगैरे स्थितीमुळें नवमतवाद्यांना ही 'उसनवारी' करावी लागते. परंतु ज्याअर्थी त्यांचे विचार प्राप्त परिस्थितीचें विश्लेषण करावयास समर्थ असतात (किंवा कालतः ते तसे ठरतील) त्याअर्थी त्यांचा उगम पाश्चात्य प्रदेशांत आहे एवढ्याच सबबीवर त्यांची उपेक्षा अगर अवहेलना करणें योग्य होणार नाहीं. प्रस्तुतची निराशाजनक परिस्थिति जेव्हां बदलेल तेव्हां महाराष्ट्रांत स्वतंत्र प्रज्ञेचा प्रवाह अगदीं अप्रतिहतपणें वाहील. पण ती परिस्थिति बदलण्या-सच पाश्चात्यांच्या 'उसन्या' विचारांची मदत घ्यावी लागेल हें उघड आहे. म्हणजे स्वतःचें अंतःसामर्थ्य यथार्थतेनें प्रगट करण्यासच महाराष्ट्राला कांहीं दिवस तरी पाश्चात्य मतांचा अनुवाद करणें भाग पडेल. तो करतांना तर्कशुद्धतेच्या मर्यादा पाळल्या म्हणजे झालें. आजचे नवमतवादी याहून दुसरें कांहीं म्हणत नाहींत. मग 'पाश्चात्यांची उसनवारी' अशी नवमताची हेटाळणी करण्यांत काय फायदा ?

# महाराष्ट्रांतील कांहीं "प्रकरणें"

[ कोणत्या विषयावर कशासाठीं वाद माजतात व त्यांत तत्कालीन कार्यकर्त्यांचा पक्षाभिमान कसा दृष्टीस पडतो, हें कळल्यानें त्या समाजाची मनोवृत्ति समजण्यास पुष्कळ मदत होते. म्हणून महाराष्ट्रांत गाजलेल्या कांहीं 'प्रकरणां'ची माहिती येथें थोडक्यांत दिली आहे. जुनीं प्रकरणें आधुनिकांस नाममात्रेंच ठाऊक असतात. पण त्यांचा इतिहास मनोरंजक व उद्बोधकही असल्यानें येथें त्यांचें संक्षिप्त वर्णन दिलें आहे. ]

## मल्हारराव गायकवाड प्रकरण (बडोदें १८७५)

हिंदी–विशेषतः महाराष्ट्रीय—संस्थानिकांबद्दल गेल्या शतकांतील महाराष्ट्रियांस किती प्रेम वाटे याचें एक प्रत्यंतर मल्हारराव गायकवाड यांच्या हकीकतींत सांपडतें. वस्तुतः दुसऱ्या बाजीराव पेशव्याप्रमाणेंच मल्हारराव गायकवाड यांजविषयींही लोकांना खरी सहानुभूति नव्हती. त्यांचा कारभार लहरी व जुलमी असा झाला. सन १८७३ मध्यें त्यांच्या राज्यकारभाराविषयीं एक कमिशन बसून त्यांच्यावर अनेक प्रकारचे आरोप शाबीत झाले. शिलेदार सरदारांच्या असाम्या बुडविणें, इनामें वगैरे जप्त करणें, नोकरांकडून मूल्यवान नजराणे घेणें, न्यायकचेऱ्यांत अन्यायाचा धुडगूस घालणें, स्त्रियांना

सक्तीनें धरून राजवाड्यांत राबविण्यास नेणें...इत्यादि महाराजांचे अनेक प्रकार कमिशननें उजेडांत आणले. पण रेसिडंट साहेब, कर्नल फेअर, यांच्याशीं जेव्हां महाराजांच्या झटापटी उडूं लागल्या तेव्हां लोकांची सहानुभूति महाराजांकडे वळली. त्याच सुमारास दादाभाई नवरोजी बडोद्याचे दिवाण होते. पण त्यांच्या सात्त्विक वृत्तीस तेथील बेबंदशाही मानवणें शक्य नव्हतें म्हणून त्यांनीं दिवाणगिरी सोडली. कर्नलसाहेबांचें दुर्वर्तन सरकारासही मान्य होऊन त्यांची तेथून बदलीसुद्धां झाली. पण जाण्यापूर्वी आपल्यावर विषप्रयोग केल्याचा आरोप फेअर यांनीं महाराजांवर केला. त्यामुळें मल्हाररावांना एकदम गादीवरून दूर केलें. त्यांच्या खाजगी तिजोरींतील शिल्लक व जडजवाहीर वगैरे सर्व इंग्रज अधिकाऱ्यांनीं जप्त करून ठेविल्यानें महाराज अगदीं निष्कांचन झाले. स्वतःच्या बचावासाठीं सरकारच्या तोंडाकडे पहाण्याची पाळी त्यांना आली. त्यांच्या बचावाला एकंदर चार लक्ष बत्तीस हजार रुपये लागतील असें अंदाजपत्रक त्यांच्या सोलिसिटर्सनीं तयार केलें. पण सरकार एवढी रक्कम देण्यास तयार होईना. पैशाच्या अभावीं माझें बचावाचें काम तसेंच लोळत पडलें आहे, माझी खाजगी जप्त झाली, राणीचें स्त्रीधनही जप्त झालें, तरी मला संस्थानच्या तिजोरींतून दोन लक्ष रुपये ताबडतोब द्यावे—अशा अर्थाची तार महाराजांनीं व्हाइसरॉय साहेबांना पाठविली. तार खाजगी स्वरूपाची होती. पण तिचा गवगवा झालाच. या प्रसंगीं महाराजांच्या मदतीस सार्वजनिक सभा आली. मल्हारराव गायकवाडांच्या दुर्दशेची हकीकत पुण्यास कळतांक्षणींच सार्वजनिक काकांनीं त्यांस एक लक्ष रुपयांच्या मदतीचें आश्वासन तारेनेंच पाठवून दिलें. सार्वजनिक सभेनें या कामांत पुढाकार घेतला व तिच्याच खटपटीनें पुण्यांत एक जाहीर सभा भरली (ता० १५-१-१८७५). या सभेंत व्हाइसरॉयांकडे पाठविण्यासाठीं म. गो. रानडे यांनीं तयार केलेला अर्ज मंजूर झाला.

मल्हारराव गायकवाडांच्या विपन्नावस्थेंत महाराष्ट्रियांना सहानुभूति कां वाटते याचें दिग्दर्शन या अर्जांत प्रथमच केलेलें आहे. बडोदें, ग्वाल्हेर, इंदूर वगैरे संस्थानें मराठा राजमंडळाचेच अवशेष होत. त्यांतून बडोदें सरकारचें राज्य जुनें, संपन्न व जवळचें. मग महाराष्ट्रियांना त्याबद्दल विशेष

प्रेम वाटलें तर काय आश्चर्य ? राजा दुर्वर्तनी निघाला तर राज्य खालसा होणें हा न्याय नव्हे. महाराजांना न्याय मिळण्याकरितां, हिंदी, युरोपिअन अशा दोन्ही समाजांतील न्यायनिष्णात गृहस्थांचें संमिश्र मंडळ नेमावें आणि हिंदी गृहस्थांची निवड हायकोर्टच्या न्यायाधिशांतून किंवा महाराजांच्या बरोबरीच्या राजेरजवाड्यांतून व्हावी, अशी मागणी त्या अर्जांत होती.

सदर अर्जाचा इष्ट परिणाम होऊन महाराजाच्या इभ्रतीस साजेसें हिंदी व युरोपिअन लोकांचें न्यायमंडळ नेमण्यांत आलें. त्यांत ग्वाल्हेर व जयपूर या संस्थानांचे महाराज आणि राजे दिनकरराव असे तीन हिंदी सभासद होते. बडोद्याचें राज्य खालसा होणार नाहीं असा जाहीरनामा हिंदुस्थान सरकारनें काढला. मल्हार-रावांचा बचाव करण्यासाठीं सार्जंट बॅलन्टाइन या नामांकित बॅरिस्टराची नेमणूक झाली. जयपूरनरेश व ग्वाल्हेरकर यांनीं मल्हाररावांस निर्दोषी ठरविलें. दिनकररावांचेंही तेंच मत होतें. पण हिंदी व युरोपिअन सभासदांत मतभेद झाला. हिंदुस्थान सरकारनें विषप्रयोगाचा आरोप शाबीत धरून महाराजांना मद्रासेकडे हद्दपार केलें. या हद्दपारीच्या निषेधाचा एक अर्ज सार्वजनिक सभेतर्फे गेला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मल्हारराव महाराजांच्या सर्व वालीवारसांचा राज्यावरील सर्व हक्क नष्ट होऊन राजघराण्यांतील एकादा मुलगा महाराणी जमनाबाई साहेबांच्या मांडीवर दत्तक द्यावयाचें ठरलें. तेच सध्यांचे सयाजीराव महाराज होत.

[ न. चिं. केळकरः **टिळक चरित्र भा. १.** न. र. फाटकः **न्या. रानडे चरित्र.** ]

—o—

## गर्दभानंदाची मिरवणूक ( पुणें, ५–९–१८७५ )

आर्यसमाजाचे संस्थापक स्वामी दयानंद सरस्वती पुण्यास गेले असतां तेथील मुक्काम हलवून परतण्याचे सुमारास लष्करांतील श्री. म्हस्के वकील यांनीं स्वामींस आपल्या बंगल्यावर भाषणास बोलाविलें. त्याच वेळीं स्वामींची मिरव-णूक काढण्याचा विचार ठरला. दयानंदांनीं वेदांची मिरवणूक काढा, माझी नको असें आग्रहानें सांगितलें. पालखींत वेद ( व स्वामी अंबारींत ) आणि मिरवणुकींत एक मंडित हत्ती—अशा थाटानें दयानंद जात होते. हा

प्रकार कित्येकांना पाहवला नाहीं. त्यांनीं एका लंबकर्णाला शृंगारून पिवळसर रंगाचा फेटा त्याला बांधला. कारण स्वामीही त्याच रंगाचें शिरस्त्राण वापरीत. गर्दभाच्या पाठीवर स्वामीप्रमाणेंच, भरजरीची शाल घालून "गर्दभानंद की जय" अशा घोषांत त्याला शहराच्या सर्व भागांतून मिरविलें.

हा कुचेष्टेचा प्रकार आधींच अजमावून म्हस्के वगैरे मंडळींनीं स्वामींच्या मिरवणुकीबरोबर पोलिसांचा बंदोबस्त राखला होता. हत्ती व पालखी बुधवारांतील भिडेवाड्याजवळ येऊन स्वामी दिवाणखान्यांत पोहोंचतात न पोहोंचतात तोंच गर्दभानंदही तिकडून मिरवत आले....अशानें गर्दभानुयायांचा मोठा विरस झाला. स्वामींवर हल्ला करण्याचा त्यांचा हेतु ढांसळला. पण स्वामींच्या शिष्यांपैकीं एकानें गर्दभाच्या पाठींत बडगा घातल्यानंतर लंबकर्ण महाराजांनीं गोंधळ आरंभिला. त्याचा प्रसाद अनुयायांना योग्य तोच मिळाला. मात्र त्यामुळें गर्दभानुयायी सर्व मंडळी चिडली आणि त्यांनीं हत्तीवर, स्वामीजींच्या अनुयायांवर, दगड, विटा व रस्त्यांतील (पावसामुळें झालेल्या) चिखलाचा मारा केला. पुष्कळ प्रतिष्ठित अशा मंडळींना शिमग्यांतील प्रसाद मिळाला. हा प्रकार रात्रीं ९॥ पर्यंत चालला होता. पोलीसांवरही हल्ला झाल्यानें लोकांची व त्यांचीही मारामारी जुंपली.

—०—

## दख्खनचे दंगे (पुणें—सातारा १८७५)

१८७५ सालीं पुणें—सातारा व नगर या जिल्ह्यांत मराठा कुणब्यांनीं केलेल्या दंग्यांस 'दख्खनचे दंगे' म्हणतात. वास्तविक हे दंगे नसून कर्जबाजारी झालेल्या शेतकऱ्यांची पोटभर भाकर मिळण्याकरितां केलेली ओरड होय. फक्त तिला स्वरूप परिस्थित्यनुरूप वेगळें मिळालें.

या दंग्यांस सुरवात शिरूर तालुक्यापैकीं कर्डे गांवीं झाली. तेथील बाबासाहेब देशमुख यांनीं काळूराम व इतर मारवाडी यांकडून कांहीं कर्ज काढलें होतें. वसुलीचा मारवाडी तगादा वरचेवर होई. परंतु कांहींही कारणानें असो, कर्जफेड वेळेवर झाली नसल्यानें मारवाड्यांनीं फिर्याद लावून रीतसर डिक्री मिळवली व देशमुखांच्या शेताचा लिलांव फक्त दीडशें रुपयांस झाला. एवढ्यावरच मारवाडी थांबले नाहींत. त्यांनीं देशमुखांच्या विठ्ठल-मंदिरांतील दागिने जप्त

करून देशमुखांचें घरही पाडलें ( डिसेंबर १८७४). हा सर्व प्रकार पाहून कर्डेकर खेडवळ चिडले व मारवाड्यांवर कडक बहिष्कार पडला. मेलेलीं जनावरें सावकारांच्या घरांत फेंकण्यापर्यंत पाळी आली. सावकारांना बहिष्कारामुळें तेथें राहणें अशक्य झालें. मारवाड्यांनीं सरकारी मदत मागितली, व अशाप्रकारें शेतकऱ्यांच्या गाऱ्हाण्यास तोंड पडलें.

याच सुमारास सुपें व केडगांव या ठिकाणीं सावकारांविरुद्ध शेतकऱ्यांनीं उठाव मांडला. सुप्यास सावकारांचीं तेरा घरें जाळलीं. हेतु हा कीं, कर्ज व तत्सम कागदपत्र जळून जावे. पिंपळगांव, राहू, दौंड, मोरेगांव आंबेखुर्द, अलिगांव, धारूर, इत्यादि वीस--एकवीस खेड्यांत अशाच प्रकारचे दंगे झाले. भिमथडी तालुक्यांतील १७, शिरूर तालुक्यांतील १०, हवेलींतील ३ व इंदापूरमधील एक अशा ३१ खेड्यांतील दंगे पोलीसांच्या बंदोबस्तामुळें थांबले असा निर्देश सरकारी रिपोर्टांत आहे. सातारा व नगर जिल्ह्यांतही अशाच प्रकारचा उठाव शेतकऱ्यांनीं केला. पण सर्वत्र एक साम्य आढळतें तें हें कीं, जेथें तेथें शेतकऱ्यांनीं सावकारांवर व विशेषतः त्यांच्या कागदपत्रांवरच हल्ला केला. कारण कर्जबाजारीपणामुळेंच शेतकऱ्यांना इतका वैताग आला होता.

शेतकऱ्यांचीं कर्जें कशीं फुगत गेलीं असतील याची कल्पना येण्यास खालील आंकडे पुरेसे आहेत. पुणें जिल्ह्यांतील भिमथडी व इंदापूर तालुक्यांत नोंदलेल्या खतांची वाढ कशी झाली हें त्यांवरून कळेल. खतांची वाढ म्हणजे वाढता कर्जबाजारीपणा. शिवाय जमीन शेतकऱ्यांकडून सावकारांकडे अधिकाधिक जात चालली त्याचा तो पुरावा होय.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| इ. स. १८६६ | मध्यें | ७५२ | खातें | नोंदलीं |
| ६९ | ,, | ८७४ | ,, | ,, |
| ७० | ,, | ११९५ | ,, | ,, |
| ७१ | ,, | १२१७ | ,, | ,, |
| ७२ | ,, | १३७४ | ,, | ,, |
| १८७३ | ,, | १४१४ | ,, | ,,* |

* *Poona District Gazetteers* II–118

## आंकड्यांचें प्रमाण

अवघ्या सात वर्षांत जवळ जवळ दुप्पट खटले नोंदली. ही वाढ खरोखरच भीतिप्रद वाटते. शेतकऱ्यांच्या पिळणुकीचें वास्तविक दृश्य त्यांत आढळतें.

याच आंकड्यांच्या ओघांत १८७०-७४ मध्यें मारवाडी व सावकार यांवर झालेल्या हल्ल्यांचे ( गुन्ह्यांचे ) आंकडे ताडून पाहिल्यास सावकार-शेतकरी यांचा संबंध कसा असावा तें स्पष्ट होतें.

| | | |
|---|---|---|
| खून | — | १ |
| दरोडे | — | ५ |
| भुरटे हल्ले | — | ८ |
| चोऱ्या | — | २४ |
| दुखापती | — | २५ |
| दांडगाई | — | ८ |
| | | ७७ * |

अशी गुन्ह्यांची वर्गवारी असून ते एकजात सावकारांविरुद्ध आहेत. असो.

सर्वत्र दंगे झाल्यामुळें व त्यांचें स्वरूप सावकारांविरुद्ध असल्यामुळें सरकारला यांत लक्ष घालणें भाग पडलें. सिव्हिल प्रोसिजर कोडमधील २६६ कलमांत बदल व डेक्कन ॲग्रिकल्चरिस्ट्स रिलीफ ॲक्ट ( १८७९ च्या ) या दोन सुधारणा या दंग्यांमुळेंच झाल्या. सरकारनें चौकशी कमिटी नेमून सर्व माहिती गोळा केली व मगच त्या सुधारणा केल्या.

पुण्याच्या सार्वजनिक सभेमार्फत न्या० रानडे व सार्वजनिक काका यांनीही यावेळीं पुष्कळ मेहनत घेतली व शेतकऱ्यांची गाऱ्हाणीं जोरदार भाषेत सरकारपुढें मांडून उपाययोजनाही सुचविली. शेतकऱ्यांच्या हलाखीमुळेंच ते दंग्यास प्रवृत्त झाले; सरकारी साराधोरणांत बदल पाहिजे; सावकारांनें सारा घेतल्यास शेतकऱ्यांना पुष्कळ आराम मिळेल; सावकारांकडे शेतकरी जातात याचें कारणही सरकारच... वगैरे बाबी सार्वजनिक सभेच्या अर्जांत आहेत.

[ *Deccan Riots Committee's Report. Poona District Gazetteer.* ]

* *Deccan Riots Committee Report p. 9*

## फडक्यांचें बंड ( १८७९ )

१८५७ सालच्या उठावाचें वारें महाराष्ट्रास फारसें लागलें नाहीं. प
वीस-बावीस वर्षांनीं त्याचा वचपा वासुदेव बळवंत फडके यांनीं काढला. व
बळवंत यांचा जन्म १८४५ सालीं पनवेल तालुक्यांत शिरढोण या गांवीं
कल्याणास प्राथमिक शिक्षण आटपून त्यांनीं मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉ
प्रवेश केला. पण प्रतिकूल परिस्थितीमुळें कॉलेजांतील शिक्षणास रामराम
त्यांनीं मिलिटरी फायनान्स डिपार्टमेन्टमध्यें नोकरी धरली. पण नोकरींत
मन रमेना. आपला देश पारतंत्र्यांत, विपन्नावस्थेंत सांपडला आहे,
मुक्तता केली पाहिजे, असले विचार त्यांच्या डोक्यांत घोळत असत. '
गोष्टींचा विचार करतां माझें मन युरोपियन लोकांविरुद्ध त्यांच्या न
विचार करूं लागलें. हा विचार मी रात्रंदिवस करीत असें. रात्रींही मला
येत नसे. असें करतां करतां मी वेड्यासारखा झालों,' असें त्यावे
त्यांच्या मनस्थितीचें वर्णन त्यांनीं स्वतःच पुढें न्यायाधीशापुढें अ
जबानींत केलें. या अस्वस्थ मनःस्थितींत त्यांच्या नोकरींतील अनुभवांचं
पडली. एकदां एक जिव्हाळ्याचा नातलग आजारी पडल्यामुळें फडव
रजा मागितली. प्रथम रजा मंजूर होईनाच आणि जेव्हां झाली तेव्हां
उपयोग नव्हता. असें एकदोन वेळां झाल्यावर फडक्यांनीं नोकरीचें
तोडलें व देशसेवा पत्करली. प्रथम व्याख्यानें देऊन लोकजागृति करावी
विचार करून पनवेल, पळस्पें, पुणें, तासगांव व मध्यप्रान्तांतील
ठिकाणीं जाऊन त्यांनीं व्याख्यानें दिलीं. व्याख्यानांचा हा दौरा त्यांनीं दक्षि
नरसोबाचे वाडीपर्यंत पोंचविला. पण कितीही जीभ शिणविली तरी सुशि
लोक थंड ते थंडच असा अनुभव येतांच फडक्यांनीं आपला मोर्चा खाा
वर्गाकडे वळविला. 'शिवाजीमहाराजाप्रमाणें गनिमी काव्यानें लढून ब्रा
राज्याचें पुनरुज्जीवन करण्याचें' त्यांनीं ठरविलें. या उपक्रमाला जरूर अस
शिक्षण त्यांनीं आगाऊच मिळवलें होतें. फायनॅन्स डिपार्टमेन्टमध्यें अस
त्यांनीं निशाण मारणें, घोड्यावर बसणें, ढाल-तरवार खेळणें, वगैरे लष्करी व
प्राविण्य संपादन केलें होतें. फडक्यांना हत्यारांचा मोठा शोक असे. एव
बंदुका, चारदोन तरवारी, पट्टे, भाले वगैरे हत्यारें त्यांच्यापाशीं नेहमीं अ

खालच्या वर्गांतील रामोशी लोक आपल्या विशेष उपयोगी पडतील असा विचार करून त्यांनीं त्यांना आपल्या कटांत सामील करून घ्यावयाचें ठरविलें. अर्थात् अशा कामीं हाताखालचे लोक अत्यंत विश्वासू असणें जरूर असतें. रामोशी लोक निमकहलालीबद्दल प्रसिद्ध आहेत. रामोशांच्या स्वभावांतील हा विशेष लक्षांत घेऊन फडक्यांनीं पुण्याच्या आसमन्तांतील रामोशांस जेवणें घालण्यास सुरवात केली. रामोशीही असंतुष्टच होते. इंग्रजसरकारनें त्यांचीं वतनें जप्त केलीं होतीं. तेव्हां फडक्यांचे बंडाचे विचार त्यांना झटकन् पटले. सुरवातीस त्यांना चाळीस रामोशांची कुमक मिळाली. कांहीं वरिष्ठ वर्गांतील इसमही त्यांस सामील होते. अगदीं प्रथमच फडक्यांना द्रव्यबलाचें महत्त्व कळून चुकलें. पैसा जवळ असला तर "चार चार माणसें पूर्वीं पाठवून...देशांत लहान लाहन बंडें करीन...अशीं लहान लहान बंडें झालीं तर...सर्वच चमत्कार व्हावा त्याप्रमाणें होऊन जाईल; व इंग्रजांना हांकून लावून प्रजासत्ताक राज्य स्थापन करण्याचा जो आपला हेतु तो तडीस जाईल" * —फक्त पैसा पाहिजे. म्हणून त्यांनीं दरोडे घालण्यास सुरवात केली. धामारी, हर्णई, वाल्हें, मांगदरी, सोनापूर, चांदखेडा वगैरे गांवें त्यांनीं लुटलीं. परंतु फडक्यांच्या सैन्यांतील रामोशांना त्यांचें उच्च ध्येय वगैरे आकलितां आलें नाहीं. त्यांनीं त्यांच्याशीं विश्वासघात करून लुटींतील ऐवज लांबविला. इकडे हरि दामोदर नांवाच्या एका रामोशानें वासुदेव बळवंताच्या नांवावर दरोडे घालण्यास सुरवात केली. त्यानें पळस्पें, जांभूळपाडा, नेरें, चिखलें वगैरे गांवांत दरोडे घालून तेथील सधन लोकांना लुटलें. वासुदेव बळवंत मात्र निराश होऊन पुण्यास परत आले. परंतु आपल्यामुळें आपल्या आप्तमित्रांस त्रास होण्याचा संभव आहे असें पाहून त्यांनीं पुणें सोडलें व ते दक्षिणेंत गाणगापुराकडे गेले. पुण्याहून मेजर डॅनियल यांनीं त्यांचा पाठलाग सुरू केला. शेवटीं गाणगापुरच्या जंगलांत पोलिसांनीं फडक्यांना पकडलें.

वासुदेव बळवंत यांचें बंड पुणें शहरास प्रत्यक्षरीत्या नसलें तरी अप्रत्यक्ष रीत्या बरेंच भोंवलें. दरवड्यांच्या भीतीनें खेड्यापाड्यांतील सधन लोक

* रा. ग. बोरवणकर : वासुदेव बळवंत फडके

पुण्याच्या आश्रयास प्रत्यहीं येत असत व येतांना बऱ्याच बाजारबातम्यांचें गांठोडेंही बरोबर आणीत. आज ना उद्यां पुण्यावरही दरोडा पडणार अशा विवंचनेनें पुणेकर हवालदील झाले होते. त्या विवंचनेच्या पसाऱ्यांत आगीची ठिणगी अक्षरशः पडली. ता. १३ मे १८७९ रोजीं रात्रीं बुधवारवाड्यास एकाएकीं आग लागली. नागरीक व पोलीस जमून आग विझविण्याचे प्रयत्न चालू असतांच विश्रामबागवाडा पेटल्याचा बोभाटा झाला. अँग्लोइंडियन पत्रांनीं या आगीच्या मुळाशीं महाराष्ट्रीय सुशिक्षितांचा राज्यक्रांतीचा कट आहे असें म्हणून पुण्यांतल्या आगीचें लोण थेट फडक्यांच्या बंडाशीं नेऊन भिडविलें. सरकारनेंही पुण्यास झडतीचें सत्र सुरू केलें. ठिकठिकाणीं लष्करी चौक्या बसल्या, व पुण्यास लष्करी कायदा जारीनें सुरू झाला. सुशिक्षितांबद्दल सरकारला वाटणाऱ्या संशयाची झळ खुद्द महादेव गोविंद रानडे यांना लागून त्यांची धुळ्यास तांतडीनें बदली झाली, व पुढें पुण्यांतील आगी लावणारा इसम कोणी रानडे या नांवाचाच निघाला तेव्हां तर मुंबईच्या टाइम्सपत्रानें रानड्यांचें नांव घेऊन ओरडा करण्यास कमी केलें नाहीं.

जुलै महिन्यांत फडके कैद झाले. सरकारच्या असंतोषाची जरब पुण्याच्या सुशिक्षितांस इतकी बसली होती कीं, फडक्यांचें वकीलपत्र घेण्यास एकही वकील पुढें येईना. शेवटीं सार्वजनिक काकांनीं फडक्यांचें वकीलपत्र घेतलें. फडके हे अस्सल देशभक्त आहेत; त्यांच्या देशभक्तीस सामोपचाराची व विवेकाची मुरड नसल्यामुळें त्यांनीं बंडखोरी आरंभिली असें त्यांचें व खुद्द रानड्यांचेंही मत होतें. काकांनीं वकिली जीव तोडून केली व कदाचित् त्यामुळेंच फडक्यांची फांशी टळून त्यांना जन्मठेप हद्दपारी मिळाली. चार वर्षांनीं ( १८८३ ) फडके एडनच्या तुरुंगांत मृत्यू पावले.

[ न. र. फाटक : न्या. **रानडे चरित्र**. बोरवणकर : **वा. ब. फडके चरित्र** ]

—०—

**कोल्हापूर प्रकरण.** ( पुणें-कोल्हापूर १८८१–८२ )

राजाराममहाराजांचे दत्तक पुत्र शिवाजीमहाराज अज्ञान असतां कोल्हापूरचा कारभार पो० एजंट कौंसिलच्या मदतीनें चालत असे. तेव्हांपासून

# पुरावा लटका पडला

रा. ब. महादेव वासुदेव बर्वे हे तेथील दिवाण होते. त्यांचेबद्दल कोणत्याही कारणानें कां होईना पण करवीरस्थ लोक नाखूष असल्यानें दिवाणावर भलतेच आरोप सभांतून व वर्तमानपत्रांतून उघडपणें होत असत. शिवाजीमहाराजांना वेड लागलें या निमित्तानें दिवाणांनीं त्यांना कडक देखरेखीखालीं ठेवलें. छत्रपतींना 'हंटर'नें बडवतात, त्यांचे हाल चालविले.........वगैरे बातम्या सर्वत्र पसरल्यामुळें त्यांचें खापर लोक बर्वे दिवाणांच्या माथीं फोडीत.

ह्याच प्रकरणांत केसरी–मराठ्यानें सद्धेतूनें केलेल्या कामगिरीबद्दल आगरकर टिळक यांना मुंबईस शिक्षा झाली आणि अशाप्रकारें हे पराक्रमी वीर हिंदुस्थान-पुढें प्रथम चमकले. त्या दृष्टीनें कोल्हापूरप्रकरणाला महत्त्व विशेष आहे. तो प्रकार असाः--पुण्याच्या ज्ञानप्रकाश व केसरी-मराठा वृत्तपत्रांत कोल्हापूरच्या राज्यकार-भारासंबंधीं पत्रें प्रसिद्ध होऊन रा. ब. बर्व्यांवर टीकांचा भडिमार झाला. केसरी–मराठा पत्रांनीं कांहीं अस्सल म्हणून पत्रें प्रसिद्ध केल्यावर रा. ब. बर्वे यांनीं अब्रुनुकसानीची फिर्याद मांडली. आरोपी मंडळींत सदाशिव पांडुरंग उर्फ नाना भिडे, केशव नारायण बखले, बाळ गंगाधर टिळक ('मराठा' पत्राचे संपादक), गोपाळ गणेश आगरकर (केसरीचे संपादक) आणि वामन गोविंद रानडे (ज्ञानप्रकाशाचे संपादक) यांचीं नांवें होतीं.

ता. २४ जानेवारी रोजीं मुंबईच्या चीफ प्रे. मॅजिस्ट्रेटपुढें खटले सुरू झाले. ता. १५ मार्च रोजीं खटले सेशन–कमिट होऊन ता. ६ ते १५ जुलैचे दरम्यान भिडे, बखले व रानडे यांस ज्यूरीनें दोषी ठरविलें. स्वसमर्थनार्थ जो पुरावा बखले व भिडे यांनीं कोर्टापुढें मांडला त्यावरच टिळक–आगरकर अवलंबून होते. अर्थात् तो पुरवा ढांसळल्यावर टिळक–आगरकरांची बाजू लंगडी पडली, हें उघडच आहे. तेव्हां शिष्टाचारास जागून बर्व्यांची माफी मागावी असा सल्ला टिळक–आगरकरांस मेथा व तेलंग अशासारख्या कायदेपंडितांनीं तर दिलाच, पण खुद्द राजवाड्यांतून पुरावा आणून देतों असें म्हणणाऱ्या टिळकांच्या करवीरस्थ मित्रमंडळीनेंही दिला. टिळक व आगरकर हे दोघेही माफी मागूं नये या खंबीर मताचे होते. पण शेवटीं त्यांनीं माफी मागण्याचें ठरवून माफीचें पत्र बर्व्यांकडे रवाना केलें; पण

बऱ्यांनीं फिर्याद काढून घेतली नसल्यानें खटला चालून टिळक व आगरकर यांना प्रत्येकीं चार महिने साध्या कैदेची शिक्षा झाली.

कायद्याच्या दृष्टीनें बर्वे यांची अब्रु साफ झाली. इकडे खटला सुरू असतांच छत्रपतींना कोल्हापूरहून नगरास नेऊन तेथें किल्ल्यांत ठेवलें व तेथें त्यांचा अत्यंत हृदयद्रावक रीतीनें अंत झाला. या दुःखदावस्थेला बर्वेच कारण आहेत हा लोकांचा ग्रह कधींच बदलला नाहीं. टिळक–आगरकरांच्या शिक्षेमुळें त्यांचें नांव सर्वत्र गाजलें व लोकांची संपादकद्वयावर भक्ति निरतिशय बसली. लोकमत प्रकट करतांना कायद्यानें होणारी कैदेची शिक्षा सहन करणारे हे नवे वीर जनतेचे पुढारी ठरले.

[ न. चिं. केळकर : **टिळकचरित्र भा० १.** मा. दा. आळतेकर: **आगरकर चरित्र**]

---

## रखमाबाई प्रकरण (मुंबई १८८६)

मुंबईचे डॉ. सखाराम अर्जुन यांनीं एका विधवेशीं पुनर्विवाह केला. (इ. स. १८७१) त्या विधवेची प्रथम संबंधापासून झालेली मुलगी ही रखमाबाई. रखमाबाईसच वडिलार्जित संपत्ति मिळणार होती. पण ती आईबरोबर डॉक्टरांच्या घरीं राहावयास गेली तेव्हां त्या इस्टेटीची व्यवस्था आपणाकडे रहावी म्हणून डॉक्टरांनीं रखमाबाईचें लग्न एका गरीब अर्धवट शिकलेल्या अशा दादाजी नामक आपल्या नातलगाशीं लावलें. पुढें दादाजी डॉक्टरांशीं भांडून वेगळा राहूं लागला. पण डॉक्टर कांहीं केल्या रखमाबाईस त्याचेकडे पाठवीनात. ती 'आर्यमहिला समाजा'ची चिटणीस झाली होती; दादाजीनें नांदण्यास बोलाविलें तरी ती जाईना. मध्यंतरीं डॉ. सखाराम वारले. दादाजीनें आपल्या पत्नीचा ताबा मिळण्यासाठीं १२-३-१८८४ रोजीं हायकोर्टात अर्ज केला !

कायदा आपल्या उलट जाईल अशी भीति रखमाबाईस वाटत होती. तिनें इंग्रजी वर्तमानपत्रांतून आपलें गाऱ्हाणें लोकांपुढें मांडलें. अर्थातच तिला सुधारकांकडून सहानुभूति मिळण्याची अपेक्षा होती आणि तशी ती तिला मिळालीही. वादाचा मुद्दा असा कीं, रखमाबाईचें लग्न बालपणीं तिच्या

संमतीनें झालें नसतां व तिचा नवरा अशक्त व रोगी असतांही, तिच्या मर्जीविरुद्ध तिला नवऱ्याचे घरीं नेण्याची जबरदस्ती व्हावी काय ? हिंदू कायद्याप्रमाणें 'लग्न' लागलें असलें तरी इंग्रजी न्यायपद्धतीनुसार स्त्रीवर हा केवढा भयंकर जुलूम होणार ! न्या० पिन्हे यांनीं दादाजींच्या विरुद्ध निकाल देऊन रखमाबाईस स्वातंत्र्य दिलें खरें; पण नीफर्जास्टस सार्जंट व ज० बेले यांनीं तो निकाल फिरवून रखमाबाईवर दादाजींचा हक्क शाबीत केला. रखमाबाईनें मात्र ह्या निकालावर 'सत्याग्रह' करून कोर्टाचा हुकूम अमान्य करण्याचें ठरविलें. मग तिला भलतेंच महत्त्व चढलें. तिच्या संरक्षणार्थ फंड उभारले. सुधारकाग्रणी स्वयंसेवक होऊन तिच्या मदतीस धांवले. कित्येकांनीं दादाजीलाच वळवून तिचा नाद सोडण्यास सांगितलें व त्याप्रमाणें त्यानें तो सोडला.

ह्या प्रकरणांत न्या० तेलंग, कीर्तिकर, टिळक, वामनराव आपटे, ही मंडळी जुन्या पक्षाची म्हणजे नवरेपणाचा हक्क कबूल करणारी पण रखमाबाईस कैदेंत घालूं नये असें म्हणणारी; तर न्या० रानडे, वामनराव मोडक, आगरकर, वगैरे रमाबाईचा पक्ष सर्वस्वी उचलून धरणारी होती. रानड्यांनीं पुण्यास स्त्रीपुरुषांचा विवाहसंबंध व त्याची अमलबजावणी या विषयावर ( १८८७ ) मध्यें भाषण केलें. टिळकांनीं केसरींत दोन मोठे लेख लिहून रानड्यांना उत्तर दिलें.

## क्रॉफर्ड प्रकरण ( मुंबई-पुणें १८८८ )

इंडियन सिव्हिल सर्व्हंटांपैकीं एक विचित्र पण बुद्धिवान् गृहस्थ म्हणून क्रॉफर्डसाहेबांना ओळखतात. त्यांच्या बुद्धीला रंगेलपणाचीही जोड होती. पण रंगेलपणाला हात सढळ पाहिजे आणि हात भरलेला राहाण्यास खिसाही गरम पाहिजे. साहेबमजकूर रेव्हेन्यू कमिशनरच्या हुद्यावर होते व त्यांचा पगारही मोठा होता. पण त्यांच्या चैनबाजीला तो कितपत पुरणार ? अर्थात् साहेबांनीं आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करण्यास सुरवात केली. त्यांना लांचलुचपतीची प्रथमपासून संवय होती. देणगी कर्ज, भेट, नजर... इत्यादि नांवाखालीं कमाई करणें त्यांना कठिण गेलें नाहीं. साहेबांचा स्वभाव नेटिव लोकांत मिळूनमिसळून वागण्याचा असल्यामुळें त्यांच्या दोषांचा थांग बरेच दिवस झांकून राहिला. एतद्देशीयांशीं त्यांची फाजील

सलगी, लांचलुचपतीमुळें गोऱ्यांच्या नीतिमत्तेस लागणारा काळीमा, त्यांच्या वागणुकीमुळें सरकारचें होणारें नुकसान...इत्यादि गोष्टींमुळें सरकारदरबारीं त्यांचे शत्रु वाढले. त्यांच्या गोऱ्या कातडीनें त्यांचा बरेच दिवस बचाव केला होता. पण अखेर त्यांची गय न करण्याचा निश्चय होऊन ता. २४ जून १८८८ रोजीं पोलिस इन्स्पेक्टर–जनरल ओमॅनीसाहेब यांची या प्रकरणांत चौकशी करण्यासाठीं नेमणूक झाली. चौकशीस शेवटचें निमित्तकारण म्हणजे खानदेशांतील भडगांव येथील कांहीं सरकारी शेतें एका व्यापाऱ्यास क्रॉफर्ड साहेबांनीं ( लांच घेऊन ) स्वस्त दरानें विकलीं.

आरंभीं मामलेदारांकडून लांच खाल्ल्याचे स्पष्ट पुरावा असलेले दोन तीन मुकद्दमे उभे करावे असें ठरलें. पण आपण होऊन लांच चारल्याचा कबुलीजबाब कोणता मामलेदार देणार? तेव्हां योग्यता पाहून माफी देण्याचा अधिकार चौकशीच्या हुकुमाबरोबरच ओमॅनीसाहेबांस दिला व शेवटीं सरकारी चौकशीचें काम सुरू झालें.

या प्रकरणीं जनतेंत दोन पक्ष झाले होते. एक पक्ष म्हणे, “गोरा सिव्हिलियन आयता सांपडला आहे लांचाच्या आरोपांत. कांहींही होवो पण स्वतःच्या नीतिमत्तेची टिमकी वाजवून नाकानें कांदे सोलणाऱ्या साहेबास धडा शिकवलाच पाहिजे.” दुसऱ्याचें म्हणणें हें कीं, “एतद्देशियांनीं आपण होऊन गुन्हा कबूल करावयाचा म्हणजे लांच खाल्ली ती खाल्लीच, पण वर चहाडीही केली. एक गोरा मरतो पण त्याबरोबर कित्येक काळ्यांची अब्रू स्वतःच्या हातानें चव्हाट्यावर येते त्याचें काय?” पुण्यांत पहिला पक्ष केसरीनें उचलला व त्याला बहुमताचा पाठिंबा होता. सीतारामपंत चिपळूणकर, श्रीधर विठ्ठल दाते आणि ‘ज्ञानप्रकाश’ दुसऱ्या पक्षाचे होते.

ता. १६ जुलै १८८८ रोजीं क्रॉफर्डसाहेबांचे हस्तक म्हणून हणमंतराव इनामदार यांस कैद करण्यांत आलें. आणि साहेबमजकूर बडतर्फ होऊन उघड चौकशीस सुरवात झाली. हणमंतरावाला दोन वर्षें साधी कैद व दोन हजार रुपये दंड झाला. हणमंतरावाला कैद झाली त्याच्या दुसरे दिवशीं रात्रीं आपण आत्महत्या करीत आहों असें पत्र लिहून ठेवून क्राफर्ड बेपत्ता झाले. वास्तविक

प्रकार असा होता कीं ते वेषान्तर करून मुंबईचे मार्गास लागले होते. ठाण्यास येऊन मचव्यांतून परदेशीं पलायन करण्याचा त्यांचा बेत होता. पण आयत्या वेळीं पोलिसांनीं पकडल्यामुळें तो फसला. साहेबांवर रीतसर खटला न भरतां त्यांची चौकशी करण्याकरितां एका कमिशनची नेमणूक झाली व ता. २३ ऑक्टोबर रोजीं कमिशननें लांचाचा आरोप नाशाबीत धरून " आपल्या तालुक्यांतील माणसांकडून " कर्ज काढल्याचा आरोप मात्र शाबीत धरला. परंतु मुंबईसरकारनें कमिशननें म्हणणें ग्राह्य न मानतां क्रॉफर्डवरील आरोप सिद्ध धरले. कमिशनच्या चौकशींत असें दिसून आलें कीं, **दोन तीन वर्षांच्या अवधींत क्रॉफर्डनें दीड लाख रुपये कर्ज काढलें** व मध्यभागासारख्या गरीब प्रांतांतून एक **महिन्यांत १४००० रु. कर्ज मिळविलें ! !** हें असो. मुंबईसरकारचें मत स्टेट सेक्रेटरीस ग्राह्य न वाटतां त्यांनीं कमिशनच्या म्हणण्यास मान लावला व कर्जाचाच आरोप शाबीत धरून क्रॉफर्ड यांस नोकरीवरून दूर केलें, व त्यांचें नांव सिव्हिल सर्व्हंटांच्या यादींतून काढून टाकलें.

पण इकडे साक्षी देणारे मामलेदार तसेच लोंबत राहिले. त्यांचा पक्ष टिळकांनीं उचलला. कांहीं झालें तरी सरकारनें आश्वासन पाळलें पाहिजे असें त्यांनें म्हणणें होतें. इकडपक्षीं थावर बिडळ दात्यांनीं त्यांच्यावर फौज-दारी करण्याचा प्रयत्न करून पाहिला. टिळकांच्या प्रयत्नांस १८८९ सालीं सार्वजनिक स्वरूप प्राप्त झालें व ता. १ सप्टेंबर रोजीं पुणेंकराची एक जाहीरसभा भरली. सरकारानें नऊ मामलेदारांचे अधिकार काढून घेतले होते व इतरांनीं बदली शांतांनच्याची वोळवा येऊं येऊं लागली होती. टिळकांनीं यांना न्याय मिळवून देण्याकरितां पुष्कळ खटपट केली. इतकेंच नव्हे, तर मद्द बिलासंबंधीं पार्लमेंटांत बिल आणविण्यासाठीं डिग्बी-ब्रॅडला वगैरेंच्या मार्फत त्यांनीं व्यवस्था चालविली.

अखेर मुंबईसरकारानें आठ मामलेदारांचे तर बळी घेतलेच. पण बाकीच्यांचें रक्षण करण्यासाठीं हिंदुस्थानसरकारनें सिमला येथील कौन्सिलांत एक बिल आणलें. मात्र यांत कोणत्याही मामलेदारावर खटला भरला जाणार

नाहीं एवढाच मजकूर होता; नोकरीच्या शाश्वतीबद्दल निश्चयात्मक असा कांहींच उल्लेख नव्हता. बिल होतें तसेंच पास झालें व पार्लमेंटमध्यें बिल आणण्याची खटपटही निरुपयोगी ठरली. शेवटीं मामलेदारांचे दोन वर्ग करून त्यांचा निकाल लावण्यांत आला. ज्यांना जबरदस्तीमुळें लांच द्यावी लागली त्यांना माफी दिली. त्यापैकीं कांहींना नोकरीवर ठेऊन बढती तेवढी कांहीं दिवस बंद ठेवली; व कित्येकांना कामावरून दूर केलें तरी त्यांचा पगार सुरू ठेवला. ज्यांनीं स्वखुषीनें लांच चारली त्यांना मात्र नोकरीस मुकावें लागलें. या प्रकरणाचा शेवटीं असा निकाल लागला.

[ **लो॰ टिळकांचे केसरींतील लेख भा १.** न. चिं. केळकरः **टिळकचरित्र भा १.**]

—०—

**पंडिता रमाबाईचें शारदासदन** ( मुंबई, पुणें १८८९ )

पंडिता रमाबाई ह्या (ज० १८५८) मंगळूर प्रान्तांतील अनंतशास्त्री डोंगरे यांच्या कन्या. लहानपणीं वडिलांपाशींच त्यांनीं संस्कृत काव्य--व्याकरणाचें अध्ययन केलें. पुढें अनेक आपत्तींत सांपडल्यामुळें त्यांनीं कलकत्त्याचा मार्ग धरला. तेथें त्यांचा एका बंगाली ब्रम्होशीं विवाह झाला. पण लग्न झाल्यावर अवघ्या दीड वर्षांनें त्यांना वैधव्य आलें. सन १८८२ सालीं त्या पुण्यास गेल्या व स्त्रियांची उन्नति करण्याच्या हेतूनें त्यांनीं 'आर्यमहिला समाज' स्थापन केला. या संस्थेच्या हितचिंतक वर्गांत त्या वेळचे बहुतेक सुधारक होते. याच सालीं हंटर एज्युकेशन कमिशन पुण्यास गेलें. त्यापुढें रमाबाईंची अत्यंत परिणामकारक अशी साक्ष झाली. पुण्यास हुजुरपागेच्या सुपरिन्टेंडंट मिस हरफर्ड यांच्याशीं त्यांचा दाट परिचय होता. मिस हरफर्ड व मिशनरी मंडळी यांच्या मदतीमुळें रमाबाई विलायतेस गेल्या, व तेथेंच त्यांनीं आपल्या मुलीसह बाप्तिस्मा घेतला. नंतर त्यांनीं अमेरिकेंत प्रवास केला. तिकडून परत आल्यावर पंडिता रमाबाई यांनीं अमेरिकन मिशनरी मंडळींच्या सहाय्यानें १८८९ सालीं मुंबई येथें 'शारदासदन' नांवाची एक स्त्रीशिक्षणसंस्था स्थापन केली. शाळेंतील सामान्य शिक्षणाशिवाय नीति, व्यवहार, गृहव्यवस्था हेंही शिक्षण तेथें द्यावयाचें होतें. सदनाच्या सल्लागार–मंडळांत रानडे, भाण्डारकर, लोकहितवादी, आत्माराम पांडुरंग यांच्या सारखी सुधारक मंडळी होती.

## मुलींना बाटविण्याचा उद्देश

ता. २१ डिसेंबर १८८९ रोजच्या न्यूयॉर्क येथील ‘ख्रिश्चन वुइकली’ नामक पत्रांत शारदासदन ही संस्था ख्रिस्ती आहे अशा अर्थाचा मजकूर आला. केसरी पत्रानें ही हकीकत तबडतोब प्रसिद्ध केली. केसरीनें पुरविलेल्या माहितीच्या आधारावर ‘पुणें वैभव’ सारख्या पत्रांनीं पंडिता रमाबाईंच्या विरुद्ध बरेंच काहूर माजविलें. “संस्था पाहिजे तर सर्व खर्च देऊन हिंदु करा” असें या टीकेला रमाबाईंनीं स्पष्ट उत्तर दिलें. सल्लागार मंडळांतील एक सभासद श्री. सदाशिवराव केळकर यांनीं “सहाय्यकारी मंडळानें मत रमाबाईंच्या मताशीं तंतोतंत जुळणारें नाहीं” असें जाहीर केलें. पण टीकाकार किंवा सहायक यांपैकीं पैशाची सोय कोणाही करून देणारा नव्हता. तेव्हां ‘विधवांची शाळा मिशनरी लोकांनीं काढली म्हणून काय झालें? त्यापासून कांहींतरी आपला फायदा होणारच. पंडिता रमाबाईंनीं धर्मान्तर केलें म्हणून आमच्या स्त्रियांस शिकविण्यास त्यांस काय हरकत आहे? आपण बरें तेवढें घ्यावें वाईट तेवढें सोडून द्यावें” असा युक्तिवाद करून रानडेप्रभृति सल्लागारमंडळीनें सदनावरील टीकेला उत्तर दिलें. परंतु केसरीनें मुलींना बाटविण्याच्या बाईंच्या उद्देशाचा [illegible] परिस्फोट केला, व शेवटीं १८९३ सालीं रानडे, भांडारकर वगैरेंनीं शारदासदनाशीं असलेला आपला संबंध तोडून टाकला. याच सुमारास हिंदुमुसलमानांचा दंगा उद्भवल्यामुळें संस्थेंतून मुली काढून घ्यावयास पालकांना आयतीच संधि मिळाली. अखेर सदन उघडउघड ख्रिस्ती बनलें. बाईंनीं सदन पुण्याहून उठवून केडगांवास नेलें व तेथें तें ‘मुक्तिसदन’ या नांवानें अद्याप चालू आहे.

[ न. चिं. केळकर: टिळकचरित्र भा. १ ]

## संमतिवयाचा वाद ( १८८९-९१ )

संमतिवयोवादाचा उगम मुंबईचे नामांकित पत्रकार बेहरामजी मलबारी यांच्या हिंदुसमाजसुधारणेच्या प्रयत्नांत सांपडतो. १८८४ सालीं त्यांनीं ‘बालविवाह’ आणि ‘सक्तीचें वैधव्य’ या दोन विषयांवर टिपणें तयार

करून तीं हिंदुस्थानसरकार व पार्लमेन्ट यांजकडे पाठवून दिलीं. १८८५-८६ सालांत त्या टिपणांच्या प्रती प्रांतिक सरकारांकडे आणि त्यांजकडून विशिष्ट अधिकाऱ्यांकडे आणि वजनदार पुढाऱ्यांकडे अजमावण्यासाठीं गेल्या. त्यांनीं आपापलीं मतें सरकारांत रवाना केलीं व विरुद्ध बाजूस बहुमत पडल्यामुळें आपल्याला कांहींच करतां येत नाहीं असें वरिष्ठ सरकारनें प्रसिद्ध केलें. पण यामुळें मलबारी शेट निराश झाले नाहींत. त्यांनीं आपला उद्योग चालूच ठेवला. विलायतेंत जाऊन कांहीं जमतें कां पहावें या उद्देशानें ते १८९० मध्यें विलायतेस गेले. तेथें त्यांनीं सुधारणेचे नऊ मुद्दे प्रसिद्ध केले. त्यांत जबरीं संभोगाच्या बाबतींत कायद्यांत नवऱ्याबायकोच्या व्यवहाराविषयीं जो अपवाद दिला आहे तो रद्द करावयाचा, म्हणजे बारा वर्षांच्या आंत कोणतीही स्त्री कोणत्याही कृत्यास अनुमोदन देण्यास लायक नाहीं असें ठरावयाचें"* हा मुद्दा अग्रस्थानीं होता.

मध्यंतरीं ( १८८९ ) मुंबईचे दयाराम गिडूमल यांनीं संभोगसंमतीचें वय कायद्यांत दहा वर्षांचें होतें, तें बारा वर्षांचें करावें, अशा अर्थाचें एक लहानसें पत्रक प्रसिद्ध केलें. गिडूमल यांच्या पुस्तकांतील मुद्यांना उत्तर देऊन संमतीचें आहे तेंच वय योग्य आहे, असें प्रतिपादणारें एक पुस्तक टिळकांनीं छापून प्रसिद्ध केलें.

मलबारींचीं टिपणें प्रसिद्ध झाल्यापासून रानडे-तेलंगप्रभृति सुधारकांनीं त्यांना पाठिंबा देण्यास सुरवात केली. गिडूमल यांच्या पत्रकानें पुराणमताभिमानी समाज संतापला होता, व वादळाचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं. पण वादाला खरा रंग १८९०च्या आगस्ट महिन्यांत चढला. त्या महिन्यामध्यें बंगालप्रान्तीं हरिमोहन नांवाच्या एका तिशी उलटलेल्या इसमानें आपल्या फुलमानी (फुमोनी ?) नामक अल्पवयस्क धर्मपत्नीवर बलात्कार करून तिचा प्राण घेतल्याबद्दल त्याच्यावर खटला झाला. सदर खटला 'फुलमानीप्रकरण' या नांवानें ओळखतात. सुधारकांना संमतिवयाचें मान वाढविण्याचा आग्रह धरण्यास एक आयतेंच साधन मिळालें. व त्या प्रकरणानंतर थोड्याच दिवसांत मुंबईच्या सुधारकांनीं संमतिवयाचा कायदा करण्याबद्दल सरकारकडे अर्ज पाठवून दिला.

सरकाराचेंही कायदा करण्याकडे मन वळूं लागलें. अर्थात् पुराणमताभिमानी लोकांत खळबळ उडून त्यांची एक प्रचंड सभा तुळशीबागेंत भरली ( नो० १८९० )

* लो० **टिळकांचे केसरींतील लेख**. भाग ४

## शास्त्रवचनांचा मारा

या सभेला रानडे-भांडारकर वगैरे सुधारकाग्रणी हजर होते. या सभेस टिळक, रा. भि. जोशी, देवधर वगैरे लोकांनीं एक उपसूचना पाठविली. कायद्यानें सर्वांवर सुधारणा लादण्याऐवजीं सुधारणा ज्यांना मान्य असेल त्यांनीं स्वतःला बांधून घ्यावें, असा त्या सूचनेचा आशय होता. परंतु त्यापासून कांहींच निष्पन्न झालें नाहीं. इकडे मुंबईच्या सुमारें दोन हजार स्त्रियांच्या सहीचा संमतिवयोमानाच्या वाढीला पाठबळ देणारा एक अर्ज सरकारकडे गेला. अखेरीस संमतिवयोमानाचें बिल ता. ९ जानेवारी १८९१ रोजीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांत प्रविष्ट झालें. अर्थात् वादाचें प्रमाण विशेष वाढलें. अनुकूल–प्रतिकूल मतांच्या सभा एकसारख्या ठिकठिकाणीं भरूं लागल्या. विरोधी मंडळींत टिळक, जिन्सीवाले, खापर्डे, राजारामशास्त्री बोडस, भीमाचार्य झळकीकर, महादेव चिमणाजी आपटे वगैरे लोक सामील होते. तर रानडे, तेलंग, भांडारकर, मुधोळकर इत्यादि गृहस्थांनीं बिलाचें मंडन केलें. संमतिवयाच्या कायद्याला शास्त्रवचनांचा बाध येत नाहीं असें दाखविण्याचा भांडारकरांनीं प्रयत्न केला. टिळकांनीं प्रतिकूल शास्त्रवचनांचा मारा केला. टिळकांनीं उपस्थित केलेला महत्त्वाचा मुद्दा हा कीं हें बिल हिंदूंच्या सामाजिक व धार्मिक आचारांत हात घालतें. अतएव तें राणीच्या जाहीरनाम्याशीं विसंगत आहे. उलटपक्षीं तेलंगांनीं जाहीरनाम्यांतील कांहीं शब्दांवर जोर देऊन संमतिबिल व जाहीरनामा यांच्या विरोधाचा परिहार सुचविला होता. या वादविवादांत कांहीं मारामारीचे व झटापटींचे प्रसंग येऊन तेलंग, भांडारकर प्रभृति विद्वानांना मानहानी सोसण्याचीही पाळी आली.

शेवटीं ता. १९ मार्च रोजीं संमतिवयाचे बिलाला कायद्याचें स्वरूप प्राप्त झालें. सनातन्यांचा संताप अधिकच वाढला. कायदा होऊन थोड्याच दिवसांत शिमग्याचा सण आला, व त्या निमित्तानें सुधारकाचें एक नकली प्रेत तयार करून पुणेकर सनातन्यांनीं त्याची एक मिरवणूक काढली. शिमग्याचा सण संपल्यावर या वादाची धुळवडही संपली.

[ न. चिं. केळकर: **टिळकचरित्र भाग १.** न. र. फाटक: **न्या. रानडेचरित्र.** ]
**टिळकांचे केसरींतील लेख, भाग ४**

## चहाग्रामण्य प्रकरण ( पुणें १८९० ते १८९२ )

चहाग्रामण्य प्रकरणाला मूळ कारण पंचहौद मिशनमधील चहापान. हा समारंभ गोपाळराव जोशी या गृहस्थांनीं ता. ४ ऑक्टोबर १८९० रोजीं पुणें पंचहौद मिशनमध्यें घडवून आणला. गोपाळराव जोशी यांचें मिशनरी मंडळींत बरेंच येणेंजाणें असे. त्याचा फायदा घेऊन त्यांनीं रे० रिव्हिंग्टन यांजकडून बऱ्याच सुशिक्षितांना व्याख्यानाकरितां म्हणून निमंत्रणें करविलीं. निमंत्रणांतून पुण्यांतील कोणीही ठळक इसम सुटला नव्हता. हजर असलेल्या मंडळींत टिळक, रानडे, गोखले, सीतारामपंत देवधर, गोविंदराव कानिटकर अशासारख्या प्रसिद्ध व्यक्ती होत्या.

व्याख्यानाच्या शेवटीं सर्वांचे पुढें टेबलावर चहाचे कप व बिस्किटें आलीं. कित्येकांनीं त्यांचा समाचार घेतला. कित्येकांनीं कप हातांत घेऊन त्याचा नुसता सन्मान केला व इतर कांहीं स्वस्थ बसले.

या गोष्टीला सहा महिने लोटल्यावर गोपाळराव जोशी यांनीं या समारंभाची हकीकत 'पुणें-वैभव' वृत्तपत्रांत हजर असलेल्या ( व कांहीं नसलेल्या ) गृहस्थांच्या नांवनिशीं प्रसिद्ध केली. तरीही कांहीं दिवस पुणेकर ब्रम्हवृंद गप्पच बसला. पण शेवटीं १८९१ च्या अखेरीस ब्राम्हण्यरक्षक पुढाऱ्यांनीं पंचहौद मिशनमधील समारंभांत भाग घेणाऱ्या इसमांशीं संबंध ठेवणाऱ्या भिक्षुकांच्या व आचारी-पाणक्यांच्या मागें ग्रामण्याचा ससेमिरा लावला. व नंतर समारंभांत भाग घेणाऱ्या इसमांच्या नात्यागोत्यांत ग्रामण्याचा प्रवेश होऊन बायकामंडळींना विशेष त्रास होऊं लागला.

दरम्यान, 'पुणें-वैभवांत' प्रसिद्ध झालेलीं कांहीं नांवें खोटीं असल्यामुळें 'पुणें-वैभवावर' खटला होऊन वैभवकर्त्याला दोनशें रुपये दंड झाला. इकडे नातुप्रभृति सनातनी मंडळीनें या बाबतींत पुढाकार घेऊन चौकशी करण्यासाठीं शंकराचार्यांकडे फिर्याद गुदरली. श्रींनीं दोन त्रयस्थ इसम शिक्कामोर्तब देऊन पुण्यास रवाना केले व १८९२ च्या जानेवारीच्या अखेरीस ग्रामण्य कमिशनचे कामास जोरानें सुरवात झाली. टिळक-रानडे वगैरे पुढाऱ्यांनीं श्रींचा अधिकार कबूल केला. वादींना या

गोष्टीची धन्यता वाटून त्यांनीं ही चौकशी शक्य तितकी लांबविली व रंगविली. अखेर कमिशननें खालील प्रमाणें निकाल दिला: ( १ ) हरि नारायण आपटे, रामचन्द्र भिकाजी जोशी प्रभृति मंडळी समारंभास हजरच नव्हती. सबब ते प्रायश्चित्तांतून मोकळे झाले. ( २ ) गोपाळराव पानसे वगैरे तीन इसमांच्या प्रायश्चित्तांचा निकाल ब्रह्मवृंदाकडून पूर्वींच लागला होता म्हणून त्यांना वेगळें प्रायश्चित्त सांगण्याचें कारण उरलें नाहीं; ( ३ ) मिशन हाऊसमध्यें गेले पण चहा घेतला नाहीं अशा आठ इसमांनीं ब्रह्मकूर्चोपवासपूर्वक यथाशक्ति दक्षिणादान करावें; (४) टिळकांनीं काशीस जाऊन अगोदर प्रायश्चित्त घेतलें असल्यामुळें त्यांना प्रायश्चित्ताची जरूर नाहीं. ( ५ ) रानडे, कानिटकर, भिडे, देवधर वगैरे आठ इसमांनीं ज्ञाताज्ञातदोषनिवारणार्थ प्रायश्चित्त मिळण्याबद्दल अर्ज दिला होता त्यांना सर्व-प्रायश्चित्त घेण्याचा हुकूम झाला. ( ६ ) कमिशनला दाद न देणारे १६ इसम निघाले. त्यांत प्रो० वासुदेवराव केळकर, प्रो० पानसे, वैजनाथ काशिनाथ राजवाडे इत्यादि गृहस्थांचा समावेश होता. त्यांना एक सांतपन व एक चांद्रायण प्रायश्चित्त सांगण्यांत आलें.

पण वरील निकालानें हें प्रकरण शमण्याऐवजीं अधिकच भडकलें. ज्यांनीं कमिशनला अगदीं धुडकावून लावलें किंवा ज्यांनीं पहिल्याप्रथमच त्याला साष्टांग प्रणिपात केला त्यांच्याबद्दल फारसा वाद नव्हता. परंतु ज्यांनीं हातानें प्रायश्चित्त घेतलें, पण तोंडानें निरर्थक ठरविलें किंवा ज्यांनीं पुण्याबाहेर प्रायश्चित्त घेऊन श्रींची समजूत घातली, त्यांच्याबद्दल वाद अधिक माजला. जे उघडउघड बहिष्कृत ठरले त्यांचेकडे कोणी जेवीना. शहरांत कृष्ण व शुक्ल असे दोन तट पडले. शेवटीं गांवांतील सनातनी लोकांनीं त्रासून जाऊन हा घोंटाळा मोडण्यासाठीं शंकराचार्यांकडे अर्ज केला. श्रींनीं वादींना पाचारण केलें. त्याप्रमाणें वादीपक्षाची मंडळी १६ डिसेंबर १८९१ रोजीं कुरुंदवाडास श्रींकडे गेली. श्रींनीं आपलें प्रतिनिधित्व कुरुंदवाडचे अधिपति व बाळासाहेब कुरुंदवाडकर यांच्याकडे सोंपविलें. त्यांचे अभिप्राय थोडेसे वेगळे पडले व खुद्द श्रींच्या आज्ञापत्रांतही विसंगति आहे असा विकल्प निघाला. श्रींचे कारभारी भडकमकर हे सक्तीच्या प्रायश्चित्ताचा आग्रह धरूं लागले. मिळून हें ग्रामण्यप्रकरण निकालांत निघेना; पण कांहीं काळ भिजत

पडल्यानंतर सर्वसाधारण समाज तें प्रकरण हळूहळू विसरला व ग्रामण्या
बंध ढिले पडले.

[ न. चिं. केळकर: टिळकचरित्र भा. १. *न. र. फाटक: न्या. रानडेचरित्र.

—०—

## प्लेग प्रकरण ( पुणें १८९६-७ )

हिंदुस्थानांत पहिला प्लेग म्हणतात तो १८९६ सालीं आला व त्याच व
दुष्काळानेंही सर्वत्र कहर उडविला. इतर ठिकाणीं ह्या दोन आपत्तींनीं काय खे
केले ते विस्तारशः ठाऊक नसले तरी पुण्यास प्लेगनें उडविलेला धुमाकूळ ऐति
हासिक स्वरूपाचा होऊन राहिला आहे.

पुण्यांत प्लेगचा पहिला बळी १८९६ च्या सप्टेंबर महिन्यांतला होता. प
प्लेगोबाचें स्वरूप हिवाळ्यांत उग्र झालें. सर्व देशभर रोग व दुष्काळ यां
साम्राज्य माजल्यास विलायत सरकारचें नुकसान होणार होतें म्हणूनच कदाचि
हिंदुस्थान सरकारचे मागें प्लेगबंदीचे उपाय ताबडतोब योजण्याकरितां त्यांच
लकडा लागला असावा. वरिष्ठ कायदेकौंसिलांत फेब्रुआरीच्या पहिल्या आठव
ड्यांत एक कायदा पसार झाला आणि प्लेगबंदी करणासाठीं 'लष्करी' अधिका
जिल्ह्याधिकाऱ्यांस मिळाले. अर्थात् लष्करी कायदे अवमानल्याबद्दल होणाऱ्य
कडक शिक्षा त्याबरोबरच आल्या. कायदा पास होतांना ना. आनंदाचार्लू व
दरभंग्याचे महाराज यांनीं अधिकाराच्या व्यापक स्वरूपाबद्दल तक्रार केली. पण
तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

ह्या कायद्यानुसार पुण्यांतील प्लेग अधिकारी म्हणून मि. रँड ता. १७-२-१८९७
पासून रुजू झाले. त्यांनीं आपल्या हाताखालीं दोन लष्करी अधिकारी घेतले.
आणि कामाच्या सोईसाठीं एक प्लेगकमिटी नेमली. रँड यांचा अधिकार केवळ पुणें
शहरापुरता नसून खडकी, लष्कर, वगैरे उपनगरांवरही, कार्याच्या सोईसाठीं,
ते अधिकार गाजवीत असत. प्लेगप्रतिबंधक व प्लेगनिवारणार्थ म्हणून जे उपाय तेव्हां
योजीत ते असेः—ठिकठिकाणीं क्वारंटाईनचे कँप उघडणें म्हणजे प्लेग झाला
आहे कीं नाहीं हें नक्की समजेपर्यंत ( ठराविक मुदतींत ) लोकांनीं तेथें रहावयाचें.
गांना व संशयित ठिकाणांहून जाणारायेणारांस हा जाच असे. कारण अशा

फिरत्या व तात्पुरत्या 'धर्मशाळेंत' उतारूंची सोय ती कसली असणार? खाणें पिणें तर दूरच, पण कडक थंडींत निवाऱ्याची जागा मिळणें मुष्कील होई. दुसरा उपाय सेग्रिगेशनचा. प्लेगनें लागण झालेल्या इसमाला खास इस्पितळांत नेऊन टाकीत; व त्या घरांतील इतर मंडळींस सेग्रिगेशन कँपमध्यें जावें लागे. प्लेगचें इस्पितळ संगमाजवळ होतें. ह्या सर्व ठिकाणीं व्यवस्था ती कसली असणार? आधींच इस्पितळांत जाणें ही इकडील चालीप्रमाणें कमीपणाची गोष्ट. त्यांत भर पडली प्लेगअधिकाऱ्यांच्या यांत्रिक शिस्तीची. कारण प्लेगची लागण होई त्या घराची साफसफाई लष्करी अधिकारी लष्कराच्याच मदतीनें करीत. प्लेगचे रोगी लोक लपवून ठेवतात असा अधिकाऱ्यांचा ग्रह झाला व त्यामुळें तपासणी जरा कडकपणें होऊं लागली. सोजिरपार्टीनें घरांत शिरावें, माणसांची तपासणी करावी असा प्रकार न्याय्य ठरल्यावर त्यांत अन्यायाला पुष्कळ सवड सोजिरांना मिळणार हें उघड होतें. शिवाय रोगी मेला कीं त्या घरावर लाल रेघ खुणेसाठीं करीत. तीवरून धुरी देणाऱ्या पार्टीनें तें धुण्यासाठीं यावें व नंतर सफेती पार्टीनें येऊन आपलें काम करावें अशी व्यवस्था होती. कारण सेग्रिगेशन करणें, घरें साफ ठेवणें, हवा नीट खेळत नसल्यास कवलें काढून टाकणें अगर भिंताडास खिंडार पाडणें, रोग्याचे कपडे, खोली, जिनसा...साफ करणें...वगैरे अधिकार कायद्यानें मिळाले असतां ते बजावण्यांत लष्करी सोजिरांकडून (अतिक्रम झाला तरी) कसूर होणें शक्यच नव्हतें. एवंच हिंदू लोकांच्या भावना दुखविण्यास, त्यांचेवर मानभंगाचे प्रसंग येण्यास, त्यांच्या मूल्यवान चीजवस्तूंना (कायमची) बाहेरची हवा मिळण्यास ह्या प्लेगोबानें बरीच मदत केली. पुण्यपुरीचे नागरिक अत्यंत नाखूष झाले.

प्लेग प्रकरणांत सरकारानें काय करावें याविषयीं विवेचन टिळकांनीं प्रथमपासून केसरींतून केलें व प्रत्यक्ष कार्य म्हणून डॉ. भांडारकर, रा. सा. शिरोडकर वगैरे मंडळींच्या मदतीनें एक वेगळें हिंदु प्लेग इस्पितळ स्थापलें. निरनिराळ्या कँपमधील तक्रारी दूर करण्यासाठीं एक रिलीफ् कमिटीही नेमली. तींत बापू पुरुषोत्तम जोशी, गणपतराव साठे वगैरे मंडळी होती. लोकांनीं यावेळीं कसें वागावें याचेही धडे वेळोवेळीं टिळकांनीं दिले.

अखेर, मे महिन्यांत प्लेग हटला व हा लष्करी जाचही कमी झाला. पण प्लेग प्रकरणांतून पुणें प्रकरण उद्भवलें–म्हणजे २२–६–९७ रोजीं रात्रौ रँड व आयर्स्ट यांचा खून झाला. पुण्यांत प्लेग तपासणीचा जुलूम अशा स्वरूपानें बाहेर पडला म्हणतात! तसेंच प्लेगप्रकरणामुळेंच ना० गोखल्यांस सरकारची माफी मागावी लागली. पुणें व माफी हीं दोन प्रकरणें स्वतंत्र दिलीं आहेत.

प्लेग प्रकरण तात्पुरतें तरी मिटलें; पण हाफकिन साहेबांनीं 'इनॉक्युलेशन' चा प्रकार सुरू केला–स्वतः तयार केलेली लस प्लेग प्रतिबंधक उपाय म्हणून टोचून घ्या असें सांगितलें, तेव्हां प्लेग प्रकरणाचें शेंपूट पुनः चर्चेस निघालें. प्लेगची ब्याद चुकविण्यासाठीं इनॉक्युलेशनचा उपाय चांगला आहे म्हणून सरकार तर्फे त्याची शिफारस होऊं लागली. डॉ. भालचंद्र भाटवडेकर हेही सरकारच्या शिफारसीची ' री ' ओढूं लागले. टिळकांनीं या वादाचा शास्त्रीय अभ्यास करून डॉ. भालचंद्रांसारख्यांस त्यांची चूक दाखवून दिली. सरकारचीही घाई कशी आहे, व्हावे तितके प्रयोग ह्या नूतन रसायनाचे झाले नाहींत तें सोदाहरण पटविलें. श्री. कृष्णाजी आबाजी गुरुजी यांनीं टिळकांस ह्या बाबतींत पुष्कळ मदत केली. धारवाड जिल्ह्यांत इनॉक्युलेशन केलेल्या मंडळीच्या शरीरप्रकृतीवर एकंदर काय परिणाम घडला हें टिपण नांवनिशीवर गुरुजींनीं केलें. व टिळकांनीं त्याचे आधारें सरकारला व भालचंद्रांना आपल्या घाईच्या शिफारसींचा फेरविचार करावयास लावलें. हा वाद १९०० पर्यंत चालला होता.

[ **लो० टिळकांचे लेख**, भाग १–२. न. चिं. केळकर : **टिळक चरित्र** खं. १ ]

—०—

## ना. गोखले यांचें माफीप्रकरण ( १८९७ )

सन १८९६–७ च्या प्लेगच्या अमदानींत कडक उपाय योजल्याबद्दल राणीच्या ज्युबिलीचे रात्रीं रँड साहेबांचा खून झाला. या खुनानें जिकडे तिकडे काहूर माजलें. इंग्लंडमधील वर्तमानपत्रांत सर्व बाजूंनीं लेख प्रसिद्ध होऊं लागले. अशा वेळीं गोपाळ कृष्ण गोखले मुंबई इलाख्यातर्फे वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्यासाठीं विलायतेस गेले होते. तेव्हां अशा जबाबदार पुणेकर पुढाऱ्यांचें या खुनाच्या बाबतींत काय म्हणणें आहे तें समजून घेण्याकरितां

वर्तमानपत्रांच्या बातमीदारांनीं त्यांजकडे धांव घेतली. गोखल्यांचे मनांतही हिंदुस्थानांत चाललेल्या घडामोडींनीं खळबळ उडाली होती. प्लेगच्या अमदानींत पुण्यास अधिकाऱ्यांनीं चालविलेल्या जुलुमाच्या हकीकतींचीं पत्रें त्यांना आपल्या मित्रांकडून मिळत. गोखले तीं पत्रें त्यांच्याबरोबर असलेल्या ना० वाच्छांना दाखवीत असत. पार्लमेन्टगृहाच्या लायब्ररींत त्या पत्रांचा विचार करण्यासाठीं गोखले, वाच्छा व त्यांचे इतर मित्र यांच्या तीन सभाही भरल्या होत्या. पहिल्या दोन बैठकींस वाच्छा हजर होते. पण तिसऱ्या बैठकींत त्या पत्रांतील हकीकत प्रसिद्ध करावयाचें ठरलें, तेव्हां मात्र ते हजर नव्हते. 'मँचेस्टर गार्डियन' पत्राच्या बातमीदारास मुलाखत देतांना ना० गोखल्यांनीं असें सांगितलें कीं, प्लेगकमिटीनें पुण्यांत अतिशय जुलूम केला म्हणून रँड व आयर्स्ट यांचे खून झाले असावेत. सोजिर व प्लेगचे अधिकारी बायकांना रस्त्यावर आणून त्यांची तपासणी घेत; एकदोन बायकांवर जुलूम झाला; एकीनें जीवही दिला,.........असाही मजकूर त्यांच्या मुलाखतींत होता.

या मुलाखतीनें इंग्लंडमध्यें मोठी खळबळ उडाली. पार्लमेन्टमध्यें या संबंधीं प्रश्नांचा भडिमार झाला म्हणून विलायत सरकारनें मुंबई सरकारकडे खुलासा विचारला. मुंबई सरकारनें चौकशीदाखल पांचशें सद्गृहस्थांकडे प्रश्नपत्रिका पाठविल्या. पण गोखल्यांचीं विधानें उचलून धरण्यास कोणीच पुढें येईना. मुंबई सरकारनें स्वतःच्या निर्दोषीपणाचा खलिता विलायतेस रवाना केला, व स्टेटसेक्रेटरीनें गोखल्यांचीं विधानें खोटीं आहेत असें प्रसिद्ध केलें.

ह्यामुळें गोखल्यांची विचित्र स्थिति झाली. खोटीं विधानें करणारा हिंदी पुढारी म्हणून लोक त्यांना नांवें ठेऊं लागले. गोखल्यांना ती परिस्थिति दुःसह झाली. स्वदेशीं येऊन आपलीं विधानें सिद्ध करण्याचा प्रयत्न करावा अशा विचारानें ते जलदी परत फिरले. ज्यांनीं ज्यांनीं पत्रें लिहून बातमी पुरविली होती त्यांची 'कृपा करून आमचीं नांवें फोडूं नका' अशा विनंतीचीं पत्रें त्यांना एडनला मिळालीं. गोखल्यांचीं विधानें सिद्ध करण्याचा मुख्य पुरावाच अशा तऱ्हेनें गळून गेला. मुंबई बंदरांत मुंबईचे पोलिस कमिशनर त्यांना बोटीवरच भेटले. त्यांचा हेतु उघड होता. आपल्या मित्रमंडळीला भेटल्याखेरीज आपणांस कांहींच सांगतां येणार नाहीं, असा गोखल्यांनीं त्यांना जबाब दिला.

मुंबईस उतरल्यावर गोखल्यांनीं प्रथम रानड्यांची भेट घेतली. रानड्यांनीं त्यांना जाहीर माफी मागण्याचा सल्ला दिला. त्याप्रमाणें अवास्तव विधानें केल्याबद्दल गोखल्यांनीं सरकारची बिनशर्त माफी मागितली.

गोखल्यांनीं माफी मागितली हें लोकांना मुळींच आवडलें नाहीं. त्यांच्या माफीनें लोक इतके चिडले कीं त्यानंतर त्यांना सुमारें वर्ष दीड वर्ष अज्ञातवासांत काढावे लागले. इ. स. १८९७ च्या अमरावती कॉंग्रेसला गोखले हजर असूनही लोकांच्या क्षोभामुळें त्यावेळीं ते भाषण करूं शकले नाहींत. गोखल्यांच्या मनास हें लोकक्षोभाचें शल्य फार लागलें. लोकांची ही वागणूक ते कधींच विसरले नाहींत. '*Forgive I must, forget I cannot*' असे उद्गार ते याविषयीं काढीत असत. गोखल्यांची बाजू सावरण्यास न्या० रानडे सदैव तयार होते. 'गोखल्यांनीं माफी मागितली त्यांत त्यांची कांहींच चूक नाहीं; त्या बद्दलची सर्व जबाबदारी माझ्यावर आहे. मीं सांगितलें म्हणूनच गोखल्यांनीं माफी मागितली' असे उद्गार रानड्यांनीं काढले होते ! टिळकही गोखल्यांना मदत करूं इच्छित होते. गोखल्यांच्या विधानांत अतिशयोक्ति आहे असें त्यांनीं केसरीच्या २० जुलैच्या अंकांत लिहिलें होतें. परंतु जेव्हां मुबई सरकारनें कसल्याच प्रकारचा जुलूम प्लेगच्या अमदानींत झाला नाहीं असें प्रसिद्ध केलें, तेव्हां अखेरीस सरकारची फजिती होईल हें त्यांनीं लक्षांत ठेवावें, असें केसरींतून टिळकांनीं सरकारला बजावलें व २० जुलैच्या अंकांतच प्लेगसंबधीं ज्या कोणाच्या तक्रारी असतील त्या पत्त्यामुद्द्यासह केसरीकडे कळवाव्या अशी विनंति त्यांनीं प्रसिद्ध केली. परंतु नंतर आठ दिवसांनीं टिळकांना पकडल्यामुळें त्यांना या बाबतींत कांहींच करतां आलें नाहीं.

[ न. चिं. केळकर : **टिळकचरित्र.** पां. स. साने **ना. गोखले यांचें चरित्र.** ]

—०—

## पुणें प्रकरण—चाफेकर बंधू ( पुणें १८९७-९९ )

पहिल्या प्लेगच्या जाचांतून पुणें शहर मुक्त होतें न होतें तोंच दुसऱ्या एका फेऱ्यांत तें सांपडलें. मे महिन्यांत प्लेगचें मान कमी झालें; आणि ता. २२ जून रोजीं रात्रीं मि. रँड व ले० आयर्स्ट यांचे खून पडले. महाराणीच्या कारकीर्दीस साठ वर्षें पुरीं झाल्याबद्दल १८९७ सालीं हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं डायमंड

जुबिली मोठ्या थाटानें साजरी झाली. ता० २२ जून रोजीं रात्रीं गणेशखिंडीं-तील गव्हर्नमेंट हाऊसमध्यें जुबिलीनिमित्त एक मोठा समारंभ होता. मध्यरात्रीं समारंभ खलास झाल्यावर गणेशखिंडीच्या रस्त्यानें मि० रँड आपल्या गाडींतून परत निघाले. त्यांच्या मागें येणाऱ्या गाडींत ले० आयर्स्ट व त्यांच्या पत्नी हीं उभयतां होतीं. गव्हर्नमेन्ट हाऊस सोडून गाड्या पांच-सहाशें यार्ड आल्या तोंच बाजूच्या झाडींतून कोणी मनुष्य बाहेर येऊन, रँड यांच्या गाडीमागें चढून, त्यानें त्यांजवर भरलेलें पिस्तुल झाडलें. त्यामुळें ते बेशुद्ध पडले, व नंतर थोड्या सेकंदांनीं दुसरा बार झाला. त्यानें मागच्या गाडींतील ले० आयर्स्ट यांचा तत्काळ प्राण घेतला व त्यांचें शरीर त्यांच्या पत्नीच्या अंगावर कोलमंडून पडलें. मिसेस आयर्स्ट यांची आरडा-ओरड कानीं गेल्यामुळें तिसऱ्या एका गाडींतील ले० लुइस यांनीं त्या गाड्या थांबविल्या. मि. रँड यांना तात्काळ इस्पितळांत नेऊन त्यांजवर औषधोपचार केले व मरणोन्मुख स्थितींत त्यांची जबानीही घेतली. अकरा दिवस इस्पितळांत काढल्यावर त्यांचा अंत झाला. खुनाचा तलास लावण्याची खटपट जारीनें सुरू झाली. मि. ब्रुइन यांची खुनाचा शोध लावण्यासाठीं स्पेशल ड्यूटी ऑफिसर म्हणून नेमणूक झाल्यामुळें ते मुंबईहून आले. गुन्हेगार आणि त्यांस उत्तेजन देणारे यांस पकडून देणारास सरकारनें वीस हजारांचें बक्षिस लावलें.

पण टाइम्स सारख्या इंग्रजी वृत्तपत्रांच्या संतापाचा पारा बराच वर चढला होता. " पुण्यांत ब्राम्हणांचा एक भयंकर कट निर्माण झाला असून मि. रँड यांचा खून ही या कटाची पहिली सलामी होय" असें मत त्यांनीं जाहीर केलें. टाइम्सकारांना कोणीएक टोपणनांवी ' जस्टिस ' भेटून त्यानें या कृत्याचा शिवाजी उत्सवाशीं सरळ संबंध जोडून दिला. सरकाराला हें पटलें कीं नाहीं कोण जाणे. पण तेव्हांचे कलेक्टर मि. लँब यांनीं लोकांची एक सभा भरवून त्यांना असें सांगितलें कीं, हीं असलीं दुष्टकृत्यें होण्यास आधुनिक शिक्षणानें बिघडलेलीं शाळेंतील चटोर पोरें, शिवाजी उत्सवासारखे उत्सव आणि देशी वर्तमान-पत्रांतील कडक आणि राजद्रोही लेख हे कारणीभूत झाले असावे.

वरील भाषणाचे दुसरेच दिवशीं पुणें शहरावर दोन वर्षेंपर्यंत दरसाल १,१५,००० रुपये खर्चाचे जादा पोलिस बसविण्याचा सरकारी ठराव प्रसिद्ध झाला. त्याकरितां

सामान वगैरे घेण्यास, प्रारंभीं, या खेरीज ३२००० रुपये खर्च झाला तो वेगळा. एवढा खर्च देण्याची पुणें म्युनिसिपालिटीची ऐपत नसल्यामुळें म्युनिसिपालिटीच सरकारच्या ताब्यांत गेल्यासारखी झाली.

एवढ्यानें टिळक मात्र डरले नाहींत. त्यांनीं केसरींतून या सर्व प्रकाराचा कडक निषेध करण्याचें सुरू ठेवून, सरकारचें डोकें ठिकाणावर आहे काय? (के. ६.७.९७) असा सवाल त्यांनीं केला. 'खून झाला ही गोष्ट चांगली नव्हे; खुनी इसमास पकडून त्याला शिक्षा करणें वगैरे गोष्टी योग्यच आहेत; परंतु त्याकरितां सरकारनें लावलेलें वीस हजाराचें बक्षिस पुरें आहे, सगळ्या शहरावर जादा पोलिस बसविण्याचें कारण नाहीं आणि बसवून कांहीं उपयोगही नाहीं,' असा टिळकांच्या लिहिण्याचा इत्यर्थ होता. ज्युबिलीच्याच दिवशींच पेशावरास एका गाझीनें एका युरोपियनास दिवसा ढवळ्या गोळी घालून मारिलें, पण पंजाबसरकारनें या गुन्ह्यास राजद्रोहाचें किंवा राजकीय कृष्ण-कारस्थानाचें स्वरूप दिलें नाहीं, याची टिळकांनीं मुंबईसरकारला आठवण करून दिली. इतकेंच नव्हे, तर "खुन्यास जो खून चढावयाचा तो आमच्या सरकारास चढून सरकारची नजर अगदीं फिरून गेली आहे," असे उद्गार त्यांनीं काढले.

अर्थात् अशा प्रकारचें लेखन सरकारला रुचणारें नव्हतें. शिवाजी उत्सवांत केलेल्या भाषणांत राजद्रोह आहे अशा आरोपांची टिळकांविरुद्ध फिर्याद ता. २७ जुलै रोजीं गुदरली. त्या खटल्यांत टिळकांना दीड वर्षें सक्तमजुरीची शिक्षाही झाली. हाच महाराष्ट्रांतील राजद्रोहाचा पहिला खटला होय. टिळकांचा खटला सुरू असतांच इतर लोकांची धरपकड झाली. 'टिळकांना पकडल्याचे दुसरे दिवशींच नातुबंधूंना (मधली पाती) १८२७ च्या रेग्यु. नं. २५ अन्वयें पकडून तुरुंगांत विनाचौकशी डांबून ठेवलें. मोदवृत्त, पुणें वैभव, प्रतोद वगैरे वर्तमानपत्रांवर याच सुमारास राजद्रोहाचे खटले भरून संपादकांना (वैभवकारांनीं माफी मागितली ते वगळून) शिक्षा ठोठावण्यांत आल्या. खूनप्रकरणीं सरकारनें लावलेलें वीस हजारांचें बक्षिस प्रभावी ठरून खुनाचा तलास लागला. द्रविड नामक दोघा बंधूंनीं कोणा चाफेकरबंधूंचीं नांवें घेतलीं व त्याप्रमाणें दामोदर हरि चाफेकर ह्या कीर्तनका-राच्या मुलाला अटक झाली. चाफेकरानें आपल्या कबुलीजबाबांत पुणें–मुंबईंतील सर्व दांडगाईच्या गुन्ह्यास आपणच कारण असून प्लेगच्या अमदानींतील सोजि-

रांच्या जुलमाचा त्वेष येऊन आपल्या बाळकृष्ण या भावाच्या मदतीनें हा गुन्हा केला, असें कबूल केलें. टिळक वगैरे लोकांना या खुनाबाबत त्रास होऊं लागला, तेव्हां हा कबूलीजबाब द्यावयाचा आपण अगोदरच ठरविलें होतें, असेंही त्यानें सांगितलें. या कबुलीजबाबांतील मुख्य मुद्दा ग्राह्य ठरून चाफेकरबंधू फांशी गेले.

द्रवीडबंधू हे चाफेकरांचे बाळमित्र. या मित्रद्रोहाबद्दल त्यांना लौकरच प्रायश्चित्त मिळालें. चाफेकरांचा तिसरा बंधु वासुदेव व त्याचे एक स्नेही रानडे यांनीं ता. ८ फेब्रुवारी १८९९ रोजीं रात्रीं द्रवीडबंधूंना ब्रुइनसाहेबांनीं बोलावलें आहे असें सांगून घरांतून बाहेर नेलें व खुन्या मुरलीधराचे देवळाजवळ त्यांच्यावर गोळी ठोकली. द्रविडबंधू दुसरे दिवशीं इस्पितळांत मरण पावले, व खुनांतून उत्पन्न झालेल्या ह्या खुनांचा खटला सुरू झाला. वासुदेव चाफेकर व रानडे यांचेवर आरोप शाबीत होऊन ता. १३ मार्च रोजीं त्यांना फांशीची शिक्षा दिली. ‘ पुढच्या जन्मींची शिक्षाही वाटेल तर आतांच द्या ’ अशा उद्गारांनीं त्यांनीं शिक्षेचा स्वीकार केला.

दामोदर चाफेकराच्या जबानींतील एक मुद्दा संस्मरणीय आहे. आपण लष्करी नोकरींत शिरण्याचे प्रयत्न केले; मला नोकरींत घ्याल तर मी चारशें ब्राह्मणांची कवायती पलटण तयार करीन; परंतु आपलें ब्राह्मण्य आड आलें. म्हणून निराशा झाल्याचें त्यानें सांगितलें. त्या मुद्यावर भर देऊन केसरीनें लिहिलें, “चाफेकरांच्या अंगीं असलेल्या तेजाचा सरकारनें जर उपयोग करून घेतला असता तर त्यांनीं मारलेल्या गोळीपुढें मि. रँड, ले. आयर्स्ट किंवा द्रविड बंधू हे मृत्युमुखीं न पडतां सरहद्दीवरील शत्रूंच्या कपाळाच्या कवच्या उडाल्या असत्या. एकाद्या राष्ट्रांतील लोकांचा तेजोभंग करणें हें सरकारास हितावह आहे किंवा त्या तेजाचा आपल्या कामीं उपयोग करून घेणें अधिक श्रेयस्कर आहे, अशा प्रकारचा राष्ट्रीय महत्त्वाचा प्रश्न वरील खटल्यापासून उत्पन्न होतो.” ( के० १४--३--९९ )

[ न. चिं. केळकर : **टिळक चरित्र भा. १. लो० टिळकांचे केसरींतील लेख, भा. १. केसरी प्रबोध.** ]

—०—

# आजकालचा महाराष्ट्र

## वेदोक्त प्रकरण ( कोल्हापूर १९०१–६ )

" मराठे हे क्षत्रिय आहेत म्हणून त्यांचे सर्व संस्कार, ब्राम्हणांचे चालता त्याप्रमाणें, वेदोक्त विधीनें व्हावे, पुराणोक्त पद्धतीनें नको " असा आग्र कोल्हापूरचे शाहू महाराज यांनीं धरला. त्यांची ' री ' इतर मराठ्यांनीं ओढल कोल्हापूरचे ब्राम्हण सर्वसाधारणपणें मराठ्यांचा हा समानदर्जाचा हक्क मान्य करीत पण या बाबतींत शंकराचार्यांचा निर्णय मान्य करावा असें जेव्हां कित्येकांनीं सुचवि तेव्हां वेदोक्त कर्माबद्दल महाराजांना परवानगी देणें न देणें हा अधिकार कोल्हापू ब्रम्हवृन्दाचा आहे, यांत जगद्गुरु स्वामींनीं ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं अ कोल्हापूरकर राजोपाध्ये वगैरे मंडळी म्हणूं लागले. कोल्हापूरच्या ब्राम्हणांच हट्ट शाहूमहाराज चालू देण्यास मुळींच तयार नव्हते. वेदोक्त पद्धतीला कबूर नसलेल्या पुरोहितांचीं परंपरागत वतनें भराभर जप्त होऊं लागलीं. पण पुरोहि वर्गानें या प्रसंगीं कमालीचें धैर्य दाखविलें. वतन गेलें, वेतन गेलें. परंतु ब्राम्हण परंपरागत चाललेली रीती सोडावयास कांहीं तयार झाले नाहींत. कोल्हापूरच्य ब्रम्हवृन्दाला इतक्या हट्टास पेटविण्यास प्रो. वि. गो. विजापूरकर कारण झाले असा शाहूमहाराजांचा ग्रह झाला. विजापूरकरांना या चळवळींत राजकारण आढळलें. व त्यांची लेखणी ब्रम्हवृंदाच्या बाजूनें तरफदारी करूं लागली. शेवटीं ज्यांच्यापुढें सर्व पक्षांना सर्व पत्रपुराव्यासह आपापलें म्हणणें मांडतां येईल असे ( ट्रिब्युनल ) पंच नेडून या गोष्टीचा निकाल लावावा असें विजापूरकरांनी सुचविलें. या मंडळांत दोन शास्त्री, दोन डॉ. भाण्डारकरांसारखे तिऱ्हाईत संस्कृतज्ञ व दोन युरोपिअन अशा सहा गृहस्थांचा समावेश व्हावा व या मंडळानें दिलेला निर्णय जगद्गुरूपुढें ठेवून अनुज्ञा घ्यावी असें विजापुरकरांचें म्हणणें होतें. पण महाराजांना तें कबूल झालें नाहीं.

याचा परिणाम पुढें विजापूरकरांना भोगावा लागला. स्वदेशी चळवळीला प्रोत्साहन देऊन विद्यार्थ्यांना स्वदेशीकडे प्रवृत्त केल्याबद्दल विजापूरकरांना राजाराम कॉलेजमधील अध्यापकाच्या खुर्चीला मुकावें लागलें ( १९०५ ). नंतर तीन वर्षांनीं त्यांना राजद्रोहाबाबद ठेठावलेल्या शिक्षेंत ते कोल्हापूर सोडून गेले होते तरी या प्रकरणाचा कांहीं संबंध असावा असें म्हणतात.

## ' भिक्षांदेही 'ला सोडचिठ्ठी

या वेदोक्त प्रकरणांत ब्रह्मनाळ स्वामींनीं महाराजांचा पक्ष उचलला. हे स्वामी भिलवडीकर महाराज यांचे शिष्य. भिलवडीकरांना शाहू महाराजांचा वेदोक्ताधिकार मान्य नव्हता. म्हणून या वादावर गुरुशिष्यांची जुंपली. केसरीनें " गुरुस्वामीं"ची बाजू उचलली. ' केसरी 'ला महाराजांचा अधिकार मान्य नव्हता असें नव्हे. शिवाजी महाराजांचे राज्याभिषेकाचे वेळीं हा अधिकार पूर्णपणें मान्य झाला होता; मध्यंतरीं ती परंपरा विच्छिन्न झाली; म्हणून योग्य प्रायश्चित्त घेतल्यास हा अधिकार महाराजांना प्राप्त व्हावा, असें ' केसरी 'नें प्रतिपादिलें. प्रायश्चित्ताच्या तपशिलांत मतभेद पडल्यामुळें तें राहिलें, व पुढें राजोपाध्ये हट्टास पेटल्यामुळें ती मसलत फुकट गेली. या वेदोक्त वादाची पुढली पायरी म्हणजे महाराष्ट्रांत कांहीं काळ गाजलेली ब्राह्मणेतर व सत्यशोधकी चळवळ होय.

[ गं. दे. खानोलकर : **विजापूरकर चरित्र. केसरी प्रबोध.** ]

---

## सुरतेचें भांडण ( राष्ट्रीय सभा १९०७ )

कलकत्त्याला राष्ट्रीय सभेचें अधिवेशन १९०६ सालीं झालें, त्यांतच पुढील वर्षीं सुरतेस झालेल्या दुफळीचें मूळ होतें असें म्हणतां येईल. कलकत्त्याची बैठक अनेक दृष्टीनें चिरस्मरणीय झाली. अध्यक्ष म्हणून महर्षि दादाभाई नवरोजी यांनीं केलेल्या भाषणांत राष्ट्रीय सभेला स्वराज्याचें ध्येय दर्शविलें होतें. तावत्कालपर्यंत राष्ट्रीय सभेनें आपल्या कार्याला ध्येयाची जोड दिली नव्हती. सरकारच्या किरकोळ कारभारावर टीका करून त्यांतील दोष काढून टाकण्याची नम्र विनंति करणें हाच मार्ग राष्ट्रीय सभा पहिलीं वीस एक वर्षें चोखाळी. कलकत्ता काँग्रेसनें मात्र स्वराज्य हें ध्येय मान्य केलें. पण ' स्वराज्या ' सारखें ध्येय ' भिक्षांदेही 'नें थोडेंच साध्य होणार ? म्हणून त्याच बैठकींत स्वदेशी, बहिष्कार, व राष्ट्रीयशिक्षण या मार्गांनीं प्रयत्न करावयाचे असें ठरलें.

हे असे ठराव पास झाले ते नेमस्त पक्ष कलकत्ता काँग्रेसला हजर नव्हता म्हणून नव्हे. वस्तुतः जुना नेमस्त व नवा जहाल—दोन्ही पक्ष आपल्या सर्व ग्रहोपग्रहांसह त्या बैठकीस हजर होते. वंगभंगानें लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं होतीं. अशा स्थितींत खुद्द बंगालप्रांतीं काँग्रेस भरली असतां हे

ठराव पास न होते तरच नवल. पण नेमस्तांचे मेथा, गोखले वगैरे पुढारी या ठरावांमुळें अगदीं नाराज झाले व कसेंही करून पुढील बैठकींत ते बदलून घेण्याचा बेत त्यांनीं केला. त्यांनीं ठरावांच्या उलट चळवळ सुरू केली व तिची छाया सुरत व रायपूर येथें भरलेल्या प्रान्तिक परिषदांवर पडलीही. शिवाय राष्ट्रीयसभेचीं सूत्रें हातीं होतीं, त्यांचा उपयोग करून नेमस्तपक्षानें राष्ट्रीयसभेची पुढील बैठक नागपूरहून सुरतेस नेण्याचें ठरविलें. नेमस्तपक्षाचें हें धोरण पाहून जहाल पक्षाला चीड आली व त्यांतील कांहीं जण नेमस्तांची कॉंग्रेस सोडून स्वतंत्र चळवळ करण्याची भाषा बोलूं लागले. अशा लोकांना टिळकांनीं थोपवून धरलें व सुरतेस भरणाऱ्या कॉंग्रेसमध्यें नेमस्तपक्षाशीं सामना देण्याची तयारी त्यांनीं जारीनें सुरू केली.

मध्यंतरी आणखीं एक मतभेदाचा प्रश्न निर्माण झाला. पंजाबचे पुढारी लाला लजपतराय हे सुमारें सहा महिन्याच्या हद्दपारीनंतर मंडालेहून परत आले होते. त्यांना अध्यक्ष निवडावें अशी राष्ट्रीयपक्षाकडून सूचना आली. पण लजपतरा-यांना अध्यक्ष केल्यानें सरकार चिडेल या भीतीनें नेमस्तपक्षानें घाईघाईनें डॉ. रासबिहारी घोष यांना अध्यक्षस्थानीं निवडलें. "Surely, we cannot flout the Government at this stage.........The Authorities will throttle our movement in no time" असे उद्गार गोखले यांनीं या प्रसंगीं काढले. वास्तविक 'स्वराज्या'ची मागणी करणें म्हणजेच सरकारचा रोष ओढवून घेणें आहे. तो ठराव तर अगोदरच पास झालेला असतां, अध्यक्षांच्या निवडणुकीवर असा युक्तिवाद करून काय फायदा? पण नेमस्तपक्ष कलकत्त्याच्या ठरावालाच विरोध करीत होता. तात्पर्य, अध्यक्षासंबंधाचा वाद निघाला याचें मूळ कारण व्यक्तींत नसून, तत्त्वांत होतें.

असे परस्परविरोधी तत्त्वांचे अभिमानी सुरतेस तळ देऊन राहिले. परस्परां-मध्यें समेट घडवून आणण्याचे प्रयत्न झाले; पण ते सिद्धीस गेले नाहींत. शेवटीं कलुषित वातावरणांतच सभेस सुरवात झाली. स्वागताध्यक्षांच्या भाषणानंतर डॉ. घोष यांनीं अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी सूचना पुढें आली व सभेंतली सगळी शांतता विराम पावली. ह्या सूचनेस पाठिंबा द्यावयास

सुरेन्द्रनाथ बानर्जी उभे राहिले, त्यांना कोणी बोलूं दिलें नाहीं. सर्वत्र आरडा-ओरड माजली व स्वागताध्यक्षांनीं बैठक तहकूब केली.

दुसरे दिवशीं बऱ्याच हिंदुमुसलमान गुंडांना मंडपांत प्रवेश मिळाला. सभेच्या कामाला सुरवात झाल्यावर सुरेन्द्रबाबूंनीं आपलें भाषण चालविलें. ते अध्यक्षपदाचा ठराव सभेपुढें मांडणार, इतक्यांत आपली आगाऊच कळवून ठेवलेली उपसूचना मांडण्याकरितां टिळक व्यासपीठाकडे जाऊं लागले. एका स्वयंसेवकानें त्यांना अडथळा करण्याचा प्रयत्न केला, पण त्यास न जुमानतां टिळक गेले व भाषण करूं लागले. इकडे घोष जणूं काय टिळक बोलतच नाहींत अशा बाण्यानें ठराव पास झाला असें गृहीत धरून उठले आणि माझ्या निवडणुकीचा ठराव पास झाला! मी अध्यक्ष आहें,' असें त्यांनीं घोषित केलें. पण आपलें भाषण ते वाचण्यास सुरवात करणार, इतक्यांत टिळकांनीं 'तुमच्या निवडणुकीचा ठराव अजून पास झाला नाहीं,' असें त्यांना बजावलें. झालें. गडबड माजली व शिव्या आणि ठोसे यांचा विनिमय सवंग होऊं लागला. कोणी एकानें तर जोडा फेंकला व तो मेथा आणि सुरेन्द्रबाबू यांना ओझरता लागून टेबलावर पडला. थोड्याच वेळांत नेमस्त पक्षाची मंडळी मागच्या बाजूनें निघून गेली. पोलिस न येते तर मंडपांतील मारामारीला मोठें स्वरूप आलें असतें.

अशा तऱ्हेनें राष्ट्रीय सभा मोडली. पण ती पुनः जोडावी असें नव्या राष्ट्रीय पक्षाचें मत होतें. उलटपक्षीं राष्ट्रीय सभेची ब्याद टाळून सवतासुभा स्थापण्याचे मार्ग नेमस्तपक्ष शोधूं लागला. आमची मंडळी तयार आहे; आम्हीं डॉ. घोष यांना अध्यक्ष म्हणून मान्य करतों; पण आमची अट एवढीच कीं कलकत्त्याची चतुःसूत्री ( स्वराज्य, स्वदेशी, बहिष्कार आणि राष्ट्रीय शिक्षण ) ठरावाच्या रूपानें पुनः प्रस्थापित व्हावी, असें टिळकपक्षाचें म्हणणें पडलें. नेमस्तांनीं तें कांहींच न जाणतां कन्व्हेन्शन या नांवानें स्वतंत्र सभा भरविली. नेमस्त पुढाऱ्यांनीं तयार केलेल्या प्रतिज्ञापत्रकावर सही केल्याखेरीज कोणाला सभेच्या स्थानीं सोडलें नाहीं. त्या प्रतिज्ञापत्रकांत स्वदेशी--बहिष्कार--राष्ट्रीय शिक्षण यांचा नुसता उल्लेखही नव्हता. उलटपक्षीं कलकत्त्याची चतुःसूत्री मान्य असणाऱ्यांसाठीं राष्ट्रीय पक्षानें निराळी सभा राष्ट्रसभेचें काम पुरें करण्याचे हेतूनें भरविली.। याचा इत्यर्थ एवढाच कीं नेमस्तपक्ष राष्ट्रीय सभेंतून फुटून

निघाला. तेव्हांपासून लखनौला संयुक्त काँग्रेस भरेपर्यंत ( १९१६ ) नेमस्तांचें वेगळें कन्व्हेन्शन भरत असे.

[ न चिं. केळकर : टिळकचरित्र, भाग २. केसरी प्रबोध. लो॰ टिळकांचे केसरींतील लेख भा॰ ३. ]

—०—

## ताईमहाराज प्रकरण ( १८९७–१९२० )

मृत्युशय्येवर पडलेल्या एका मित्राची इच्छा पूर्ण करण्याकरितां टिळकांनी त्याच्या इस्टेटीच्या चौघां ट्रस्टींपैकीं एक होण्याचें ठरविलें; पण एक जन्माची कटकट पाठीस लावून घेतली. बाबा महाराज १८९७ सालीं वारले. महाराजांच्या दत्तकप्रकरणीं वांधा पडून १९०१ सालीं टिळकांनीं साक्षीदार म्हणून पुणें डिस्ट्रिक्ट कोर्टांत पाऊल टाकलें. तेथपासून त्यांचा एकही महिना या प्रकरणाबाबत कांहीं ना कांहींतरी काम केल्यावांचून सुना गेला नसेल. तें प्रकरण त्यांना १९२० सालच्या जुलैपर्यंत म्हणजे जवळजवळ अगदीं मृत्यूपर्यंत पुरलें. याच प्रकरणामुळें टिळकांची निस्पृहता, करारीपणा, चिकाटी आणि चारित्र्य हीं सर्व कसाला लागलीं. आणि टिळक त्या कसोटीला पूर्णपणें उतरले.

बाबा महाराज निपुत्रिक वारले. मरणसमयीं त्यांची तरुण पत्नी ताईमहाराज गरोदर होती. तिला मुलगा झाला. पण तोही दोन महिन्यांतच वारला. अर्थात् इस्टेटीला वारस म्हणून दत्तक घ्यावयाचा प्रश्न उद्भवला. दत्तक घ्यावयाचा तो अर्थात् गोत्रजच घ्यावयाचा. परंतु त्यांतल्या त्यांत कोणत्या घराण्याचा घ्यावयाचा हा प्रश्न होता. व याच मुद्यावर ट्रस्टींमध्यें दुफळी माजली. ट्रस्टींपैकीं श्री. नागपूरकर यांचा कोल्हापूरशीं ऋणानुबंध असल्यामुळें तिकडील शाखेचा दत्तक घ्यावा असें त्यांचें मत पडलें. टिळक त्या गोष्टीला नाकबूल झाले. टिळक संस्थानी वातावरणाविषयीं आधींच साशंक; त्यांत तिकडील शाखेच्या एकदोन प्रौढ मुलांनीं अगोदरच अपकीर्ति कमावून ठेविलेली. तेव्हां अशा वातावरणांत वाढलेल्या मुलांच्या हातीं इस्टेट लागली तर पुढेंमागें तिचें वाटोळें होईल अशी भीति टिळकांना पडली. व त्यांनीं दूर निजामशाहींतला मुलगा दत्तक घ्यावा असा विचार केला.

अशाप्रकारें ट्रस्टींत भांडणें सुरू झालीं. "कोल्हापूरकडचा मुलगा दत्तक घेतलात तर तो अंतस्थ रीत्या करारमदार करून मिळकतीचा कांहीं भाग तुम्हांस

तोडून देईल. टिळकांच्या मताप्रमाणें दत्तक झाल तर हिंदु विधवेचें खडतर आयुष्यच तुमच्या वांट्यास येईल," अशी ताईमहाराजांची समजूत करून देऊन नागपूरकरांनीं तिची सहानुभूति मिळविली. अखेर हो ना करतां करतां ता. १८ जून १९०१ रोजीं ट्रस्टींच्या तर्फे खापर्डे आणि स्वतः ताईमहाराज यांनीं औरंगाबादेकडे जाऊन दत्तकप्रकरणाचा कायमचा निकाल करून परत यावें असा ठराव झाला. त्याप्रमाणें मंडळी निजामशाहीकडे रवाना झाली. तेथील शाखेंतील मुलांची सर्व प्रकारें परीक्षा होऊन जगन्नाथमहाराज पंडित यांना ता. २७।२८ जून रोजीं दत्तक घेण्यांत आलें.

ट्रस्टींचें दप्तर नागपूरकरांच्या स्वाधीन होतें. त्याचा फायदा घेऊन ता. १८ जून रोजीं झालेला ठराव आपल्याला अमान्य असल्याचा शेरा मागाहून त्यांनीं लिहून ठेवला व पुढच्या वादाचा पाया रचिला. औरंगाबादेकडील दत्तकविधान रद्द करण्याचे सर्व मार्ग नागपूरकर व ताईमहाराज यांनीं अमलांत आणले. पहिला दत्तक रद्द करण्यासाठीं दुसरा दत्तक घेणें जरूर होतें. कोल्हापूरच्या शाखेपैकीं एक बाळामहाराज यांची त्याकरतां निवड झाली. प्रथम हें दत्तकविधान पुण्याला व्हावयाचें ठरलें होतें. पण टिळकांनीं तो डाव फिसकटविला; पण शेवटीं ताईमहाराज स्वतः कोल्हापुरास गेल्या व छत्रपतींच्या देखत त्यांनीं बाळामहाराजांना दत्तक घेतले.

हें दत्तकविधान होण्यापूर्वी ताईमहाराजांनीं एक डाव टाकला होता. त्यांनीं सर्व ट्रस्टींना अशी नोटीस दिली कीं, 'मला मुलगा होऊन तो वारला, यामुळें यापुढें बाबामहाराजांच्या सर्व इस्टेटीची मालकीण मुलाची आई व वारसदार या नात्यानें मी झालें आहें. म्हणून बाबामहाराजांचें मृत्युपत्र आतां रद्द ठरतें. मुलगा जिवंत राहाता तर तो मालक असतांही वयांत येईपर्यंत बापानें मृत्युपत्राप्रमाणें नेमलेले पालनकर्ते म्हणून त्याच्यातर्फे वहिवाट करण्याचा अधिकार ट्रस्टींना राहिला असता. पण तो मेला, म्हणून तुम्हीं यापुढें इस्टेटीच्या व्यवस्थेंत कांहीं एक हात घालूं नये.' या नोटिशीप्रमाणें इस्टेटीचा प्रोबेट रद्द करण्याचा अर्ज ताईमहाराजांनीं पुणें डिस्टिक्ट कोर्टांत मि० ॲस्टन यांच्यापुढें गुदरला (ता० २९ जुलै १९०१). राजद्रोहाच्या पहिल्या खटल्यांत टिळक शिक्षा भोगून आलेले, म्हणून ॲस्टन यांच्या कोर्टांत टिळकांना सर्वस्वीं प्रतिकूल वातावरण

आढळलें तर नवल काय? टिळकांनीं दुसऱ्या एकाद्या कोर्टाकडे दावा बदलून घेण्याचा प्रयत्न केला पण तो निष्फळ ठरला. मि० ॲस्टन यांनीं सर्वस्वीं ताई-महाराजांच्या बाजूनें निकाल दिला. इतकेंच नव्हे, तर टिळकांवर खोटी साक्ष देणें, बनावट कागद करणें, खोटे हिशोब ठेवणें, ताईमहाराजांना अटकेंत ठेवणें, नागपूरकरांवर खोट्या तोहमती आणणें वगैरे आरोप ठेविले व त्यांची चौकशी व्हावी असें लिहून सर्व कागदपत्र पुणें सिटी मॅजिस्ट्रेट यांजकडे पाठविले. ताईमहाराजांनीं नवीन दत्तक घेतल्यावर तें दत्तकविधान रद्द व्हावें असा दावा टिळकांनीं दिवाणी कोर्टांत मांडला होता, त्याचें काम टिळकांना फौजदारीचा शह मिळाल्यावर आयतेंच थांबलें असतें.

टिळकांनीं ॲस्टन यांच्या निकालावर हायकोर्टांत अपील केलें. व ता० १९ ऑगस्ट रोजीं न्यायमूर्ति क्रो व बॅटी यांनीं ॲस्टन यांचा निकाल फिरविला. पण असें झालें तरी ॲस्टन यांनीं केलेले आरोप राहिलेच. त्यांची चौकशी होण्यासाठीं मि. क्लेमन्ट्स् यांना स्पेशल मॅजिस्ट्रेट नेमिलें. ता० २४ ऑगस्ट १९०३ रोजीं क्लेमन्ट्स् यांनीं निकाल देऊन टिळकांना खोटी साक्ष देण्याबद्दल दोषी ठरविलें. टिळकांचा हेतु निःस्वार्थी होता म्हणून कमी म्हणजे अठरा महि-न्याची सक्तमजुरी व एक हजार रुपये दंडाची शिक्षा त्यांनीं सांगितली. सेशनजज्जकडे अपील झालें, त्यांत शिक्षा कमी होऊन ती सहा महिन्यांची झाली. सेशन जज्जांनीं टिळकांवरील खोटी साक्ष देण्याच्या आरोपाचें स्वरूप बरेंच सौम्य करून फक्त दत्तकविधान झाल्याचें वाक्य तेवढेंच खोटें एवढाच आरोप मान्य केला. याही शिक्षेवर अपील झालेंच. हायकोर्टांत न्या. जेन्किन्स व बॅटी यांनीं टिळकांना दोषमुक्त करून सोडून दिलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं सरकारी बॅरि-स्टराकडून टिळकांवर शिल्लक असलेले इतर सर्व आरोप सरकारनें परत घेतल्याची कबुली तोंडानें वदवून आपल्या कागदांवर नोंदवून घेतली ( ३ मार्च १९०४ ).

अशा तऱ्हेनें ॲस्टननीं टिळकांना दिलेला फौजदारी शह कुचकामी ठरला. पण दिवाणी प्रकरण अद्याप चालावयाचेंच होतें. या मुकदम्यांतील सर्व कागद-पत्र फौजदारी खटल्यांत अडकल्यामुळें दिवाणी खटला चालणें शक्यच नव्हतें. फौजदारी खटल्याचा निकाल लागल्यावर हे कागदपत्र मिळाले. पण मध्यंतरीं ताई-महाराज निवर्तल्यामुळें त्यांच्या जागीं त्यांची अविवाहित कन्या शांताआका

हिचें नांव दाखल झालें; व ता. २७ सप्टेंबर १९०१ रोजीं दाखल झालेली फिर्याद चार वर्षांनंतर सुनावणीस निघाली. १९०५ च्या जून महिन्यांत वादी या नात्यानें टिळकांची साक्ष सुरू झाली. ती संपल्यावर उभयपक्षीं कमिशननें निघालीं. व शेवटीं १९०६ सालीं जुलै ३१ ला पुणें फर्स्टक्लास कोर्टानें टिळकांना सर्वस्वीं अनुकूल असा निकाल दिला.

आतां अपील करण्याची पाळी प्रतिपक्षावर आली. अपील मंजूर होऊन त्याचा निकाल लागण्यास चार वर्षें लागलीं. मध्यंतरीं (१९०८) टिळकांना राजद्रोहाबद्दल सहा वर्षांची सजा झाली म्हणून खटल्याचे कागदपत्र त्यांना मंडालेस तुरुंगांत तपासावे लागले. पण या अपिलांत न्या० चन्दावरकर व न्या० हीटन या उभयतां न्यायमूर्तींनीं टिळकांविरुद्ध निकाल दिला. टिळकांची साक्ष पुनः खोटी ठरली, त्यांचा पुरावा पुनः अविश्वसनीय मानला. न्यायमूर्तींनीं दस्तऐवजाचा अर्थ विपरीत केला व टिळकांना दोषी ठरविलें. आपल्या निकालांत टिळकांना अप्रामाणिक ठरविण्यासाठीं चन्दावरकरांना युक्तिवाद लढवावा लागला. टिळकांचा द्रव्याविषयींचा निःस्वार्थीपणा पुनः पुनः सिद्ध झाला होता. पण चन्दावरकरांच्या व्याख्येप्रमाणें ते अप्रामाणिकपणाच्या आरोपांतून सुटत नव्हते "अप्रामाणिकपणा हा अनेक प्रकारचा असूं शकतो. त्यांत पैशाचा संबंध असलाच पाहिजे असें नाहीं. द्रव्यलोभाप्रमाणें अधिकारलोभानेंही मनुष्य अप्रामाणिक वर्तन करूं शकेल. पण अधिकाराच्या जागीं मनुष्य असला म्हणजे अर्थात् तो बोलेल तेंच खरें."

चन्दावरकरांचे हे शब्द त्यांच्यावर उलटविण्याइतकी धमक आणि चिकाटी टिळकांचे अंगीं होतीच. टिळक तुरुंगांत असले तरी प्रिव्ही कौन्सिलकडे अपील व्हावयाचें चुकलें नाहीं. प्रिव्ही कौन्सिलनें हायकोर्टाचा निकाल तर फिरवलाच, पण तो फिरवितांना न्यायाधिशांवर टीकाही केली. "टिळकांवर व त्याच्या साक्षीदारांवर कट करण्याच्या गुन्ह्याचा आरोप पर्यायानें चन्दावरकरांनीं आणला आहे व तो भयंकर असून खोटा आहे." चन्दावरकरांचा युक्तिवाद अशा प्रकारें धुडकावून हायकोर्टाच्या अनुमानास काडीइतकाही आधार नाहीं असा निकाल प्रिव्ही कौन्सिलनें दिला ( १९१५ ).

या निकालानें तरी प्रतिपक्षानें शहाणें व्हावें. पण नाहीं. कोल्हापूर दरबारनें प्रिव्ही कौन्सिलचा निकाल मानण्याचें नाकारलें, व कोल्हापूरच्या राज्यांत बाळामहाराजांचेंच दत्तकविधान कायदेशीर ठरविलें. म्हणजे जगन्नाथमहाराजांना कोल्हापूर संस्थानच्या हद्दींतील जहागिरीला मुकावें लागलें. तरीपण खालसांतील जहागीर राहिली. ती जप्त करण्याचे प्रयत्नही कोल्हापूर दरबारनें केले. इ. स. १८७६ च्या एका कायद्यान्वयें आपल्याला ती इस्टेट जप्त करण्याचा अधिकार आहे असें दरबारचें म्हणणें पडलें. परंतु खालसा उत्पन्नाला कोल्हापूर दरबारनें कांहीं हरकत आणिली तर ती आपण दूर करूं असें अभिवचन इंग्रजसरकारनें १९ व्या शतकाचे प्रारंभीं महाराज घराण्याचे त्या वेळचे कर्ते पुरुष भाऊमहाराज यांना दिलें असल्यानें कोल्हापूर दरबारच्या प्रयत्नांस यश आलें नाहीं. मुंबईसरकारनेंही प्रिव्ही कौन्सिलचा निकाल मान्य करण्यास बरीच नाखुषी दर्शविली. शेवटीं इस्टेट ताब्यांत आली; पण वडिलोपार्जित सरदारीशिवाय. मात्र बारा वर्षांनंतर जगन्नथामहाराजांना सरदारी परत मिळाली.

[ न. चिं. केळकरः **टिळक चरित्र भा० २** ]

---

## नाशिक प्रकरण ( नाशिक १९०९-१० )

ता० १२ डिसेंबर १९०९ रात्रीं रोजीं नाशिकचे कलेक्टर जॅक्सन किर्लोस्कर कंपनीचें नाटक पाहाण्याकरितां नाशिक येथील विजयानंद थिएटरामध्यें गेले होते. आपणांस येण्यास उशीर झाला म्हणून ते दिलगिरी प्रदर्शित करीत होते. इतक्यांत पिस्तुलाचा आवाज होऊन त्यांच्या पाठींत एक गोळी बसली. कसला आवाज तें पाहाण्यासाठीं ते वळून पहातात तोंच पांच सहा गोळ्या त्यांच्या शरीरांत धडाधड शिरल्या व ते तात्काळ गतप्राण होऊन पडले. डेप्युटी इन्स्पेक्टर पळशीकर यांनीं चपळाई करून खुनी इसमास पकडलें. खुनी इसम—अनन्त लक्ष्मण कान्हेरे--हा अठरा एकोणीस वर्षांचा कोंवळा तरुण होता. त्यानें कबुली दिली कीं, "माझें कर्तव्य होतें तें मी पार पाडलें आहे. गणेश दामोदर सावरकर यांना जन्मठेपेची शिक्षा दिली आणि एका हिंदी गाडीवाल्याचे मृत्यूस करणीभूत झालेले एक्झिक्युटिव्ह इन्जिनिअर, मि० विल्यम्स यांस सोडून दिलें, म्हणून मी जॅक्सन यांचा खून केला. मी निसटून जाऊं इच्छित नाहीं." पुढें कोर्टापुढें जबानी देतांना कान्हेरे यानें असें सांगितलें कीं, ब्रिटिश

दडपशाहीचा निषेध करण्यासाठीं मी हा खून केला. जॅक्सन यांच्या सुशील स्वभावामुळें मला त्यांचा खून करावासें वाटेना. परंतु माझ्या साथीदारांनीं माझी संशयनिवृत्ति केली. आमचे बेत सप्टेंबर महिन्यापासून सुरू होते.

खुनाच्या वेळेपासून झडतीचें सत्र सुरू झालें. या खुनाबाबद तिघांना फांशी, दोघांना जन्मठेप, व एकाला दोन वर्षें सक्तमजुरी अशा शिक्षा झाल्या.

या खुनांतूनच 'नाशिक कटा' च्या खटल्याची उत्पत्ति झाली. त्यांत बॅ० विनायक दामोदर सावरकर यांना आरोपी म्हणून विलायतेहून पकडून आणलें. त्याचवेळीं त्यांनीं बोटींतून उडी टाकून कैदेंतून निसटून जाण्याचा प्रयत्न केला. बोट मार्सेलिस बंदरांत उभी होती. उतारूंची चढउतर, मालाची ने-आण, बोटीवर चढलेल्या फेरीवाल्यांची गर्दी—अशी गडबडीची वेळ साधून निसटण्याचा विचार सावरकरांच्या मनांत आला. स्नान करावयाच्या निमित्तानें ते स्नानगृहांत गेले. कांहीं राहिल्याचा बहाणा करून त्यांनीं पहारेकऱ्यांना दूर घालवून दिलें. नंतर स्नानगृहाचें दार घट्ट लावून घेऊन अंगाला सपाटून साबण माखला व खिडकीवाटे ते बाहेर पडले. इकडे पहारेकरी परत येऊन पहातो तों स्नानगृहाचा दरवाजा लागलेला व हांक मारली तरी आंतून जवाब येत नाहीं. त्यानें ताबडतोब पुकारा केला. व थोड्याच अवधींत बोटीवर जिकडे तिकडे 'अरे निसटला' 'हिंदी कैदी फरारी झाला' अशा आरोळ्यांनीं ओरड झाली. धक्क्यापर्यंतचें अंतर पोहून सावरकरांनीं चपळाईनें किनारा गांठला व रस्त्यानें 'कॅब' 'कॅब' ( भाड्याची गाडी ) असें ओरडत ते पळत सुटले. जवळच असलेल्या एकदोन हिंदी इसमांनीं त्यांना 'कॅब' मिळवून देऊन मदत करण्याचा प्रयत्न केला, परंतु सावरकरांच्या मागें फ्रेन्च पोलीस, व इतर कांहीं इसम लागले होते, त्यांना पाहून सावरकर दिशा बदलून पळूं लागले. पण अखेरीस त्यांना पकडून फिरून बोटीवर आणलें.

नाशिक कटाच्या खटल्यांत एकंदर ३८ आरोपी होते. एकंदर तीस इसमांना शिक्षा झाल्या. सावरकरांना दोनदां जन्मठेप मिळून एकंदर ५० वर्षें काळ्यापाण्याची शिक्षा झाली. इतर २९ जणांना निरनिराळ्या मुदतीच्या सक्तमजुऱ्या मिळाल्या.

—०—

या परिशिष्टांत सन १७९९ पासून सन १९३४ अखेरपर्यंतच्या कालांतील महाराष्ट्राच्या दृष्टीनें महत्त्वाच्या अशा गोष्टींचा सालवारीनें निर्देश केला आहे. अशा प्रकारचा हा पहिलाच प्रयत्न असावा असें आम्हांस वाटतें. अर्थातच त्याच्या निर्दोषत्वाबद्दल ग्वाही देणें शक्य नाहीं. तरीपण प्रत्येक बाब शक्य तितकी पडताळून पाहिली आहे. जेथें महत्त्वाचे फरक आढळले तेथें ग्राह्य वाटत असलेला सन स्वीकारला असून फरकांचा निर्देश तळटिपांत केला आहे.

# कालगणना

१७९९

परशुरामतात्या गोडबोले ज०(मृ० १८७४)

१८००

विठोजी होळकर–हत्तीचे पायीं खून.

गोविंदराव गायकवाड मृ०

१८०१

आपसांतली यादवी ( शिंदे × होळकर )

लखबा दादा लाड मृ०

१८०२

रावबाजीविरुद्ध बंड–पुणें.

यशवंतराव होळकराचा पुण्यावर हल्ला.

१८०३

असईची लढाई ( मराठे × इंग्रज )

आडगांवची लढाई.

सुर्जी अंजनगांवचा तह. (मराठे + इंग्रज)

मोरोबादादा फडणीस मृ० (ज० १७६६)

नाना शंकरशेट ज० ( मृ० १८६५ )

१८०४

मुकंदराची लढाई (होळकर × इंग्रज) इंग्रजांचा पराभव.

डीगची लढाई ( होळकर × इंग्रज ) होळकरांचा पाडाव.

हरि केशवजी ज० ( मृ० १८५८ )

१८०५

शिंद्यास ग्वाल्हेर किल्ला परत.

भरतपूरची लढाई ( होळकर+जाठ × इंग्रज ) इंग्रजांचा पराभव.

मुस्तफापूरचा तह ( शिंदे+इंग्रज )

राजपूर घाटचा तह ( होळकर+इंग्रज )

१८०६

टॉमस कँडी ज० ( मृ० १८७७ )

खंडेराव होळकर यांचा खून.

१८०७

आनंदराव पवार ( धार ) मृ०

रामचंद्रराव पवार ( धार ) राज्यप्राप्ति.

१८०८

छत्रपति ( दुसरा ) शाहू मृ०

छत्रपति प्रतापसिंहास सातारचें राज्य मिळालें.

१८०९

अंबूजी इंगळे मृ० ( ज० १७२८ )

सर्जेराव घाटगे याचा खून.

१८१०

रामचंद्रराव पवार ( धार ) मृ०

सवाई रामचंद्रराव पवारास राज्यप्राप्ति.
बाळशास्त्री जांभेकर ज० ( मृ० १८४६ )
मराठींत पहिलें छापील पुस्तक.
( सिंहासनबत्तिशी. )

१८११

यशवंतराव होळकर मृ०

१८१२

विठोबा अण्णा दप्तरदार ज०
( मृ० १८७४ )

१८१४

दादोबा पांडुरंग ज० ( मृ० १८८२ )

१८१५

गंगाधरशास्त्री याचा खून.
पेंढाऱ्यांचे दंगे.
गोविंद नारायण शेणवी माडगांवकर ज०
( मृ० १८६५ )

१८१६

रघूजी भोंसले मृ०
परसोजी भोंसले यास राज्यप्राप्ति.

१८१७

रुक्मांगदराव पवार ( देवास २ ) मृ०
आनंदराव पवार ( देवास ) राज्यप्राप्ति.
परसोजी भोंसले मृ०
आप्पासाहेब भोंसले राज्यप्राप्ति.
पेंढाऱ्यांवर मोहीम सुरू.
तुळसाबाई (होळकर) खून (ज० १७८७)
महित्पूरची लढाई ( होळकर × इंग्रज )
पेशवाई समाप्तीचा तह
( रावबाजी + इंग्रज )
खडकीची लढाई ( मराठे × इंग्रज )
येरवड्याची लढाई ( मराठे × इंग्रज )
शनिवार वाड्यावर इंग्रजी निशाण—पुणें
( नोव्हें० १७ )
कोरेगांवची लढाई ( मराठे × इंग्रज )

१८१८

अष्टयाची लढाई ( इंग्रज × मराठे )
आप्पासाहेब भोंसले-इंग्रजांची कैद व बंड.
रघूजी भोंसले यास अधिकारप्राप्ति.
मंदसोरचा तह ( होळकर + इंग्रज )
मल्हारराव होळकर—राज्यप्राप्ति.
बापू गोखला मृ०
शिवनीची लढाई ( मराठे × इंग्रज )
रावबाजी माल्कमच्या आधीन झाले
( जून ३ )

१८१९

आनंदराव गायकवाड मृ०
वाघकृत मराठी व्याकरण तयार
( पोर्तुगीजमधून )

१८१९-२०

पुणें, सोलापूर, विजापूर जिल्ह्यांत
कॉलरा व दुष्काळ

१८२०

कृष्णशास्त्री राजवाडे ज० ( मृ० १९०१ )

१८२१

संस्कृत पाठशाळा—पुणें. स्थापना.

१८२२

महाराष्ट्रांत मुद्रणकलेचा प्रवेश.

*भाऊ दाजी (लाड) ज० (मृ० १८७४)
बॉम्बे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी.
( सरकारी ) मुंबई. स्थापना.
महादेवशास्त्री कोल्हटकर ज०
(मृ० १८६५)

१८२३
लोकहितवादी ऊर्फ गो. ह. देशमुख ज०
( मृ० १८९२ )
आत्माराम पांडुरंग ज० ( मृ० १८९८ )

१८२४
कृष्णशास्त्री चिपळूणकर ज० (मृ० १८७८)
स्वामी दयानंद सरस्वती ज० (मृ० १८८३)
केरो लक्ष्मण छत्रे ज० ( मृ० १८८५ )
"नानासाहेब" (पेशवा) ज०

१८२४-२५
दख्खनभर दुष्काळ-गुरांचा नाश.

१८२५
विष्णुबुवा ब्रह्मचारी ज० ( मृ० १८७१ )
गणेश सदाशिवशास्त्री लेले ज०
( मृ० १८९८ )
दादाभाई नवरोजी ज० ( मृ० १९१७ )

१८२७
विष्णु पराशर पंडित ज० ( मृ० १८७६ )
विष्णु मोरेश्वर भिडे ज० ( मृ० १९०१ )
दौलतराव शिंदे मृ० ( ज० १७७९ )
तुकोजी पवार ( देवास-१ ) मृ०

*[ केळकर ( टि. च. ) १८१८; फाटक ( वि. शा. वि. १९२४) १८२४; फाटक (न्या. रानडे-चरित्र) १८२२ ]

रुक्मांगदराव पवार राज्यप्राप्ति.
रावबाजीनें नानासाहेबांस दत्तक घेतलें.

१८२८
गणेश वासुदेव जोशी 'सार्वजनिक काका'
ज० ( मृ० १८८० )
* जोतीराव फुले ज० ( मृ० १८९० )
एल्फिन्स्टन विद्यालयाची स्थापना.
वासुदेव बाबाजी नवरंगे ज० (मृ० १९०७)
'महाबळेश्वर'ची प्राणप्रतिष्ठा.

१८२९
सतीची चाल बंद

१८३०
कृष्णाजी लक्ष्मण नूलकर ज० (मृ० १८९३)

१८३१
बाबा पदमनजी ज० ( मृ० १९०६ )
मोल्सवर्थ यांचा मराठी-इंग्रजी कोश.
रावजी श्रीधर गोंधळेकर ज०

१८३२-३३
दख्खनभर दुष्काळ.

१८३३
विश्वनाथ नारायण मंडलिक ज०
( मृ० १८८९ )
मल्हारराव होळकर मृ०
रामचंद्रराव पवार ( धार ) मृ०
यशवंतराव पवार ( धार ) राज्यप्राप्ति.

* फुले यांच्या गुलामगिरी ( ३ री आवृत्ति ) या पुस्तकास जोडलेलें चरित्र-१८२७. पं. सि. पाटीलही (फुले चरित्र) हाच सन देतात.

पाश्चात्य शिक्षणाचा उपक्रम.
आगबोटींची सुरवात.

१८३४

हरिराव होळकर यास राज्यप्राप्ति.

१८३५

वामन आबाजी मोडक ज० (मृ० १८९७)
महादेव मोरेश्वर कुंटे ज० (मृ० १८८८)
झांशीकर राणी लक्ष्मीबाई ज०
(मृ० १८५८)
मुद्रण स्वातंत्र्य.

१८३६

ठगीच्या बंदोबस्ताचा कायदा.
सोकर बापूजी त्रिलोकेकर ज०
(मृ० १९०८)
तुकारामतात्या पडवळ ज०
(मृ० १८९८)
तत्त्वविवेचक छापखाना. मुंबई. स्थापना.

१८३७

भास्कर हरि भागवत ज०
(मृ० १८९४)
'दिग्दर्शन' सुरू. मुंबई.
रामकृष्ण गोपाळ भाण्डारकर ज०
(मृ० १९२५)
सूर्याजी सदाशिव महात्मे ज०
(मृ० १८९९)

१८३८

मामा परमानंद ज० (मृ० १८८१)
बाळ मंगेश वागळे ज० (मृ० १८८७)
बजाबा रामचंद्र प्रधान ज० (मृ० १८८६)
बापूसाहेब कुरुंदवाडकर ज० (मृ० १८९९)

१८३९

विनायक जनार्दन कीर्तने ज० (मृ० १८९१)
श्रीधर विठ्ठल दाते ज० (मृ० १८९९)
जावजी दादाजी चौधरी ज० (मृ० १८९२)
सखाराम अर्जुन राऊत ज० (मृ० १८८५)
छत्रपति प्रतापसिंह (सातारा) पदच्युत.
सातारकरांचे चार वकील इंग्लंडास रवाना
(यशवंतराव शिर्के; भगवंत विठ्ठल;
चिटकोजी सुर्वे; रंगो बापूजी गुप्ते)

१८४०

(बॉ. ने. ए. सो. मोडून) बोर्ड ऑफ
एज्युकेशनची स्थापना.
शंकर पांडुरंग पंडित ज० (मृ० १८९४)
अप्पासाहेब भोसले मृ० (ज० १७९६)
जंगली महाराज ज०
आनंदराव पवार (देवास–२) मृ०
हैबतराव पवार (देवास–२) राज्यप्राप्ति.
काशिनाथ गोविंद नातु ज० (मृ० १८९७)
बॉंबे बॅंक. स्थापना. मुंबई.
विनायक कोंडदेव ओक ज० (मृ० १९१५)
'प्रभाकर' सुरू. मुंबई.
(गुप्त) परमहंस सभा–स्थापना. मुंबई.

१८४१

गुलामगिरी बंदीचा कायदा.
सातारा प्रकरण.
पुरंदर येथें रामोशांचें बंड.

१८४२

बेळगांवीं दोन ब्राह्मण बालविधवांचे पुनर्विवाह×

बाळशास्त्री जांभेकर यांस गणिताध्यापकाचें काम. मुंबई.

महादेव गोविंद रानडे ज० (मृ० १९०१)

'ज्ञानोदय' सुरू. मुंबई.

पुण्याच्या संस्कृत पाठशाळेस इंग्रजी वर्ग जोडला.

१८४३

'उपदेशचंद्रिका' सुरू. मुंबई.

रामचंद्र विष्णु माडगांवकर ज०

रामचंद्र भिकाजी गुंजीकर ज० (मृ० १९०१)

बळवंत पांडुरंग ऊर्फ अण्णा किर्लोस्कर ज० (मृ० १८८५)

जनकोजी शिंदे मृ०

हरीराव होळकर मृ०

१८४४

वामन दाजी ओक ज० (मृ० १८९१)

नीळकंठ जनार्दन कीर्तने ज० (मृ० १८९६)

अण्णा मोरेश्वर कुंटे ज० (मृ० १८९६)

गोविंद शंकरशास्त्री बापट ज० (मृ० १९०४)

पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी ज० (मृ० १९००)

पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी ज० (मृ० १९११)

खंडेराव होळकर मृ०

राघो भांग्र्याचें बंड. नगर-नाशिक.

१८४५

वासुदेव बळवंत फडके ज० (मृ० १८८३)

* मुंबईंत मुलींची पहिली शाळा.

ग्रँट मेडिकल कॉलेज. स्थापना.

वामन दाजी ओक ज० (मृ० १८९७)

फेरोजशहा मेथा ज० (मृ० १९१५)

जनार्दन बाळाजी मोडक ज० (मृ० १८९०)

महादेव चिमणाजी आपटे ज० (मृ० १८९४)

आनंदराव सखाराम बर्वे ज० (मृ० १८९३)

१८४५—४६

दख्खनभर दुष्काळ

१८४६

आबाजी विष्णु काथवटे ज० (मृ० १९०७)

× प्रभाकर. (२३-१-१८४२)

* फाटक (न्या. रानडेचरित्र पृ. १०८). पण भाण्डारकरांचे एतत्संबंधीं उद्गार निराळेच आहेत. "In the year 1848 was established the first girl's school in Bombay by the members of the Students' Literary & Scientific Society' (कर्नाटकी–तेलंगचरित्र, पृ. १७१)

१८४७

कृष्णाजी परशुराम गाडगीळ ज० (मृ० १८९६)

दीनानाथ विष्णु माडगांवकर ज० (मृ० १९१७)

अण्णासाहेब पटवर्धन (महर्षि) ज० (मृ० १९१७)

छत्रपति प्रतापसिंह (सातारा) ज० (मृ० १७९३)

बाळाजी प्रभाकर मोडक ज० (मृ० १९०६)

१८४८

अण्णा मार्तंड जोशी ज० (मृ० १८९८)

नारायण मेघाजी लोखंडे ज० (मृ० १८९८)

सदाशिव पांडुरंग केळकर ज० (मृ० १९०६)

स्टुडंट्स् लिटररी अँड सायन्टिफिक सोसायटी. स्थापना. मुंबई.

मराठे लोकांकरितां पुण्यांत स्वतंत्रशाळा. स्थापना (फुले)

अनाथ मुलांकरितां गृह स्थापना. पुणें (फुले)

छत्रपति शहाजी भोसले (सातारा) मृ०

पुणें नगरवाचन–मंदिर. स्थापना.

१८४८-९

सातारचें राज्य खालसा.

१८४९

×'ज्ञानप्रकाश' सुरू, पुणें.

कान्होबा रणछोडदास कीर्तिकर ज० (मृ० १९१७)

हरि माधव पंडित ज० (मृ० १८९९)

नारायण हरी भागवत ज० (मृ० १८६५)

१८५०

शंकर मोरे रानडे ज० (मृ० १८९९)

काशिनाथ त्र्यंबक तेलंग ज० (मृ० १८९३)

बाळाजीपंत नातु मृ०

विष्णुशास्त्री चिपळूणकर ज० (मृ० १८८२)

विठ्ठल भगवंत लेंभे ज०

कोल्हापूर जनरल लायब्ररी. स्थापना.

१८५१

स्वदेशी प्रदर्शन.

मुंबईस कापसाची पहिली गिरणी.

पुण्यांत मुलींची शाळा. स्थापना.

दक्षिणा प्राइझ कमिटी, पुणें. स्थापना.

फुल्यांची अस्पृश्यांसाठीं शाळा, पुणें. स्थापना.

१८५२

धि बाम्बे असोशिएशन मुंबई. स्थापना.

पूना कॉलेज स्थापना, पुणें.

'विचारलहरी' सुरू, पुणें.

कृष्णाजी नारायण आठल्ये ज० (मृ० १९२६)

लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर ज० (मृ० १९००)

---

× [पोतदार (म. ग. इं. अ.) १८४८]

नारायण बापूजी कानिटकर ज०
(मृ० १८९७)

१८५३

* बेहरामजी मलबारी ज०
(मृ० १९१२)

सिव्हिल सर्व्हिस परिक्षा सुरू.

हिंदुस्थानांतली पहिली आगगाडी
(मुंबई ते ठाणें) सुरू.

१८५४

गोविंद वासुदेव कानिटकर ज०
(मृ० १९१८)

१८५५

मुंबई विद्याखातें. स्थापना.

नारायण गणेश चन्दावरकर ज०
(मृ० १९२३)

गणेश श्रीकृष्ण खापर्डे ज०

१८५६

बाळ गंगाधर टिळक ज० (मृ० १९२०)

गोपाळ गणेश आगरकर ज० (मृ० १८९५)

रामचंद्र भिकाजी जोशी ज०
(मृ० १९२७)

चिंतामण गंगाधर भानू ज०
(मृ० १९२९)

विधवाविवाहाचा कायदा.

पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी ज०
(मृ० १९३०)

गणपतराव गायकवाड मृ०

१८५७

मुंबई युनिव्हर्सिटीची स्थापना.

हिंदी स्वातंत्र्य-संग्राम.

मुंबई स्कूल ऑफ आर्ट्स् स्थापना.

महादेव भास्कर चौबळ ज० (मृ० १९३४)

यशवंतराव पवार (धार) मृ०

आनंदराव पवार (धार) राज्यप्राप्ति.

१८५८

राणीचा जाहीरनामा.

हरि केशवजी मृ० (ज० १८०४)

श्रीधर रामकृष्ण भांडारकर ज०
(मृ० १९१६)

वामन शिवराम आपटे ज० (मृ०
१८९२)

वासुदेवशास्त्री खरे ज० (मृ० १९२४)

महादेव शिवराम गोळे ज० (मृ० १९०६)

धोंडो केशव कर्वे ज०

पंडिता रमाबाई ज० (मृ० १९२२)

झांशीची राणी लक्ष्मीबाई मृ० (ज०
१८३५)

१८५९

तात्या टोपे यांस फांशी (सिप्री)

१८६०

वासुदेव बाळकृष्ण केळकर ज०
(मृ० १८९५)

पिनल कोडाचा कायदा.

रुक्मांगदराव पवार (देवास-१) मृ०

कृष्णाजी पवार (देवास १) राज्यप्राप्ति.

सर्वसंग्रह मासिक, मुंबई. सुरू.

---

* केसरी प्रबोध. १८४३

विष्णूपंत भातखंडे ज०

१८६१

चिंतामण विनायक वैद्य ज०

कोंकण लाईनच्या बोटी सुरू.

१८६२

* 'इंदुप्रकाश' मुंबई. सुरू.

पहिले बी.ए. ( वामन आबाजी मोडक, भांडारकर, रानडे, वागळे ) ×

प्रभाकर रामकृष्ण भाण्डारकर ज० ( मृ० १९२५ )

नारायण वामन टिळक ज० ( मृ० १९१९

१८६३

फुले यांचा अनाथबालकाश्रम. पुणें. स्थापना

बायजाबाई शिंदे मृ०

शालापत्रक मासिक सुरू. पुणें.

नेटिव्ह ओपिनियन सुरू. मुंबई.

१८६४

हैबतराव पवार ( देवास-२ ) मृ०

नारायणराव पवार ( देवास २ ) राज्यप्राप्ति.

हरि नारायण आपटे ज० ( मृ० १९१९ )

विष्णुबुवा जोग ज० ( मृ० १९२० )

* [ वैद्य ( प्रा. स. इ. ) १८६३; केळकर ( टि. च. ) १८६४; पोतदार ( म. ग. इं. अ. ) १८६४ ]

× श्री. मोडक हे या सालीं एकटेच बी. ए. झाले असें श्री. केळकर टिळकचरित्रांत [भा. १ पृ. ६५] म्हणतात. न्या. रानडे हे त्याचसालीं बहुमानपुरस्सर बी.ए.ची परीक्षा उतरले असें श्री. न. र. फाटक 'चरित्रां'त म्हणतात.

जोसेफ बॅप्टिस्टा ज० ( मृ० १९३० )

केशवचंद्र सेन यांची मुंबईस भेट.

विश्वनाथ काशिनाथ राजवाडे ज० ( मृ० १९२६ )

विष्णु गोविंद विजापूरकर ज० ( मृ० १९२६ )

शेणवी जातींतला पहिला पुनर्विवाह. पुणें. ×

१८६५

नारायण हरी भागवत मृ० ( ज० १८४९)

नाना शंकरशेट मृ० ( ज० १८०३ )

गोविंद सखाराम सरदेसाई ज०

मुंबई विधवाविवाहोत्तेजक मंडळ स्थापना

महादेवशास्त्री कोल्हटकर मृ० ( ज० १८२२ )

गोविंद नारायण शेणवी माडगांवकर मृ० ( ज० १८१५ )

रामचंद्र विनायक टिकेकर ( धनुर्धारी ) ज० ( मृ० १९०७ )

१८६६

पहिले एलएल. बी. ( म. गो. रानडे आणि बा. मं. वागळे )

कृष्णाजी केशव दामले ( केशवसुत ) ज० ( मृ० १९०५ )

गोपाळ कृष्ण गोखले ज० ( मृ० १९१५ )

न्यायाश्रय मासिक सुरू. पुणें.

१८६७

मुंबई प्रार्थनासमाजाची स्थापना.

× पं. सि. पाटील फुले चरित्र पृ. ५०-१

भास्करराव विठोजीराव जाधव ज०
शंकर आबाजी भिसे ज० (मृ० १९३५)
पूना असोसिएशन, स्थापना.
मुंबई वक्तृत्वोत्तेजक सभा. स्थापना.
अमरावती शहर वाचनालय. स्थापना.
विविधज्ञानविस्तार सुरू. मुंबई.

१८६८

डेक्कन कॉलेज. स्थापना. पुणें. (बंद १९३४)
आय. सी. एस. परीक्षेस पहिला महाराष्ट्रीय विद्यार्थी गेला. (श्रीपाद बाबाजी ठाकूर)
विद्याकल्पतरू मासिक सुरू ठाणें. व बडोदें.
सुमार्गदर्शक मासिक. रत्नागिरी. सुरू.

१८६९

पहिला पुनर्विवाह मुंबई.
निर्णयसागर छापखाना. मुंबई. स्थापना.
लक्ष्मण काशिनाथ किर्लोस्कर ज०
खंडेराव चिंतामण मेहंदळे ज० (मृ० १९३४)
स्त्रीज्ञानप्रदीप मासिक, ठाणें. सुरू.
सुएजचा कालवा उघडला.

१८७०

पुणें येथील पुनर्विवाहविषयक वाद.
पुणें प्रार्थनासमाज स्थापना.
खंडेराव गायकवाड मृ०
न्यायदीपिका मासिक सुरू.
सार्वजनिक सभा, पुणें. स्थापना.
पार्वतीबाई आठवले ज०
नारायण गोविंद चाफेकर ज०
गोविंद चिमणाजी भाटे ज०

१८७१

वक्तृत्वोत्तेजक सभा, पुणें. स्थापना.
दंभहारक मासिक सुरू. मुंबई (बंद १८७५)
विष्णुबुवा ब्रह्मचारी मृ० (ज० १८२५)
वासुदेव गोविंद आपटे ज० (मृ० १९३०)
श्रीपाद कृष्ण कोल्हटकर ज० (मृ० १९३४)
गोपाळ कृष्ण देवधर ज०

१८७२

'ज्ञानसंग्रह' मासिक. वऱ्हाड. सुरू. (बंद १८७४)
नरसिंह चिंतामण केळकर ज०
कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर ज०
'देशसुधारणेच्छु' (गोमंतक) मासिक सुरू. (गोव्यांतील पहिलें मराठी नियतकालिक)
सिव्हिल मॅरेज ॲक्ट.

१८७३

सत्यशोधक समाज, पुणें. स्थापना.
विठ्ठल रामजी शिंदे. ज०
सार्वजनिक सभा, पुणें–मार्फत महाराष्ट्राची सांपत्तिक दृष्ट्या पहाणी.
फुले यांची 'गुलामगिरी' प्रसिद्ध.

१८७४

गोविंद त्र्यंबक दरेकर (गोविंद) ज० (मृ० १९२६)
†डॉ. भाऊ दाजी मृ० (ज० १८२२)

---

†[केळकर टि. च.) १८७३

'निबंधमाला' सुरू ( बंद १८८१ )
परशुरामतात्या गोडबोले मृ० ( ज० १७९९ )
विठोबा अण्णा दप्तरदार मृ० (ज० १८१३)
भास्कर रामचंद्र तांबे ज०
मिश्रविवाहाचा कायदा.
रानडे यांचा जबाबदार राज्यपद्धतीच्या मागणीचा अर्ज.
कथारत्नावली मासिक सुरू. मुंबई.
वऱ्हाड शालापत्रक सुरू. अमरावती.
सत्यदीपिका ( नवी ) मासिक, पुणें. सुरू.
महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी. पुणें. स्थापना.

१८७५

कथाकल्पतरू मासिक, मुंबई. सुरू.
थिऑसाफिकल सोसायटी, मुंबई. स्थापना.
वेदोक्त सद्धर्मविचार मासिक सुरू. मुंबई.
वसंतव्याख्यानमाला, पुणें. स्थापना.
दत्तात्रय कोंडो घाटे ( दत्तकवि ) ज० ( मृ० १८९९ )
मल्हारराव गायकवाड यांची पदच्युति.
सयाजीराव गायकवाड यांस राज्यप्राप्ति.
शेतकऱ्यांचे ( दक्षिणचे ) दंगे.
बालहत्या–प्रतिबंधक गृह व अनाथ बालकाश्रम. पंढरपूर. स्थापना.
दयानंद सरस्वतींचें पुण्यास आगमन.
गर्दभानंदाची मिरवणूक.
आर्यसमाजाची स्थापना ( मुंबई )
बापूजी मार्तंड आंबेकर ज० (मृ० १९३४
श्रीपाद बलवंत तांबे ज०
स्वदेशी प्रदर्शन – पुणें.

१८७६

रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे ज०
अबलामित्र मासिक सुरू. अलीबाग.
वेदार्थयत्न मासिक सुरू. मुंबई.
शिल्पकलासंग्रह मासिक, पुणें. सुरू.
शेतकी त्रैमासिक, पुणें. सुरू.

१८७६–७

महाराष्ट्रांतील दुष्काळ.

१८७७

व्हिक्टोरिया महाराणी 'हिंदुस्थानची बादशाहीण' हा किताब धारण करते.
'दीनबंधु' सुरू. पुणें.
टॉमस कँडी मृ० ( ज० १८०६ )
षड्दर्शनाचिंतनिका मासिक, पुणें. सुरू.

१८७८

वर्तमानपत्रांच्या मुस्कटदाबीचा कायदा
कृष्णशास्त्री चिपळूणकर मृ० ( ज० १८२४ )
धूतपापेश्वर आरोग्यमंदिर आर्यौषधि कारखाना, पनवेल. स्थापना.
मराठी ग्रंथकारांचें संमेलन–पुणें. १ लें मराठी साहित्यसंमेलन (लोकहितवादी)
उपयुक्त ज्ञानसागर मासिक सुरू, पुणें.
काव्येतिहास संग्रह मासिक. सुरू.
निबंधसार मासिक सुरू. पुणें.

वेदांतसमूह मासिक सुरू, पुणें

टोळधाड—कुलाबा, ठाणा, पुणें, सातारा.

१८७९

अच्युत बळवंत कोल्हटकर ज०
( मृ० १९३१ )

कुर्तकोटी – शंकराचार्य ज०

नारायण मल्हार जोशी ज०

ब्लॅव्हॅट्स्की यांचें मुंबईंत आगमन.

वर्तमानपत्रकर्त्यांचें संमेलन—मुंबई.
( ज. सु. कीर्तीकर )

नाव्यकथार्णव मासिक सुरू. मुंबई.

भारतवर्ष मासिक सुरू. पुणें.

विश्रामबाग व बुधवारवाड्यास आग.

वासुदेव बळवंत फडके—कैद; खटला; शिक्षा.

१८८०

खोती ॲक्ट.

ऐतिहासिक नाटकमाला मासिक सुरू.
अलीबाग.

पुष्पगुच्छ मासिक सुरू. मुंबई.

पांडुरंग वामन काणे ज०

दत्तात्रय विष्णु आपटे ज०

गणेश वासुदेव जोशी ( सार्वजनिक काका )
मृ० ( ज० १८१८ )

माधव श्रीहरि अणे ज०

न्यू इंग्लिश स्कूल—पुणें. स्थापना.

१८८१

'केसरी' पत्र सुरू. पुणें.

'मराठा' सुरू. पुणें.

वामन गोपाळ ( वीर वामनराव ) जोशी ज०

श्रीपाद कृष्ण बेलवलकर ज०

बालविवाहप्रतिबंधक संस्था, पुणें, स्थापना.

बालबोध मासिक सुरू. मुंबई.

वीरपत्नी मासिक सुरू. मुंबई.

१८८२

वेदपाठशाळा, पुणें, स्थापना.

पंडिता रमाबाई यांचें पुण्यास आगमन.

पांडुरंग दामोदर गुणे ज० (मृ० १९२२)

विष्णुशास्त्री चिपळूणकर मृ० (ज० १८५०)

दादोबा पांडुरंग मृ० ( ज० १८१४ )

वामन मल्हार जोशी ज०

वालचंद हिराचंद ज०

कँप एज्युकेशन सोसायटी, पुणें. स्थापना.

लोकहितवादी मासिक सुरू.

सार्वत्रिक टोळधाड.

कोल्हापूर – प्रकरण.

राजहंस मासिक सुरू.

पदच्युत मल्हारराव होळकर मृ०

मालिका मासिक सुरू. पुणें.

निबंधचंद्रिका, रत्नागिरी. सुरू.

चित्रदर्शन मासिक, रत्नागिरी, सुरू.

तत्त्वविवेक मासिक, पुणें, सुरू.

१८८३

इल्बर्ट बिल.

वासुदेव बळवंत फडके मृ० (ज० १८४५)

कुवलयानंद—श्री. गुणे ज०

विनायक दामोदर सावरकर ज०

१८८४

डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें, स्थापना.
फर्ग्युसन कॉलेज, पुणें, स्थापना.
श्रीधर व्यंकटेश केतकर ज०
डॉ. गोपाळ विनायक देशमुख ज०
महाराष्ट्र गर्ल्स् एज्युकेशन सोसायटी, (हुजुरपागा) पुणें. स्थापना.
शांबाकृष्णाजी सूर्यराव सरदेसाई ज०
आर्यमित्र मासिक सुरू.
कादंबरी कलाप मासिक सुरू. पुणें.
बालसुमित्र मासिक सुरू, मुंबई.
संगीतमीमांसक. पुणें. सुरू.
ज्ञानदीप मासिक मुंबई सुरू

१८८५

मराठी ग्रंथकारांचें संमेलन. पुणें.
रावजी सखाराम राऊत मृ० (ज० १८३९)
बळवंत पांडुरंग (अण्णा) किर्लोस्कर मृ० (ज० १८४३)
इन्डियन नॅशनल कॉंग्रेस (राष्ट्रीय सभा) * स्थापना (मुंबई)
राम गणेश गडकरी ज० (मृ० १९१९)
केरो लक्ष्मण छत्रे मृ० (ज० १८२४)
धन्वंतरी मासिक सुरू, पुणें.
नीत्युपदेश मासिक सुरू, मुंबई.
विविधकलाविस्तार मासिक सुरू, बडोदें.
सृष्टिज्ञान मासिक. मुंबई. सुरू.
हिंदुधर्मविवेचक मासिक, पुणें, सुरू

[ष्ट्र सांवत्सरिकः १८८४]

१८८६

तुकोजीराव होळकर मृ०
भगीरथ ऊ. जयाजी शिंदे मृ०
बजाबा रामचंद्र प्रधान मृ० (ज० १८३८)
विष्णु गंगाधर केतकर ज०
वामन रामचंद्र कोकटनूर ज०
राष्ट्रीय सभा २ रें अधिवेशन — कलकत्ता

१८८६--७

रखमाबाई प्रकरण.

१८८७

बाळ मंगेश वागळे मृ० (ज० १८३८)
डॉ. आनंदीबाई जोशी मृ०
राष्ट्रीय सभा ३ रें अधिवेशन. मद्रास.
मराठा ऐक्येच्छू समाज मुंबई. स्थापना.
* सामाजिक परिषदेची स्थापना, मद्रास.
केरळकोकिळ मासिक सुरू.
काव्यरत्नावली मासिक सुरू.
अहमदनगर एज्युकेशन सोसायटी स्थापना.

१८८७–८८

आनंदाश्रम, पुणें. स्थापना.

---

* "(१८८५) डिसेंबराच्या अगदीं अखेरीला मुंबईला कॉंग्रेसची बैठक झाली आणि त्या बैठकींतच सामाजिक परिषदेचा पाया घालण्यांत आला." असें फाटक म्हणतात (न्या. रानडेचरित्र पृ. ३८७). कांग्रेसच्या पहिल्या दोन बैठकींत सामाजिक सुधारणांवर नुसती चर्चाच झाली. परिषदेची स्थापना १८८७ मध्यें झाली. (तेलंगचरित्र पृ. २३४)

१८८८

'सुधारक' सुरू. पुणें.
महादेव मोरेश्वर कुंटे मृ० (ज० १८३५)
नारायण श्रीपाद राजहंस (बालगंधर्व) ज०
राष्ट्रीय सभा ४ थें अधिवेशन, अलाहाबाद.
शिक्षण प्रसारक मंडळी, पुणें. स्थापना.
ब्राह्मणसभा, मुंबई. स्थापना.
लॉर्ड रे इन्डस्ट्रिअल म्युझिअम. पुणें. स्थापना.

१८८८–९

क्रॉफर्ड प्रकरण.

१८८९

पंडिता रमाबाईचें शारदासदन. मुंबई.
राष्ट्रीय सभा ५ वें अधिवेशन, मुंबई.
प्रान्तिक परिषद २ री. पुणें.
गणेश विठ्ठल कुळकर्णी ज० (मृ० १९२१)

१८९०

जोतीराव फुले मृ० (ज० १८२८)
प्रान्तिक परिषद ३ री. पुणें.
पंचहौद मिशनमधील चहापान.
जनार्दन बाळाजी मोडक मृ० (ज० १८४५)
शिक्षण प्रसारक मंडळ, राजापूर. स्थापना.
पं. रमाबाईंचें 'शारदासदन' पुण्यास आलें.
धि इन्डस्ट्रियल असोसिएशन ऑफ वेस्टर्न इन्डिया. स्थापना.
औद्योगिक परिषद्–स्थापना.
फुलमानी–प्रकरण.
हिंदुमुसलमानांचा दंगा. बेळगांव.
मुंबईंतील म्युनिसिपल भंग्यांचा संप.
कित्ते-भंडारी ऐक्यवर्धक मंडळी. मुंबई. स्थापना.
राष्ट्रीय सभा ६ वें अधिवेशन, कलकत्ता.
संमतिवयाचा वाद.

१८९१

स्वदेशी चळवळ.
संमतिवयाचा कायदा पास.
विनायक जनार्दन कीर्तने मृ० (ज० १८३९)
दत्तो वामन पोतदार ज०
राष्ट्रीय सभा ७ वें अधिवेशन, नागपूर.
शाळीग्राम यांचें पोवाड्याचें पुस्तक.
प्रान्तिक परिषद ४ थी. पुणें.
हिंदुमुसलमानांचे दंगे. प्रभासपट्टण.
वामन दाजी ओक, मृ० (ज० १८४४)
लोकमित्र मासिक सुरू.

१८९१-२

पंचहौद मिशनचहाग्रामण्य प्रकरण. पुणें.
स्वामी विवेकानंद यांची पुण्यास भेट

१८९२

नारायणराव पवार (देवास–२) मृ०
मल्हारराव पवार (देवास–२) राज्यप्राप्ति.
टांकसाळी बंद.
जावजी दादाजी चौधरी मृ० (ज० १८३५)
कौन्सिल ॲक्ट.

लोकहितवादी ऊ० गो. ह. देशमुख मृ०
(ज० १८२३)
वामन शिवराम आपटे मृ०
(ज० १८५८)
राष्ट्रीय सभा ८ वें अधिवेशन, अलाहाबाद.
न्या. रानडे यांचा 'हिंदी अर्थशास्त्रा'वरील
निबंध प्रसिद्ध.
प्रान्तिक परिषद् ५ वी. पुणें.
दादाभाई नवरोजी पार्लमेंटचे मेंबर झाले.

१८९३

टिळककृत 'ओरायन' प्रसिद्ध झालें.
काशिनाथ त्र्यंबक तेलंग मृ० (ज० १८५०)
राष्ट्रीय सभा ९ वें अधिवेशन, लाहोर.
हिंदु-मुसलमानांचा दंगा—मुंबई, पुणें, रावेर,
येवलें, आळंदी, तळेगांव, वांई, धुळें.
प्रान्तिक परिषद् ६ वी. अहमदाबाद.
आनंदराव सखाराम बर्वे मृ०
(ज० १८४५)
गणपत्युत्सव सुरू.
मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणें. स्थापना.
कृष्णाजी लक्ष्मण नूलकर मृ०
(ज० १८३०)

१८९४

राष्ट्रीय सभा. १० वें अधिवेशन. मद्रास
भास्कर हरि भागवत मृ० (ज० १८३
शंकर पांडुरंग पंडित मृ० (ज० १८४

महादेव चिमणाजी आपटे मृ०
(ज० १८४
डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी
पुणें. स्थापन
बाँबे बँकिंग कंपनी. स्थापना.
बापट कमिशन.
प्रान्तिक परिषद ७ वी. मुंबई.
ग्रंथमाला मासिक सुरू. कोल्हापूर.
विधवाविवाहोत्तेजक मंडळ. पुणें. स्थापना.
पुनर्विवाहितांचा कुटुंबमेळा. १ ला. पुणें.

१८९५

मासिक मनोरंजन. मुंबई. सुरू.
सामाजिक परिषदेच्या मंडपाचा वाद.
रायगड स्मारक मंडळ. स्थापना.
सोशल क्लब. पुणें. स्थापना.
गोपाळ गणेश आगरकर मृ०
(ज० १८५६)
वासुदेव बाळकृष्ण केळकर मृ०
(ज० १८६०)
राष्ट्रीय सभा ११ वें अधिवेशन, पुणें.
ग्रंथसंपादक व ग्रंथप्रकाशक मंडळी.
मुंबई. स्थापना.

१८९६

अनाथबालिकाश्रम अथवा 'हिंदु वुइडोज्
होम.' पुणें. स्थापना.
ना.

कृष्णाजी परशुराम गाडगीळ मृ०
( ज० १८४७ )
नीळकंठ जनार्दन कीर्तने मृ०
( ज० १८४४ )
राजारामशास्त्री बोडस मृ०
माधवराव बल्लाळ नामजोशी मृ०
डॉ. अण्णा मोरेश्वर कुंटे मृ०
( ज० १८४४ )
प्लेग व दुष्काळ.

१८९६-७

वेल्बी कमिशन.

१८९७

रँड आणि आयर्स्ट यांचा खून–पुणें.
केसरी पत्र ( पुणें ) खटला.
टिळकांना राजद्रोहाची पहिली शिक्षा.
वामन आबाजी मोडक मृ०
( ज० १८३५ )
वामन दाजी ओक मृ० ( ज० १८४५ )
राष्ट्रीय सभा १३ वें अधिवेशन, उमरावती.
आर्यन एज्युकेशन सोसायटी, मुंबई.
स्थापना.
नातुबंधूंना अटक.
ऐतिहासिक लेखसंग्रह मासिक सुरू. मिरज.
द्रविडबंधूंचा खून.
गोखले माफी–प्रकरण.
काशिनाथ गोविंद नातु मृ०
( ज० १८४० )
पुनर्विवाहितांचा कुटुंबमेळा २ रा,
अमरावती.
नारायण बापूजी कानिटकर मृ०
( ज० १८५२ )

१८९८

आनंदराव पवार ( धार ) मृ०
उदाजीराव पवार ( धार ) राज्यप्राप्ति.
मुसलमानांचा प्लेगमुळें दंगा.
आत्माराम पांडुरंग मृ० ( ज० १८२३ )
शंकर बाळकृष्ण दीक्षित मृ०
गणेश सदाशिवशास्त्री लेले मृ०
( ज० १८२५ )
गणेश सखाराम महाजनी ज०
राष्ट्रीय सभा १४ वें अधिवेशन. मद्रास.
तुकाराम तात्या पडवळ मृ०
( ज० १८३६ )
अण्णा मार्तंड जोशी मृ० ( ज० १८४८ )
नारायण मेघाजी लोखंडे मृ० ( ज० १८४८ )
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय. स्थापना.

१८९९

श्रीधर विठ्ठल दाते मृ० ( ज० १८३९ )
राष्ट्रीय सभा १५ वें अधिवेशन, लखनौ.
'गुराखी' पत्रा ( मुंबई ) वर
राज्यद्रोहाचा खटला.
जी. आय्. पी. रेल्वेच्या तारमास्तरांचा संप.
दत्तात्रय व्यंकटेश पै. ज०
दत्तात्रय कोंडो घाटे ( दत्त कवि ) मृ०
( ज० १८७५ )
नातुबंधूंची सुटका.
सूर्याजी सदाशिव महात्मे मृ०
( ज० १८३३ )

बापूसाहेब कुरुंदवाडकर, मृ० (ज० १८३८)
कृष्णाजी पवार (देवास-१) मृ०
तुकोजीराव पवार (देवास-१) राज्यप्राप्ति.

१८९९

हरी महादेव पंडित मृ० (ज० १८४९)
शंकर मोरो रानडे मृ० (ज० १८५०)

१८९९-१९००

मुंबई इलाख्यांतील दांडगा दुष्काळ.

१९००

पुरुषोत्तम गोविंद नाडकर्णी मृ० (ज० १८४४)
दख्खनभर टोळधाड.
न्या० रानडे यांचें 'दि राइज ऑफ दि मराठा पॉवर' प्रसिद्ध झालें.
'कालिदास' पत्रा (काशी) वर (१५३ अ) खटला.
पी. वाय. सी. हिंदु जिमखाना, पुणें. स्थापना.
र. पु. परांजपे रँगलर झाले.
लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर मृ० (ज० १८५२)
राष्ट्रीय सभा १६ वें अधिवेशन, लाहोर.
प्रान्तिक परिषद, सातारा.
नाना फडणिस शतसांवत्सरिक उत्सव, वेळास.
श्रीपाद रामचंद्र टिकेकर ज०

१९०१

व्हिक्टोरिया महाराणी मृ०
धनंजय रामचंद्र गाडगीळ ज०
महादेव गोविंद रानडे मृ० (ज० १८४२)
भाऊराव कोल्हटकर मृ०
रामचंद्र भिकाजी गुंजीकर मृ० (ज० १८४३)
विष्णु मोरेश्वर भिडे मृ० (ज० १८२७)
कृष्णशास्त्री राजवाडे मृ० (ज० १८२०)
राष्ट्रीय सभा १७ वें अधिवेशन, कलकत्ता.
महाराष्ट्रमित्र मंडळी, रंगून. स्थापना.
प्रांतिक परिषद ११ वें अधिवेशन, मुंबई.
हिंदु एज्युकेशन फंड, मुंबई. स्थापना.

१९०२

प्रान्तिक परिषद १२ वें अधिवेशन. सोलापूर.
राष्ट्रीय सभा १८वें अधिवेशन. अहमदाबाद.
हरिकिशोर पत्र (यवतमाळ) सुरू.
हिंदुस्थान सरकारनें निजामाकडून वऱ्हाड कायमच्या भाड्यानें घेतला.
इंदूरकर शिवाजी महाराजांचा राज्यत्याग.

१९०२-१९०३

वेदोक्त प्रकरण. कोल्हापूर.

१९०३

मुं. प्रांतिक परिषद १३ वें अधिवेशन. धारवाड.
टिळककृत 'आर्टिक होम इन् दि वेदाज्' प्रसिद्ध.

श्रीधर गणेश जिन्सीवाले मृ०

( ज० १८५२ )

राष्ट्रीय सभा १९ वें अधिवेशन. मँद्रास.

दिल्ली दरबार–एडवर्ड राज्यारोहण.

१९०४

राष्ट्रीय सभा २० वें अधिवेशन. मुंबई.

पैसाफंड कमिटी स्थापना.

गोविंद शंकर शास्त्री बापट मृ०

( ज० १८४४ )

पुराणवस्तुसंरक्षण कायदा.

१९०५

कृष्णाजी केशव दामले ( केशवसुत ) मृ०

( ज० १८६६ )

बहिष्काराच्या चळवळीस प्रारंभ.

वंगभंगाची चळवळ.

विलायतेमध्यें हिंदी शिष्टमंडळ. मुंबई इलाख्या तर्फे गोखले गेले.

मराठी साहित्य संमेलन २ रें अधिवेशन. सातारा. ( करंदीकर )

सर्व्हंट्स् ऑफ इन्डिया सोसायटी स्थापना. पुणें.

बंगालची फाळणी.

राष्ट्रीय सभा २१ वें अधिवेशन. काशी.

भाला (पुणें) पत्रावर राजद्रोहाचा खटला.

स्पिसि बँक. स्थापना.

मद्यपाननिषेध चळवळ सुरू.

१९०६

डेक्कन जिमखाना. पुणें. स्थापना.

गोवर्धन संस्था, वांई, पुणें व मुंबई. स्थापना.

महाराष्ट्र-साहित्य-परिषद, स्थापना.

सदाशिव पांडुरंग केळकर मृ०

( ज० १८४८ )

महादेव शिवराम गोळे मृ० (ज० १८५८)

बाबा पदमनजी मृ० ( ज० १८३१ )

राष्ट्रीय सभा २२ वें अधिवेशन. कलकत्ता.

भालाकार भोपटकर–राजद्रोहाबद्दल शिक्षा.

मराठी साहित्य संमेलन ३ रें पुणें. (कानिटकर)

स्वदेशी कोऑपरेटिव्ह स्टोअर्स. मुंबई. स्थापना.

समर्थ विद्यालय कोल्हापूर. स्थापना.

१९०७

खेळगडी मासिक, महाड. सुरू.

लाला लजपतराय हद्दपार झाले.

मुं. प्रांतिक परिषद १४ वें अधिवेशन, सुरत.

आबाजी विष्णु काथवटे मृ०

( ज० १८४६ )

सभाबंदीचा कायदा.

श्रीमंत नानासाहेब पंतप्रतिनिधि यांच्याविषयीं कमिशन.

हेटकरी भंडारी मंडळ. मुंबई. स्थापना.

‘ हरिकिशोर ’ ( यवतमाळ ) पत्रावर राजद्रोहाचा खटला.

राष्ट्रीय सभा २३ वें अधिवेशन. सुरत.

वासुदेव बाबाजी नवरंगे मृ०

( ज० १८२८ )

रामचंद्र विनायक टिकेकर ऊ. 'धनुर्धारी' मृ० (ज० १८६५)
म. साहित्य सं. ४ थें. पुणें. (महाजनि)
अफगाण अमीर हबिबुल्ला यांची पुण्यास भेट.

१९०८

टिळकांना राजद्रोहास्तव ६ वर्षें शिक्षा.
राजाराम रामकृष्ण भागवत मृ०
'काळ' (पुणें) पत्रावर राजद्रोहाचा खटला.
'विहारी' अरुणोदय (मुंबई); प्रतोद (इस्लामपूर); स्वराज्य (सोलापूर) हरकिशोर (यवतमाळ) या पत्रांवर राजद्रोहाचा खटला.
अच्युत बळवंत कोल्हटकर-राजद्रोहाचा खटला.
सोकर बापू त्रिलोकेकर मृ० (ज० १८३६)
मुष्टिफंड संस्था, नवीन गोवें. स्थापना.
ज्ञानप्रसारक मंडळी, म्हापसें, स्थापना.
बॅ. सावरकरांचें बोटींतून फ्रान्समध्यें पलायन.
प्रेस ॲक्ट.
मुं. प्रांतिक परिषद १५ वें अधिवेशन. धुळें.
गिरणी मजुरांचा संप. मुंबई.
मुझफरपूर येथें क्रांतिकारकांचा अत्याचार.
राष्ट्रमत दैनिक सुरू. मुंबई.
समर्थ विद्यालय तळेगांव दाभाडें. स्थापना (स्थलांतर)
पैसा फंड. } कांचशाळा. } तळेगांव दाभाडे स्थापना.
तारखात्यांतील सिग्नलरांचा संप.
सरदार बहादूर दस्तुर हुसेन जमास्प मृ०
मल्हार खंडेराव चिटणीस मृ०
संकेश्वर शंकराचार्यांचा तंटा.
पहिली रयतसभा. सांगली.
विश्ववृत्त, कोल्हापूर, राजद्रोहाचा खटला.
मराठी साहित्य संमेलन ५ वें. पुणें. (चिंतामणराव वैद्य.)
'हिंदी केसरी,' नागपूर राजद्रोहाचा. खटला.
फत्तेसिंगराव गायकवाड मृ० (ज० १८८२)
इतिहाससंग्रह मासिक. मुंबई. सुरू.
व्ही. व्ही. नारळीकर ज०
राष्ट्रीय सभा २४ वें अधिवेशन. मद्रास.
'ज्ञानप्रकाश'वर कोर्टाच्या बेअदबीचा खटला-माफी.
'मराठा' पत्रावर कोर्टाच्या बेअदबीचा खटला. केळकरांस शिक्षा.
शिवाजीराव होळकर, इंदूर. मृ०

१९०९

मोर्ले-मिन्टो सुधारणा.
* सेवासदन. पुणें. स्थापना.
राष्ट्रीय सभा २५ वें अधिवेशन. लाहोर.
अनाथ विद्यार्थी गृह, पुणें. स्थापना.
जॅक्सनचा खून. नाशिक.
मूकविद्यालय. बडोदें. स्थापना.

*[सदर संस्थेच्या १९३३ च्या अहवालावर "Established 1910" अशी नोंद आहे]

मुंबई प्रांतिक निवडणुकी.
दाजीशास्त्री पदे मृ०
ग. दा. सावरकर यांवर खटला.
राष्ट्रोदय मासिक. नाशिक. सुरू.
( सं० सी. के. दामले )
ग्वाल्हेर येथील बाँबचा खटला.
डेक्कन ॲग्रिकल्चरल असोशिएशन. पुणें. स्थापना.
शिवराम महादेव परांजपे यांची सुटका.
औंध प्रकरण. बाळासाहेबांस अधिकारप्राप्ति.
किर्लोस्कर नाटकगृह उद्‌घाटन – पुणें.
अण्णासाहेब विजापूरकर आणि वा. म. जोशी यांस राजद्रोहाबद्दल शिक्षा.
'काळ' (पुणें) पत्रावर राजद्रोहाचा खटला.
देशसेवक [ सं० ओगले ]. नागपूर. राजद्रोहाचा खटला.
'देशसेवक'चे संपादक शंभुराव गाडगीळ यांच्यावर राजद्रोहाचा खटला.
म० साहित्य संमेलन–६ वें, अधिवेशन बडोदें [ कीर्तिकर ]
काव्यसंग्रह मासिक बंद.

१९१०

'सच्चिदानंद स्वामी'. राजद्रोहाचा खटला व शिक्षा.
शंकर श्रीकृष्ण देव, खटला व शिक्षा.
किर्लोस्कर वाडी. स्थापना.
सप्तम एडवर्ड मृ०
भारत इतिहास संशोधक मंडळ. पुणें. स्थापना.
राष्ट्रीय सभा. २६ वें अधिवेशन. अलाहाबाद.
रानडे इन्डस्ट्रियल ॲण्ड इकॉनॉमिक इन्स्टिटय़ूट. पुणें. स्थापना.
चान्द्रसेनीय कायस्थप्रभु शिक्षणोत्तेजक संस्था. पुणें व मावळ. स्थापना.
भारत-गौरव-ग्रंथमाला सुरू.

१९११

राष्ट्रीय सभा २७ वें अधिवेशन, कलकत्ता.
मोडक व नागपूरकर, राजकीय खुनाचा खटला.
बसु बिल.
सावरकरांना जन्मठेप.
दिल्लीदरबार.
बंगालची फाळणी रद्द.
पंचम जॉर्ज व मेरी यांचें हिंदुस्थानांत आगमन.
पांडुरंग गोविंदशास्त्री पारखी मृ० (ज० १८४४)
श्रुतिबोध मासिक, मुंबई. सुरू (बंद १९१४)
मुंबई समाजशुद्धि मंडळ, स्थापना.

१९१२

राष्ट्रीय सभा २८ वें अधिवेशन. बांकीपूर.
सारस्वत ब्राह्मण समाज मडगांव. गोवा. स्थापना.
पब्लिक सर्व्हिस कमिशन.
गोखल्यांचें आफ्रिकेस प्रयाण व आगमन.

लोकशिक्षण मासिक सुरू.
मराठी साहित्य संमेलन ७ वें अकोला, [ह. ना. आपटे.]
मुंबई प्रांतिक निवडणुकी.
गौड सारस्वत ब्राह्मण स्कॉलरशिप लीग, मुंबई. स्थापना.
मराठी ग्रंथालय. पुणें. स्थापना.

१९१३

राष्ट्रीय सभा, २९ वें अधिवेशन, कराची.
अनाथ विद्यार्थीगृह, अहमदनगर, स्थापना.
महाराष्ट्र साहित्य पत्रिका, मुंबई (विविध-ज्ञान विस्तारान्तर्गत)
कुडाळदेशस्थ गौड ब्राह्मण निराश्रित सहाय्यकारी फंड. मुंबई. स्थापना.
पुनर्विवाहितांचा कुटुंबमेळा. ३ रा, पुणें.
आयुर्वेद प्रसारक मण्डळी, सातारा. स्थापना.

१९१४

गजानन मिल्स सांगली, स्थापना.
हनुमान व्यायाम प्रसारक मंडळ, अमरावती. स्थापना.
युरोपियन महायुद्धाची सुरवात.
टिळकांची मंडालेहून सुटका.
बळवंत रामचन्द्र ऊर्फ बाळासाहेब नातु मृ०
ऑटोमिडीनचा शोध [मिसे]
राष्ट्रीय सभा. ३० वें अधिवेशन. मद्रास.
खानदेश शिक्षण मंडळ. अमळनेर.
सीताराम तुकाराम सुर्वे, हरि रामचन्द्र देसाई, कमलाकर रामचन्द्र सुमन्त — पुणें. राजद्रोहाचा खटला व शिक्षा.

१९१५

डिस्ट्रिक्ट असोसिएशन, यवतमाळ, स्थापन
मराठी साहित्य संमेलन ८ वें. मुंबई. (बाळासाहेब मिरजकर
मुंबई प्रांतिक निवडणुकी.
ओगले ग्लास वर्क्स, औंध. स्थापना.
मुं० प्रांतिक परिषद अधिवेशन. पुणें.
गोपाळ कृष्ण गोखले मृ० (ज० १८६६)
विनायक कोंडदेव ओक मृ० (ज० १८४०)
राष्ट्रीय सभा ३१ वें अधिवेशन. मुंबई.
टिळकांचें ‘गीतारहस्य’ प्रसिद्ध झालें.
पिरोजशहा मेथा मृ० (ज० १८४५)

१९१६

तेली ज्ञानोत्तेजक फंड. मुंबई. स्थापना.
श्रीधर रामकृष्ण भाण्डारकर मृ० (ज० १८५८)
दाजी आबाजी खरे मृ०
गोविंद बल्लाळ देवल मृ०
राष्ट्रीय सभा. ३२ वें अधिवेशन. लखनौ.
श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी, इन्डियन वुइमेन्स युनिव्हर्सिटी. पुणें. स्थापना.
भारतसेवक मासिक सुरू.
इंडियन होमरूल लीग (हिंदी स्वराज्य संघ) स्थापना. बेळगांव.
मुंबई प्रांतिक परिषद, १८ वें अधिवेशन. बेळगांव.
सरस्वती सेवक मंडळ आणि श्री दामोदर वाचन-मंदीर, मडगांव, गोवें, स्थापना.

श्री सरस्वती भवन पाठशाळा. औरंगाबाद. स्थापना.
मराठी ज्ञानकोशाचें कार्य सुरू.
लखनौ हिंदु–मुस्लिम पॅक्ट.
टिळकांचा ६१ वा वाढदिवस.
टिळकांवर जामिनकीची नोटीस, खटला व दोषमुक्तता.

१९१७

हनुमान आखाडा, यवतमाळ स्थापना
दीनानाथ विष्णु माडगांवकर मृ० ( ज० १८४७ )
अण्णासाहेब पटवर्धन ( महर्षि ) मृ० ( ज० १८४७ )
कान्होबा रणछोडदास कीर्तिकर मृ० ( ज० १८४९ )
दादाभाई नवरोजी मृ० ( ज० १८२५ )
जबाबदारीच्या स्वराज्याची घोषणा. ( ऑगस्ट २० )
मुं० प्रांतिक परिषद अधिवेशन – नाशिक.
म० साहित्य सं० ९ वें, इंदूर, [ग. ज. आगाशे]
भाण्डारकर प्राच्य संशोधन मंदिर. पुणें, (स्थापना)
बयाबाई आपटे ( बाजीराव पेशवे यांची कन्या ) मृ०
राष्ट्रीयसभा ३३ वें अधिवेशन, कलकत्ता.
कोंकण एज्युकेशन सोसायटी, महाड. स्थापना.

१९१८

हिंदुस्थानभर इन्फ्लुएंझाची साथ.
मुंबई प्रांतिक निवडणुकी.
राष्ट्रीय सभा, ३४ वें अधिवेशन, दिल्ली.
शिवाजी मराठा सोसायटी, पुणें. स्थापना.
गोखले एज्युकेशन सोसायटी, मुंबई. स्थापना.
नारायणराव वैद्य. दमोह ( म० प्रां० ) राजद्रोहाचा खटला व शिक्षा.
पटेल बिल ( मॅरेज ).
युरोपियन महायुद्ध समाप्ति (नोव्हें० ११)
वैश्यहितवर्धक समाज, मुंबई, स्थापना.
परशुराम एज्युकेशन सोसायटी (चिपळूण) स्थापना.
हिंदविजय जिमखाना बडोदें, स्थापना.
मॉंटेग्यू–चेम्स्फर्ड रिफॉर्म्स्–रिपोर्ट.
गोविंद वासुदेव कानिटकर मृ० ( ज० १८५४ )
सिडिशन कमिटीचा रिपोर्ट.
हिंदी–स्वराज्य–संघाच्या शिष्ट-मंडळाचें विलायतेस प्रयाण.
गणपत नारायण कुळकर्णी मृ०

१९१८–१९१९

मुंबई इलाखाभर दुष्काळ

१९१९

टिळक वि. चिरोल खटल्याचा टिळकांविरुद्ध निकाल–लंडन. ( फे० २१ )
स्वराज्य–संघाच्या शिष्टमंडळाचें आगमन.
गिरणी मजुरांचा संप–मुंबई.

महाराष्ट्रीय स्नेहसंवर्धक समाज दिल्ली. स्थापना.
राम गणेश गडकरी मृ० (ज० १८८५)
विनायक सखाराम घाटे मृ०
नारायण वामन टिळक मृ० (ज० १८६२)
हरि नारायण आपटे मृ० (ज० १८६४)
राष्ट्रीय सभा ३५ वें अधिवेशन, अमृतसर.

१९२०

काँग्रेस डेमॉक्रॅटिक पक्षाचा जाहीरनामा.
मुंबई प्रांतिक निवडणुकी.
गिरणी मजुरांचा संप मुंबई.
जादा राष्ट्रीय सभा — कलकत्ता (लजपतराय)
सरस्वती मंदिर पुणें, स्थापना.
बाळ गंगाधर टिळक मृ० (मृ० १८५६)
विष्णुबुवा जोग मृ० (ज० १८६४)
कृष्णाजी काशिनाथ फडके मृ०
काशिनाथ रघुनाथ मित्र मृ०
राष्ट्रीय सभा. ३६ वें अधिवेशन. नागपूर.
प्राज्ञ पाठशाळा मंडळ. वांई. स्थापना.

१९२०–१

असहकारितेची चळवळ

१९२१

टिळक राष्ट्रीय विद्यालय. खामगांव, स्थापना.
अनंत शिवाजी देसाई मृ०
वासुदेव बळवंत पटवर्धन मृ०
रंगनाथ नरसिंह मुधोळकर मृ०
राष्ट्रीय सभा, ३७ वें अधिवेशन. अहमदाबाद.
मुळशी सत्याग्रह.
हिंदुमुसलमानांचा दंगा. मालेगांव.
हिंदी स्वराज्य संघाचें नामांतर — टिळक स्वराज्य संघ — वसई.
महाराष्ट्र प्रांतिक परिषद १ लें अधिवेशन, वसई.
मराठी साहित्य संमेलन, १० वें अधिवेशन बडोदें, (केळकर.)
मॉँटफर्ड सुधारणानुसार नव्या असेंब्लीचें उद्घाटन. दिल्ली.
ना. म. जोशी सी. आय. इ. किताब नाकारतात.
मोपल्याचें बंड.
डॉ. चोळकर यांस अटक, नागपूर.
टिळक महाराष्ट्र विद्यापीठ पुणें, स्थापना.
गणेश विठ्ठल कुलकर्णी मृ० (ज० १८८९)

१९२२

पांडुरंग दामोदर गुणे मृ० (ज० १८८२)
गोपाळ विनायक जोशी मृ०
हिंदु-मुसलमानांचा दंगा. नेवासें.
महाराष्ट्रीय प्रांतिक परिषद २ रें अधिवेशन. पेण.
पं. रमाबाई मृ० (ज० १८५८)
शाहूमहाराज मृ०
राष्ट्रीयसभा ३८ वें अधिवेशन. गया.

१९२३

रविकिरण मंडळ, पुणें, स्थापना.
मुंबई प्रांतिक निवडणुकी.

नारायण गणेश चन्दावरकर मृ० (ज० १८५५)

राष्ट्रीय सभा, ३९ वें अधिवेशन, कोकोनाडा.

धि बाँबे व्हिजिलन्स असोसिएशन, मुंबई स्थापना.

हिंदु-मुसलमानांचा दंगा, नागपूर.

झेंडा सत्याग्रह, नागपूर.

महाराष्ट्र प्रांतिक परिषद, ३ रें अधिवेशन, रत्नागिरी.

१९२४

नंदुरबार, कऱ्हाड, नागपूर, गुलबर्गा, सोलापूर, अकोला, कामठी } हिंदु-मुसलमानांचा दंगा.

इंडियन रेडक्रॉस सोसायटी, यवतमाळ. स्थापना.

विनायक दामोदर सावरकर यांची सुटका.

गिरणी मजुरांचा संप-मुंबई.

वासुदेवशास्त्री खरे मृ० (ज० १८५८)

राष्ट्रीय सभा, ४० वें अधिवेशन, बेळगांव.

कैवल्यधाम, लोणावळें, स्थापना.

महाराष्ट्रीय मण्डळ, पुणें. स्थापना.

'महाराष्ट्र' (नागपूर) कोर्टाची बेअदबीचा खटला व शिक्षा.

केसरी (पुणें) हायकोर्टच्या बेअदबीचा खटला व न. चिं. केळकर यांना शिक्षा व दंड.

महाराष्ट्र प्रांतिक परिषद, ४ थें अधिवेशन जळगांव.

श्रीशिवाजी व्यायामशाळा, उमरावती, स्थापना.

१९२५

अभिनव कार्यालय (पुणे, नागपूर) स्थापना.

मल्हारराव-बाजीराव उत्सव मंडळ, इंदूर. स्थापना.

महाराष्ट्र प्रांतिक परिषद ५ वें अधिवेशन. सातारा.

माधवराव शिंदे मृ०

गिरणीमजुरांचा संप—मुंबई.

महाराष्ट्र प्रांतिक परिषद ५ वी. सातारा.

रामकृष्ण गोपाळ भांडारकर मृ० (ज० १८३७)

प्रभाकर रामकृष्ण भाण्डारकर मृ० (ज० १८६२)

सीताराम गणेश देवधर मृ०

राष्ट्रीय सभा, ४१ वें अधिवेशन, कानपूर.

चित्तरंजनदास मृ० (ज० १८७०)

१९२६

तुकोजीराव होळकर, राज्यत्याग.

कृष्णाजी नारायण आठल्ये मृ० (ज० १८५२)

दत्तात्रय बळवंत पारसनीस मृ०

विनायक लक्ष्मण भावे मृ० (ज० १८६४)

विश्वनाथ काशिनाथ राजवाडे मृ० (ज० १८६४)

विष्णु गोविंद विजापुरकर मृ० (ज० १८६४)

